

# प्रश्नोत्तरे

**एम. वासुदेवमूर्ति, खम्मम् (आंध्र)**

प्र. : रविवार, सोमवार, मंगळवार इत्यादी सात वार हे मूळ झाले कसे?

उ. सात दिवसांचा आठवडा हा सहजी झालेला कालमान नव्हे. सर्व जगात रूढ झालेले हे सात वार एका सभ्यतेतुन उद्भवले असावेत, याची कारणे अनेक असण्याची शक्यता आहे. आपले पूर्वज सात ही संख्या पवित्र मानीत—सप्तर्षी, सूर्याच्या रथाचे सात अश्व, सात समुद्र वगैरे याची उदाहरणे होत. दुसरे कारण प्राचीन खगोल शास्त्रज्ञानी सात ग्रह—रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि हे ओळखले. त्यांनी सात वारांना म्हणून ही नावे दिली असावीत. आज आपण ग्रहांच्या कक्षेचे केन्द्रस्थान सूर्य व चंद्र उपग्रह असल्याचे मानतो. तरी वारांची नावे बदलली नाहीत. (वार या शब्दाचा खरा अर्थ दिवस, आपण वार म्हणतो तो सात दिवसांचा असतो.)

**श्रीनंदा, बंगळूर (कर्नाटक)**

प्र. : आकाशगंगा (क्षीरपथ, दुग्धधारेचा मार्ग) म्हणजे काय?

उ. : आकाशातले तारे खूप गर्दी करून जवळजवळ असतात. आपण सूर्यमंडळात आहों. सूर्यासारखे तारे अब्जावधी ब्रह्मांडात आहेत. नोच क्षीरपथ. आपला सूर्य या क्षीरपथापासून फार दूर आहे. आपण त्या अब्जावधी सूर्य तुल्य प्रकाश असलेल्या नक्षत्रांच्या समूहाकडे पाहतो तेव्हां आपल्याला प्रकाशाचा प्रवाहसा भासतो. तीच आकाशगंगा होय.

**एम. सुकुमार जैन, शिवमोगा (कर्नाटक)**

प्र. : चंद्र आपल्याला गोल दिसतो व आपल्याला चांदणं देतो, तशी चंद्र गोलावरून दिसते का पृथ्वी?

उ. : दिसते. चंद्राच्या बाजूने पृथ्वीचा रंगीत फोटोसुद्धा काढलेला आहे. पृथ्वी ही चंद्रापेक्षा मोठी आहे. म्हणून चंद्रावरून पृथ्वी पाहिली तर फार मोठी दिसते. आपल्याकडे जेव्हां अमावस्या असते तेव्हां चंद्रावर पौणिमा असते. म्हणजे चंद्रावरच्यांना पृथ्वीचे पूर्णबिंब व अमर्याद कांती दिसते.



# अघटित अनपेक्षित

[ ८९ ]

मेघवर्ण व इतर कावळ्यांनी 'काव काव' करून जो ओरडा केला त्यामुळे घाबरून जाऊन सर्व जलपक्षी किल्ल्याबाहेर पळून गेले व खंदकात जमा झाले.

चित्रवर्णाचा सेनापती कोंबडा हिरण्यगर्भावर व त्याचा सेनापती करकोचा दोघांच्यावर तुटून पडला. सारस हिरण्यगर्भाचं रक्षण करायला धावला तेव्हां हिरण्यगर्भ त्याला म्हणाला—"मला स्वतःचं रक्षण करायला तू सोड, मात्र माझा मुलगा चूडामणी याचा तू राज्याभिषेक करून घे!"

"माझ्या जिवात जीव असे पर्यंत शत्रू तुमच्या केसालाही धक्का लावू शकणार नाही!" असं म्हणत करकोच्याने कोंबड्याचे सर्व प्रयत्न निष्फळ केले आणि हिरण्यगर्भाला खंदकात बाजूला सारून व कोंबड्याशी द्वंद्व करून त्याला ठार केले. परंतु जमिनीवरच्या पक्ष्यांनी एक जूट होऊन करकोच्याला ठार केले.

चित्रवर्णाचा जय झाला आणि युद्ध संपले. जयजयकार करीत तो किल्ल्यात शिरला.

**शांती**

"आपल्या किल्ल्यातील घरांवर जळती लाकडं आणि काटक्या आणून टाकल्या त्या कोणी? शत्रूने की शत्रूने नेमलेल्या हेरांनी?" हिरण्यगर्भाने आपल्या अनुयायांना विचारले.

"आपले घनिष्ट मित्र मेघवर्ण व त्याचे अनुयायी दिसले नाहीत का. त्यांनीच हे काम केले असले पाहिजे" सर्वज्ञ म्हणाला.

"हे सर्व आपल्या प्रारब्धात होतं तसं झालं! आपलं दुर्दैव!" राजा म्हणाला.

"दुर्दैवाला नावं कशाला ठेवावयाची? चांगलं हिताचं सांगितलं असून जे ऐकत

नाहीत त्यांनाच असे कष्ट भोगावे लागतात." सर्वज्ञ म्हणाला.

इतक्यात एका दूताद्वारे एक बातमी कळली की कर्पूरद्वीपाचा पराभव करण्यासाठी मेघवर्णाने मदत केली म्हणून चित्रवर्ण त्याला राजा करू लागला तेव्हां दूरदर्शनाला ते मान्य झाले नाही व म्हणाला–

"नीचाला कोणत्याही जबाबदारीच्या पदावर नेमू नये; त्याला सोने, चांदी व इतर भेटवस्तू देऊन निरोप द्यावा." तरी चित्रवर्ण म्हणाला की त्याला राजा केले तर तो आपल्याला काश्मीरी शाली. केशर व फळफळावळ देईल! परंतु दूरदर्शनाने असली आशा बाळगून फंसू नये, असे सांगून राजाला सावध केले.

"तरमग मी काय करू म्हणतोस?" असे चित्रवर्णाने दूरदर्शनाला विचारले.

"हंसराजाशी शांतीची बोलणी सुरू करावी व विंध्यपर्वतात परत जाऊन रहावे! पावसाळा सुरू होईपर्यंत आपण येथेच राहालो की पुन्हां युद्ध होईल व आपण जे मिळविलं तेही घालवून बसू. किल्ला सर केला, ही कीर्ती आपल्याला लाभलीच आहे. ती कां घालवून बसावी, म्हणतो? दोन्ही पक्ष समबल असले की कधीकधी दोन्हींचा एकदम नाश होऊ शकतो. म्हणून आतां आपल्यासमोर हारलेल्या हिरण्यगर्भाशी संधी करून घेऊ या." दूरदर्शन म्हणाला.

चित्रवर्णाला विजयगर्व चढला होता. हारलेल्या शत्रूशी संधी करून घेऊन शाश्वत शांती व सुख मिळेल हे सुरवातीला पटले नाही.

म्हणून हिरण्यगर्भाच्या मंत्र्याने जंबूद्वीपाला आपल्या नवीन सेनापतीला म्हणजे सारसपक्ष्याचा मुलाला पाठवून तेथे बंड घडवून सिंहलद्वीपाला जंबुद्वीपावर चालून यायला प्रोत्साहन दिले.

तेव्हां घारीने (दूरदर्शनाने) मयूरराजाला या बाबतीत मेघवर्णाचा, म्हणजे कावळ्याचा सल्ला घ्यावा असे सुचविले. हंसराजाशी संधी करून घ्यायला सांगून कावळा म्हणाला–"तो राजा व त्याचा मंत्री दोघे बुद्धिमान आहेत!"

"तरमग काय रे, तू त्या राजाला व त्याच्या मंत्र्याला कसं काय फंसविलेस?" मयूरराजाने कावळ्याला विचारले.

"प्रभो! आपल्यावर पूर्ण विश्वास करणाऱ्या थोर महात्म्यांना फंसविण्यात मोठेपण असे काय आहे? आपल्या कुशीत किंवा मांडीवर झोपलेल्याला ठार करण्यासारखेच तर आहे! सज्जन व्यक्तीने दुष्ट माणसाला आपल्यासारखाच मानून त्याच्यावर विश्वास केला की त्याला फसविणे सोपे असते. इतके असूनही मी दिलेला सल्ला चांगला नाही, असं होऊ शकत नाही." कावळा म्हणाला.

"मेघवर्णा! तू त्यांच्यामध्ये इतके दिवस त्यांच्याशी नम्रपणाने कसा काय राहू शकलास रे?" मयूरराजाने कावळ्याला पुन्हा विचारले.





"आपले काम पुरे व्हावे यासाठी तसे राहल्याशिवाय चाललेच नसते. माझा सल्ला ऐका व हिरण्यगर्भाशी संधी करून घ्या!" कावळा म्हणाला.

सर्वज्ञने त्या गोष्टीस होकार दिला.

"माझ्या हातून हारलेल्या त्या हंस-राजाने मला कमीत कमी खंडणी तर द्यावी व मी आज्ञा करीन तसे वागण्याचे कबूल तरी करावे!" मयूरराजा म्हणाला.

इतक्यात जंबुद्वीपातून आलेला पोपट मयूरराजाला म्हणाला–"सिंहलद्वीपाच्या दुष्ट राजाने जंबुद्वीपावर स्वारी केली आहे!"

"सर्वज्ञा! तू चांगलं काम केलेस!" घार उत्साहाने म्हणाली.

"मी लगेच निघतो व विंध्यपर्वतावर जाऊन त्या दुष्टाचा शेवट करतो." मयूर-राजा म्हणाला.

"प्रभो! असं संतापून काय फायदा? विचार केल्याशिवाय काही काम केले तर त्यामुळे जास्त आपत्ती ओढवून घेण्यासारखं आहे!" सर्वज्ञ म्हणाला.

मयूरराजाला ते पटलं. त्याने घारीला शांतिस्थापनेसाठी संधी करून घ्यायला सांगितले. दूरदर्शन तेव्हां शांतीची बोलणी करण्यासाठी हिरण्यगर्भाकडे शिष्टाई साठी गेला. हिरण्यगर्भ म्हणाला–"ओहो! ही आणखी काही लबाडी दिसते आहे!"

सर्वज्ञ म्हणाला–"तसं नाही! घार दूरदर्शिनी आहे. तिला भेटवस्तू देऊन तिचं स्वागत करणेच श्रेयस्कर!"

घार सर्वज्ञाला म्हणाली–"आपण दोघां राजांमध्ये शांति व समेट घडवून आणू या! एक सहस्र अश्वमेधांपेक्षा सत्यावर आधारलेली शांती श्रेयस्कर होय!"

सर्वज्ञ आनंदाने त्या गोष्टीस कबूल झाला. दोन्ही पक्षांत शांतिस्थापना झाली. त्यानंतर कोणत्याही प्रकारे परस्परांशी भांडणं न करतां चित्रवर्ण जंबुद्वीपात व हिरण्यगर्भ कर्पूरद्वीपात व मेघवर्ण सिंहल-द्वीपात सुखाने राज्य करू लागले. (संपूर्ण)






## [ ७ ]

[ समरसेन व त्याचे सैनिक यांच्या जहाजांकडे जाण्यासाठी ज्वालामुखीचा ताप असह्य झाल्याने दुसऱ्या बाजूने वाट काढीत निघाले. त्यांना त्या वाटेवर झाडाला उलटा टांगलेला एक रानटी माणूस मृतावस्थेत दिसला. तेथे त्यांना एक पाऊलवाट दिसली. परंतु हत्तींचा एक कळप त्या वाटेने चालून गेल्यामुळे ती वाट त्यांना दिसेनाशी झाली. पुढे–]

समरसेनाने आपल्या अनुयायांना धीर दिला व त्याने मागे पाहिला होता त्या उंच खडकाळ टेकडीवर चढून गेला. त्या उंच जागेवरून दूरवर पाहिले तर कदाचित रानटी लोकांची वस्ती कोठे आहे हे दिसेल असे त्याला वाटले होते. परंतु किती लक्ष देऊन पाहिले तरी तशा एकाद्या वस्तीचे चिन्ह सुद्धा त्याला दिसले नाही.

मग पुढे काय? कोणत्या वाटेने पुढे जायचे? समरसेन व त्याच्या अनुयायां-समोर हेच प्रश्न होते. समरसेन एका झाडाच्या बुंधाला टेकून पुढे काय करावे या विचारात बराच वेळ उभा राहिला. परंतु त्याला एकही मार्ग सुचला नाही.

अशा परिस्थितीत त्यांना आश्चर्यचकित करून सोडणारा एका माणसाचा आर्तनाद ऐकू आला. तो आवाज एकाक्षाचा नव्हता



व चतुराक्षाचाही नव्हता. भयंकर संकटात सांपडलेल्या माणसाचाच होता.

सैनिक निश्चेष्ट होऊन आपल्या नायकाकडे पाहू लागले. समरसेनाने चटदिशी म्यानेतून आपली तलवार उपसली व म्हणाला–"या, पण सावधपणे!" आणि आवाज आला त्या दिशेने चालू लागला.

सैनिक सुद्धा आपापल्या तलवारी उपसून आपल्या नायकाच्या पाठोपाठ निघाले. ते पुढे जात होते तसतसा तो आवाज जास्त स्पष्ट ऐकू येऊ लागला. थोड्याच वेळात ते सर्व त्या जागी येऊन पोचले. तेथे त्यांनी जे दृश्य पाहिले ते पाहून त्यांना आश्चर्याबरोबर भीती सुद्धा वाटली. परंतु दुसऱ्याच क्षणाला आशादायक परिस्थिती असल्यासारखे वाटले. कारण त्या मंत्रद्वीपावर त्यांना अगदी पहिल्याने एक जिवंत माणूस दिसला. तो फार मोठ्या संकटात सांपडलेला होता.

कोणीतरी त्याचे दोन्ही हात झाडाला बांधून त्याला टांगून ठेवले होते. अशा नि:सहाय स्थितीत सापडलेल्या त्या बिचाऱ्याला खाण्यासाठी चार पाच लांडगे तेथे आले होते. त्याच वेळी एक भुकेला वाघही तेथे येऊन पोचला. त्या बिचाऱ्या माणसाच्या अंगाचे लचके तोडण्यासाठी लांडगे आणि वाघ यांचे भांडण सुरू झाले. तो माणूस घाबरून जाऊन मोठमोठ्याने ओरडत होता.

समरसेनाने एका क्षणार्धात सर्व परिस्थिती ओळखली. वाघाचा पंजा लागताच एकेक करून लांडगे जमिनीवर लोळू लागले. त्या लांडग्यांना वाटेला लावून नंतर माणसाचे मांस निश्चितपणे खाण्याच्या विचारात वाघ असावा. उशीर झाला तर त्या माणसाच्या जिवाला धोका होता. समरसेनाने वेळ न दवडतां चटदिशी धनुष्यावर बाण चढवून तो त्या वाघावर सोडला. तो बाण लागतांच वाघ ओरडत जमिनीवर लोळू लागला.

लगेच सैनिक पुढे धावले. परंतु लांडगे त्यांच्यावर धावले. सैनिकांनी आपल्या तलवारी भोसकून त्यांना वाटेला लावले. इतक्यात समरसेनाने पुढे येऊन त्या माणसाला सोडविले.

"मला जीवदान देणारे तुम्ही कोणी थोर पुरुषच आहां! तुमचे हे उपकार मी आयुष्य भरात कधीही विसरणार नाही." असे म्हणत त्या माणसाने समरसेनाला व सैनिकांना नमस्कार केला.

त्या माणसाचा रूपरंग व बोलण्याची रीत पाहून समरसेनाला तर फारच आश्चर्य वाटले. हा या मंत्रद्वीपात राहणारा नाही ह्याबद्दल त्याच्या मनात थोडीदेखील शंका उरली नाही. एवढेच नव्हे तर हा माणूस कुंडलिनी द्वीपात राहणाराच तर नसेल अशीही एक शंका त्याच्या मनात आल्याशिवाय राहिली नाही.

समरसेनाने त्याला तसे विचारलेही– "तू कोणत्या देशाचा राहणारा रे?"

"मी कुंडलिनी बेटावरचा एक सैनिक आहे. त्या राज्याचे सेनापती समरसेन आपणच नाही का?" त्या व्यक्तीने समरसेनाला तो प्रश्न विचारला.

समरसेनाला व सैनिकांना तो प्रश्न ऐकून जे आश्चर्य वाटले ते एवढे तेवढे नव्हते. तो सैनिक आपल्याबरोबर जहाजातून आलेला सैनिक नाही, हे सर्वांना माहीत होते. तरमग हा या बेटावर केव्हा व कसा काय आला?














त्या नव्या सैनिकाने समरसेन व त्याच्या अनुयायांच्या मनात उद्‌भवलेली शंका ओळखल्यासारखे दिसले. तो पुढे म्हणाला.

"तुम्ही सर्व त्या दिवशी निघाला तेव्हां धूमकेतू दिसला होता, होय ना? ज्योतिष्यांनी न जायला सांगितले तरी तिकडे दुर्लक्ष करून निघालात. त्यानंतर थोड्याच वेळाने एक फार मोठे वादळ आले. समुद्र खवळला व भिंती एवढ्या मोठमोठ्या लाटा उसळू लागल्या. चित्रसेन महाराज फार काळजीत पडले. लागोपाठ चार पांच दिवस कुंडलिनी देवीवर अभिषेक करून तिची कृपा संपादन करण्याचा त्यांनी प्रयत्न केला.

"परंतु तुफान एक आठवडाभर चालू होते. तुम्ही कोठे व कोणत्या परिस्थितीत असाल या काळजीत महाराज व प्रजेला काही काम सुचत नव्हते."

"शेवटी महाराजांनी दरबारी ज्योतिष्यांना बोलावून त्यांच्या करवी तुम्ही कोठे, कोणत्या दिशेला, कशा परिस्थितीत असाल, ग्रहदशा पाहून सांगायला सांगितले. ज्योतिष्याने पंचांग पाहिले. उभ्या आडव्या रेघा काढून पाहिले व म्हणाले—"काही गलबते व त्यावरचे सैनिक बुडाले आहेत. उरलेले सैनिक व सेनापती कोणत्यातरी बेटावर पोचले आहेत.

"ते कळल्यावर चित्रसेन महाराजांनी प्रधान व इतर मंत्र्यांचा सल्ला घेतला. त्यांनी काही सैनिकांना तुमच्या शोधार्थ पाठवायला आज्ञा काढली. कुंभांडाला त्या सैनिकांचा नायक नेमले. कोणत्यातरी अज्ञात बेटाला तुम्ही सर्व लागलेले असणार व त्यामुळे तुम्हांला फार कष्ट सहन करावे लागणार असे समजावून सांगून फार लक्षपूर्वक तपास करायला सांगितले."

त्या नव्या सैनिकाने सांगितलेले वृत्त ऐकून समरसेन विचारात पडल्यासारखा दिसला, 'हा कुंभांड कोण बरे असावा?' नंतर आठवल्यासारखा म्हणाला—"ओहो, कुंभांड सामंत होय?"

तो सैनिक लगेच दात ओठ चावून म्हणाला—"होय, तोच! त्याच्याच मुळे मी या भयंकर संकटात सांपडलो आहे!"

समरसेन सैनिक म्हणाला ते ऐकून चकितच झाला. बाजूला उभे असलेल्या सैनिकांना काही कळलेच नाही. परंतु तो सैनिक पुन्हा पुढे बोलू लागला.

"आम्ही जहाजांतून निघालो आणि काही दिवसांनी आम्ही हे बेट पाहिले. बेटाच्या दक्षिणेला आम्ही जहाजांतून उतरलो. कुंभांडने आम्हां सर्वांना किनाऱ्यावर उतरून थांबायला सांगितले आणि दोघां सैनिकांनाबरोबर घेऊन बेटावर आतल्या बाजूला निघून गेला.

"आम्ही दिवसभर तो परत येईल म्हणून वाट पाहिली. दुसऱ्या दिवशी सकाळी कुंभांड एकटाच परतला आणि गंमत अशी की, कारण वगैरे काही एक न सांगता, त्याची आज्ञा आहे असे सांगून त्याने आमच्या जवळ जे धनुष्यबाण वगैरे होते ते सर्व एकत्र बांधून आमच्याकडून समुद्रात टाकविले. किती विचार करून पाहिले, परंतु कुंभांडाने हा विक्षिप्तपणा कशासाठी केला, त्याचे कारण मात्र आम्हांला मुळीच कळले नाही. शिवाय त्याच्याबरोबर जे दोघे सैनिक गेले होते ते कां परतले नाहीत व त्यांचे काय झाले, आम्हांला मुळीच



कळले नाही. आम्ही खोदून खोदून काही विचारल्यावर कुंभांडाने त्यांना रानटी जातीच्या लोकांनी काहीतरी कारणावरून ठार केल्याचे सांगितले.

त्याचे ते उत्तर ऐकून आम्हांला अर्थातच संशय आला. म्हणून आम्ही धीर करून त्याला विचारले की त्याने धनुष्यबाण समुद्रात फेकून द्यायला कां सांगितले? ते ऐकून कुंभांड भडकला व म्हणाला—"मी सेनापती आहे. मी जे काही सांगतो वा करतो त्याविषयी कोणी प्रश्न करतां कामा नये."

समरसेनने मध्येच त्या सैनिकाला थांबवून विचारले—"तरमग कुंभांडने

सुद्धा त्याचे धनुष्यबाण समुद्रात फेकले का?"

"सेनापती, तीच तर गंमत! त्याने स्वत:चे धनुष्यबाण मात्र स्वत: जवळच ठेवून घेतले. त्यानंतर थोड्या वेळाने रानटी जातीचे लोक ढाली, भाले, बरछी वगैरे घेऊन मोठमोठ्याने ओरडत आम्ही होतो तेथे आले. आमच्याजवळ शस्त्रास्त्रे नव्हती. म्हणून आम्हांला तेथे जे दगड आणि झाडांच्या फांद्या जे मिळाले ते घेऊन आम्ही आत्मरक्षण करू लागलो.

"परंतु कुंभांडाने आम्ही सर्वांनी त्यांना शरण जावे असे बजावून सांगितले. त्याचे हे विचित्र वागणे आम्हांला विक्षिप्तपणाचे वाटले. आमच्यापैकी बरेच जण तोपर्यंत रानटी लोकांच्या हाती ठार झाले होते. उरलेल्यांना पळून जाणेसुद्धा अशक्य झाल्याने रानटी लोकांना शरण जाण्याव्यतिरिक्त आम्हांला दुसरा मार्ग दिसला नाही."

"इतका भयंकर प्रसंग येऊन ठेपला असूनसुद्धा कुंभांडाने तुम्हांला कोणत्याही प्रकारे मदत केली नाही?" समरसेनाने संतापून जाऊन त्या सैनिकाला विचारले.

"तशी मदत त्यानेआम्हांला काहीच केली नाही. आम्ही शरण गेल्यावर रानटी लोकांनी आमचे हात उलटे करून पाठीमागे बांधले आणि कुंभांडाला एका पालखी-



सारख्या वाहनावर बसविले आणि रानटी लोक त्याला आपल्या खांद्यावर बसवून घेऊन घोष करीत आपल्या वस्तीकडे घेऊन गेले. आम्ही त्यांचे कैदी म्हणून राहू लागलो आणि कुंभांड त्यांच्या राजासारखा त्यांच्यावर अधिकार गाजवू लागला. तो म्हणे ती पूर्व दिशा वाटू लागली त्या रानटी जातीच्या लोकांना. त्या रानटी लोकांवर तो एवढा अधिकार गाजवू शकला हे कसं काय झाले, आम्हांला काहीच कळले नाही."

समरसेन थोडा वेळ विचार करून म्हणाला—"मलासुद्धा कळले नाही. बरं त्यानंतर काय झाले?" त्याने सैनिकाला विचारले.

"कुंभांडाविषयी आमच्या मनात जी शंका होती त्याचे उत्तर आम्हांला दोनतीन दिवसांनी मिळाले. रानटी लोकांना धनुष्य बाण म्हणजे काय हे माहीतच नव्हते. माणसाने एका जागी उभे राहून दूर कोणत्यातरी पक्ष्याला किंवा जनावराला मारायचे ठरविले तर ते शक्य आहे हे पाहून रानटी जातीचे लोक थक्क झाले होते. कसब फक्त त्याच्या एकट्याच्या अंगात असल्याचे कुंभांडाला दाखवायचे होते व अशा तऱ्हेने त्या रानटी लोकांवर अधिकार गाजवायचा होता. म्हणून त्याने आमच्याकडून आमचे धनुष्यबाण समुद्रात टाकविले." सैनिकाने कुंभांडाचे ते गुपित सांगितले.

"पुढे काय झाले?" समरसेनने त्याला विचारले.

एका दिवशी सर्व अरण्यभर डफ व नगारे वाजू लागले. शेकडो रानटी जातीचे लोक आम्ही रहात होतो त्या बाजूला आले. त्याच्यासमोर या दुष्ट कुंभांडने आपल्या नैपुण्याचे प्रदर्शन केले. आकाशात उडत असलेली घार बाण लागताच जमिनीवर येऊन पडली, दूर पळत जाणाऱ्या हरणाला बाण मारून त्याने लोळविले. रानटी लोक कुंभांडचा तो प्रताप पाहून त्याच्या चारीबाजूला नाचू लागले. त्यांच्या मदतीने या सर्व द्वीपावर आपले राज्य स्थापन करण्याचे स्वप्न कुंभांड पाहतो आहे."

समरसेन स्मित करून म्हणाला—"येथे राज्य करायला आहे तरी काय? एक दोघे मांत्रिक आहेत खरे!"

"मांत्रिक?" असे म्हणत तो सैनिक चारीबाजूला भयभीत होऊन पाहू लागला व म्हणाला—"रानटी लोकांच्या तोंडी आम्ही ते ऐकलं, खरं, परंतु..."

सैनिक पुढे आणखी काही बोलणार इतक्यात "ऐकलं, एवढंच नव्हे, प्रत्यक्ष पहा की!" असा खणखणित आवाज त्याच वेळी दुमदुमला. त्या पाठोपाठ चतुराक्ष आपली टोपी हातात घेऊन त्यांच्या समोर येऊन उभा राहिला. (क्रमशः)





# योग्य निर्णय

विक्रमादित्याने हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू या मध्यरात्रीच्या वेळी प्रेत खांद्यावर उचलून नेण्याचा निर्णय घेतलास त्याबद्दल मी तुला दोष देत नाही, परंतु राजांचा निर्णय नेहमी बरोबरच असतो असे मात्र नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला ज्ञानशील नावाच्या राजाने विचार केल्याशिवाय दोघा बद्दल चोरांना कशी शिक्षा केली, ती गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

ज्ञानशील नावाचा राजा मगधराज्याच्या सिंहासनावर बसला तेव्हां राज्यात अराजक माजले होते. प्रजेचे जीवन नरक-



यातनेसारखे झाले होते. ज्ञानशील राजाने दंडनीतीचा अवलंब करून देशात जो समाजशत्रूंनी धुमाकूळ घातला होता, त्याला आळा घातला. गुन्ह्यांची संख्या कमी झाली आणि प्रजेला हायसे वाटले.

परंतु परिस्थिती पूर्णपणे आटोक्यात आली नाही. चोऱ्या होतच होत्या. परंतु त्या चोऱ्यांमुळे सामान्य प्रजेला त्रास होत नव्हता. चोऱ्या श्रीमंत लोकांच्या घरीच होत होत्या. श्रीमंतांच्या घरातले धन लुटून अगदी गरीब लोकांना वांटण्यात येत असल्याचे राजाला कळले.

राजाला हेही कळले की या चोऱ्या कोणीतरी दोघे चोर करीत आहेत. कारण एकाच वेळी दोनदोन जागी एकदम चोऱ्या होत असलेल्या आढळून आल्या. दोन्ही जागच्या चोऱ्यात चोरांचे नैपुण्य स्पष्ट दिसत होते.

या चोरांना पकडणे आपले आद्य कर्तव्य आहे, असे राजाला साहजिकच वाटले. चोर सहजी शिपायांना सांपडतीलसे दिसत नव्हते. तेव्हां 'काय केले तर बरे होईल' असे राजाने आपल्या प्रधानाला विचारले.

प्रधान म्हणाला–"चोरांना धरून देणाऱ्याला मोठे इनाम दिले जाईल असे जाहीर करावे, महाराज! गोरगरिबांना चोर मदत करीत आहेत, म्हणून चोरांचा पत्ता त्यांना नक्कीच माहीत असणार. आपण इनाम जाहीर केले तर ते गोरगरीब चोरांना धरून द्यायला नक्कीच मदत करतील."

परंतु राजाला तो सल्ला पटला नाही. म्हणाला–"आपण फक्त एकदांच इनाम देणार. त्यासाठी नेहमी मदत करणाऱ्या चोरांशी द्रोह करून गोरगरीब त्यांना पकडून देतील असे नाही वाटत मला. कारण गरीब लोकांच्या मनात कृतज्ञता नावाची वस्तू फार असते. नंतर आपण चोरांना पकडू शकत नाही असे जगजाहीर केल्यासारखंही होईल. तसं झालं तर लोक चोरांना कदापी धरून देणार नाहीत. प्रजेच्या हिताची मी कित्येक कामे केली. तसेच हे कामही मी स्वतःच्या बळावर अवलंबून राहूनच केले पाहिजे."

चोरांना चोरांनीच धरून दिलं तर ते शक्य आहे. असा विचार करून राजा वेष पालटून चोरासारखा हिंडत राहिला व त्याला चोरांविषयी व त्यांच्या चोरी करण्याच्या पद्धतीविषयी काही गोष्टी कळल्या. ते दोघे चोर होते. त्यांची नावे अनुक्रमें रंगा व सिंगा अशी होती. दोघेही चांगल्या सुखवस्तू घराण्यातच जन्मलेले होते. पिढ्यान्‌पिढ्या चोऱ्या करणाऱ्या गुन्हेगार कुळात जन्मलेले नव्हते. राज्यात अराजकत्व पसरलेले पाहून दोघे चोऱ्या करू लागले होते.

एवढी माहिती कळल्यावर राजाने आपल्या अंगरक्षकांच्या मदतीने दोघां चोरांना पकडले. राजाने त्या दोघां चोरांना दरबारात बोलावून गुन्ह्याची चवकशी सुरू केली. दोघांनीही चोरी करीत असल्याचा गुन्हा कबूल केला. परंतु सिंगाने गुन्हां कबूल करतांना आपली जबानी दिली ती अशी :

"महाराज, आपण गादीवर आलात त्या पूर्वी आम्हांला चोरीशिवाय आपले जीवित चालवायला दुसरा मार्ग दिसला नाही. त्या काळात मी ज्या चोऱ्या केल्या त्याबद्दल मला पश्चात्ताप करण्याचे कारण वाटत नाही. परंतु आपण गादीवर आल्या-नंतर मी ज्या चोऱ्या केल्या त्या केवळ स्वतःच्या स्वार्थासाठीच. कारण चोरी



करण्यात मी जे प्राविण्य संपादन केले होते ते मला सोडवेना. मी चोरी करून मिळविलेले सर्व धन स्वतःच्या सुखासाठी खर्च केले. परंतु हा रंगा मात्र सुरवातीपासून आतापर्यंत गोरगरिबांना मदत करीत आला आहे. त्याने संपादन केलेले धन स्वतःच्या सुखासाठी कधीच खर्च केले नाही."

राजाने दोघां चोरांना जन्मठेप शिक्षा दिली.

थेथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, दोघां चोरांमध्ये एवढा फरक असूनही राजाने दोघांना सारखीच शिक्षा कां केली? याचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"दोघां चोरांचा चोरी करण्याचा हेतू निरनिराळा होता हा फरक करण्याची गरज राजाला वाटण्याचे कारण नाही. श्रीमंतांना लुटून गरिबांना धन वाटून दिल्याने देशाची स्थिती सुधारेल असे थोडेच असते. गरीबीचा प्रश्न राजाने आपल्या कर्त्तबगारीने सोडवायचा असतो. चोऱ्या करून सुटणे शक्यच नसते. शिवाय प्रजा सुखी व्हावी यासाठी राजाने सुरू केलेल्या प्रयत्नांना चांगले फलित आलेले दिसू लागले असतां चोरांनी चोरी करून वाटलेल्या पैशांनी कायमची सुबत्ता स्थापन होणे शक्यच नाही. राजाचे प्रयत्न वृथा ठरण्याची वेळ येऊन ठेपली होती. कारण राजापेक्षा चोरच चांगले ही भ्रामक कल्पना प्रजेच्या मनात मूळ धरू लागली होती. राजाला ही गोष्ट चांगली कळत होती. ते कोणत्याही योग्य शासकाला सहन होणे शक्यच नव्हते. म्हणून राजाने दोघां चोरांना शिक्षा केली हा त्याचा निर्णय योग्यच होता."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# लौकिक बुद्धी

रामूशेटने पुष्कळ दिवस व्यापार केला, परंतु मिळकत बेताचीच होती. आपण कसे तरी दिवस काढले, पुढे एकुलत्या एका राघूचे कसे होणार, ही एकच काळजी होती. राघूला व्यापाराचा थोडादेखील अनुभव नव्हता. व्यापारासाठी काही भांडवल घालावे तर रामूशेटचाच व्यापार बेताचा. म्हणून शहरात व्यापार करणारा त्याचा मित्र रंगूशेट कोणत्यातरी कामासाठी आला तेव्हां रामूशेटने त्याच्याजवळ राघूच्या भविष्याविषयी प्रश्न काढला.

रंगूशेटने राघूला बोलावून त्याच्या हातात एक चिट्ठी लिहून दिली व म्हणाला–"तू पुढे चल व आमच्या घरी जाऊन ही चिट्ठी दे आणि मी उद्यां येतो आहे असे सांग."

राघू रंगूशेटच्या घरी शहरात गेला. रंगूशेटच्या घरी त्याची बायको व सूनबाई होत्या. रंगूशेटच्या बायकोने राघूला जेवायला वाढतांना सून जवळपास नाही असे पाहून म्हटले– "माझी सून माझ्याशी सारखी भांडते. माझा जीव खाते! कधीतरी ती नाही का सासू होणार?"

"पिकलेल्या पानांकडे पाहून कोवळी पाने हंसतात. त्यांची गळून जायची वेळ कधी येईलच की, याचा नाही विचार करीत!" राघू म्हणाला.

मध्यंतरी सासू कोणत्यातरी कामासाठी दूर गेली तेव्हां सून आली वाढायला. ती राघूला म्हणाली–"सासूबाईचा स्वभावच मोठा 'हा' आहे! नेहमी म्हणतात 'तू तरी कधी सासू होणार नाहीस का? तुला नाही का अनुभवावं लागणार?"

सर्वांनाच कधीतरी जायचंच आहे! म्हणून लहानपणापासूनच लाकडे सिद्ध करून कोणी ठेवतो का?" राघू म्हणाला सहानुभूती दर्शवीत.

रंगूशेटने आल्यावर त्याच्या बायकोशी व सुनेशी राघूचे काय बोलणे झालं हे विचारून घेतलं आणि रामूशेटला लिहून कळविले–"अरे तुझ्या मुलाला लौकिक ज्ञान कमालीचं आहे बरं!"





# हक्क

गंगापूर नावाच्या गावी रंगनाथ नावाचा एक माणूस रहात असे. रंगनाथ स्वभावाने शांतवृत्तीचा संसारात होता. त्याला काही गम्य नाही अशा वृत्तीचाही होता. तो मितभाषीपण होता. तो कोणाशी मैत्री वाढवायच्या भानगडीत पडला नाही. गावकरी त्याला एक अक्कलशून्य माणूस मानीत.

रंगनाथची बायको कमला एक वस्ताद बाई होती. तिच्या तोंडी लागायला गावातले लोक भीत. तिला पैशाची हाव फार होती. म्हणून ती रंगनाथला गंगापूर बोलावून घेऊन आली व तिने निराळा संसार थाटला. ती घरात लागणारा अत्यावश्यक खर्च सुद्धा न करून पैसे साठवी व ते व्याजाने देई. तिने सोन्याचे चार दागिनेसुद्धा करवून घेतले होते.

रंगनाथाचा धाकटा भाऊ खंडेराव आपल्या गावच्या काही लोकांबरोबर तीर्थयात्रेला जायचे ठरवून व जवळचे सहाशं रुपये घरात ठेवणे धोक्याचे समजून थोरल्या भावाकडे ठेवण्यासाठी गंगापूरला आला. त्याने रंगनाथकडे पैसे ठेवून दिले आणि तीर्थयात्रेला निघून गेला.

कमलाने दिराने ठेवलेले पैसे मोजून पाहिले, बरोबर सहाशे होते. ते पैसे पाहिल्यापासून कमलाच्या मनात ते पैसे स्वतःचे करून घ्यायचा मोह झाला. तिने बराच विचार केला व काहीतरी ठरविले.

रंगनाथाला कोणत्यातरी कामासाठी शहरात जावे लागले. त्या दिवशी ती नवऱ्याजवळ गोड बोलून म्हणाली—"काय हो, माझी पांच तोळयांची माळा आणि मी पैसे देते ते नेऊन शहरात कोणाकडून तरी सहा तोळयाची माळा करवून आणतां का? संभाळून आणा बरं का!"

रंगनाथने दागिन्याबरोबर पैशाची पिशवी घेतली व ती खंडेरावची असल्याचे ओळखून अगदी खालच्या स्वरात घाबरत म्हणाला—"हे पैसे आपले नाहीत ना!"

"तुमची अक्कल पाहून मला संताप का येणार नाही! खंडेराव म्हणजे कोणी परका आहे का? त्याचे पैसे म्हणजे ते आपले नाहीत का? तो मला माझ्या पोटच्या मुलासारखा आहे! त्याचे पैसे खर्चून खायला मला हक्क आहे. नाही म्हणणारा कोणी असेल तर त्याला समोर येऊन बोल म्हणावं!" कमला ठासून म्हणाली.

"तु म्हणालीस ते बरोबरच आहे ग! खंडेराव आपल्याला मुलासारखाच तर आहे!" असे म्हणत रंगनाथ एक शब्दही जास्त न बोलता शहराकडे निघाला.

शहरात पोचेपर्यंत काळोख पडला. रंगनाथ खूप दमून गेला होता. जवळच एक धर्मशाळा दिसली त्यात विश्रांतीसाठी शिरला. तेथे खंडेरावला पाहून रंगनाथ आश्चर्यचकितच झाला.

खंडेराव थोरल्या भावाला म्हणाला—"त्या बाजूला पुरामुळे सर्व रस्ते बंद पडले आहेत. म्हणून आम्ही सर्व परतलो. उद्या सकाळी निघून गंगापूरला जायचे ठरविले. तेथून पैसे घेऊन मग गावी जायचे म्हणतो.

"पैशासाठीच असेल तर गंगापूरला जाण्याची गरज नाही. तुझे पैसे माझ्याच-



जवळ आहेत. तुझ्या वहिनीला तू मुलासारखा तर आहेस म्हणे! म्हणून तुझ्या आईसारखा तुझ्या पैशावर तिचा हक्क आहे व ते वापरायचा हक्कही तिला आहे म्हणे, तेव्हां त्या पैशांची आशा तू सोड!" रंगनाथ खंडेरावाला म्हणाला.

इतके दिवस कष्ट करून मिळवून जमविलेले पैसे असे गेलेले पाहून खंडेरावाने डोळ्यांत पाणी काढले.

खंडेरावाचा चेहरा पाहून रंगनाथाच्या हृदयाला पाझर फुटला. कमलाच्या म्हणण्याविरुद्ध काही करणे म्हणजे मोठी चूक होणार! परंतु धाकट्या भावाचे दुःखही कमी व्हायला हवे. परंतु ते कसे?

अकस्मात् विजेचा झटका लागावा तसा एक विचार त्याच्या मनात आला.

"एवढं मनाला लावून घेऊ नकोस खंडेराव! तुझी वहिनी म्हणजे तुझ्या आईसारखीच की नाही? तिनेच पैसे घेतले याबद्दल तू दुःखी होता कामा नये! कोणी परक्याने पैसे घेतले का? तू तिचा मुलगा आहेस. मुलगा म्हणून तिच्या या दागिन्यावर तुझा हक्क आहे. म्हणून तू हा दागिना ठेवून घे." असे सांगून रंगनाथने बायकोचा तो दागिना खंडेरावला दिला आणि रंगनाथ दुसऱ्या दिवशी गंगापूर परतला.

रंगनाथाच्या प्रतापाची गोष्ट कळल्यावर कमलाने आकाशपाताळ एक केले. म्हणाली—"अहो, दोन हजारांचा दागिना गेला की! ही तुमची भिकारडी अक्कल पाहून मला राग का येऊ नये हो!"

कमला अशी ओरडू कां लागली, न कळल्यामुळे आणि आपण काय चूक केली हे न कळल्यामुळे रंगनाथ वेड्यासारखं तोंड करून कमलाकडे पाहू लागला.

आणखी थोड्या वेळाने खंडेराव आला व कमलाला तिचा दागिना त्याने दिला. तेव्हां भांड्यात जीव पडल्यासारखे तिला वाटले. खंडेराव जणु काहीकाही घडलेच नाही असे दाखवून आपली पैशाची पिशवी घेऊन व भावाभावजयीचा निरोप घेऊन आपल्या गावी निघून गेला.



# हुशार नोकर

गोपू नावाचा नोकर शंकरशेटच्या दुकानात नुकताच लागला होता. तो सर्व कामे सांगितल्याप्रमाणे समजून करी. एके दिवशी सकाळी शंकरशेट दुकानात आले आणि आपला सदरा काढून खुंटीला टांगायला गेले. त्या वेळी खिशातले पैसे जमिनीवर पडले. गोपूने चटदिशी वांकून सर्व नाणी एकत्र करून शंकरशेटला दिली.

त्या दिवशी रात्री शंकरशेट जेवल्यावर हात धुवून आपल्या खोलीत गेले. शंकरशेटची बायको ताट उचलायला म्हणून गेली, त्या वेळी गोपूने चटदिशी ताटात हात घालून त्यातली अंगठी उचलली व शंकरशेटला द्यायला खोलीत गेला.

शंकरशेटने गोपूला कामावरून काढून टाकले. बायकोने कारण विचारले.

"सकाळी माझ्या खिशातून पैसे जमिनीवर पडले तेव्हां मला किती पैसे होते हे माहीत नसावे, असे वाटून याने एक रुपया एका कोपऱ्यात सरकवून ठेवला आणि बाकीचे पैसे मला उचलून दिले. आतां जेवतांना माझ्या बोटातली अंगठी ताटात पडली तेव्हां माझ्या हातात अंगठी नाही हे त्याने पाहून ठेवले. माझ्यावर एवढी बारीक नजर ठेवणारा नोकर नकोच!" शंकरशेट म्हणाले.





# दरिद्रनारायण

विद्यानगर गावाचा गावप्रमुख विरूपाक्ष चांगला सुखवस्तू गृहस्थ होता. तो नेहमी गोरगरिबांना दानधर्म करी. भुकेला कोणी आला तर त्याने कधी 'ना' म्हटले नाही, उलट त्याला पोटभर जेवायला वाढले. तो दर वर्षी वैशाख महिनाभर अन्नदान करीत असे. म्हणून वैशाख महिना येताच जवळपासच्या गावचेच नव्हे तर दूरदूरच्या गावचे सुद्धा साधूसंन्यासी विद्यानगरला येऊन वस्ती करीत व विरूपाक्ष षड्रसभोजन वाढी ते आनंदाने खात व त्याला आशीर्वाद देत.

एके वर्षी विरूपाक्ष वैशाख महिन्यात अन्नदानाची तयारी करीत असतां त्याची बायको विमलाक्षी म्हणाली–"काय हो! निदान या वर्षीतरी फक्त साधूसंन्याशांनाच जेवण वाढण्याची व्यवस्था करावी. साधू-संन्याशांना जेवायला वाढलं तर पुण्यलाभ तरी होईल. साध्या भिकाऱ्यांना खायला घालून काय मिळणार आहे?"

"विमलाक्षी, फक्त भगवी वस्त्रे नेसून आल्याने कोणी देवपुरुष होतो का? ती नेसून न येणारे लोक अन्नदानाला अपात्र आहेत असे वाटते का तुला? उद्यापासून आपण अन्नदानाचा कार्यक्रम सुरू केल्याबरोबर मी सांगतो तसे कर, म्हणजे मी सांगितले त्याचा खरा अर्थ तुला कळेल." असे सांगून विरूपाक्षने बायकोला काय करायचं ते सांगितले.

विमलाक्षीने नवऱ्याने सुचविल्याप्रमाणे करण्याचे ठरविले.

पहिल्या दिवशी अन्नदानाचा कार्यक्रम सुरू होत असतांच दहा जण साधू त्यांच्यात काहीतरी विशेष असल्यासारखे दर्शवून आत आले व पंक्ती करून बसत म्हणाले–"पहिल्याने आमच्या पंक्तीला वाढा बरं का!" आणि पंचपक्वान्ने येतील म्हणून वाट पाहू लागले.

इतक्यात विरूपाक्ष व विमलाक्षी दहा मातीचे वाडगे कण्हेरी भरून सर्वांसमोर ठेवीत म्हणाले–"साधु पुरुष हो, या वर्षी पिके चांगली आली नाहीत, म्हणून दर वर्षीप्रमाणे पंचपक्वान्नांचं अन्नदान करणे शक्य झालं नाही. ही कण्हेरीच पंचपक्वान्ने मानून स्वीकारण्याची कृपा करावी!"

झालं! सर्व साधू नरसिंहावतार घेऊन उभे राहिले व संतापून म्हणाले–"दहा दहा मैलावरून चालून आम्ही आलो आहो, आम्हांला खायला दळभद्री कण्हेरी मिळत नाही म्हणून का? शक्य नव्हते तर असले अन्नदान करण्याची गरजच काय होती?" असे म्हणत लाथ मारून वाडगे भिरकावून देत सर्व निघून गेले.

किती थोर दिसणारे साधू सौम्य स्वभावाच्या एखाद्या अन्नदान करणाऱ्याने पंचपक्वान्ने वाढली नाहीत की किती संतापून जातात याची कल्पनाही नसलेली विमलाक्षी थक्कच झाली. ती ते सर्व दृश्य अवाक् होऊन पहातच राहिली.

थोड्याच वेळाने आणखी एक संन्याशांचे टोळके आले. आज जेवायला काय काय मिळणार आहे या विषयी मनातले मांडे खात पंक्तीत येऊन बसले. विमलाक्षीने त्या सर्व संन्याशांसमोर मातीचे वाडगे भरून कण्हेरी आणून ठेवली आणि



अगदा नम्रपणे जेवायला सुरवात करायला विनंती केली.

परिस्थिती कळताच या संन्याशांचे टोळकेसुद्धां संपावर जात असल्यासारखं नाटक करीत ओरडले–"भिकारड्यांना वाढतात तसे हे कण्हेरीचे पाणी सर्वसंग-परित्याग करणाऱ्या संन्याशांना वाढायला काही वाटले का तुम्हांला? तुमचे हात पुढे तरी झाले कसे? आमचं कर्म म्हणून हे दिवस बघायला मिळत आहेत. आम्ही सुद्धां तुमच्यासारखे श्रीमंतात दिवस काढले आहेत, वाटलं काय तुम्हांला?" असे ओरडत समोरचे वाडगे लाथेने भिरकावीत उठून निघून गेले.

या वर्षी वैशाख महिन्यातले अन्नदान म्हणजे फक्त कण्हेरीच्या पाण्याशिवाय आणखी काही लाभणार नाही, हे साधू संन्याशांना व ब्रह्मवृंदाला कळले. पक्वान्ना-वर महिनाभर मनसोक्त हात मारायला मिळणार या आशेने आलेल्या सर्वांना हताश होऊन परतावे लागले. सर्व विरू-पाक्षाला व विमलाक्षीला शिव्या देत निघून गेले. उरले ते लगड, लुळे व आंधळे व उपाशी गोरगरीब.

विमलाक्षीने त्यांना घरात बोलाविले नाही व बाहेरच ते उभे होते त्यांना म्हणाली–"या वर्षी आमच्या घरी पंच-पक्वान्नांची जेवणं नाहीत बरं. फक्त कण्हेरीच मिळेल. ती सुद्धा एकेकाला वाडगाभरच मिळेल!

ते ऐकून आनंदाने विस्फारित डोळ्यांनी पहात ते उपाशी गरीब म्हणाले–"आई, आम्ही दररोच पंचपक्वान्नं खातो का हो? कण्हेरी पिऊन तरी किती दिवस झाले हो!" असे म्हणत ते सर्व रस्त्यावरच पंगत करून बसले आनंदाने कण्हेरी पिऊन म्हणाले–"अन्नपूर्णामाई आहांत बाई! तुम्हांला देव आयुष्यभर सुखी ठेवो!" असा आशीर्वाद देऊन आनंदाने परतले.

भूक असेल तोच खरा भुभुक्षू, व तोच 'दरिद्र-नारायण.' अशाच लोकांना अन्नदान करण्यात पुण्य आहे व पुरुषार्थ आहे हे विमलाक्षीला अनुभवाने कळले.





# लांचखाऊ

ब्रह्मदत्त काशीच्या गादीवर असतां बोधि-सत्व त्याच्या पदरी क्रयाधिकारी म्हणून काम करीत होते.

क्रयाधिकाऱ्यावर राज्यासाठी लाग-णाऱ्या हत्ती, घोडे वगैरे प्राण्यांची, शस्त्रा-स्त्रांची व इतर वस्तूंची खरेदी करण्याची जबाबदारी असे. अर्थातच त्याने प्राणी व पदार्थांच्या गुणधर्माची पारख करून किंमत ठरवायची असे. या कामात लाचलुच-पतीला खूप जागा असे. परंतु बोधिसत्व इमानेइतबारे सर्व प्राण्यांची व मालाची चांगली पारख करून योग्य त्या किमतीला ती खरेदी करीत असत.

ब्रह्मदत्त राजा फार लोभी व संशयी स्वभावाचा होता. त्याच्या मनात आपल्या क्रयाधिकाऱ्याविषयी सं ाय होता. योग्य किंमतीपेक्षा जास्त किंमत देऊन मध्ये स्वत:साठी काही रक ्म उचलीत असावा. काही दरबाऱ्यांच्या तोंडी त्याने बोधि-सत्वांविरुद्ध तशी तक्रार ऐकली होती. हा या पदावर राहला तर थोड्याच दिवसांनी राज्याचं दिवाळं निघायचं.

राजाने ह्या विचारात असतां एकदां राजोद्यानाच्या बाजूने राजवाड्याची जी खिडकी होती ती उघडली. एक माळी उन्हातान्हांत झाडांना पाणी घालीत होता तो राजाला दिसला. 'किती इमानदार माणूस आहे, नाही तर इतक्या उन्हांत घाम गाळून याने झाडांना पाणी लावले असते का?' असे राजाला वाटले.

दुसऱ्या दिवशी राजाने त्या माळ्याला बोलावून त्याला बोधिसत्वांच्या जागी क्रयाधिकाऱ्याच्या पदावर नेमले. राजाला वाटले की हा नवा अधिकारी खरेदी करतांना प्रामाणिकपणाने स्वस्तात खरेदी करून राज्याचे पैसे वांचवील. परंतु झाले



उलटे, तो जातीनेच दरिद्र होता. हातात आलेली संधी कां दवडावी म्हणून तो ज्यास्त किमत देऊन खरेदी करू लागला. माल विकणारे व्यापारी त्याच्या हातावर चार पैसे ठेवून मालाची किमत वाढवून घेऊ लागले. माळचाला मालाच्या गुण-धर्माची तरी माहिती कोठे होती. म्हणून हलका माल जास्त किमतीला खरेदी होऊ लागला. कधीकधी व्यापाऱ्यांचे नुकसान सुद्धां होई. कारण मालाची पारख नसल्या-मुळे तो सांगेल ती रक्कम व्यापाऱ्यांना मान्य करावी लागे. त्यांचा माल विकत घेणारा राजाचा क्रयाधिकारी. म्हणून फायदा होवो अगर नुकसान, त्याच्याविरुद्ध 'ब्र' काढण्याची हिंमत नसल्यामुळे व्यापारी तो जी किमत देई त्या किमतीला माल देऊन निघून जात. कोणी त्यांच्यावर अन्याय होतो आहे, असे उघडपणे बोला-यला तयारच नव्हता.

एके दिवशी परदेशातून एक घोड्याचा व्यापारी उत्तम जातीचे पांचशे घोडे घेऊन काशीच्या राजाकडे आला. राजाने लगेच आपल्या दरबारी क्रयाधिकाऱ्याकडे निरोप पाठवून त्याला सांगितले की घोड्यांची पारख करून घोडे चांगले असले तर घेऊन त्यांची किमत देऊन टाकावी.

क्रयाधिकाऱ्याने पांचशे घोड्यांची पारख केली व किमत एका पायली तांदुळाहून जास्त असणे शक्य नाही असे मनाशी ठरवून पांचशे घोड्यांना मिळून एक पायली तांदूळ द्यायला आज्ञा केली व घोड्यांना तबेल्यात नेऊन बांधायला सांगितले.

घोड्यांच्या व्यापाऱ्याला तर धक्काच बसला. आपण किती मूर्खपणा केला? तरी इतर व्यापाऱ्यांप्रमाणे पुढे निघून जायच्या ऐवजी त्याने सरळ महाराजांपर्यंत वर्दी कशी पोचवायची याविषयी राज्याचे जुने क्रयाधिकारी बोधिसत्व यांना भेटून त्याच्या-वर जो अन्याय झाला होता तो सांगून त्यांचा सल्ला विचारला. बोधिसत्वांनी सर्व ऐकून घेतले व म्हणाले—"हे पहा, मी सांगतो तसे करा. या नव्या क्रयाधि-काऱ्याला मनःशांती मिळावी यासाठी पहिल्याने याच्या हातावर काही रक्कम ठेवा व नंतर त्याला विचारा—'आपण आमच्या घोड्यांची किमत एक एक पायली तांदूळ सांगितलीत ती ठीकच आहे. तर एक विनंती आहे, आपण या पायलीभर तांदुळांची किमत किती हे महा-राजांसमक्ष दरबारात सांगू शकाल का?' क्रयाधिकाऱ्याने ते मान्य केले तर त्याला राजाच्या दरबारात घेऊन या. त्यावेळी मी तेथे असेन. तुमच्यावर अन्याय होऊ नये. यासाठी सर्व आवश्यक ते करीन."

बोधिसत्वांनी सांगितले त्याप्रमाणे त्या घोड्यांच्या व्यापाऱ्याने क्रयाधिकाऱ्याच्या हातावर काही पैसे ठेवले आणि बोधि-सत्वांनी विचारायला सांगितले होते, तसे क्रयाधिकाऱ्याला विचारले.

क्रयाधिकारी तर खूषच झाला व म्हणाला—"त्यात काय! एक पायली तांदु-ळाची किमत सांगणं तेवढं कठीण काहीच नाही. उद्यां महाराजांना दरबारात जाऊन मी सांगतो आणि त्यांच्याकडून होकार घेववितो."

दुसऱ्या दिवशी दरबार भरला. खचा-खच गर्दी होती. सर्व मंत्री व सर्व अधिकारी हजर होते. महाराजांची परवानगी मागून



बोधिसत्वसुद्धा दरबारात आले होते. घोड्यांचा व्यापारी राजाला अभिवादन करून म्हणाला—"महाराज! आपल्या नव्या क्रयाधिकाऱ्यांनी माझ्या पांचशे घोड्यांची किमत एक पायली तांदूळ म्हणून ठरवून दिली आहे; ती ठीकच आहे. परंतु मला यात एक शंका राहली आहे या एक पायली तांदुळाची किमत किती माना-वयाची?"

तोपर्यंत राजाला घडलेली गोष्ट काहीच माहीत नव्हती. म्हणून त्याला आश्चर्यच वाटले. त्याने नव्या क्रयाधिकाऱ्याला विचारले—"पांचशे घोड्यांची किमत तू काय ठरवून दिलीस?"

"प्रभो! एक पायली तांदूळ!" क्रयाधिकारी म्हणाला.

"अस्सं! फार छान, पांचशे घोड्यांची किमत एक पायली तांदूळ असेल तर पायलीभर तांदुळाची किमत . किती?" राजाने विचारले.

क्रयाधिकारी मागेपुढे न पाहतां एकदम म्हणाला–"पायलीभर तांदुळांची किमत किती विचारतां, प्रभो? सर्व काशीराज्य आणि त्याची मांडलिक राज्यें मिळून जितकी किमत होईल तितकी!"

ते विचित्र उत्तर ऐकून मंत्री व राज्याचे इतर अधिकारी प्रमुख नागरिक हसत टाळ्या वाजवू लागले. हंसूनहंसून त्यांच्या पोटात दुखू लागले.

त्यांच्यापैकी एका नागरिकाने उठून नव्या क्रयाधिकाऱ्याला विचारले–"आजपर्यंत राज्याची किमत किती हे ठरविणे अशक्य वाटत होते आम्हांला. परंतु आज कळले की सर्व काशी राज्याची किमत तू सांगतो आहेस तशी पायली तांदूळ आहे. तुझ्या बुद्धिमत्तेचं कौतुक करावं तेवढं थोडंच आहे!"

तेव्हां बोधिसत्व दरबारात उभे राहून म्हणाले–"या क्रयाधिकाऱ्याने सांगितले ते खरे आहे! त्यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे? त्याला हंसण्यात व त्याची थट्टा करण्यात काय अर्थ आहे? त्याने पांचशे घोड्यांची किमत एक पायली तांदूळ सांगितली आणि एक पायली तांदूळाची किमत सर्व काशी राज्य व त्याची मांडलिक राज्ये एवढी त्याने सांगितली. त्याप्रमाणे पांचशे घोड्यांची किमत काशी राज्य व मांडलिक राज्ये एवढी झाली हे कळते. म्हणून क्रयाधिकाऱ्याने पांचशे घोड्यांची किमत ठरविली ती न्याय्य आहे."

बोधिसत्व म्हणाले ते ऐकून सर्व दरबारी थक्क झाले. चवकशी केल्यावर घडलेली गोष्ट कळली. तेव्हां काशी राजाला आपली चूक कळली व त्याने लांचखाऊ क्रयाधिकाऱ्याला कामावरून कमी करून पुन्हां बोधिसत्वांना त्या पदावर नेमले.





# बुद्धाचे निर्वाण

सारिपुत्र व मौद्‌गल्यायन नावाचे बुद्धाचे दोन सुयोग्य व समर्थ असे शिष्य होते. त्याने बौद्धधर्माचा प्रचार करण्यासाठी त्या दोघांना नेमले. दोघे शिष्य दोन निरनिराळ्या प्रदेशात राहू लागले.

काही वर्षे लोटल्यावर सारिपुत्राला वाटले की त्याचा निर्वाण लवकरच होणार आहे. म्हणून तो बुद्धाच्या दर्शनास गेला. बुद्धाचा आशीर्वाद व निरोप घेऊन सारिपुत्र आपल्या आईकडे गेला. तिला बुद्धधर्म स्वीकारायला लावून एके दिवशी सूर्योदयाच्या वेळी त्याला निर्वाणप्राप्ती लाभली.





मौद्‌गल्यायनाने बौद्धधर्माचा जो तत्व प्रचार केला त्यामुळे काही कट्टर धर्मावलंबियांना राग आला. त्यांनी त्याचा वध करण्यासाठी एका मारेकऱ्याला पाठविले. परंतु तो मौद्‌गल्यायनाच्या कुटीरात प्रवेश करीत असतां मौद्‌ल्यायन हवेत तरंगत त्या मारे-



अशातऱ्हेने मौद्गल्यायनाने अनेक वेळां मारेकऱ्यांच्या हातून स्वत:चे संरक्षण केले. परंतु एकदां एक मारेकरी एक जाडजूड दांडके घेऊन मौदगल्यायनांना ठार करण्यासाठी टपून बसला होता. तेव्हां मौद्गल्यायननांना त्यांच्या पूर्व-जन्मात घडलेली एक घटना आठविली.

पूर्वजन्मी त्यांनी आपल्या वृद्ध माता पित्यांना सोडून द्यायचे ठरवून त्यांना ते एक अरण्यात घेऊन गेले. तेथे ते एका झाडाच्या सावलीत बसले असतां मौद्गल्यायन स्वत: दाढीमिशा लावून त्यांना मारायला तयार होऊन आले. तेव्हां आईवडील मोठयाने ओरडून म्हणाले—"संभाळ रे बाळा ! आम्हांला कोणीतरी ठार करायला आला आहे. तू मात्र दूर पळून जा !" आईवडिलांनी त्या क्षणालाही मुलाच्या रक्षणासाठी केलेला तो प्रयत्न पाहून मौद्गल्या-यनांच्या मनात बदल झाला होता.





दूर जाऊन मौद्गल्यायनांनी दाढीमिशा काढून टाकल्या व आईवडिलांना घरी घेऊन गेले. ते पूर्वजन्मीचे पापकृत्य आठवतांच मौद्गल्यायनातील अद्भुत शक्ती नष्ट झाली. मारेकऱ्याने आपल्या सोटयाने त्यांना ठोकले व ते मेले असतील असे समजून निघून गेला. परंतु त्या अंतिम क्षणीही मौद्गल्यायन

आतां बुद्धाचे वय ऐंशी वर्षांचे झाले होते. एके दिवशी ते वैशालीला गेले. रूपसुंदरी राजनर्तकी अंबालिका त्याच्या दर्शनासाठी आली. तिने आप-ल्या घरी जेवायला बोलाविले. बुद्धाने ते मान्य केले.





त्यानंतर लगेच काही कुलीन लोक बुद्धाच्या दर्शनाला आले व त्यांनी बुद्धाला जेवायचे बोलावणे केले. त्याच बरोबर बुद्धाने राजनर्तकीचे बोलावणे मान्य करणे बरोबर नसल्याचे त्यांनी सांगितले. बुद्ध त्यांना म्हणाला—"गंगा, कृष्णा वगैरे नद्या निरनिराळ्या अस-ल्या तरी त्या समुद्रात मिळाल्या की त्यांचे निराळेपण नाहीसे होते. त्याच प्रमाणे माझा उपदेश घेणारी व्यक्ती कोणी वेश्या असो अगर कुलीन स्त्री असो सारखीच."

त्यानंतर काही दिवसांनी बुद्धाने आपल्या शिष्यांना बोलावून त्याचे निर्वाण तीन महिन्यांनी होणार अस-ल्याचे सांगितले. शिष्य शोक करू लागले. बुद्ध त्यांना धीर देत म्हणाला—"कोणी कितीही मोठा असला तरी त्याला मरण टळत नाही. यापुढे माझे उपदेशच तुमचे मार्गदर्शन करणार."





बुद्ध वैशालीहून निघून श्रावानगरीला आला. तेथे त्याचा एक शिष्य चुंद नांवाचा कुंभार होता त्याचे आतिथ्य स्वीकार केले. त्याने प्रेम भक्तिपूर्वक बुद्धाला सामिष भोजन वाढले. ते मांस भक्षण केल्यास प्रकृती बिघडेल हे माहीत असूनही शिष्यावरच्या प्रेमामुळे बुद्ध त्याला नकार देऊ शकला नाही.

भोजन झाल्यानंतर बुद्ध आजारी पडला. मरण जवळ येऊन ठेपल्याचे बुद्धाने आपल्या शिष्यांना सांगितले. त्याचे अंत्यदर्शन घेण्यासाठी लोकांची गर्दी झाली. त्या शेवटच्या घटकेलाही दर्शनाला आलेल्या शिष्यांनी विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे बुद्ध देत राहिला. त्यानंतर शांतपणे डोळे मिटले.





बुद्धाचे उपदेश दिगदिगंत पसरले. त्याच्या स्मरणार्थ बांधलेले स्तूप व भिक्षूंचे विहार एका भारतातच नव्हे, तर इतर देशातही आहेत. त्याने केलेल्या उपदेशांच्या आधारे असंख्य काव्ये, नाटके, समीक्षाग्रंथ लिहिले गेले. बौद्ध धर्म जगातल्या मोठ्या धर्मांपैकी एक मानला गेला.



# उग्रसेनाचा राग

उग्रसेन महाराजांना भयंकर राग येत असे.

ते युवराज असेपर्यंत तसा काही प्रसंग घडला नाही. परंतु गादीवर आल्यापासून त्यांच्या रागाचा परिणाम अनर्थकारी होऊ लागला.

आपल्या रागाला आळा घालण्याचा त्यांनी लाख प्रयत्न करून पाहिला. परंतु राग आला की त्यांना देहभानच रहात नसे व ते अत्यंत क्रूरपणे वागत, परंतु राग कमी झाला की त्यांच्यासारखा चांगला माणूस मिळायचा नाही!

एकदा त्यांना एका सैनिकावर भयंकर राग आला व त्यांनी लगेच त्याला पंचवीस कोरडे द्यायची शिक्षा सांगून त्याचा अंमल सुद्धा करविला. कोरडे खाऊन तो बेशुद्ध होऊन पडला असतां त्यांचा राग उतरला होता. त्यांना फार वाईट वाटले व त्यांनी त्या सैनिकाचा सर्व औषधोपचार करविला. राणीकडे गेल्यावर त्यांनी आपल्या चुकीबद्दल पुष्कळ पश्चात्ताप व्यक्त केला.

राणी म्हणाली—"तुम्हांला इतका राग येणे हे देशहिताचे नाही!"

"मग मी काय करू? राग काबूत ठेवण्याचा किती प्रयत्न करतो आहे." उग्रसेन राणीला म्हणाला.

"मी एक युक्ती सांगते. यापुढे तुम्ही कोणाला काही शिक्षा केलीत तर ती शिक्षा स्वत: अनुभव घेऊन पहा." राणीने सुचविले.

एक आठवडासुद्धा लोटला नसेल व उग्रसेन महाराजांनी आणखी एका सैनिकाला पंचवीस कोरडे द्यायची शिक्षा केली. शिक्षा देऊन झाल्यावर त्यांचा राग पार नाहीसा झाला. त्याच वेळी राणी म्हणाली होती ते त्यांना आठवले. "एवढ्याशा चुकीबद्दल पंचवीस फटक्यांची शिक्षा करणे हाच घोर अपराध आहे. हा अपराध



केल्याबद्दल मी हीच शिक्षा भोगावी म्हणतो." उग्रसेन महाराज म्हणाले.

परंतु तेथे हजर असलेल्या सैनिकांपैकी एकही जण महाराजांना ही शिक्षा करायला पुढे पाऊल टाकीना राजाने आज्ञा केली तरी काही उपयोग झाला नाही.

उग्रसेनाने राणीकडे जाऊन घडलेली गोष्ट सांगितली. राणीहसून म्हणाली–"सैनिकांनी लहानसहान चुका केल्याबद्दल पंचवीस फटक्यांची शिक्षा तुम्ही केलीत. मग राजाज्ञा मान्य न करणे हा तर फारच मोठा अपराध झाला. तरी सुद्धा तुम्हाला राग आला नाही. म्हणजे शिक्षा भोगायला तुमची तयारी नाही हाच अर्थ झाला!"

"ते ऐकून उग्रसेनाच्या अहंकाराला धक्का बसला."

"मला मारलं नाही या अपराधाबद्दल मी आपल्या सैनिकांना कशी शिक्षा द्यावी म्हणतेस? तुला शक्य असेल तर तूच त्या आज्ञेचे पालन करवून दाखव!" उग्रसेन महाराज राणीला म्हणाले.

राणीने लगेच एका सैनिकाला बोलाविले व त्याला विचारले–"मी सांगेन ते करशील का? की तत्क्षण मृत्युदंड भोगायला तयार होशील का?" राणीने विचारले.

तो सैनिक थरथर कांपत राणी म्हणेल ते करतो, म्हणाला. राणीने त्याच्या हातात चाबूक दिला व 'राजाला फटके दे' म्हणाली. तो त्या गोष्टीस कबूल झाला.

राजाला पहिला फटका बसताच राजाला घेरी आल्यासारखं झालं. दुसरा फटका पडण्याआधी राजा उलटला व त्याच्या हातातून चाबूक ओढून घेऊन त्याला दहा फटके मारले. राणी काही म्हणायला गेली तेव्हां तिकडे लक्ष न देतां तिकडून प्रधानाकडे गेला व म्हणाला–"राणीने राजद्रोह केला आहे तिला हद्दपारीची शिक्षा मी करीत आहे. माझ्या आज्ञेचे पालन तावड तोब झाले नाही तर तुम्हीसुद्धा राजद्रोह केल्यासारखे होईल.' नाइलाज म्हणून प्रधानाने राणीला जवळच्या एका अरण्यात नेऊन सोडले.

त्यानंतर राजाचा राग उतरला. त्याला फार वाईट वाटले व त्याने स्वत: जाऊन राणीला परत अंत:पुरात आणले आणि अनेक प्रकारे तिची क्षमा मागितली.

राणी राजाला म्हणाली–"प्रभो! क्षमा कराल तर आणखी एक उपाय सुचविते. अशी आज्ञा काढा की आपण कोणाला एखादी शिक्षा केली तर लगेच ती शिक्षा दिली जाऊ नये. मध्यंतरी आपला राग कमी होईल. राग उतरल्यावर आपल्या इतका चांगला माणूस मिळणेच शक्यनाही!"

राजाने आपल्या अधिकाऱ्यांना तसेच सांगितले.

परंतु ती युक्तीसुद्धा निरुपयोगी ठरली. कारण राजाने कोणाला शिक्षा केली व ती शिक्षा दिली गेली नाही, तर त्याला संबंधित अधिकाऱ्यांचा राग येई. शिक्षा दिली जाईपर्यंत त्याचा राग वाढतच जात असे.

आपल्याला राग येतो त्याविषयी प्रजेला काय वाटते हे कळावे म्हणून उग्रसेन वेष पालटून एकदां राज्यभर फिरला.

एका जागी त्याला त्याच्याहून जास्त रागीट माणूस भेटला. त्याचे वेष पालटून फिरत असलेल्या राजाशी भांडण झालं.

जवळपासच्या लोकांनी राजाला शांत करण्याचा प्रयत्न करीत म्हटले–"थांबा हो, तो जन्मापासूनच रागीट मूर्ख आहे! त्याला राग आला तर राजालासुद्धा सोडणार नाही!"



"कसा सोडणार नाही? मीच महाराज आहे! ह्याने माझे पाय धरून क्षमा मागितली नाही तर याला मी पन्नास फटके देववीन!" उग्रसेन म्हणाला आणि आपला पालटलेला वेष काढून फेकून दिला.

उग्रसेन महाराज असल्याचे कळले तरी सुद्धा रागीट माणूस गप्प न राहता म्हणाला–"राजा असला म्हणून मला त्याची पर्वा नाही. त्याचीच सर्व चूक आहे! त्यानेच माझे पाय धरले पाहिजेत!"

आतां मात्र उग्रसेन स्वत:ला आवरू शकला नाही. त्या रागीट माणसाला फटक्याची शिक्षा भोगावी लागली. तो फटके खात असतांही राजाला शिव्या देतच राहिला. अशा मूर्खाला राजाने शिक्षा केल्याबद्दल अनेक लोकांनी राजाला नावे ठेवली. राग उतरल्यावर राजाने राणीला सर्व सांगितले व म्हणाला–"माझ्या प्रजेत रागीटपणाच्या बाबतीत माझ्याहून वरचढ लोक आहेत फटके खात असतांही एकाचा राग कमी झाला नाही. असे लोक असतां मी आपल्या रागाविषयी इतकी फिकीर करण्याचे कारण नाही!"

राणीला ते मान्य झाले नाही ती म्हणाली–"सामान्य माणसाला राग आला तर त्याचे फळ त्यालाच भोगावे लागते. परंतु राजाला राग आला तर त्याचा त्रास राजापेक्षां प्रजेलाच जास्त भोगावा लागतो. इतका राग असल्यावर तुम्ही राजा म्हणवून घ्यायला योग्य नाही असेच म्हणावे लागेल. तुम्हांला राज्याचं व प्रजेचं हित व्हावं असं वाटत असेल तर तुम्ही राज्यकारभार माझ्या हाती द्यावा. तुम्ही एक सामान्य प्रजा म्हणून रहा!"

कोणत्या मन:स्थितीत का होई ना, राजाने ते मान्य केले. राणीच्या हातात अधिकारसूत्रे दिल्यानंतर काही दिवसांनी राजाचा राग कमी झाला. अधिकार नसला की राग आटोक्यात असतो, हे राजाला लवकरच कळले. कारण राग वाढायला दंड देण्याचा त्याला जो अधिकार होता तोच मुख्य मूळ कारण ठरला.



# उपकाराची फेड

रंगूताईला चार मुले होती. तिची धाकटी बहीण वारली तेव्हां तिचा मुलगा गोपू याला तिने आपला पांचवा मुलगा म्हणून वाढविले. सर्व मुले वयात आली. गोपू आपल्या गावी निघून गेला व त्याची जमीन होती तीत पीक काढून स्वत:चा उदरनिर्वाह करू लागला.

रंगूताईच्या चौघां मुलांची लग्ने झाली व त्यांचे संसार सुरू झाले. कोणत्याही सुनेने रंगूताईला आपल्या घरी राहू दिले नाही. ती काही दिवस एकटीच राहली व मुले पैसे देत त्यावर भागवू लागली. काही दिवसांनी ते पैसे मिळणेसुद्धा बंद झाले. तेव्हां रंगूताई एका श्रीमंताच्या घरी नोकरी करून तेथेच राहू लागली.

काही काळ लोटल्यावर गोपू आपल्या मावशीला भेटायला आला. ती कोणत्याही मुलाकडे रहात नसल्याचे कळले आणि हेही कळले की कोणत्यातरी श्रीमंताच्या घरी उतारवयात अंगमेहनत करून तिला आपले पोट भरावे लागत आहे. गोपूला फार वाईट वाटले. तो त्या श्रीमंताच्या घरी जाऊन तिला भेटला व तिचे ते हाल पाहून त्याला राहवले नाही. तो तिला बरोबर चलायला आग्रह करू लागला.

तो श्रीमंत माणूस गोपूच्या मनाचा थोरपणा पाहून म्हणाला–"असे उपकार आठवणारे लोक फार थोडे असतात बाबा! तुला मी आपली मुलगी देतो. तू तिच्याशी लग्न करून घे."

"नको हो, मी लग्न केले की मावशीची पुन्हां तीच गत होईल!" गोपू म्हणाला.

तो श्रीमंत माणूस हंसून म्हणाला–"तुला ते भय वाटण्याचे कारण नाही. मला एकुलती मुलगी आहे. तू व तुझी मावशी आमच्याच घरी रहा." गोपू लग्नाला तयार झाला.





# सोने सापडले

एका घरात तीन बिऱ्हाडं होती. एका बिऱ्हाडात रामाचारी नावाचे एक शिक्षक रहात होते. ते आपल्या घरी वीस पंचवीस मुलांना शिकवीत असत.

दुसऱ्या बिऱ्हाडात योगिराज नावाचे एक भक्त रहात होते. त्यांच्या घरी दररोज भजन, पुराण, प्रवचन, कीर्तन वगैरे नित्य काहीतरी होत असे.

तिसऱ्या बिऱ्हाडात व्यंकटराव नावाचे एक गृहस्थ रहात. त्यांना नोकरीबिकरी काही नव्हती. परंतु दर शनिवारी त्यांच्या बायकोच्या अंगात येई. कोणी काही प्रश्न विचारला की तिच्या अंगातली देवी त्या प्रश्नाचे उत्तर देई. प्रश्न विचारणाऱ्याजवळ व्यंकटराव प्रत्येकी एक रुपया वसूल करीत म्हणून दर शनिवारी त्यांच्या घरात प्रश्न विचारणाऱ्यांची गर्दी असे.

त्यांच्या घरात पाण्याची सोय चांगली नव्हती. म्हणून महादू नावाचा एक माणूस पाणक्याचं काम करी. तो गावातल्या तलावावरून पाणी आणून तिघांच्या घरात भरी. महादू जगात एकटाच होता.

पार्वती नावाची मोलकरीण तिन्ही घरात कामे करी. तिचे वडील नेहमी आजारी असत. त्यांची सेवा तिला करावी लागे.

एका शनिवारी संध्याकाळी पार्वतीने भांडी घासून पुसून व्यंकटरावांच्या सैंपाकघरातल्या कोनाड्यात आणून ठेवली. दिवसभर प्रश्नांची उत्तरे देत व्यंकटरावांची बायको दमून भागून एका चटईवर पडून होती. भक्तांनी आणून दिलेली फळफळावळ, नारळाच्या वाट्या वगैरे व्यंकटराव एका टोपल्यात नीट लावून ठेवीत होते. काळोख पडल्याबरोबर ती फळे व नारळाच्या वाट्या ते विकायला घेऊन जात.

व्यंकटरावांना फळे पाटीत लावीत असलेले पाहून पार्वतीला अंथरुणाला खिळून राहलेल्या वडिलांची आठवण झाली. तिला राहवलं नाही व ती म्हणाली—"काका, विकत घ्यायचं म्हणजे फार महाग आहेत ही फळं. तुम्ही दोन फळं दिलीत तर बाबांना खायला देईन म्हणते! आजारी आहेत ते!" किती विनवण्या केल्या तिने.

व्यंकटरावांनी चटदिशी टोपलीवर फडकं टाकलं व म्हणाले—"तुझी दृष्ट लागलेल्या फळांना आज काय किमत येते कोणाला ठाऊक?"

दमून भागून पडलेली व्यंकटरावांची बायको चटदिशी उठून बसली व म्हणाली—"तुला पगाराबरोबर फळफळावळ व फराळ पाहिजे का? लोभाला काही मर्यादा हवी असते. नीघ, चालू लाग!"

काही दिवसांपूर्वीच ती एका बाईला म्हणाली होती—"लोभामुळेच तुझी ही गत झाली. लोभ माणसात कधी असू नये!" ते तिला आठवले व पार्वती स्वतःशीच हसली.

त्याच वेळी महादू रामाचारींच्या बिऱ्हाडात होता. वरदाचारीच्या मुलाची परीक्षा झाली होती. त्याची जुनी पुस्तकं होती. महादूच्या ओळखीचा एक गरीब मुलगा शिकत होता. त्याला ती जुनी पुस्तके



द्यावीशी महादूला वाटले. मागे एकदां रामाचारी विद्यार्थ्यांना सांगत असतां महादूने त्यांच्या तोंडचं हे वाक्य ऐकलं होतं—"सर्व दानात उच्च दान विद्यादान होय!"

महादू रामाचारींना त्या गरीब विद्यार्थ्याविषयी सांगून म्हणाला—"तुमच्या मुलाला गरज नसलेली पुस्तकं दिलीत तर तो बिचारा शिकेल!"

"अस्सं, हे तर आणखी बरं झालं की! याला लोभ म्हणायचा की मोह? गरिबाला विद्याभ्यास हवा कशाला? त्याने कोठेतरी मजुरी करावी. पुस्तकांची अर्धी किमत तरी दे म्हणावं, त्याला." रामाचारी म्हणाला.



हे शक्य दिसत नाही हे ओळखून महादू तेथून दुसरीकडे निघाला आणि व्यंकट-रावांच्या बिऱ्हाडाबाहेर पडतांच पार्वती समोर दिसली. दोघं परस्परांच्या अनुभवां-विषयी बोलू लागली.

"हे सर्व सोड रे! पण शेजारच्या गावी उद्या जत्रा भरणार आहे, जाऊं या का?" पार्वतीने विचारलं.

"इकडची कामं मग कोण करणार?" महादू म्हणाला.

"पहाटे काळोखातच येऊन करून जाऊ. रात्री यायला नको. योगिराज भक्त आहेत. पहिल्याने त्यांची परवानगी घेऊं. पार्वती म्हणाली.

"होय, होय! 'दिवसातला पाव भाग देवघरात काढावा' असं म्हणताना मी त्यांना ऐकलं आहे." महादू म्हणाला.

परंतु योगिराजांनी जत्रेला जायला परवानगी द्यायची तर राहूली बाजूलाच, वर म्हणाले—"तुम्हांला, आशाच फार! तुम्हांला काम केल्याशिवाय फुकटाचा पगार मात्र हवा! एक वेळचं काम केलं नाही तरी पगार कापून घेईन, सांगून ठेवतो. देव दर्शनासाठी कोठे दूर जायला हवं का? तो तर सर्वत्रच असतो!"

दोघं बाहेर निघून आली.

"ही मोठी माणसं बोलतात एक व करतात एक! दोन्हींचा परस्पर संबंधच नसतो!" पार्वती रागाने म्हणाली.

दुसऱ्या दिवशी महादू कावडीने पाणी भरू लागला तेव्हां त्या घरात त्याला काहीतरी चकाकत असलेलं दिसलं. त्याने कावडी उतरविली आणि ती वस्तू उचलून पाहिली. ती सोन्याची अंगठी होती.

त्याच वेळी पार्वती सुद्धा कामाला आली, तिला महादूने ती अंगठी दाखविली. व म्हणाला—"मला आत्तां मिळाली!"

त्याच वेळी दातवणासाठी कडुलिंबाची काडी काढायला व्यंकटराव बाहेर आले होते त्यांना "मिळाली!" हा आवाज ऐकू आला. ते धावतच आले व जवळ जाऊन व अंगठी पाहून म्हणाले— "ही तर माझी आहे! कोणीतरी भक्ताने भेट म्हणून दिली. माझ्या बोटातून गळून पडली वाटतं. दे इकडे!

त्यांच्या पाठोपाठ त्यांची बायको आली व म्हणाली—"होय तर, भक्ताने दिलेली अंगठी अशी कशी जाईल? म्हणून तर मिळाली."

त्या गडबडीत रामाचारीच्या कानावर काहीतरी अर्धवट पडलं. ते धावत येऊन म्हणाले—"ती अंगठी माझी आहे हो! माझ्या एका शिष्याने दिली होती. दे इकडे, पाहू!"

रामाचारीची बायको मध्येच तोंड खुप-सून म्हणाली—"दिवसभर हातात घालून फिरलात, निसटून पडली असेल!"

आपल्या दारात उभे राहून योगिराज सर्व पहात होते. पुढे येऊन म्हणाले—"मी शेजारच्या गावी रामायणाचे पारा-यण करीत होतो. त्यावेळी त्या गावच्या लोकांनी चंदा करून मला ही अंगठी दिली. ती माझी आहे, दे इकडे!"

"देवाचं नाव घेऊन दिलेली अंगठी आणखी कोणी उचलली तर डोळे जातील!" त्यांची बायको म्हणाली.

सर्वजण आपापल्या परीने ती अंगठी त्यांचीच असल्याचे सांगून महादूवर तुटून पडले. आतां ती कोणाला द्यायची महादूला कळेना.

पार्वतीने चटदिशी महादूच्या हातातली अंगठी घेतली व म्हणाली—"काल रात्री



ताडीच्या दुकानात जो कोणी गेला असेल त्याची आहे ही अंगठी. ही महादूला ताडीच्या दुकानात सापडली!"

ते ऐकून सर्वांची तोंडे पांढरी फट्ट पडली. अंगठी हातात वर खाली करून पाहून सर्व म्हणू लागले–"आमचा गैरसमज झाला हो, ती आमची नाही. अगदी अशीच आमची अंगठी आहे! पेटीत ठेवली व ते पार विसरून गेलो!" म्हणत सर्वांनी एकेक करून तेथून पाय काढला.

सर्व निघून गेल्यावर पार्वती खदखदा हसली.

"अंगठी ताडीच्या दुकानात सापडली, असं खोटे कां ग बोललीस?" महादूने आश्चर्य करीत तिला विचारले.

"अरे, तू आहेस भोळा सांब! माणसाचा खोटेपणा तुला कळत नाही. ही अंगठी त्यांच्या पैकी कोणाचीही नाही, हे सिद्ध करण्यासाठीच तर मी हा डाव टाकला होता. थोरपणा मिरविणारी ही मंडळी ताडीच्या दुकानात गेलो होतो, असे म्हणतील तरी का? याहून घोर कामे करायला धजतील! यांचा स्वार्थीपणा पाहून चीड येते! आणि हे इतरांना लोभी, स्वार्थी म्हणतात. ही अंगठी कोणाची हे कळेपर्यंत ही तुझीच समज! चार जण या घरात येतात जातात नाही का? कोणाच्या हातातून निसटून पडली असेल, झालं!" असं म्हणत पार्वतीने अंगठी महादूच्या हातात दिली.

"होय, तू म्हणतेस तेच खरं! मला अक्कलच नाही. तुझ्यासारखी पोरगी बरोबर असली तरच या जगात निर्वाह होणार! तुला हरकत नसेल तर मी ही अंगठी तुझ्या बोटात घालतो!" महादू म्हणाला.

पार्वती लाजत म्हणाली–"बाबांना विचारूं या!......आणखी खऱ्या सोन्याचीच की खोटी, कोणास ठाऊक?"

"पितळेचीच असू दे! तिच्या मुळेच तर मला खरं सोनं लाभलं!" महादू प्रेमाने पार्वतीकडे पहात म्हणाला.





# दागिन्यांची हाव

रखमाबाईना दागिन्यांची फारच हाव होती! ती सर्व अंगावर दागिने घालून रात्रंदिवस रहायची. कोणी कधी एखादा दागिना चार दिवस उधार मागितला तर द्यायची नाही.

रखमाबाईंच्या मोठ्या भावाचं नाव होतं शंकरराव. त्यांच्या मुलीचं लग्न होतं. शंकरराव चांगले श्रीमंत जमिनदारच होते. रखमाबाई भाचीच्या लग्नाला आल्या.

मुहूर्तजवळ आला होता. शंकररावांनी रखमाबाईना बाजूला बोलावून म्हटलं–"ताई, एक मदत पाहिजे आहे, तुझी! मी मुलीसाठी दागिने करायला शेजारगावच्या सोनाराला बोलावून आठ हजार रुपये दिले व दागिने काल आणून द्यायला सांगितले होते. आजपर्यंत त्याने तोंड दाखविले नाही. परवांचा मुहूर्त आहे. मुलीला दागिन्या शिवाय बोहोल्यावर उभी करणे शोभणार नाही. म्हणून तूच आपल्या अंगावरचे दागिने मुलीच्या अंगावर घाल, आपल्या हाताने. लग्न झाल्यावर आपले दागिने काढून घे!"

रखमाबाईना ते कसे मान्य होणार, म्हणून खरी गोष्ट लपवून त्या म्हणाल्या–

"दादा! माझे हे दागिने सोन्याचे असते तर तू म्हणालास तसे भाचीच्या अंगावर सर्व दागिने घालायला मला काही वाटलं नसतं. परंतु माझे सर्व दागिने गिलिटाचे आहेत रे! तुला ही गोष्ट माहीत नसेल म्हणून सांगितलं. नवऱ्या मुलीच्या अंगावर गिलिटाचे दागिने घालणे अशुभ कार्य होईल की रे!"

शंकररावांना रखमाबाई म्हणाल्या ते सर्व खरं व बरोबर वाटलं. परंतु ते आणखी काहीतरी युक्ती काढण्याचा विचार

करू लागले. त्या आधीच सोनाराने सुदैवाने दागिने आणून दिले.

ठरल्या मुहूर्तावर लग्न निर्विघ्न पार पडले. लग्नाला आलेली सर्व नातेवाईक मंडळी शंकररावांच्या घरातच रात्री राहली. उजाडल्याशिवाय आपापल्या घरी जाणेही सर्वांना शक्य नव्हते.

रखमाबाईचं वागणे भावाच्या घरी लग्न दिवशीसुद्धा थोडं तुटकपणाचेच होतं. रात्रीची जेवणे झाल्यावर त्या आणि दोघी कोणी दूरच्या नातेवाईक बायका एका निराळ्या खोलीत झोपल्या.

मध्यरात्रीच्या नेमके सुमारास त्या खोलीतच चोर शिरले व चाहूल लागताच रखमाबाई व दोघी बायका जागा झालेल्या पाहून त्या सर्व बायकांना "तोंड उघडाल तर सुरा भोसकू!" असे बजावून सांगून त्यांच्या अंगावरचे दागिने काढून घेऊन चोर पसार झाले.

चोर जाईपर्यंत जीव मुठीत घेऊन बसलेल्या रखमाबाई चोर गेल्याबरोबर मोठमोठ्याने छाती बडवून रडू लागल्या. दुसऱ्या दोघीसुद्धा रडू लागल्या.

त्या गडबडीमुळे सर्व लग्न घरच जागे झाले आणि रडण्याचा आवाज आला त्या खोलीकडे धावले.

शंकररावसुद्धा काय भानगड आहे, म्हणून पहायला धावले व घडलेली गोष्ट कळल्यावर रखमाबाईला व इतर बायकांना म्हणाले—"ताई, अक्का! कोणी एवढं मनाला लावून घेऊ नका! माझ्या घरात झालेल्या चोरीची सर्व जबाबदारी माझी! तुमचं काय काय गेलं, हे तुम्ही सांगितलं तर मी नवे दागिने करवून देईन." नंतर आपल्या बहिणीकडे वळून म्हणाले—"ताई! तुझ्यासारखेच या दोघींचे दागिने पण गिलिटाचेच असते तर माझा हा विनाकारण होणारा खर्च वाचला असता नाही का?"

ते ऐकून रखमाबाई काय बोलणार? तोंड दाबून बुक्याचा मार बसल्यासारखे झाले त्यांना!






हरिश्चंद्राने सुरू केलेला नरमेघ विश्वामित्राने हा काय धर्म झाला असे सांगितल्यावर तेथेच थांबला व त्याचा शेवट गोडच झाला.

एके दिवशी इंद्राला भेटण्यासाठी इंद्र सभेत वसिष्ठ व विश्वामित्र दोघेही आले. वसिष्ठ ऋषींच्या अंगावर निरनिराळी वस्त्राभूषणे पाहून विश्वामित्राने चकित होऊन विचारले—"कोणी हो, तुमचा एवढा सत्कार केला?"

वसिष्ठ थोड्या गर्वाने आनंदोत्साह प्रगट करून म्हणाले—"चंद्रासारखा सत्य हरिश्चंद्र आमचा शिष्य आहे ना! त्याची बरोबरी करू शकेल असा कोणी दुसरा राजा आहे का? त्याने राजसूय यज्ञ केला व खूप दक्षिणा देऊन माझा निरनिराळ्या प्रकारे सत्कार केला. सत्य बोलण्यात असो, दातृत्वात असो, शौर्य पराक्रमात असो किंवा धर्माचरण करण्यात असो, कोणत्याहि युगात आणि चतुर्दश लोकात हरिश्चंद्राची बरोबरी करू शकेल असा राजा मिळणे शक्य नाही." या शब्दात वसिष्ठाने हरिश्चंद्राची फार स्तुती केली.

वसिष्ठाने हरिश्चंद्राला आकाशात चढवलेला पाहून विश्वामित्राच्या मनात मत्सराग्नी पेटला. तो म्हणाला—"इतका खोटा आणि कपटी आहे तो आणि तू त्याला इतका मोठा म्हणून माझ्याजवळ त्याची वाखाणणी करतो आहेस होय? या हरिश्चंद्रानेच ना वरुणाला फसविले होते?



आणि त्याच्याविषयी तुझ्या या गप्पा? मी पैज लावून सांगतो. हरिश्चंद्र खोटे बोलणारा, दुष्ट आहे, दाता तर नाहीच नाही! मी हे सिद्ध करून दाखवू शकलो नाही तर माझे सर्व पुण्य नष्ट होईल, मी सिद्ध करून दाखविले तर तुझे पुण्य नष्ट होईल आहे कबूल?"

वाद वाढला आणि दोघांनी पैज लावली आणि आपापल्या आश्रमात परतले.

एकदां हरिश्चंद्र अरण्यात फिरत असता त्याला एक स्त्री दिसली. ती मोठ्याने रडत होती. हरिश्चंद्राला तिची कीव आली व त्याने तिला विचारले–" बाई, या भयंकर अरण्यात तू एकटी कशी? तुझे पती कोठे आहेत? माझ्या राज्यात राक्षस किंवा क्रूर माणसे कोठेही नाहीत? तुला त्रास देणारी व्यक्ती कोण, तू त्याचे नाव सांग, त्याचा शेवट करतो."

ती स्त्री म्हणाली–" राजा, विश्वामित्र नावाचा एक ऋषी आहे तो मला कष्ट देण्यासाठी तपश्चर्या करीत आहे."

ते ऐकून हरिश्चंद्र म्हणाला–" तू घाबरण्याचे मुळीच कारण नाही. त्याच्या तपश्चर्येने तो तुला त्रास देत असेल तर मी त्याची तपश्चर्या बंद करवितो." असे तिला वचन देऊन हरिश्चंद्र विश्वामित्र ऋषींच्या आश्रमात गेला. तो विश्वामित्राला म्हणाला–" मुनिवर्य! मी राज्य करीत असतां कोणी पापबुद्धीने कोणाला त्रास देण्यासाठी तपश्चर्या केलेली चालणार नाही. तेव्हां ही तपश्चर्या बंद करा! या तपश्चर्येने पुण्य काय मिळणार आणि पुरुषार्थ तरी कोणता साधणार?"

विश्वामित्राने तो प्रांत सोडला आणि आणखी कोठे तरी निघून गेला. वसिष्ठांशी झालेल्या भांडणानंतर आतां हरिश्चंद्राने तपश्चर्येत विघ्न आणले त्यामुळे विश्वामित्राला जास्तच राग आला. त्याने हरिश्चंद्राला त्रास देण्याचे ठरवून एका राक्षसाची डुक्कर रूपे सृष्टी केली. ते डुक्कर हरिश्चंद्राच्या राजोद्यानात शिरले आणि [illegible] वून सोडून त्याने फुलझाडांची नासधूस केली. माळ्यांनी काठ्या घेऊन झोडपून पाहिले, बाण मारून पाहिले, परंतु ते डुक्कर तेथून हटेच ना. हे सामान्य डुक्कर नसल्याचे लक्षात आल्यावर माळी राजाकडे धावले.

हरिश्चंद्र घोड्यावर बसून काही सैनिकांसह उपवनात आला. त्याने दुरून गुरगुरत असलेल्या डुकराला पाहिले व फुलझाडांची झालेली नासधूसही पाहिली. त्याला भयंकर राग आला व त्याने त्या डुकरावर बाणांची वृष्टी केली. परंतु ते डुक्कर मेले तर नाहीच, ते पळू लागले. कधी झाडाझुडपाआड लपून राही, कधी बाहेर येई, असा त्याने हरिश्चंद्राला खूप त्रास दिला. शेवटी ते अरण्यात पळून गेले. हरिश्चंद्राने त्याचा पाठलाग सुरू केला.

खोल अरण्यात ते डुक्कर व त्याच्या पाठोपाठ हरिचंद्र जात असता एका जागी एक ओढा लागला. डुक्कर नाहीसे झाले. हरिश्चंद्राने घोड्याला पाणी पाजले, स्वत: पाणी पिऊन घेतले व परत जायला वाटेचा शोध काढीत असतां विश्वामित्र एका वृद्ध ब्राह्मणाच्या रूपे तेथे आला. हरिश्चंद्राने त्याला पाहून नमस्कार केला, तेव्हां विश्वामित्र म्हणाला–" काय रे, तू तर राजा दिसतो आहेस? परंतु तू एकटा या निर्जन स्थानी कसा काय आलास?"



हरिश्चंद्राने विश्वामित्राला ओळखले नाही व त्याला डुकराचा पाठलाग करीत आल्याचे सांगितले व म्हणाला–" परत कसे जायचे मला कळत नाही. मला कृपा करून वाट दाखवितां का?"

विश्वामित्र म्हणाला–" राजा, हे एक तीर्थक्षेत्र आहे. या ओढ्यात स्नान करून पितरांना तर्पण कर आणि तुला शक्य होईल तेवढे दान कर. तू तुला वाटेल ते दान केलेस की मी तुझ्याबरोबर काही अंतर चालत येऊन तुला वाट दाखवीन!"

हरिश्चंद्र म्हणाला–" ब्रह्मवर्य! आपण जे दान मागाल ते मी करीन. सोने, घोडे, भूमि की धन दौलत? मी पूर्वी राजसूय यज्ञ



केला होता तेव्हां मी तपस्वी मुनीसमोर कोणी जे काही मागील ते देण्याची प्रतिज्ञा केली होती. आपण थोरपुरुष आहां! हे पुण्यतीर्थ आहे. आपण जे मागाल ते मी देईन!"

"राजा, तू इतका थोर मनाचा माहेस! सूर्यवंशात जन्मलेल्या त्रिशंकूचा मुलगा आहेस. तुझ्या विषयी वसिष्ठ मुनींना बोलतांना मी ऐकले आहे. तुझ्यासारखा दानी अ सत्यवक्ता जगात कोठेही मिळणे शक्य नाही! ते कधी खोटे बोलतील का? तू दानशूर आहेस पृथ्वीपती आहेस. माझ्या मुलीचे लग्न करून दे." विश्वामित्र ऋषी म्हणाले.

विश्वामित्राने माया करून एका दहा वर्षांच्या मुलीची व एका मुलाची सृष्टी केली व म्हणाला—"याच दोघांचा विवाह करून द्यायचा आहे. यांचे लग्न करून दिलेस की राजसूय यज्ञ केल्याच्या पुण्यपेक्षा मोठे पुण्य लाभेल!"

हरिश्चंद्राने होकार दिला व त्या म्हाताऱ्या ब्राह्मणाच्या रूपात असलेल्या विश्वामित्राने दाखविलेल्या वाटेने आपल्या राजधानीत परतला.

विश्वामित्र आपल्या आश्रमात परतला. त्याने त्या वधूवरांचा विवाह करून दिला. नंतर हरिश्चंद्राला भेटायला गेला तेव्हां हरिश्चंद्र अग्निहोत्राच्या गृहात होता.

"मी कसा अगदी वेळेवर आलो. तू मला दान देतो म्हणाला होतास ते दान देऊन टाक." वृद्ध ब्राह्मण रूपात असलेला विश्वामित्र म्हणाला.

"आपण जे मागाल ते देतो. सांगा काय देऊ?" हरिश्चंद्राने विचारले.

"तुझ्या समोर हे अग्निहोत्र आहे. त्याला साक्षी ठेवून तू आपले सर्व राज्य, हत्ती, घोडे वगैरे सर्व संपत्ती मला दान कर!" विश्वामित्र म्हणाला.

हरिश्चंद्र मागचा पुढचा काही एक विचार न करता म्हणाला—"दिले!"

तेव्हा विश्वामित्र म्हणाला— दक्षिणा-शिवाय दिलेले दान व्यर्थ असते. म्हणून या दानाला अनुरूप होईल अशी दक्षिणा देऊन कृतार्थ हो!"

"ती दक्षिणा किती असेल?" हरिश्चंद्राने विचारले.

"चाळीस मण सोने दक्षिणा म्हणून दे!" विश्वामित्र म्हणाला.

"देतो." असे हरिश्चंद्राने वचन दिले.

विश्वामित्राचे ते कपट हरिश्चंद्राला आतां कळले. तो आश्चर्यचकित झाला. राज्य दिल्यानंतर विश्वामित्राने दक्षिणा मागितली व त्याने भोळपणाने द्यायचे कबूल केले. जवळ होते नव्हते ते सर्व दान केल्यानंतर चाळीस मण सोनं कोठून आणायचे? काळच फिरल्याशिवाय तपश्चर्या करणारा कोणी असे दान व दक्षिणा धन-लोभाशिवाय मागेल का?

राजाला चिंतामग्न स्थितीत पाहून राणी शैब्याने कारण विचारले. राजाने थोडक्यात घडलेली गोष्ट सांगितली. रात्रभर त्याला झोपच आली नाही.

उजाडतांच विश्वामित्र आला व म्हणाला—"राज्याबाहेर कोठे तो जा आणि मला तू दक्षिणा देतो म्हणाला होतास ती द्यायची व्यवस्था कर."



"होते नव्हते ते आपल्याला दिले, जातो. आतांच दक्षिणा देऊ शकणार नाही. म्हणून थोडया उशिरां देईन." असे सांगून हरिश्चंद्र बायकोला व मुलाला म्हणाला—"आपल्याला आतां येथे राहतां येणार नाही, चला!"

तिघे अंगावरच्या कपड्यानिशी निघाले. राजा फसल्याचे प्रजेला कळले व त्यांनी डोळ्यात आंसवे भरून विश्वामित्राला शिव्याशाप दिले.

हरिश्चंद्र निघाला त्याच्याबरोबर विश्वामित्रही निघाला व म्हणाला—"माझी दक्षिणा देऊन टाक. द्यायची नसेल तर देत नाही म्हणून सांगून टाक. मी पुन्हां



सागणार नाही. एवढेच नव्हे तर तू जे काही मला दिले आहेस ते सर्व परत करीन. परंतु तुला आपले वचन मोडायचे नसेल तर सोने दे!"

"ब्रह्मवर्या! मी आपले ऋण नक्कीच फेडीन, नाही तर अन्नाला हात सुद्धा लावणार नाही. माझ्याकडे पाहून सर्व लोक हसणार नाहीत का? आपण थोडे थांबलात व दैव अनुकूल असेल तर मला जे धन मिळेल ते मी दक्षिणा म्हणून देईन!" हरिश्चंद्र म्हणाला.

तेव्हां विश्वामित्र म्हणाला–"तू हे वेडयासारखं बोलू नकोस. तुला धन कोठून रे मिळणार? सर्व धनाचे मूळ कारण जे राज्य ते माझे झाले आहे. आता असे आडवाटेने खोटे बोलू नकोस. देत नाही असे सांगून टाक. मी पुन्हां तोंड वेंगाडणार नाही. त्यानंतर तू व तुझे नशीब!"

आतां मात्र हरिश्चंद्राला राग आला. "मी खोटे बोलतो आहे का? पैशाविषयी तुम्हांला इतकी शंका करण्याचे कारणच काय? मी जरूर पडल्यास आपला देह विकूनही तुमचं सोनं तुम्हांला देईन. मला त्रास द्यायचं किंवा छळायचं मुळीच कारण नाही. आम्ही तिघं शरीर प्रकृतीने चांगले हृष्टपुष्ट आहो. आम्हांला या अयोध्येत कोणी विकत घ्यायला तयार आहे का, पहातो! नाही तर काशीला जाऊन आम्ही स्वतःला विकून तुमची दक्षिणा देतो." असे सांगून हरिश्चंद्र पुढे निघाला.

अयोध्येत त्याला कोण विकत घेणार? सर्व काशीला पोचले. हरिश्चंद्राने गंगेचे स्नान केले, तर्पण केले व बरोबर आलेल्या विश्वामित्राला म्हणाला–"अहो, तुम्ही आम्हांपैकी कोणा एकाला विकून आपले कर्ज फेडून घ्या!"

"एक महिना झाला, तू मला आपल्याबरोबर भटकत फिरवीत आहेस, हे योग्य आहे का? माझी दक्षिणा मला देऊन टाक व नंतर पुढे जा! तुझ्या कीर्तीला कलंक लागेल." विश्वामित्र म्हणाला.

"अहो, अजून एक महिना पुरा झालेला नाही. संध्याकाळपर्यंत अवधी आहे. काही वेळ थांबलात तर तुमचं ऋण फेडतो." हरिश्चंद्र म्हणाला.

"मी जाऊन पुन्हा येतो. तू माझं ऋण फेडले नाहीस तर शाप देईन." असें सांगून विश्वामित्र निघून गेला.

संध्याकाळपर्यंत चाळीस मण सोनं दिलं नाही तर शाप देईन असे धमकावून सांगून विश्वामित्र गेल्यावर हरिश्चंद्र विचारात पडला. मागितले तर देतील असे श्रीमंत मित्र असूनही तो हात पसरायला तयार नव्हता. तसे मित्र नव्हतेच म्हणा. ब्राह्मणाची कर्जफेड झाल्याशिवाय मरण आले तर ब्राह्मणाचे धन अपहरण केल्याचे पाप लागून पुढल्या जन्मी किड्याचा जन्म मिळणार! म्हणून त्याने स्वतःला विकण्याशिवाय दुसरा मार्ग नाही असे ठरविले.

अशा तऱ्हेने विचारमग्न असलेल्या नवऱ्याला पाहून शैव्या त्याला म्हणाली– "राजा सत्यवानाची बरोबरी कोणी करू शकणार नाही. दिलेले वचन मोडल्यास भुतापिशाचासारखी गत होते. सत्य वचनाचे पालन कर. ययातीने शंभर अश्वमेध यज्ञ केले व त्यानंतर राजसूय यज्ञ केला. त्याचे फळ त्याला स्वर्गप्राप्ती रूपे मिळाले. परंतु एक खोटे बोलला म्हणून त्याला अधोगति प्राप्त झाली."

ती म्हणाली ते ऐकून हरिश्चंद्र म्हणाला– "तुझ्या मनात काहीतरी बोलायचं आहे ते निर्भयपणे बोल."

शैव्या म्हणाली–"बायको असते ती संतानप्राप्तीसाठीच नाही का? तुम्हांला पुत्रसंतती माझ्यामुळे लाभली आहे. म्हणून मला विकून टाकून त्या ब्राह्मणाचं ऋण फेडून टाका पाहू."

ते ऐकून हरिश्चंद्राला अपार दुःख झाले. किती नम्रपणे गोड बोलून जिने आजपर्यंत त्याला सुखी केले ती बायकोच असे कठोरपणे बोलू लागली तेव्हां त्याला वाटले की आपल्या नशिबाने पाठ दाखविली आहे. त्या दुःखावेगाने तो बेशुद्ध होऊन पडला.





# प्रायश्चित्त

फार प्राचीनकाळी कायरो नगरी सुमारे बीस वर्षे वयाचा एक जव्हेरी रहात असे. त्याच्या दुकानात खरेदीसाठी गिऱ्हाईक म्हणून बायकाच जास्त येत. तो तरुण जव्हेरी नेहमी स्वतःला जपत असे की एखाद्या सुंदर स्त्रीवर नजर पडायची व तिच्या जाळ्यात कधी पडण्याची पाळी यायची. तो कधी कोणत्याही स्त्रीच्या नजेरला नजर भिडवीत नसे. त्याच्या वागणुकीची गावभर स्तुती होई.

एकदां त्याच्या दुकानात एक निग्रो गुलाम स्त्री आली व विचारू लागली– "हसन जव्हेऱ्यांचे दुकान हेच का? आपणच का हसन साहेब?" जव्हेऱ्याने होकार दिला. लगेच त्या गुलाम स्त्रीने जवळपास कोणाची नजर नाही असे पाहून चट्दिशी एक चिट्ठी त्या तरुण जव्हेऱ्याच्या हातात दिली. चिट्ठी वाचल्याबरोबर त्या तरुण जव्हेऱ्याला कमालीचे आश्चर्य वाटले व त्याच बरोबर रागही आला. कारण त्या चिट्ठीत एक प्रेमगीत होते व शेवटच्या ओळीत गीत लिहिणारीचे नाव होते.

जव्हेऱ्याने ती चिट्ठी फाडून फेकून दिली आणि उत्तराची वाट पहात उभी असलेल्या त्या गुलाम स्त्रीला खूप शिव्याशाप देऊन दुकानाबाहेर काढले. ते पाहून चारी बाजूला जमलेल्या लोकांनी त्याची फार स्तुती केली. म्हणाले–"असे सदाचरणी तरुण कोठे असतील का?"

दोनतीन वर्षे लोटली. त्या तरुणाचे लग्नाचे वय झाले होते. त्याने सुंदरशा मुलीशी लग्न करावयाचे ठरविले. तेव्हांपासून दुकानात कोणी सुंदर व हुशार अविवाहित तरुणी येते का, तो वाट पाहू लागला.

एके दिवशी त्याच्या दुकानात पांच सहा गोऱ्या गुलाम स्त्रियांबरोबर एक तरुण



स्त्री आली. ती म्हणाली—"उत्तमोत्तम दागिने असतील तर तेच दाखवा!"

दुकानदाराने होकार दिल्यावर त्या तरुणीने सोन्याचे पैंजण दाखवायला सांगितले. एका गोऱ्या गुलाम स्त्रीने त्या तरुण स्त्रीच्या परकराचा किनारा बाजूला सारून तिची पावले दाखविली. सुकुमार बारीक पावले पाहून तरुण जव्हेरी चकितच झाला व म्हणाला—"माझ्या जवळ जे लहानात लहान पैंजण आहेत ते देखील तुझ्या पायांना मोठे होतील!"

"तुम्ही असे काय म्हणतां? लोक माझे पाय हत्तीसारखे आहेत, म्हणताहेत!" ती स्त्री म्हणाली.

"जे म्हणताहेत त्यांचे डोळे फुटोत! अहो, तुमची पावले तर बुलबुलाला लाजवितील अशी आहेत." दुकानदार म्हणाला.

"बरं तर, तुमच्याकडे हातात घालायला बिलवर आहेत का?" त्या तरुणीने विचारले. त्यानंतर एका गुलाम स्त्रीने तिच्या हातावरच्या अस्तनी सरकवून हात दाखविले. ते पाहून तो जव्हेरी आश्चर्यचकितच झाला. म्हणाला. "माझ्याकडे जे लहानात लहान बिलवर आहेत ते देखील तुम्हांला सैल होतील" दुकानदार म्हणाला.

"अहो, लोक म्हणतात की माझी बोटे केळघासारखी बटबटीत आणि हात हत्तीच्या सोंडेसारखे आहेत." ती तरुणी म्हणाली.

"असं म्हणणाऱ्यांच्या जिभेला किडे पडोत! हे सुंदरी, तुझ्यासारखी रूपलावण्यवती त्रिलोकात कोठेही मिळणार नाही. तू माझ्याशी लग्न करून मला धन्य कर." असे सांगून तो दुकानदार गुडघे टेकून विनवण्या करू लागला.

ती तरुणी स्मित करून म्हणाली—"माझ्या वडिलांचा माझ्यावर जसा राग आहे त्याची तुम्हांला कल्पनाही नसेल. ते म्हणतात की माझ्या तोंडावर देवीचे वण आहेत. म्हणून मला कोणी पाहिले तर तोंड फिरवितील. परंतु तुम्ही मला सुंदर म्हणतां म्हणून मला आनंद होत आहे."

"तुझे वडील म्हणतात? अशक्य! असं म्हणणारा कोणी माथेफिरू असेल. तू मला तुझ्या वडिलांचे नाव सांग, मी त्यांना भेटून शपथ घेऊन तुझ्याशी लग्नाला तयार असल्याचे सांगेन." दुकानदार म्हणाला.

"त्यांचे नाव आहे, शेख अल इसलाम! ते या गावातल्या व्यापाऱ्यातले एक प्रसिद्ध व्यापारी आहेत. तुम्हीं माझ्याशी लग्नाची गोष्ट काढलीत तर ते सहजी मान्य करणार नाहीत. माझ्या कुरूप चेहऱ्याचे वर्णन करून तुम्हांला घाबरवून सोडवितील, म्हणून त्यांच्या प्रत्येक शब्दाला 'मला मान्य आहे', असे म्हणावे लागेल.

"त्यांना केव्हां भेटलं तर सोयीचं होईल?" दुकानदाराने विचारले.

"उद्या दहा वाजतां." असे सांगून ती तरुणी गुलाम दासीबरोबर निघून गेली.

दुसऱ्या दिवशी सकाळी जव्हेरी शेख अल इस्लामच्या घरी गेला. शेख अल इस्लाम जव्हेरी म्हणाला ते ऐकून उदास चेहरा करून म्हणाला—"बेटा, कदाचित् तुला तिच्याविषयी पुरी माहिती नसावी. ती एक दुर्दैवी मुलगी आहे. तू तिला पाहिलेस तर रात्री स्वप्नात ती दिसेल व तू घाबरून जागा होशील!" अशा तऱ्हेने त्याने मुलीच्या रूपाविरुद्ध बरेच काही सांगितले- परंतु तरुण जव्हेरी म्हणत राहिला—"मला ते सर्व मान्य आहे!"

शेवटी शेख अल इसलाम आपल्या मुलीचे लग्न जव्हेऱ्याशी करून द्यायला तयार





झाला. त्याने एक संमतीपत्र जव्हेऱ्याकडून लिहून घेतले आणि त्यावर साक्षिदारांच्या सह्या घेतल्या. त्या संमतीपत्रात लिहिले होते–'वधू मधील सर्व उणीवांची पूर्ण माहिती असूनही मी तिच्याशी लग्न करायला तयार आहे. मी काडीमोड करून घ्यायचे कधी ठरविले तर वधूला वीस हजार दीनार द्यायचे कबूल करतो!"

त्यानंतर शेख अल इसलाम म्हणाला– "बेटा, वधू आजारी आहे. खाटेवरून उतरू शकत नाही. म्हणून लग्न तिच्या खाटे जवळ होईल." ती अटसुद्धा जव्हेऱ्याने मान्य केली. लग्न झाले. जव्हेऱ्याने बायकोच्या खाटेजवळ जाऊन तिच्या तोंडावरचा बुरखा बाजूला सारला. तिचा चेहरा पाहून जव्हेऱ्याच्या सर्वांगाचा थरकाप उडाला. ती कुरूप होती व त्याच्या दुकानात दागिने विकत घ्यायला आलेली स्त्री ती नव्हती.

जव्हेऱ्याला हे कळेना की त्याला असे तोंडघशी का पाडण्यात आले! तो निराश होऊन घरी परतला. दुसऱ्या दिवशी तो दुकानात उदास होऊन बसला होता, तेव्हां ती सुंदरी आपल्या दासींबरोबर तेथे आली व म्हणाली–"नवरदेवांचे अभिनंदन त्यांचा संसार सुखी होवो!"

तेव्हां तो तरुण त्या सुंदरीवर पिसाळल्यासारखा ओरडू लागला. त्या तरुणीने आश्चर्यचकित होऊन विचारले–"मी तुमच्याकडे जे गीत लिहून आपल्या दासीच्या हाती पाठविले होते आणि तुम्ही काय केलेत, ते सर्व तुम्हांला आठवते का?" असे म्हणत ती दुकानातून जाऊ लागली तेव्हां तो तरुण तिच्या पायां पडून विनवण्या करीत म्हणाला–"माझं डोकं ठिकाणावर नव्हतं! मला आतां तरी या नरकातून वांचव!"

त्या तरुणीला जव्हेऱ्याची कीव आली व तिने त्याला काहीतरी उपाय सुचविला आणि निघून गेली. तिने सांगितल्याप्रमाणे जव्हेऱ्याने आवश्यक सर्व तयारी केली आणि सरळ आपला सासरा शेख अल इसलामच्या घरी गेला. तेथे तो व त्याचा सासरा वऱ्हांड्यात बसले होते आणि बरेचसे लोक दरवाजा उघडून आत शिरले. त्यांच्यापैकी काही लोक डफ वाजवीत होते तर काही शिट्ट्या वाजवीत होते. काही जण माकडांना व अस्वलांना नाचवू लागले.

शेख अल इसलामने उठून विचारले– "हा सर्व गोंधळ काय आहे?" परंतु ते लोक जव्हेऱ्याने ओरडा बंद करायला सांगेपर्यंत नाचत गात राहिले.

त्यानंतर जव्हेरी शेख अल इसलामला म्हणाला–"शेखसाहेब, हे सर्व माझे नातेवाईक आहेत. माझं लग्न झाल्याचे ऐकून माझे अभिनंदन करायला आले आहेत!"

शेख अल इसलामला भयंकर राग आला. म्हणाला–"म्हणजे, ही सर्व तुमची नातेवाईक मंडळी का आहेत? मला हे आधी कळले असते तर मी आपली मुलगी तुम्हांला दिलीच नसती!"

"मला विचारले असते तर मी सांगितले असते!" जव्हेरी म्हणाला.

"मी विचारले नाही तरी सांगायल हवं होतेस तू! म्हणून तू जे काही लिहून दिले आहेस ते सर्व निरुपयोगी आहे. मी ते मान्य करणार नाही!" शेख अल इस लाम म्हणाला.

"मी आपल्या बायकोला सोडायल तयार नाही. मी सुद्धा पाहतो की तुम्ही काय करता!" जव्हेऱ्याने रागाचा आव आणून सांगितले.

शेख म्हणाला–"बाबा रे! तू माझ अन्न राख! अल्ला तुझे भले करील! मी पायां पडतो! तू माझ्या मुलीशी काडीमोड करून घेऊन मला सोडव!"

जव्हेऱ्याने सोडचिट्ठी लिहून दिली आणि अशातऱ्हेने बाहेर आला, जणुकाही त्याने ते स्वतःच्या इच्छेविरुद्ध केले होते. त्यानंतर त्याने स्वतः निवड केलेल्या त्या अपूर्व सुंदरीशी विवाह करून घेतला. पुढे त्याला कळले की ती कायरोच्या सुलतानाच्या नात्यातली आहे. तेव्हां त्याला परमानंद झाला.












# प्रश्नोत्तरे

**पूर्णचंद्रराव, विशाखापट्टण**

प्र : माणसाच्या शरिराचे सामान्य तापमान ९८.४ डिग्री असते. उन्हाळ्यात हवेचे तापमान फक्त ९८.५ किंवा ९९ डिग्री झाले तर ते आपल्या शरिराच्या तापमाना-जवळपासच असते, की नाही? शरीरातले तापमान कसे उत्पन्न होते? ताप १०४ डिग्री झाला तर माणसाला चालता येत नाही. परंतु हवेचे तापमान तितके झालं तरी तो कसा चालू शकतो?

उ : हवेचे तापमान कमी जास्त होत राहिले तरी त्याच्याशी संबंध न ठेवता शरीर आपली सामान्य उष्णता ९८.४ डिग्रीवरच ठेवते तर त्याची कारणे आहेत. पहिले कारण म्हणजे शरिरात प्रत्येक क्षणाला उष्णता उत्पन्न होत असते. परंतु शरिराचे तापमान वाढू नये यासाठी घाम व श्वासोच्छ्वास द्वारे व इतर मलमूत्रविसर्जना द्वारे शरीर उष्णता बाहेर फेकीत असते. हवेचे तापमान शरिराच्या तापमानाएवढे झाले तर शरिराला क्षणोक्षणी आपली उष्णता बाहेर फेकणे शक्य होत नाही. घाम येतो, परंतु वाफ होऊन गेल्याशिवाय त्यात थंडपणा येत नाही. हवेत आर्द्रता जास्त असेल तर घामाची वाफ होत नाही. अशा वेळी पंख्याचा उपयोग करून घामाची वाफ करून शरिरात थंडपणा आणावा लागतो. त्याच प्रमाणे थंडप्रदेशात हवामान पाणी गोठण्या इतके थंड होते. त्या वेळी शरिरात प्रत्येक क्षणाला उत्पन्न होणारी उष्णता पुरी पडत नाही. म्हणुन उष्णता वाढविण्यासाठी आहार वाढवावा आणि शरिरातली उष्णता बाहेर जाऊ नये यासाठी लोकरीचे किंवा कातड्यांचे कपडे घालावेत. लोकरीचे कपडे उष्णता उत्पन्न करतात असा काहींचा गैरसमज आहे. वास्तविक ते उष्णता बाहेर जाऊ देत नाहीत. त्याचे उदाहरण म्हणजे आपण लोकरी कपड्यात बर्फ गुंडाळून ठेवला तर तो वितळत नाही, कारण बाहेरची उष्णता तो लागु देत नाही.

हवेतले तापमान १०४ डिग्री झाले तरी शरिराचे तापमान ९८.४ डिग्रीच राहते. ताप आल्यावर शरिराचे तापमान १०४ डिग्री झाले तर बाहेर बर्फ पडत असला तरी मनुष्याला हिंडणे फिरणे अशक्य होते. त्याला चालता येत नाही याचे कारण आजार आहे, उष्णता नाही.



# रंगनाथाचे लग्न

रंगनाथाला पंचवीसावे वर्ष लागले, तरी तो कोणतेही काम जबाबदारी घेऊन करण्यालायक नव्हता. बापाने त्याला लाडात वाढविले होते. विद्याभ्यासातही तो बेताचाच होता. उडाणटप्पूपणाच त्याच्या अंगात शिरला होता. घरची स्थितीपण बेताचीच होता.

परंतु तो दिसायला गोरागोमटा होता. म्हणून काहीजण त्याला आपली मुलगी द्यायला तयार होते.

रंगनाथाच्या ओळखीचे लोक त्याला म्हणत—"हे बघ रे, तू एखादी चांगली नोकरी करू लागलास तर अप्सरेसारख्या मुली तुझ्यावर तुटून पडतील."

रंगनाथ त्यांना म्हणे—"माझे बाबा माझ्याबरोबर आणखी एकाला जेवाय-खायला घालू शकणार नाहीत का?" एकदा त्याचा एक मित्र शेजारच्या गावी एका मुलीला पाहून आला व त्या मुलीचे वर्णन करून सांगू लागला. म्हणाला—"अरे काय सांगू, फक्कड मुलगी आहे बघ! शिवाय तिच्या आईजवळ खूप पैसेसुद्धा आहेत. ती मुलगीच आईच्या इस्टेटीला वारस आहे. ती म्हातारी दुर्गाबाई थोडी फटकळ आहे. मला म्हणाली—'माझी मुलगी मी मदनाचा पुतळा असेल त्यालाच देईन.' तू जाऊन तर पहा एकदा मुलीला! त्या मुलीशी तुझे लग्न झाले तर तुला नोकरी चिकरीची गरजच काय? घरजांवई होऊन राहतां येईल!"

रंगनाथाला ते फार आवडले. दुसऱ्याच दिवशी तो आपल्या वडिलांना सांगितल्या-शिवाय शेजारच्या गावी निघाला. रंग-नाथाला दुर्गाबाईचे घर सहजी मिळाले. दाराची कडी वाजविताच दुर्गाबाईने स्वतःच येऊन दार उघडले आणि विचारले—"कोण



रे बाबा, तू? तू माझ्या राणी बेटीला पहायला आला आहेस वाटतं?"

दुर्गाबाई थोडी लठ्ठच अशी, एक विधवा-बाई होती.

रंगनाथाने होकारार्थी मान हलविली.

"बेटा राणी! अग, इकडे ये, तुला पहायला पहा, कोण आलं आहे ते!" दुर्गाबाईने मुलीला बोलाविले. राणी वाचीत होती, हातातलं पुस्तक घेऊन आली आणि चिडक्या स्वरात म्हणाली–"पुन्हां लग्ना-च्याच गोष्टी!" रंगनाथ त्या मुलीला पाहून थक्कच झाला.

"तुमचं नाव? कोठे राहतां? शिक्षण कोठवर झालं आहे?" वगैरे प्रश्न धडाधड राणीने विचारले. रंगनाथाने त्या प्रश्नांची योग्य ती उत्तरे दिली. ती ऐकून राणी घरात निघून गेली.

त्यानंतर दुर्गाबाई रंगनाथाला म्हणाली–"बेटा, आता तू ये बरं! आम्ही लवकरच काय ते कळवू!"

त्या घरातला थाटबाट, राणीचे सौंदर्य व प्रश्न इत्यादी गोष्टी पाहून रंगनाथाला आपल्या नशिबात ही मुलगी नाही असेच वाटले. परंतु दुर्गाबाईने बरोबर एका आठ वड्यानंतर रंगनाथाच्या घरी निरोप पाठ-विला–"आम्हांला तुमच्या मुलाचे स्थळ पसंत आहे, मुहूर्त वगैरे ठरविण्यासाठी यावे."

रंगनाथाच्या वडिलांना काही माहीतच नव्हते. चवकशी करतां त्यांना कळले की मुलीच्या घरची आर्थिक स्थिती चांगली आहे. मुलीला वडील नाहीत व भाऊ ही नाही. लोक त्याला म्हणाले–"हे स्थळ घालवून बसू नका! चालून आलेली लक्ष्मी परतवू नका!"

लवकरंच रंगनाथाचे लग्न थाटामाटाने झाले चारपांच दिवस लग्न घरी राहून रंगनाथाचे वडील इतर नातेवाइकांबरोबर घरी परतले.

रंगनाथाला वाटले की त्याची सासू त्याला घरजावई करून घेणार. म्हणून तो बायकोला घेऊन परतला नाही. परंतु एकदा बोलताना दुर्गाबाई त्याला म्हणाली–"तुम्हांला कळलंच असेल जावईबापू! पाटलांचा दुसरा जावई महिन्यातले पंधरा दिवस सासुरवाडीच राहतो आणि मेज-वान्या उडवितो. पाटलाच्या जागी मी असते तर लाथ मारून त्याला घराबाहेर काढले असते!"

ते ऐकून रंगनाथाच्या डोक्यात प्रकाश पडला. आपली सासू आपल्याला घरजावई करून घ्यायला तयार नाही.

दोनतीन दिवसांनी रंगनाथ मनाचा थोरपणा दर्शवीत म्हणाला–"मामी, आतां तुम्ही या वयात एकट्या किती काळ राहणार हो? आमच्याबरोबर चला ना, आमच्याच घरी रहा!"

परंतु त्याची सासू म्हणाली–"बेटा, ज्याला जेथे राहणे योग्य तेथेच त्याने रहावे तरच त्याचा मान राहतो. मला आतांआतां कोठे पन्नासावे वर्ष लागलं आहे. उद्यांचा दिवस चांगला आहे प्रयाणाला, तुम्ही निघा-यला हरकत नाही." दुर्गाबाई म्हणाली.

नाइलाजाने रंगनाथ राणीला घेऊन आपल्या गावी परतला. आजपर्यंत तो एकटा होता, म्हणून बेफिकीरपणे राही. आतां राणीचं ओझं त्याच्या डोक्यावर होतं. आपल्या बायकोचा खर्च वडिलांवर टाकणे त्याला लज्जास्पद वाटू लागले.



म्हणून तो एकदां बायकोला म्हणाला–"मी काहीतरी व्यापारधंदा करावा म्हणतो. तू भांडवलासाठी आईकडून पांच हजार रुपये मागून आण."

राणी हंसली व म्हणाली–"वाळूतून तेल काढता येईल, परंतु माझ्या आईच्या हातातून एक पैसा काढणे शक्य नाही."

तरी रंगनाथाने कोणाबरोबर तरी सासू-कडे निरोप पाठविला की त्याला व्यापार करण्यासाठी पांच हजार रुपयांची गरज आहे.

दुर्गाबाईने लगेच उत्तर पाठविले–"ज्याच्याजवळ व्यापार करण्यापुरेसे पैसे नाहीत त्याने व्यापारात उतरावंच कशाला?

त्याला सांगा, कोठे तरी नोकरी कर. सोन्याच्या बाहुलीसारख्या मुलीला दिलं आहे मी! त्याने एका पैशाची ही अपेक्षा ठेवणे इष्ट नाही!"

तो निरोप ऐकून रंगनाथ निराश झाला. त्याने विचार केला की आळशासारखे बसून भागणार नाही. जो पुरुष चार पैसे मिळवीत नाही, त्याची फिकीर बायकोसुद्धा करीत नाही. आयुष्यभर दुसऱ्याच्या तोंडाकडे पहात राहून स्वत:ची मान खाली करून घेणे मूर्खपणा आहे.

असा विचार करून रंगनाथने धावपळ सुरू केली व एका महिन्याच्या आत त्याला आयुष्यातल्या खऱ्या आनंदाचा अनुभव कळला. त्यापूर्वी त्याला आयुष्य एक ओझे वाटत होते. कधीकधी त्याला स्वत:चाच राग येई. परंतु आतां त्याचा उत्साह वाढला. एक वर्ष लोटले असेल आणि रंगनाथाला पितृत्व आले.

आपल्या नातीला पहायला दुर्गाबाई धावत आल्या. नातीच्या गळ्यात सोन्याची माळ घालीत त्या रंगनाथाला म्हणाल्या– "बेटा, किती बदल झाला रे, तुझ्यात, मला फार बरं वाटलं. तू दिसायला किती सुंदर आहेस, तुझं कुटुंबपण प्रतिष्ठित आहे. परंतु चवकशी केल्यावर मला कळले की तू आळशासारखा घरी बसून पुक्खा झोडतोस आणि आपली जबाबदारी तुला कळत नाही. तरी मी आपल्या मुलीचं लग्न तुझ्याशी या विश्वासावर करून दिलं की अंगावर जबाबदारी येऊन पडल्यावर तू आपोआप सुधरशील. तुझा आळशीपणा दूर करण्यासाठीच मी इतका निष्ठूरपणा केला होता. माझ्याजवळ जे आहे, ते मी बरोबर नेणार आहे का? हे सर्व तुमचंच आहे!"

ते ऐकून रंगनाथ आत्मविश्वासपूर्वक म्हणाला–"मला जी प्राप्ती होते आहे, ती माझ्या कुटुंबाला सुखाने संसार चालवायला पुरेशी आहे. तुम्हांला काही द्यावयाचेच असेल तर आपल्या नातीला द्या!"






[ ८ ]

[जंगलात वाट काढीत समरसेन व सैनिक जात असता त्यांना मरणासन्न स्थितीत असलेला एक नवा सैनिक दिसला. त्याच्याकडून कुंडलिनी द्वीपावरून आलेल्या राजद्रोही कुंभांडाची माहिती कळली. त्या राजद्रोह्याचा वध कसा करावयाचा, या विचारात असता समरसेनाला एकाएकी चतुराक्ष दिसला. पुढे–]

चतुराक्ष मांत्रिक एकाएकी समोर दिसल्यामुळे समरसेन व सैनिक घाबरून गेले. नवीन सैनिक तर थरथर कांपूच लागला. चतुराक्षाचे नोकर काळे घुबड व वनमाणूस बाजूला उभे होते.

चतुराक्ष स्मित करून म्हणाला–"तुम्ही भिण्याचं काहीच कारण नाही. इतरांना मी त्रास देत नाही. त्या एकाक्षाशिवाय माझा दुसरा कोणी शत्रू नाही. तो सुद्धा माझा वध करण्याच्या प्रयत्नात आहे म्हणून त्याला शत्रू मानावे लागत आहे मला." एवढे म्हटल्यावर चतुराक्ष थांबला व नव्या सैनिकाकडे पाहून म्हणाला–"हा नवीन सैनिक कोण?"

"माझं नाव धनपाल. मी संकटात सापडलो होतो, यांनी मला वांचविलं." नवा सैनिक म्हणाला. ते उत्तर ऐकून 'नाही' या अर्थी मान हलवीत चतुराक्ष



म्हणाला–"तुम्ही सर्वच आतां संकटात सापडणार आहांत. यापूर्वी तुमच्यावर संकट आलं असेल तर ते एकट्या एकाक्षा मुळेच असणार! यापुढे मात्र या बेटाच्या दक्षिणेकडच्या डोंगराळ प्रदेशातल्यातुमच्याच सारख्या माणसांच्या हातून तुमच्यावर संकट येण्याची शक्यता आहे."

इकडे हे संभाषण चालू असतां झाडीच्या आड उभे राहून दोघे रानटी लोक त्यांच्याकडे पहात होते. ते काय हे न कळल्यामुळे समरसेन चतुराक्षाजवळ दोन पावलं चालून गेला व म्हणाला–"चतुराक्षा, तू मांत्रिकच असलास तरी चांगला दिसतो आहेस. तू म्हणालास तसे आमच्यावर मोठे संकट येणार असेल तर त्या संकटातून सुटका मिळवायला उपायसुद्धा तूच सांग."

चतुराक्षाने लगेच उत्तर दिले नाही. थोडा वेळ विचार करायला थांबला व म्हणाला–"समरसेना! या बेटावर इतक्या अडचणी यायला मूळ कारण पश्चिमेकडच्या समुद्रात अर्धवट बुडलेली एक नाव आहे! त्यात धनराशी आहेत हे सर्वांना माहीत आहे. पैशाशिवाय कोणतेही काम होत नाही हेदेखील सर्वांना वाटते. एकाक्षी मांत्रिकाला ते धन हवे आहे तर मला त्या नावेचे रक्षण करीत असलेली नागकन्या हवी आहे. तुम्हांला काय हवे आहे हे सांगितलेस तर माझ्याकडून तुला हवी असेल ती मदत करीन."

समरसेन काही उत्तर देणार इतक्यात नवा सैनिक धनपाल थरथर कांपत मोठ्याने ओरडला. समरसेन व सैनिक त्याच्याकडे उत्सुकतेने पहात म्हणाले–"काय झालं रे?"

धनपालाने दूरच्या झाडीकडे बोट दाखवीत म्हटले–"तिकडे पहा, रानटी लोक पुन्हां आले आहेत. मला झाडाला यांनीच टांगून ठेवलं होते!"

समरसेनाला व सैनिकांना झाडीत आड लपून उभे असलेले व त्यांच्याचकडे पहात असलेले दोघे रानटी लोक दिसले. समरसेनाने लगेच धनुष्यावर बाण चढविला.

चतुराक्षाने त्याला अडविले व म्हणाला–"समरसेना, तुझा बाण त्यांना लागणार नाही. आकाशात उडणाऱ्या गरुडाला किंवा पळणाऱ्या चित्त्याला सुद्धा तुझा बाण एक वेळ लागेल. परंतु हे लोक इतक्या जोराने धावतात की तुझा बाण यांना लागणेच शक्य नाही. मी पाहून घेतो यांना."

त्यानंतर चतुराक्ष तोंड फिरवून मागे वळून हांक मारू लागला–"वनमाणसा! ए घुबडा! लगेच काळे घुबड व वनमाणूस दोघं त्याच्या जवळ आली.

"वनमाणसा, ते दोघे वांकून पाहून पळून जात आहेत ना त्या दोघां रानटी माणसांना ठार कर! घुबडा, तू हा जवळपासचा सर्व प्रदेश एकदां टेहळणी करून न्याहाळून ये पाहू." चतुराक्षाने आपल्या दोघां सेवकांना आज्ञा केली.

लगेच वनमाणूस आपल्या मालकाच्या आज्ञेप्रमाणे धावले. त्याने एक उडी मारून त्या दोघां रानटी लोकांपैकी एकाला धरले. तो रानटी माणूस सर्व अरण्य दुमदुमून गेल्यासारखा जोराने किंकाळी फोडून ओरडला. वनमाणसाने त्याला दोनदा गरगर फिरवून दूर फेकले. तो ओरडत एका





खडकावर जाऊन आदळला आणि जागच्या जागी ठार झाला.

घुबड त्या दुसऱ्या माणसाच्या डोक्यावरून उडू लागले. त्याने ओरडत राहून आपल्या अणकुचीदार नखांनी त्या रानटी माणसाचे डोके ओरबाडून काढले व त्याला अर्धमेला करून सोडून दिले.

ते पाहून थोडा निश्चिंत झालेला सैनिक धनपाल चारी बाजूला एकदा नजर फिरवून जवळच्या सैनिकाला म्हणाला– "मला तहान लागली आहे. जवळपास कोठे प्यायला पाणी मिळेल का?"

चतुराक्ष हात नकारार्थी हलवीत म्हणाला–"फार संभाळून बरं का? पाण्यासाठी वाटेल त्या तलावात किंवा सरोवरात उतरू नका. हे बेट म्हणजे सर्व तऱ्हेने भयंकर आहे. माझ्या बरोबर चला. मी तुम्हांला चांगली पिण्यालायक पाण्याची जागा दाखवितो. असे म्हणत तो पुढे निघाला.

सर्वजण एका सरोवरानजीक पोचले. त्या सरोवरात मगरी व इतर क्रूर प्राणी पोहोत फिरत होते. ते प्राणी नसलेल्या जागी सर्व गेले आणि पाण्यात न उतरतां बाहेर काठावर उभे राहून पाणी प्याले. काठावर झाडाखालच्या सावलीत उभे राहून चतुराक्षाने त्यांना सांगितले होते त्या नवीन गोष्टी विषयी विचार करू लागले. बहुतेक दक्षिणेकडून येणारी माणसे म्हणून तो म्हणाला ते लोक म्हणजे कुंभांड व त्याचे रानटी अनुयायी असावेत असे समरसेनाला वाटले.

चतुराक्ष म्हणाला त्या नागकन्येविषयी समरसेनाच्या मनातली शंका दूर झाली नाही. म्हणून तो चतुराक्षाला म्हणाला– "मी विचारतो आहे, पण तू अन्यथा मानू नकोस. धनराशी असलेल्या नावेचे रक्षण करणारी एक नागकन्या आहे, असे तू म्हणालास ते खरंच का रे?"

"त्यांत खोटे काहीच नाही. पाहिजे तर माझ्या बरोबर चला. मी ती नाव व





नागकन्यासुद्धा तुम्हांला दाखवितो. तशी ती जागा येथून फार दूरही नाही, अगदी जवळ आहे." चतुराक्ष म्हणाला व बरोबर यायला त्याने खुणावले.

चतुराक्ष पुढे निघाला व समरसेन व सैनिक त्याच्या पाठोपाठ निघाले. काही वेळाने ते एका उंच डोंगराळ जागी येऊन पोचले. तेथून समुद्र अगदी शांत दिसत होता.

"ती पहा, नाव दिसते आहे का?" असे म्हणत चतुराक्षाने आपले बोट समुद्राच्या दिशेने नावेकडे दाखवीत समरसेनाला विचारले.

समरसेन व सैनिकांनी त्या बाजूला पाहिले. त्यांना ती नाव स्पष्ट दिसत होती. ती समुद्रात अर्धी बुडालेली होती. तिचे शीड फाटलेले होते व ती लाटांमुळे डोलत होती. परंतु धनराशी असलेल्या त्या नावेची राखण करणारी ती नागकन्या मात्र त्यांना दिसली नाही.

"ती नागकन्या दिसत नाही की?" असे आश्चर्याने म्हणत समरसेनाने चतुराक्षाकडे पहिले.

त्या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी चतुराक्ष थोडा हसला व म्हणाला–"समरसेना, मंत्रविद्येशिवाय ती नागकन्यासुद्धा तुझ्या दृष्टीस पडली तर मग आमची मंत्रविद्या कोणत्या कामाची? त्या नागकन्येला फक्त मला व त्या एकाक्षाला मंत्रबळाने पाहतां येते. एकाक्षाला त्या धनाचा लोभ आहे, व ती आडवी उभी आहे म्हणून तो त्या नागकन्येला शत्रू मानतो आणि मी तर तिचे वरणच केले आहे."

समरसेनाला त्यानंतर काही विचारावेसेच वाटले नाही. मागे त्याने त्या धनराशीच्या विषयी ऐकले होते तेव्हां ती धनराशी मिळवून कुंडलिनी द्वीपावर जायचा विचार त्याच्या मनात होता. परंतु ते त्याला आता साध्य होणे शक्य नाही हे त्याला कळले. आतां आणखी एक अडचण उभी राहिली. तो राजद्रोही कुंभांड

त्याचसाठी प्रयत्न करीत होता. शिवाय एकाक्षाची भीती तर होतीच होती. या सर्वांहून जास्त कठीण म्हणजे मंत्रशक्ती-शिवाय त्या नावेचे रक्षण करणाऱ्या नाग-कन्येच्या हातातून निसटून नावेपर्यंत पोचणे अशक्य होते.

समरसेन या विचारात गढून गेला होता हे ओळखून चतुराक्ष मोठ्याने हसला व म्हणाला–"समरसेना! तुझे मन तर्कवितर्क करण्यात गढून गेले आहे ते सर्व मला कळले आहे. मला आतांच एक गोष्ट सुचली आहे. तुझी एक नजर त्या नावेतील धनराशीवर आहे, ही गोष्ट मी केव्हांच ओळखली. त्या धनराशीवर माझी नजर नाही, म्हणून त्या बाबतीत तुझ्याशी माझी चढाओढ नाही. तुझ्याशी चढाओढ करणारा तो एकाक्ष मात्र आहे. आपण दोघांनी मैत्री केली तर आपल्याला हवं आहे ते साध्य होण्याची शक्यता आहे, असे मला वाटते आहे.

चतुराक्षाने ते म्हटल्यावर समरसेनाला एक नवीन उत्साह आला. या भयंकर बेटावरून स्वतःचा जीव वांचवून कसे पळून जायचे या विचारात पडलेल्या समरसेनाच्या मनात एक नवीन आशा डोकावू लागली. त्यासाठी त्या राजद्रोही कुंभांडाचा प्रथम वध करायला हवा आणि शक्य झालं तर



त्या नावेतली धनराशी मिळवायला हवी. परंतु मुळात या नावेचे गुपित काय हे कळले पाहिजे.

सर्वात आधी ती धनराशी असलेल्या नावेच्या मागचे गुपित काय हे काढून घ्यावे, असा विचार करून समरसेन चतुराक्षाला म्हणाला–"चतुराक्षा! मांत्रिकाचे नाव ऐकतांच सामान्य माणूस घाबरूनच जातो. परंतु या बेटावरच्या दोघां मांत्रिकांमध्ये म्हणजे त्या एकाक्षमध्ये आणि तुझ्यामध्ये पुष्कळच अंतर आहे! तुझ्यात भूतदया आहे, मित्रप्रेम आदि चांगले गुण आहेत, असेही दिसत आहे. मी तुम्हांला काही मदत करण्यासारखी असेल तर बोल, मी अवश्य

करीन. परंतु त्या नावेच्या मागे जे गुपित आहे ते कळलं तर बरं असे मला वाटतं आहे."

चतुराक्षाने लगेच उत्तर न देता काही वेळ मागेपुढे केल्यावर म्हणाला—"ती नाव, तिच्यातील धनराशी आणि ती नागकन्या— यांच्याविषयी सांगायचं म्हणजे बरेच काही सांगावे लागणार आहे. ते ऐकण्या इतके कुतूहल तुला नसेल ही. तरी मी थोडक्यात सांगतो, ऐक! कदाचित तुला शमन द्वीपा-विषयी माहीत नसेल, माहीत असले तरी तुम्ही त्या द्वीपाला निराळयाच नावाने ओळखत असणार. त्या शमन द्वीपावर शाक्तेय नावाच्या राजाचे राज्य होते. शाक्तेय म्हणताच तुला कळलेच असेल की तो चंडीचा भक्त होता. मंत्रतंत्र विद्येत तो अद्वितीयच होता.

"एकदा राजधानीत देवीचा नवरात्र उत्सव चालू होता. शाक्तेय स्वतःच पूजा करीत होता. लोकांची गडबड चालू असतां अकस्मात चंडीदेवी प्रगट होऊन म्हणाली— 'भक्त हो! तुमची भक्ती पाहून मी प्रसन्न झाले आहे. परंतु फक्त पूजेने माझ्या मनाचे समाधान होणार नाही. माझे एक अपूर्व असे देवालय बांधा.' या शब्दात देवी हुंकारली.

"शाक्तेय गुडगे टेकून देवीला नमस्कार करून म्हणाला—'देवी, तुझ्यासाठी भव्य देवालयाबरोबर गगनचुंबी एक गोपुरही बांधतो.'

"त्या पाठोपाठ देवी आणखी जोराने हुंकारली—'माझं देऊळ व गोपुर सामान्य दगडामातीचं बांधले तर तेवढ्याने माझं समाधान होणार नाही. सर्व सोन्याचांदीचे बांधलं पाहिजे, तरच माझ्या मनाचं समा-धान होईल.'

"शाक्तेय थरथर कापू लागला. चंडी-चीच आज्ञा होती ती. त्या आज्ञेचे पालन करणे भागच होते. परंतु इतक्या मोठ्या देवलयासाठी व गोपुरासाठी लागणारे सोने व चांदी कशी संपादन करावयाची!

(क्रमशः)





# व्यवहारकौशल्य

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तुला इतकी मेहनत करीत असलेला पाहून तुला व्यवहारज्ञान नसल्याचे मला स्पष्ट दिसत आहे. भिकूशेट व्यवहारकुशल असल्याकारणाने मागे कसा सोनूशेट झाला होता, तुला मी त्याची गोष्ट सांगतो." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

धर्मपुरी नांवाच्या एका गावी भिकूशेट नावाचा एक वाणी रहात असे. त्याने व्यापार करायचे ठरविले. परंतु त्याच्या व्यापाराला लागणारं भांडवल नव्हतं. म्हणून त्याने आपल्या गावातल्या साव-काराकडून थोडं कर्ज काढलं. परंतु त्याला

व्यापारात तेवढं यश मिळालं नाही, म्हणून कर्ज फेडतां आलं नाही.

सावकार कर्जाची रक्कम वसूल करायला तगादा करू लागला. तेव्हां भिकूशेट त्याला म्हणाला—"सावकार, मामलेदाराच्या ऑफिसातून लवकरच आमचे वासुदेवराव येतील. ते आल्यावर मी कर्जाची रक्कम फेडीन."

"म्हणजे तू वासुदेवरावांना ओळखतोस वाटतं?" सावकाराने चकित होऊन विचारलं.

"अहो, ओळखतो काय? तो तर माझा नातेवाईक आहे!" भिकूशेट म्हणाला.

"अरे मग, तू हे मला आजपर्यंत कधीच सांगितले नाहीस की? तू सावकाश कर्जाची रक्कम दे. बरं तर येतो!" असे सांगून सावकार निघून गेला.

सावकाराचे त्या वेळचे वागणे भिकूशेटला विचित्र वाटलं. परंतु त्याचं कारण दुसऱ्या दिवशी त्याला कळलं.

दुसऱ्या दिवशी सावकार एका तरुणाला बरोबर घेऊन आला आणि म्हणाला—"भिकूशेट, हा बघ माझा मेहुणा, बायकोचा भाऊ! तू वासुदेवरावांना सांगून याला कचेरीत दे चिकटवून. तू हे काम केलेस तर तुझं सर्व कर्ज माफ!"

वस्तुस्थिती अशी होती की 'वासुदेव' नाव ऐकून सावकाराचा गैरसमज झाला होता. भिकूशेटचा वासुदेव कारकुनाचे काम करीत असे, त्याच कचेरीत एका मोठ्या हुद्यावर वासुदेव नावाचा दुसरा एक माणूस अधिकारी होता. सावकाराला वाटलं की तोच भिकूशेटचा नातेवाईक असावा.

भिकूशेटला सावकाराचा गैरसमज झाल्याचं समजलं तेव्हां एकदम विजेच्या झटक्यासारखा त्याच्या डोक्यात एक विचार आला. सावकाराच्या मेहुण्याला कचेरीत नोकरी मिळवून दिली तर कर्ज सहजी फिटेल व गावात आपलं वजन वाढेल.

म्हणून भिकूशेट म्हणाला—"बरं, पाहतो प्रयत्न करून. तुम्ही उद्यां भेटा!" असे सांगून भिकूशेटने सावकाराला निरोप दिला. तो त्याच दिवशी कचेरीत जाऊन आपल्या नातेवाईक वासुदेवला भेटला आणि त्या कचेरीतल्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांची नावे, त्यांचे हुद्दे व इतर माहिती एका वहीत टिपून घेतली.

त्यानंतर भिकूशेट कचेरीतल्या मोठ्या हुद्यावर काम करणाऱ्या वासुदेवच्या ऑफिसात गेला. तेथल्या लोकांना भेटून म्हणाला—"मला कलेक्टरच्या कचेरीतल्या रघुनाथराव साहेबांनी पाठविले आहे, मला आत्तां वासुदेवराव साहेबांना भेटावयाचे आहे.

म्हणून भिकूशेटला लगेच वासुदेवरावांना भेटण्याची परवानगी मिळाली. रघुनाथरावांचे नाव सांगतांच वासुदेवराव साहेब म्हणाले—"त्यांना जाऊन सांगा की मी त्यांच्या नातेवाईकाला नोकरी देत आहे, त्या तरुणाला माझ्याकडे पाठवा!"







त्यानंतर दुसऱ्याच दिवशी सावकाराच्या नातेवाईकाला कचेरीत नोकरी लागली.

गावभर ती बातमी पसरली. भिकूशेटच्या शिफारसीने सावकाराच्या मेहुण्याला कचेरीत नोकरी मिळाली ही बातमी पसरताच भिकूशेटचा गावात मान वाढला. लोक म्हणू लागले–"अहो, त्याची ओळख मोठमोठ्या अधिकाऱ्यांशी आहे!" सर्व गावकरी त्याची मदत मिळविण्यासाठी त्याच्या घरी खेपा घालू लागले. ज्या लोकांना कचेरीत आपली कामे करवून घ्यायची होती ते भिकूशेटकडे भेटवस्तू आणून देऊ लागले.

भिकूशेटचे व्यवहारकौशल्य फळास आले. सेनापती, खजीनदार, जिल्हा अधिकारी, न्यायाधीश, किल्लेदारासारख्या मोठमोठ्या हुद्यावर काम करणाऱ्या अधिकाऱ्यांशी भिकूशेटची नुसती ओळखच नव्हे, तर मैत्री झाली. त्याने कित्येक लोकांचे खटले जिंकवून दिले, कित्येकांना नोकऱ्या मिळवून दिल्या. तो काही दिवसांत लक्षाधीश झाला, भिकूशेट सोनूशेट झाला. आता भिकूशेटने राजधानीच्या गावीच मोठे दुकान काढले व प्रतिष्ठित व्यापारी म्हणून त्याचा नावलौकिक वाढला. राजा व प्रधान सुद्धा एक प्रतिष्ठित नागरिक म्हणून त्याला राज्याच्या सर्व उत्सव प्रसंगी खास बोलावणे पाठवू लागले. एखाद्या मोठ्या हुद्यावर काम करणाऱ्या व्यक्तीचा वाढदिवस असला की भिकूशेट त्यांना उपहार नेऊन देऊ लागला. राजघराण्यातल्या लोकांचे वाढदिवस, लग्न कार्य वगैरे निमित्ताने राजवाड्यात भिकूशेट जाऊ लागला व 'फूल नाही फुलाची पाकळी' सांगून मोठमोठे नजराणे देऊ लागला. पुढेपुढे तर त्याचा इतका मान वाढला की तो नोकराच्या हाती एखादी चिट्ठी पाठवून लोकांची कामे करून देऊ लागला.

एकदां महाराजांचा वाढदिवस होता. मोठी मेजवानी होती. त्यात फक्त उच्च अधिकाऱ्यांनाच आमंत्रणे गेली होती. त्या वेळी पर्व कसे मोठमोठ्या पदांवर पोचले परस्परांशी बोलू लागले. त्यात भिकूशेटही एक होता. [illegible] खरी गोष्ट न सांगता तिखटमीठ लावून बऱ्याच बढाया मारल्या. परंतु भिकूशेटने खरेखरे ते सांगितले. ते ऐकून सर्वांनी त्याच्या व्यवहारकौशल्याचे कौतुक केले. राजाने भिकूशेटच्या खरेपणाची वाखाणणी करून म्हटले–"भिकूशेटच्या व्यवहारकौशल्याचे इतरांच्या मानाने जेवढे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे."

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, भिकूशेट व्यवहारकुशल असेल. परंतु त्याने फसवेगिरीच केली होती की नाही? आजपर्यंत तो लबाडीचेच पीक काढीत आहे. असे असूनही राजा व इतर लोक त्याची वाखाणणी करतात, हे कसं काय? या प्रश्नाचं उत्तर माहीत असूनही तू दिलं नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"या जगात काही लोक सुखवस्तू स्थितीतच जन्माला येतात तर काही लोक हळूहळू उच्च स्थितीपर्यंत पोचतात. दुसऱ्या तऱ्हेच्या लोकांना व्यवहारकौशल्याची गरज असते. राजा किंवा मंत्री यांच्या मुलांना उच्च वर्गीयात राहायला व्यवहारकौशल्याची गरज नसते. तशीच भिकूशेटसारख्यांना उच्च समाजात स्थान मिळाल्यानंतर व्यवहारकौशल्याची गरज भासत नाही. परंतु एक सामान्य किराण्यामालाचं दुकान काढायलाही भांडवल नसलेल्या भिकूशेटला राजधानीतला एक प्रतिष्ठित व्यापारी व्हावयाचं असेल तर व्यवहारिककौशल्य आवश्यक आहे व ते भिकूशेट मध्ये होतं. एकदा उच्च पद प्राप्त झालं की ते त्याला कसं साध्य झालं याची चवकशी कोणी करीत नाही. तशी चवकशी कोणी करू लागला तर त्यालाच कधीकधी त्याबद्दल आपली मान खाली करून घ्यावी लागते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# डोळे उघडले

**सा**सरी पाऊल टाकतांच रमाला वाटलं की तिची सासू तिच्याकडून घरातली सर्व कामे कंबर मोडेपर्यंत करवून घेणार. परंतु रमाची सासू स्वभावाने गरीब होती. ती रमाला तिच्या आईपेक्षा जास्त प्रेमाने वागवी. सासूच्या या मऊपणाचा गैर फायदा रमाने घेतला. तिने कामाला हात न लावण्याचं ठरविले, सर्व कामे तिची सासूच करी.

एके दिवशी तिचा थोरला भाऊ तिला भेटायला आला. त्याची बायको नुकतीच सासरी आली होती. रमाने आपल्या दादाला विचारले–"दादा! मालतीवहिनी घरातली सर्व कामे करीत असतील नाही! आईला म्हातारपणी थोडी विश्रांती मिळत असेल नाही?"

"नाही ग रमा! मालती एकही काम करीत नाही. आईवरच कामाचं सर्व ओझे आहे!" तिचा दादा म्हणाला. त्याने त्यापूर्वी रमा सासरी कसे वागते हे पाहून घेतले होते. रमा रागाने भावाला म्हणाली–"तरमग दादा, वहिनीला माहेरी दे पाठवून! म्हणजे तिचे डोळे उघडतील."

"मी तोच विचार करीत होतो. परंतु येथे येऊन तुझा संसार पाहिला व विचार बदलला. कारण मी ज्या दिवशी मालतीला माहेरी पाठवीन त्याच दिवशी आमचे मेहुणे तुला आमच्या घरी पाठवितील. मी पाहतो आहे, तुझ्यामुळे तुझ्या सासूचे काम कमी होण्याऐवजी वाढलं आहे." रमाचा भाऊ म्हणाला. रमाचे डोळे उघडले व ती घरातली सर्व कामे करू लागली.





# खरे शिक्षण

**फा**र प्राचीन काळची गोष्ट आहे. ज्ञानप्रिय नावाचा एक तरुण बालपणीच काशीला गेला व गुरूची सेवा करून व सर्व विद्या शिकून पारंगत झाला. म्हणून सर्व त्याच्या विद्वत्तेची आणि शास्त्रज्ञानाची स्तुती करू लागले.

परंतु ज्ञानप्रियला मात्र काहीतरी उणीव असल्यासारखे भासे. तो विचार करू लागला–"मी सर्व विद्या शिकून त्यांत प्राविण्य संपादन केले. परंतु यांपैकी एकही विद्या उदरनिर्वाहाला उपयोगी पडणे शक्य नाही. माझ्या शिक्षणात कोणतीतरी उणीव नक्कीच आहे. ती उणीव कोणती हे कळल्याशिवाय लग्न करून काय उपयोग?"

तो अनेक विद्वान लोकांना भेटला व त्याने संपादन केलेल्या सर्व विद्यांचे वर्णन करून त्याने त्यांना विचारले–"आतां मला हे सांगा की शिक्षण पुरे व्हायला मी आणखी काय शिकले पाहिजे?" सर्वांनी एकच उत्तर दिले–"अरे वेड्या, तुझं सर्व शिक्षण संपले आहे!"

परंतु एक वृद्ध गृहस्थ म्हणाले–"मुला, तुझ्या शिक्षणात एका गोष्टीची उणीव राहली आहे. ते शिक्षण तुला देऊ शकणारी एकच एक व्यक्ती आहे, गांवचा लोहार, तो गावाच्या टोकाला राहातो. तू त्याच्या हाताखाली काही दिवस राहालास तर तुझे शिक्षण पुरे होईल."

ज्ञानप्रियला तो वृद्ध म्हणाला त्यात तथ्य असल्यासारखे वाटले. आतां आपले शिक्षण पूर्ण होणार याचाही त्याला परमानंद झाला. तो त्या लोहाराच्या शोधार्थ निघाला. त्याला लोहाराचे घर सांपडले. त्याने नमस्कार करून लोहाराला विनंती केली–"काका! मी सर्व विद्या शिकून आलो आहे; तरी काहीतरी शिकायचे

राहून गेल्यासारखं वाटतं आहे. म्हणून मला जगात सुखी व्हायला उपयोगी पडेल असे काहीतरी शिकवा!"

लोहाराने ज्ञानप्रियला भात्याजवळ बसून भाता चालविण्याचं काम सांगितले. ज्ञानप्रिय त्या काळ्याकुट्ट जागी विस्तवाशेजारी बसून भाता चालवू लागला.

एक दिवस गेला, एक आठवडा लोटला, एक महिना लोटला व एक वर्षही लोटले. ज्ञानप्रिय भाता चालवीत राहिला. परंतु लोहाराने त्याला दुसरं काही काम सांगितलं नाही. तरी ज्ञानप्रिय काहीच बोलला नाही. त्याने विचार केला की मी ज्या कामासाठी आलो आहे त्याची लोहार काकांना चांगली कल्पना आहे. तेव्हां पुन्हां पुन्हां त्या गोष्टीची आठवण करून देणे शहाणपणाचे नाही.

परंतु एक वर्ष लोटले तरी लोहाराने दुसरे कोणतेही काम शिकविण्याची गोष्ट काढली नाही. म्हणून खिन्न मनाने त्याने विचारले–"गुरुवर्य! माझ्या शिक्षणाची..."

"तू भाता चालवीत रहा!" लोहाराने एवढेच उत्तर दिले. त्यानंतर ज्ञानप्रियने लोहाराला पुन्हां त्या गोष्टीची आठवण कधी करून दिली नाही.

अशा तऱ्हेने पांच वर्षे लोटली.

एके दिवशी ज्ञानप्रिय भट्टीजवळ बसून भाता चालवू लागणार, तितक्यात लोहाराने येऊन प्रेमाने त्याच्या पाठीवर हात फिरविला. ज्ञानप्रियने नम्रपणे नमस्कार करून विचारले–"गुरुवर्य! काय आज्ञा आहे?"

"बेटा, तुझं शिक्षण आतां पुरे झालं आहे! आता तू घरी जा, लग्न करून घे आणि गृहस्थाश्रमात पाऊल टाक. तू सर्व विद्यांत श्रेष्ठ विद्या सहनशीलता शिकून घेतली आहेस." लोहार म्हणाला.

ज्ञानप्रियने आनंदाने गुरूचे पाय धरले व त्याचा निरोप घेऊन घरी गेला. लग्न करून त्याने संसार थाटला. त्याचा संसार सुखाचा झाला व एक थोर ज्ञानी म्हणून गावकरी त्याचा आदर करू लागले.





# जावयाचा प्रताप

फार पूर्वी रामशास्त्री नावाच्या एका गरीब ब्राह्मणाला चार मुली होत्या. रामशास्त्र्याने चारही मुलींची लग्नं करून दिली आणि मुली सासरी नांदू लागल्या. परंतु मुलींच्या लग्नासाठी जे कर्ज काढले होते त्याच्या ओझ्याखाली वाकून गेला होता तो गरीब ब्राह्मण. सावकाराला तोंड दाखविणे अशक्य झाल्यामुळे तो एके दिवशी रात्री घर सोडून निघून गेला.

तो जिल्ह्याच्या मुख्य गावी निघाला होता. वाटेवर एका गावी पोचला तेथे एक मोठे वडाचे झाड होते. त्या झाडावर दोनतीनशे वर्षांपासून एक मुंजा रहात असे. ती गोष्ट जवळपासच्या पंचक्रोशीत सर्वांना माहीत होती. म्हणून कोणी त्या बाजूला वेळी अवेळी फिरकत नसे. काळोख्या रात्री रामशास्त्रीला आलेला पाहून झाडावरच्या मुंजाने दरडावून विचारले–"कोण तो? थांब पाहू!"

रामशास्त्र्याच्या सर्वांगाला घामच सुटला, परंतु रामशास्त्री स्वभावाने थोडा धीटच होता. चारचार मुलींची लग्नं करून देणे म्हणजे काही सामान्य पराक्रम नव्हे. म्हणून प्रसंगावधान राखून रामशास्त्र्याने स्वतःला सावरून तितक्याच करड्या स्वरात विचारले–"कोण तू?"

आपला आवाज ऐकून हा माणूस बेशुद्ध होण्याऐवजी आपल्यालाच दटावून विचारतो आहे, हे पाहून मुंजाला अपमान झाल्यासारखेही वाटले. झाडावरून उडी मारून रामशास्त्रीसमोर उभा राहून त्याने विचारले–"मी कोण आहे कळलं नाही वाटतं?"

रामशास्त्र्याने त्याला न ओळखल्याचे सोंग करून विचारले–"कोण रे बाबा, तू? या काळोख्या रात्री एकटा इकडे कसा काय आलास? एखादं जिवाणू निघालं तर? तू दिसायला नाजूक दिसतो आहेस!"



त्या मुंजाच्या मनात शंका उत्पन्न झाली की सर्वलोक आपल्याला जसा भयंकर आकृतीचा मानतात, तसे आपण खरोखरच नाही वाटतं. म्हणून तो रामशास्त्र्याकडे साशंक दृष्टीने पहात म्हणाला–"तू माझ्या-समोर हे नाटक काय चालविलं आहेस रे? मी या झाडावरचा मुंजा आहे आणि गेली तीनशे वर्षे या झाडावरच आहे!"

रामशास्त्र्याने त्या गोष्टीवर त्याचा विश्वास बसत नसल्याचे दर्शवून म्हटले–"अशक्य, तुला काय वाटलं की मी मुंजाला ओळखत नाही? तू खरोखरच मुंजा असतास तर मला पाहून जागच्या जागी बेशुद्ध होऊन पडला नसतास का? तुला पाहून मला माझ्या जावयांना पाहून जे भय वाटते त्याच्या पावपटही वाटले नाही."

ते सर्व ऐकून मुंजा चकितच झाला. म्हणून रामशास्त्री पुढे म्हणाला–"तुझे डोळे किती शांत व सुंदर आहेत. तू किती रागावून माझ्यावर डोळे वटारून पाहिलेस तरी माझ्या जावयाच्या रागाच्या एक टक्कासुद्धा तो वाटणार नाही. तुझा आवाज सुद्धा कसा किरटा आहे! तू गरजलास तर मला माझ्या जांवयांच्या हसण्याची आठवण होईल."

मुंजा विचार करू लागला–"तरमग मानवजातीत माझ्याहून जास्त भयंकर लोक आहेत वाटतं? गेल्या तीनशे वर्षांत मानवजातीची शक्ती इतकी वाढली म्हणाव-याची की काय?" ती शंका दूर करून घेण्यासाठी तो रामशास्त्र्याला म्हणाला–"माझ्यात जी शक्ती नाही ती तुझ्या जांव-यांत कोठून येईल रे?"

रामशास्त्र्याने मुंजाकडे सहानुभूतीच्या दृष्टीने पहात विचारले–"काय रे, तुझे लग्न झालं आहे का?"

"नाही, परंतु लग्न झाल्याने काय होणार आहे रे?" मुंजाने विचारले.

रामशास्त्री म्हणाला–"अरे भोळ्या मित्रा! तुला माहीत नाही वाटतं की लग्नाच्या वेळी जे वेदमंत्र म्हणतात त्यात



किती शक्ती असते ती! त्या मंत्रांच्या बळाने अगदी सामान्य माणूस जांवई होतो व त्याला अपार शक्ती प्राप्त होते. हेच पहा, माझे जांवई डोळे वटारून माझ्या मुलीकडे, माझ्या बायकोकडे किंवा माझ्या-कडे पाहू लागले की आम्ही जागच्या जागी थिजून जातो. ते ओरडतात तेव्हां आम्ही त्यांच्या पायां पडतो व क्षमा मागतो. म्हणून तुझ्या रागाचा किंवा ओरडण्याचा परिणाम माझ्यावर मुळीच पडत नाही." रामशास्त्री म्हणाला.



ते ऐकून मुंजा विचार करू लागला की जर हा ब्राह्मण म्हणतो ते खरे असेल तर लग्न झाल्याबरोबर माणसांना नवी शक्ती मिळत असणार, म्हणजे मला भिणारा कोणी राहणारच नाही. म्हणून आपणसुद्धा लग्न करून आपली शक्ती वाढविली पाहिजे.

रामशास्त्र्याने मुंजाच्या चेहऱ्यावरून ओळखले की त्याच्या मनात काहीतरी खळबळ उडाली आहे. म्हणाला–"अरे मुंजा, तू तरी किती दिवस असा मुंजाच राहणार? तूसुद्धा लग्न करून आपला प्रताप वाढव." असे सांगून रामशास्त्री तेथून पाय काढण्याचा विचार करू लागला.

मुंजाला रामशास्त्र्याचा सल्ला पसंत पडला. त्याने रामशास्त्र्याला थांबवून विचारले–"काय हो, तरमग माझे लग्न कोण करून देणार? तुम्हीच माझ्यासाठी एखादी मुलगी पहा न!"

"आतां हे पहा, आमच्या मानवजातीत तुला चित्त पडणारे कित्येक लोक आहेत. कोणी झाला तरी तो आपल्या मुलीला चांगल्या घराण्यात देणार. तुझ्यासारख्या भोळ्या भाबड्या व गरीबाला कोण मुलगी देईल?" रामशास्त्री म्हणाला.

मुंजाच्या मनात लग्न करून आपली शक्ती वाढविण्याची इच्छा जास्तच वाढली. आतां तो थोडा नमला व रामशास्त्र्याच्याच पायधरण्या करू लागला. रामशास्त्री बराच वेळ आपल्याच ऐटीत राहल्यावर

म्हणाला–"हे पहा, हे काम तेवढे सोपे नाही. यासाठी पुष्कळ पैसे खर्च करावे लागतात. तू जर हे सांगू लागलास की तू याच वडावर राहतोस तर तुला कोण आपली मुलगी देईल?"

"तुम्ही पैशाची फिकर करण्याचे कारण नाही. मुलगी शोधायला जो खर्च होईल तो मी देईन. शिवाय तुम्हांला चांगले बक्षिससुद्धा देईन. लग्न झाल्यावर मी एक मोठा वाडा बांधून त्यात रहायला जाईन." असे सांगून त्या मुंजाने सोन्याच्या मोहरा भरलेला एक हंडा रामशास्त्र्याला आणून दिला.

रामशास्त्र्याने होकारार्थी मान हलवून म्हटले–"परंतु माझी एक अट आहे. जोपर्यंत मी तुझ्यासाठी मुलगी शोधून आणीत नाही, तोपर्यंत तू कोणत्याही मानवाच्या दृष्टीस पडतां कामा नये. कारण हे कळलं की नवऱ्यामुलाचं घर वडाच्या झाडावर आहे, तर मुलगी ठरवून आलो तरी ते लग्न मोडेल. नंतर तुला पाहतील ते लोक सांगत सुटतील की तू अशक्त आहेस आणि तुला आपली मुलगी देणारच नाहीत. ते म्हणतील–"जर माणसातच मोठमोठे श्रीमंत आणि बलदंड लोक आहेत तर आपल्या मुलीला अशक्त मुंजाच्या गळ्यात बांधून आपली नाचक्की कशासाठी करून घ्यावयाची?"

म्हणून मुंजाला रामशास्त्री म्हणाला ते खरे वाटले. त्याने रामशास्त्र्याला वचन दिले की लग्न होण्यापूर्वी तो कोणाच्याही दृष्टीस पडणार नाही. त्यानंतर त्या मुंजाला कोणी त्या वडावर पाहिले नाही. पुढे काही वर्षांनी म्हातारी माणसं गावातल्या तरुणांना सांगू लागली की या वडावर एक मुंजा होता तर तरुण मंडळी त्याच्या बोलण्यावर विश्वासच करीतनाशी झाली. तरुण मंडळी म्हणत, "हा तुमचा अंधविश्वास आहे हो!"

रामशास्त्री मोहरांचा हंडा घेऊन घरी आला. त्याने आपलं सर्व कर्ज फेडलं. जावयांनी जं जे मागितलं ते त्यांना दिलं आणि पुढील आयुष्य आनंदाने घालविले.





# किल्ल्यातली कुत्री

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्व काशीजवळच्या स्मशानात एका कुत्र्याच्या जातीत जन्म घेऊन व कुत्र्यांचा सरदार म्हणून रहात होते.

एके दिवशी राजा आपल्या रथात बसून वनविहार करून सूर्यास्त समयी किल्ल्यात परतला. सारथी घोड्यांना तबेल्यात घेऊन गेला आणि रथ राजवाड्याच्या आवारात उघड्यावर सोडून गेला. त्या दिवशी रात्री मुसळाधार पाऊस झाला. रथ पाण्याने भिजून गेला. राजवाड्यातली कुत्री उतरून खाली आली व रथाला बांधलेल्या वाद्या, घोड्यांचे लगाम वगैरे कातडी सामान त्यांनी कुरतडून खाल्लें.

दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर राजाच्या नोकरांनी घडलेले वृत्त राजाला जाऊन कळविले. राजाने संतापून हुकूम सोडला की दिसेल त्या कुत्र्याला धरून ठार करा.

राजाज्ञेप्रमाणे राज्यातल्या सर्व कुत्र्यांचा संहार सुरू झाला. काही कुत्री राजाच्या शिपायांच्या हातून निसटून स्मशानात बोधिसत्व रहात तेथे गेली व म्हणाली– "प्रभो, महाराजांच्या रथाचे कातडी सामान काही कुत्र्यांनी कुरतडून खाऊन टाकले म्हणे. म्हणून महाराजांनी आज्ञा काढली आहे की दिसेल त्या कुत्र्याला धरून ठार करा."

बोधिसत्व विचारात पडले. किल्ल्यातल्या रथाजवळ बाहेरची कुत्री पोचणं सुद्धा शक्य नाहीं. कारण किल्ल्यात रात्रंदिवस पाहारा असतो. याचा अर्थ असा की रथाचे कातडी सामान किल्ल्यातल्या कुत्र्यांनीच खाल्लेले असणार! तर मग खऱ्या अपराधी कुत्र्यांना पकडून आपल्या अनुयायांचं रक्षण करणे आपले कर्तव्य आहे.

ते कुत्र्यांना म्हणाले–"तुम्ही भिण्याचे मुळीच कारण नाही. मी महाराजांना भेटून परत येईपर्यंत तुम्ही इकडेच रहा." असे कुत्र्यांना सांगून बोधिसत्व "धर्माचा जय असो!" "राजाने न्याय द्यावा!" असे मनात म्हणत राजवाड्यात गेले.

त्या वेळी महाराज राजसभेत सिंहासनावर बसून न्यायविचार करीत होते. बोधिसत्वांनी सिंहासनाखालून लपून राजसभेत प्रवेश केला व राजासमोर जाऊन उभे राहिले. राजाचे शिपाई बोधिसत्वांना धरायला धावले. परंतु राजाने त्यांना बाजूला रहायला सांगितले.

बोधिसत्वांनी राजाला नमस्कार केला व म्हणाले–"महाराज, आपण राज्यातल्या सर्व कुत्र्यांचा वध करण्याची आज्ञा केली आहे म्हणे! त्याचे कारण कळू शकेल का?"

"त्यांनी माझ्या रथाचे सर्व कातडी सामान फस्त करून टाकलं आहे. म्हणून तशी आज्ञा काढावी लागली." राजा म्हणाला.

"तो गुन्हा कोणत्या कुत्र्यांनी केला, आपल्याला माहीत आहे का?" बोधिसत्वांनी विचारले.

राजाने माहीत नसल्याचे सांगण्यासाठी नकारार्थी मान हलविली. तेव्हां बोधिसत्व म्हणाले–"महाराज, गुन्हेगार कुत्री कोण ह्या गोष्टीची चवकशी केल्याशिवाय सर्व राज्यातल्या कुत्र्यांना ठार करणे हे न्याय्य होईल का? तुमचे शिपाई राज्यातल्या सर्वच कुत्र्यांना ठार करणार आहेत की काहींना जिवंत सोडणार आहेत!" बोधिसत्वांनी विचारले.

"राज्यातल्या सर्व कुत्र्यांना ठार करण्याची आज्ञा मी काढली आहे. परंतु किल्ल्यात आम्ही पाळलेल्या कुत्र्यांच्या जिवाला कोणत्याही प्रकारचा धोका नाही." राजा म्हणाला.

"आपल्याला गुन्हा करणारे कुत्रे कोण हे माहीत नाही. तरी किल्ल्यातल्या कुत्र्यांना वगळून इतर कुत्र्यांना ठार करण्याची आज्ञा आपण काढलीत. यामुळे आपला पक्षपात, द्वेष, अविवेक आणि भीति ह्याच अवगुणांचा पगडा आपल्यावर असल्याचे प्रगट होत आहे. राजपुरुषात ज्या लक्षणांची आवश्यकता असते त्यात यांपैकी एकही नाही." बोधिसत्वांनी धीटपणे आपली बाजू मांडली.

राजा विचार करून म्हणाला–"तर मग तू आपल्या चातुर्याचा उपयोग करून आमच्या रथाचे कातडी सामान कोणी खाल्ले हे सिद्ध करून दाखवं!"

"तो गुन्हा किल्ल्यात राहणाऱ्या तुमच्या कुत्र्यांचाच आहे. ते मी सिद्ध करून दाखवितो." बोधिसत्व म्हणाले.

"तू सिद्ध करून दाखव, मी आपली आज्ञा मागे घेईन." राजाने हमी दिली.

बोधिसत्वांनी राजाला थोडे ताक व थोड्या दुर्वा आणवायला विनंती केली. राजाच्या नोकरांनी ताक व दुर्वा आणून





दिल्यावर बोधिसत्वांनी दुर्वा चटणीसारख्या चांगल्या वाटून घेतल्या व त्यात ताक कालविले आणि ते किल्लयातल्या कुत्र्यांना प्यायला लावले.

जेमतम दोनतीन मिनिटेच गेली असतील किल्लयातली कुत्री ओकू लागली व त्यांच्या पोटातून जीर्ण न झालेले कातड्याचे तुकडे बाहेर पडू लागले.

ते पाहतांच राजाला आश्चर्यचकित होताना पाहून बोधिसत्व म्हणाले–"महाराज, आपले नोकर कुत्र्यांना पोटभर खायला घालीत नाहीत, म्हणून उपाशी कुत्र्यांनी भुकेने जीव कासावीस झाल्यामुळे रथाचे कातडी सामान खाल्लयाचे आपण पाहतांच आहां!"

राजाला फार आनंद झाला व म्हणाला–"हे कुत्र्याच्या रूपात असलेले बोधिसत्वच असणार. आणखी दुसरे कोण असणार?" सर्व दरबाऱ्यांना सांगून राजाने आपले श्वेत छत्र बोधिसत्वांच्या डोक्यावर धरायला सांगितले व त्यांचा सत्कार केला.

बोधिसत्वांनी राजाला धर्मबोध केला आणि स्मशानात त्यांचे अनुयायी रहात होते त्यांच्याकडे निघून गेले.

राजाने कुत्र्यांची राखण करणाऱ्या नोकरांना बोलाविले व चवकशी केली तेव्हां कळले की ते कुत्र्यांसाठी राज्याकडून मंजूर केलेल्या रकमेतून स्वत: बरीच रक्कम उचलीत होते व त्यामुळे कुत्र्यांना पोटभर खायला मिळत नव्हते. राजाने त्या नोकरांना कामावरून कमी केले व त्यांच्या जागी कुत्र्यांची राखण करायला नवे नोकर नेमले. त्या दिवसापासून राजाने किल्लयातील कुत्र्यांनाच नव्हे तर राजधानीतील सर्व कुत्र्यांना पोटभर खायला घालण्याची व्यवस्था करून दिली.

त्यानंतर राजा बोधिसत्वांच्या धर्मबोधाप्रमाणे वागू लागला व प्रजेच्या सुखासाठी त्याने अनेक कामे केली.

बोधिसत्वांनी याप्रमाणे इहलोकांत अनेक वर्षे धर्मोपदेश केला आणि अनेकांचा उद्धार केला.





# खरा जय

भारताच्या इतिहासात अशोक (अशोक-वर्धन) हा एक अत्यंत थोर राजा होऊन गेला. तो चंद्रगुप्त मौर्याचा नातू व बिन्दुसाराचा मुलगा होता त्यानेच बौद्ध धर्माचा प्रचार केला.

बिन्दुसाराला अनेक राण्या होत्या व अनेक पुत्रही होते. एकदां एका मुनिवर्यांच्या दर्शनासाठी सर्व राजकुमार राजवाड्यासमोरील पटांगणात आपापल्या आसनावर बेऊन बसले. अशोक लहान मुलगा होता. त्याच्यासाठी निराळे आसन नव्हते.





अशोक जमिनीवरच बसला. इतक्यात बिन्दुसार राजा मुनिवर्यांबरोबर तेथे आला. अशोकाला त्याने विचारले की तो जमिनीवर कां बसला आहे? अशोक म्हणाला–"भूमातेच्या मांडीशिवाय उत्तम आसन दुसरे कोणते आहे? ती कधी कोणाला फसवीत नाही.



मुनिवर्य बिन्दुसाराला म्हणाले–"अशो-कात काहीतरी अद्भुत लक्षणे दिसत आहेत, म्हणून तो मोठे नाव काढील. अशोक मोठा झाल्यावर बिन्दुसारने त्याला माळव देशाचा शासक नेमून उज्जयिनीला पाठविले.

ई. स. पूर्वी २७३ या वर्षी बिन्दुसार वारला. ती बातमी कळताच अशोक पाटलीपुत्र येथे आला. राजाने मृत्यु-समयी त्याच्यानंतर कोण राजा होईल हे जाहीर केले नव्हते. म्हणून सर्व अनिश्चितच होते.





परंतु अशोकाने राजधानीत प्रवेश केल्यावर ती अनिश्चित परिस्थिती बदलली. त्याने आपली दक्षता त्या पूर्वीच सिद्ध करून दाखविली होती. तो शूर व साहसी होता व क्रूरही होता. त्याच्याविरुद्ध 'ब्र' काढण्याची हिंमत कोणात नव्हती. तो गादीवर बसला.

अशोकाचे विचार फार घोर होते. काही लोकांनी त्याला 'चंड अशोक' ही पदवी दिली होती. त्याच्या मनात चक्रवर्ती होण्याची फार इच्छा होती. ती महत्वाकांक्षा पूर्ण व्हावी यासाठी त्याने एक मोठे सैन्य उभे केले व योग्य सेनापती नेमले.





प्रथम त्याने लहान लहान राज्ये जिंकली व नंतर बलाढ्य कलिंग देशावर स्वारी केली. कित्येक दिवस भयंकर युद्ध चालू होते. परंतु कलिंग देशाच्या सैन्याने माघार घेतली नाही. तेव्हा अशोकाच्या सैन्याने कलिंग देशाच्या सैन्याची अमानुषपणे कत्तल केली.

या युद्धात एक लाख सैनिक धरातीर्थी पडलेले अशोकाने एका टेकडीवरून प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले. त्याच्या दुप्पट सैनिक जखमी झाले होते. दीड लाख सैनिकांना कैद करण्यात आले. जय मिळाल्यावर खूष होण्याऐवजी अशोक चिंतामग्न झाला.





पश्चात्तापदग्ध होऊन अशोक आपल्या राजधानीत परतला. एका बौद्ध-भिक्षूने त्याला ज्ञानबोध केला–"खरा जय तलवारीच्या धारेवर मिळत नसतो, प्रेमाने मिळतो!" तेव्हां अशोकाला मनःशांती प्राप्त झाली.

अशोकाने आपले मंत्री, सेनापती व सामंत सर्वांना बोलावून सर्वांसमक्ष, तो त्या दिवसापासून हिंसेचा त्याग करीत असल्याचे जाहीर केले. तेव्हां तो शांतिदूत झाला. त्याने सर्वांना ज्ञान व प्रेम यांचा प्रचार करण्यास सांगितले. त्यानंतर अशोक 'धर्म-अशोक' म्हणून प्रसिद्ध झाला.





अशोकाने देशाचे सामाजिक रूपच पालटून टाकलं. शिलालेखांद्वारे धर्मसूत्रांचा प्रचार सुरू केला. त्याच-मुलगा व मुलगी बुद्धाचा संदेश श्रीलंकेला घेऊन गेले. धर्ममहामात्यांनी व प्रचारकांनी धर्ममार्गावर प्रजेला नेले.



# भांडणे मिटली

गौरी व गणपती दोघांनी ज्या दिवशी संसार थाटला त्या दिवसापासूनच दोघांची परस्परांशी भांडणे सुरू झाली. भांडणाला कारणे तशी फार मोठी नव्हती. आज भाजी कोणती करावी, कोणत्या देवळात जावे अशाच लहानसहान गोष्टी वरून दोघांची भांडणे होत.

एकदां दोघांना आपले बिऱ्हाड बदलावे लागले. गणपतीने खूप हिंडून फिरून शेवटी एक घर गावाच्या अगदी टोकला ठरविले दोघांनी समुहूर्तावर गृहप्रवेश केला.

एकदां गणपती ऑफिसातून घरी परत येतांना भाजी विकत घेऊन आला. जेवतांना दोघांचे भांडण सुरू झाले की दुसऱ्या दिवशी सकाळी कोणती भाजी करावयाची? गौरी म्हणाली–"दोडक्याची भाजी करू या. परंतु गणपतीने हट्ट धरला की भेंडीची भाजीच तिने केली पाहिजे.

गौरी चिडून म्हणाली–"मी काही म्हटलं की त्याच्या विरुद्ध बोलण्याचं तुम्ही जणूकाही व्रतच घेतलं आहे."

"मी म्हटलेलं तू कधी ऐकलं आहेस का?" गणपतीने उलट प्रश्न विचारला.

इतक्यात कोणीतरी दाराची कडी वाजविली. गणपतीने पुढे होऊन दार उघडले. बाहेर कोणी भिकारी चांदण्यात दिसला. त्याच्या हातात चोपडी होती. तो गणपतीला म्हणाला–"मालक, तुम्हांला दोघांना मी केव्हांपासून भांडत असलेला ऐकतो आहे. भांडणाची गरजच काय? दोघांना आवडणाऱ्या दोन्ही भाज्या एकदम करा!"

"तुला कोणी रे, मध्ये तोंड खुपसायला सांगितलं? आधी चालता हो!" गणपती ओरडला. "थांब रे, बाबा, मी वाढते आहे ते घेऊन जा!" गौरी म्हणाली आणि तिने त्याच्या झोळीत भात व भाजी घातली.



भिकारी आनंदाने निघून गेला.

दुसऱ्या दिवशी गौरीने दोन भाज्या केल्या. त्या दिवशी जेवताना दोघांचं भांडण झालं नाही. परंतु त्या दिवशी दोघां नवरा बायकोचं त्यांच्या एका मित्राच्या घरी लग्नाला जाण्यासंबंधी भांडण झालं.

गणपती म्हणाला–"तू हिरव्या रंगाची साडी नेस. तो रंग मला आवडतो."

"नाही, मी लाल साडीच नेसून येणार आहे. मला तीच आवडते." गौरी म्हणाली. झालं, दोघांचं त्या गोष्टीवरून भांडण जुंपलं.

इतक्यात दाराची कडी वाजली. गौरीने पुढे होऊन दार उघडलं. अदल्या दिवसाचा भिकारीच उभा होता.

"ताई, उगाच एवढयाशा गोष्टीवरून दोघं कां भांडतां? उद्यां तुम्ही दोघं लग्नाघरीच राहणार ना? दिवसा लाल साडी नेसा व रात्री हिरवी, भांडण हवंच कशाला?" भिकाऱ्याने सल्ला दिला.

"तू कोण रे, मध्ये तोंड खुपसायला? आम्ही आमचं पाहून घेऊ, चालू लाग!" गौरी संतापून म्हणाली.

"थांब रे, बाबा!" असं म्हणत गणपतीने खिशातून काही पैसे भिकाऱ्याच्या भांडयात टाकले.

भिकारी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी दोघे नवराबायको परतले तेव्हां तो भिकारी घराच्या ओसरीत झोपलेला होता.

दोघं जेवून खाऊन आली होती, म्हणून पाणी पिऊन झोपली.

"आपल्या पोटी मूल जन्माला आलं तर ती मुलगीच असावी, बाई! कन्यादानाचं पुण्य लाभेल! भटजी म्हणत होते की कन्यादानाचं पुण्य कोटयावधी पुण्यांहून श्रेष्ठ असते, म्हणे!" गौरी म्हणाली.

"चल ग! हे काय, तुझं डोकंबिकं फिरलं आहे की काय? कोणी मुलगी व्हावी म्हणून इच्छिल का? हल्ली 'नकोनको' म्हणाऱ्यांना मुलीच होताहेत! मुलगी झाली तर किती संकटांना तोंड द्यावे लागेल, तुला



कल्पना तरी आहे का? तिच्यासाठी योग्य वर शोधावा लागेल. मोठा हुंडा देऊन तिचं लग्न करून द्यावे लागेल. इतकं सर्व करून ती परक्या घरचीच तर राहणार! या उलट मुलगा जन्मला तर तो हुंडयाचे पैसे आणील. म्हातारपणी आपलं रक्षण करील." गणपणी म्हणाला. या गोष्टीवरून दोघांचं भांडण सुरू झालं.

या खेपेसही दाराची कडी पुन्हां वाजली. गणपतीने दार उघडून विचारलं–"काय रे, तू आम्हांला सल्ला द्यायला पुन्हां आला आहेस वाटतं?" त्यानंतर समोर उभा असलेल्या माणसाकडे पाहून गणपती दचकला. कारण तो कचेरीचा शिपाई सदाशिव होता.

"मला पाहून तुम्हांला कोणी दुसराच वाटलं होय? आज तुम्ही कचेरीत आला नाहीत, तुमचे कर्जाचे पैसे परत द्यायला आलो आहे. हे घ्या!" सदाशिव म्हणाला आणि गणपतीच्या हातात एक पाकीट देऊन निघून गेला.

सदाशिव निघून गेल्यावर गणपती दार बंद करू लागला तेव्हां भिकारी पुढे येऊन म्हणाला–"मालक, एक विनंती करावी, म्हणतो! तुम्ही दोघं मुलगा हवा की मुलगी या गोष्टीवरून भांडत होता ना? आतां पलीकडच्या गल्लीत केशवरावांची बायको आणि नथूराम कासाराची बायको पोटांत दुखत आहे म्हणून रडत आहेत. तुम्ही कोणाला मुलगा आणि



कोणाला मुलगी होईल, हे बरोबर सांगितलेत तर तुमचं भांडण कायमचे मिटेल."

ते ऐकून गौरी ओरडली–"केशवरावांना मुलगी होणार." परंतु गणपती म्हणाला–"नथूराम कासाराला मुलगा होणार."

त्या दिवशी रात्री गणपती, केशवरावांची बायको व नथूराम कासाराची बायको बाळंत होईपर्यंत जागत बसला. परंतु झालं उलटं, केशवरावाला झाला मुलगा आणि नथुराम कासाराला झाली मुलगी.

भिकारी हसत येऊन म्हणाला–"पाहिलंत? तुम्ही दोघं म्हणालात त्याच्या उलटच झालं. कोणाला मुलगा होणार आणि कोणाला मुलगी, ही सर्व सृष्टीची माया आहे. सृष्टीच्या नजरेत पुरुष किंवा स्त्री दोघेसारखेच असतात. म्हणून तुम्ही यापुढे उगाच भांडायचं सोडून द्या. परस्परांना समजून घेण्याचा प्रयत्न करा आणि सुखी व्हा. असं राहिलात तरच आयुष्यभर सुखी व्हाल. मी जिवंत असेपर्यंत कित्येक कुटुंबांत सुधारणा आणून दिली. आजसुद्धा तीच इच्छा माझ्या मनात आहे, म्हणून मी या रूपात फिरतो आहे."

तो म्हणाला ते ऐकून नवराबायको घाबरली. त्यांना वाटलं की घेरी येऊन खाली पडणार. परंतु जेव्हां दोघं शुद्धीवर आली तेव्हां त्यांना समोर तो भिकारी दिसला नाही.

ती गोष्ट घडली त्या घटकेपासून दोघांच्या मनात सदा भीती असे की तो भिकारी येतो की काय? त्यांचं घर गावाच्या टोकाला होते. चहूंकडे गडद झाडी होती. घर बदलण्याची इच्छा असूनही ते साध्य नव्हते. म्हणून त्या भुताच्या भीतीने त्यांनी आपसात भांडायचे सोडून दिले. त्यानंतर त्यांना मानव जीवन किती सुख देणारे आहे, याचा अनुभव आला. त्या आनंदात काही दिवस लोटले व हळूहळू भुताची गोष्टच ते विसरले. नंतर त्यांना ते भूत कधी दिसलेच नाही.



# माणूस व कर्तव्य

रविवर्मा नावाचा एक तरुण राजाच्या दर्शनास गेला व काहीतरी काम द्यायला त्याने विनंती केली. राजाला तो तरुण सज्जन असावासा वाटले. म्हणून राजाने प्रधानाला बोलावून त्या तरुणाला त्याच्या योग्यतेप्रमाणे नोकरी द्यायला सांगितले. प्रधानाने आपल्याच कचेरीत त्याला नेमले.

रविवर्म्याला जे काम दिले होते ते कित्येक दिवस झाले तरी पुरे झाले नाही. ते कळल्यावर प्रधानाने चवकशी केली. तेव्हां प्रधानाला तो तरुण एक मोठा भक्त असल्याचे व तो रात्रंदिवस देवळात रहात असल्याचे कळले. प्रधानाने त्याला रागावून जाब विचारला.

रविवर्मा म्हणाला–"प्रधान मला देवाने जन्म दिला. त्याबद्दल कृतज्ञता प्रगट करायला दिवसाचे चोवीस तासही पुरणार नाहीत."

"अस्सं! तरमग तुला नोकरी देणाऱ्या राजाचे आभार मानायला सुद्धा वेळ काढायला पाहिजे!" प्रधान म्हणाला.

रविवर्म्याला ती गोष्ट पटली. तो दररोज राजाच्या दर्शनास जाऊन त्याचे आभार मानू लागला. लागोपाठ चारपांच दिवस त्याला येत असलेला पाहून राजाने संतापून त्याला नोकरीवरुन कमी केले.

त्यानंतर रविवर्मा प्रधानाला जाऊन भेटला व म्हणाला–"प्रधान आपल्या सल्ल्याप्रमाणे मी दररोज महाराजाचे आभार मानू लागलो तर माझी नोकरीच गेली की!"

"कां जाणार नाही? राजाने तुला नोकरी दिली ती तू मन लावून काम करशील असे समजून. देवाने तुला जन्म दिला तो यासाठी की तू आपल्या कर्तव्याचं पालन करशील असे मानून; देवाचे व राजाचे फक्त आभार मानशील यासाठी नाही." प्रधानाने त्याची खूप हजेरी घेतली आणि त्याला पुन्हां नोकरी देऊन बजावले की जो स्वत:ची मदत करतो त्यालाच देव मदत करतो!





# समोरच्या रखमाबाई

चंपक देशाच्या हद्दीला लागून शिवपुर नावाच्या गावी रामजी नावाचा एक शेतकरी रहात असे. त्याला लखुजी नावाचा धाकटा भाऊ व शांता नावाची एक बहीण होती. रामजीच्या बायकोचे नाव होते लक्ष्मी. ती दिराला व नणदेला अत्यंत प्रेमाने वागवी.

चंपक देशाचे शेजारच्या देशाशी युद्ध झाले. शत्रुसैन्य चंपकदेशावर चालून जात असतां शिवपूरच्या गावावर मोठे संकट आले. सैन्याचा धुमाकूळ चालू झाल्याने गावात राहणे अशक्य झाले. लोक गाव सोडून पळून गेले. इतर गांवकऱ्यांप्रमाणे रामजीचे कुटुंबसुद्धा गाव सोडून पळून गेले व दुसऱ्या गावात जाऊन राहू लागले. शिवपूर गावावर शत्रूचा अधिकार झाला.

रामजीने परत जाण्याचा विचार सोडला व नवीन गावीच कायम राहण्याचे ठरविले. लखुजीचे विद्याभ्यासाकडे मुळीच लक्ष नव्हते. परंतु रामजी चांगला शिकला सवरलेला होता. लक्ष्मीने संगीताचा चांगला अभ्यास केला होता. दोघांनी मिळून एक लहान शाळा आपल्या घरीच काढली. शांता घरातली सर्व कामे पाहू लागली. लखुजी शेजारच्या जंगलातून लाकडे तोडून आणी. जंगलातल्या इतर उपयोगी वस्तूही तो आणून देत असे. एका वर्षाच्या आत रामजीने काही पैसे वांचवून दोन एकर जमीन विकत घेतली. लखुजी शेतीभातीची कामे करू लागला.

आतां कुटुंबाची स्थिती बरीच स्थिर-स्थावर झाली. रामजीने स्वतःसाठी एक घर घ्यायचे ठरविले. त्या गावात ते लोक आले त्या दिवसापासून ते घर विकायला घरमालक तयार असल्याचेही कळले. किंमत सुद्धा तशी जास्त नव्हती. तरी कोणी विकत घ्यायला पुढे येत नव्हता. ते घर विकत घ्यायचे रामजीने ठरविल्याचे ऐकून एक गृहस्थ म्हणाले–"असला वेडेपणा करू नका, कारण त्या घरासमोर राहणाऱ्या रखमाबाई म्हणजे एक म्हाळसाच आहे!"

एका बाईला भिऊन स्वस्तात मिळणारे घर सोडून द्यायला रामजीचे मन तयार होईना. पुरेसा पैसा जमल्याबरोबर त्याने ते घर विकत घेतले आणि चांगला मुहूर्त पाहून गृहप्रवेश केला. गृहप्रवेशाला समोरच्या रखमाबाईसुद्धा आल्या होत्या. कित्येक दिवसानंतर शेजारी एक कुटुंब आल्याचा त्यांना फार आनंद झाला.



रखमाबाईंच्या घरी त्या व त्यांचा नवरा दोघंच माणसं होती. त्यांना मुलंबाळं नव्हती. नातेवाईक होते, परंतु रखमाबाईशी कोणाचे पटत नव्हते. रखमाबाईने लक्ष्मीशी मैत्री जोडली. काही काळ आनंदातच गेला.

लक्ष्मी तिच्या घरी येणाऱ्या मुलांना गाणे शिकवी. रामजी घरासमोरच्या झाडा-खाली बसून येणाऱ्या मुलांना शिकवी. शांता घरातले सैपाकपाणी सर्व करी. लखुजी सकाळी न्याहारी करून शेतावर निघून जाई व संध्याकाळी घरी परत येई.

रखमाबाई शांताला आपल्या घरी बोलावून तिच्याशी गप्पा मारीत बसत. इतक्या लहान वयात तिला घरातली सर्व कामे करावी लागत म्हणून त्यांना तिची कीव येई. त्या म्हणत–"तू किती कामे करतेस ग? तुझ्या वहिनीला गात बसण्या शिवाय दुसरी कामे येत नाहीत वाटते?"

"तसं नका म्हणू हो! आमच्या वहिनी म्हणजे एक देवी आहे! येत्या वर्षी माझं लग्न करून देणार आहेत! घरातली सर्व कामे यावी म्हणून माझ्यावरच सर्व जबाब-दारी टाकली आहे. मी मागेन ते वहिनी मला आणून देतात." असे शांता सांगे.

"अग तुझ्यासारखी नणंद मिळावी म्हणून देवाला किती नवस करावे लाग-तात! किती पगार दिला तरी तुझ्यासारखी

कामं कोणी करील का? तुझी वहिनी मोठी भाग्यशाली आहे बाई! आणि तू, अगदीच भोळी आहेस बाई! मुकाट्यानं किती कष्ट करतेस ग?" या शब्दात रखमाबाई शांताला आपली सहानुभूती दर्शवीत.

सुरवातीला या बोलण्याकडे शांताने लक्ष दिले नाही. परंतु हळूहळू संशयाच्या किड्याने तिच्या मनात घर केलेच. आपण भोळेपणाने सर्व कामे करतो, म्हणून वहिनी चाकरी करवून घेत आहेत आणि स्वत: मजा करताहेत! तो विचार मनात आला त्या घटकेपासून शांताला तिची वहिनी दुष्टपणा करीत असल्यासारखं वाटू लागले.

रखमाबाईला लखुजीची अशीच कीव वाटे व त्या आपली सहानुभूती दर्शवीत.

"तू रामजीचा भाऊ आहेस हे कोणी मानणारच नाही. तू त्यांचा घरगडी आहेस असेच सर्वांना वाटते आहे." रखमाबाई लखुजीला म्हणाल्या.

"मी तरी घरात स्वस्थ वसून काय करू? मला लिहितावाचता येत नाही. आमचा दादा मला किती प्रेमाने वागवतो. कोणी काही म्हटलं म्हणून काय झालं?" लखुजी उत्तर देई.

"काय रे, सर्व गावाला शिकविणारा तुझा दादा, तुला कां नाही रे शिकवीत? तुला शिकविलं तर शेतात कोण राबणार? म्हणून तर तो शिकवीत नाही!" रखमा-बाईने या शब्दात विष कालवले.

म्हणून लखुजीच्या मनातही संशयाच्या किड्याने प्रवेश केला. त्याला रखमाबाई



म्हणत ते खरं वाटू लागलं. आता ही गोष्ट कोणाशी बोलावी हे त्याला कळेना. शेवटी तो धाकट्या वहिणीशीच बोलला. शांता सुद्धा तिच्या मनातलं विष ओकली. आपणां दोघांवर भाऊभावजय अन्याय करीत असल्याचं दोघांना वाटू लागलं.

शांताला थोडं गाता येत होतं. ती एके दिवशी आपल्या वहिनीला म्हणाली– "वहिनी, घरातली कामं करायला मला कंटाळा येतो बाई! तुम्ही काही दिवस घरातली कामे करा, मी मुलांना गाणं शिकविते!" त्या गोष्टीस भावजय लगेच तयार झाली.

लखुजीसुद्धा भावाला म्हणाला–"दादा. माझी तब्येत हल्ली बरी नसते. मी काही दिवस घरातच राहून लिहायला वाचायला शिकून घ्यावे म्हणतो. शेताची कामे करा-यला आपण एखादा गडी ठेवू या का?"

त्या गोष्टीस रामजीने होकार दिला.

लक्ष्मी घरातलं सैंपाकपाणी वगैरे सर्व कामे करू लागली, परंतु शांताला गाणे शिकविणे काही जमले नाही. ती शिकवी ते मुलींना येत नाही म्हणून ती मुलींवर राग काढी. ते मुलांमुलींना आवडेना. हळूहळू मुलं गाणं शिकायला यायची कमी होत गेली. प्राप्ती कमी होऊ लागली.

वर्षभर घरात राहूनही लखुजीला लिहिता वाचता आलं नाही. त्याच्या डोक्यातच काही शिरत नव्हतं. गडी शेतातली कामं लक्ष देऊन करीत नसे. म्हणून शेतातली





प्राप्तीसुद्धा कमी झाली. त्यातला काही भाग गड्याच्या पगारासाठी खर्च झाला.

अशा स्थितीत लक्ष्मीने त्या वर्षभरात शांताच्या लग्नासाठी चार पैसे मागे राखायचा विचार केला होता तसे काही जमलं नाही. रामजी आणखी एक एकर जमीन विकत घेण्याच्या विचारात होता, तेही जमले नाही.

एके दिवशी लक्ष्मीने शांताला जवळ बोलावून म्हटले–"आतां तू गाणं शिकवायचं बंद कर. तुला घरातली कामं जड वाटत आहेत ना, तर ती मी करीत राहीन व मुलांना गाणेसुद्धा शिकवीन."

रामजीनेसुद्धा लखुजीला बोलावून समजावून सांगितले. "तुला बरं वाटेपर्यंत शेतातली कामं मी सर्व करतो व मुलांनासुद्धा शिकवितो."

शांता व लखुजी दोघांनी ते आनंदाने मान्य केले.

त्या दिवसापासून लक्ष्मीला व रामजीला कामाचा ताप जास्त पडू लागला. रखमाबाईशी गप्पा मारायला शांता व लखुजीला वेळसुद्धा पुष्कळ मिळू लागला. रखमाबाईने त्या दोघांना सुटका मिळाल्याबद्दल दोघांचे अभिनंदन केले.

रखमाबाईच्या मुळेच शांता व लखुजी दोघांमध्ये बदल झाला हे लक्ष्मीबाई व रामजी दोघांना उमगले. आपल्या सद्व्यवहाराने दोघांत बदल होईल असे दोघां नवराबायकोला वाटले होते. परंतु त्यांचा तो प्रयत्न निष्फळ ठरला. म्हणून रामजीने एक युक्ती योजली.

एके दिवशी लक्ष्मी व रामजी दोघांनी परस्परांशी काहीतरी गुप्त बोलत असल्याचे सोंग केले. शांता व लखुजी त्यांचे संभाषण आड उभे राहून ऐकत होती. रामजी व लक्ष्मीला ते माहीत होते, म्हणून त्यांना चांगले ऐकू जाईल अशा बेतानेच नवराबायको बोलत होती.

"शांताला काम करायला आवडते, पण मला मदत करायला आवडत नाही, म्हणे! आम्हां दोघींचे परस्परांवर स्वतःच्या प्राणापेक्षा जास्त प्रेम आहे हे त्या रखमाबाईला माहीत नाही, म्हणून शांताच्या विरुद्ध नाही नाही ते ती बोलली. मला ती म्हणाली ते सर्व खरे वाटेल, असे वाटलं वाटतं तिला!" लक्ष्मी म्हणाली.

"लखुजीच्या विषयी मला ती असंच काहीतरी म्हणाली. मला ते खरं वाटलं नाही!" रामजी म्हणाला.

"शांताला म्हणे माझ्या बोलण्यापेक्षा तिचे बोलणंच जास्त खरं वाटतं! रखमाबाईने सांगितलं तर म्हणे शांता मला केरसुणीने मारायला मागेपुढे पाहणार नाही. उलट रखमाबाई असं माझ्याजवळ म्हणाल्याचं शांताला कळलं तर ती त्या रखमाबाईलाच केरसुणीने झोडपून काढील." लक्ष्मी म्हणाली.

"ती मला म्हणाली की तिने लखुजीला सांगितले तर तो म्हणे माझी शेंडी धरून मला रस्त्यावर ओढून न्यायला मागेपुढे पाहणार नाही. ही गोष्ट रखमाबाई म्हणाल्याचे त्याच्या कानावर पडलं तर तो त्या रखमाबाईच्याच झिंज्या धरून तिला रस्त्यावर ओढून नेईल." रामजी म्हणाला.

नवरा बायको अशी बराच वेळ बोलत बसली होती. काही वेळाने दोघांनी पलीकडे जाऊन पाहिले तर तेथे शांता किंवा लखुजी दोघांपैकी कोणीच नव्हता. गल्लीत कसला तरी आरडाओरडा ऐकू आला. दोघे बाहेर जाऊन पाहतात तर गर्दी जमलेली होती व लोक गंमत पहात होती.

लखुजी रखमाबाईच्या झिंज्या पकडून गल्लीत ओढून घेऊन आला होता आणि शांता केरसुणीने रखमाबाईला बडवीत होती.

रामजी धावतच गेला आणि दोघांना एकेका हाताने धरून घरात ओढून घेऊन आला.

दुसऱ्याच दिवशी रखमाबाई व तिचा नवरा गाव सोडून निघून गेले. कारण प्रेमाने राहणाऱ्या कुटुंबाच्या घरासमोर रखमाबाईसारख्यांना राहणं शक्यच नव्हतं.



# प्रधानाचे चातुर्य

विजयपुरी नावाच्या गावी रंगा नावाचा एक अट्टल चोर होता. त्याने अनेक चोऱ्या केल्या, कित्येकांचे खून केले आणि इतके करूनही राजाच्या शिपायांच्या हातून तो निसटून जाई. म्हणून राजाने त्या चोराला धरून देणाऱ्याला शंभर मोहरा इनाम म्हणून दिल्या जातील असे दवंडी पिटून जाहीर केले.

एके दिवशी रामजी नावाचा एक शेतकरी पहाटे उठून शेतावर जात असतां त्याला गावाकडे येणाऱ्या कोण्या दोघां यात्रेकरूंना कोणीतरी चोर अडवून त्यांच्याजवळचं काही चोरून घेत असलेला दिसला. तोच रंगा चोर असावा असे समजून रामजी एका झाडाआड लपून बसला व चोर जवळून जात असता रामजीने दोरीचा फास त्याच्या अंगावर टाकून त्याला बांधले आणि त्याला राजाकडे ओढून घेऊन चालला.

रामजीला राजू नावाचा दुसरा शेतकरी समोरून येत असलेला भेटला. भानगड काय म्हणून विचारतां रामजीने चोराला पकडलं आहे व राजाकडून शंभर मोहोरा इनाम मिळणार आहे असे रामजीने त्याला सांगितले. लगेच राजूने आपल्या हातातले दांडकं रामजीच्या कपाळात घातलं व तो बेशुद्ध झालेला पाहून चोराला धरून तोच राजाकडे निघाला.

राजू राजवाड्यात पाऊल टाकण्याच्या पूर्वी रामजी शुद्धीवर येऊन राजवाड्यापर्यंत आला. दोघे 'मी चोराला पकडला', 'मी चोराला पकडला' म्हणू लागले. ते पाहून राजाने प्रधानाकडे 'काय करावे?' या अर्थी पाहिले. प्रधानाने चोराला जवळ बोलावून घेतले व म्हणाला–"हा चोर नाही, महाराज! हा आपल्या दरबारी ज्योतिष्याचा मुलगा आहे!"

लगेच राजू म्हणाला–"मी नाही चोराला धरलं रामजीनेच धरलं." राजाने राजूला वीस फटके शिक्षा द्यायला व रामजीला शंभर मोहोरा द्यायला हुकूम केला.






हरिश्चंद्राची बायको रडू लागली. तिला हे कळेना की ब्राह्मणांना अपार दान करणारा, सत्यवान म्हणून नांवलौकिक असणारा आणि सर्वांकडून इंद्र व विष्णू-सारखा मान मिळविणारा राजा हरिश्चंद्र एकाएकी सर्व घालवून कसा बसला. शैब्या पुन्हांपुन्हां तो विचार करून रडू लागली आणि शेवटी बेशुद्ध होऊन पडली.

इकडे आईबाप बेशुद्ध होऊन पडले होते आणि तिकडे भुकेने रोहिताचा जीव कासा-वीस होत होता. काही खायला मिळाले तरच जीव वांचणार. तो रडू लागला व आईवडिलांजवळ काहीतरी खायला द्यायला मागू लागला. त्याच वेळी विश्वामित्र ऋषी यमराजासारखे आले आणि हरिश्चंद्राच्या तोंडावर पाणी शिपडून रौद्ररूप धारण करून म्हणाले–"तू आपल्या वचनाचे पालन करणार असशील तर माझी दक्षिणा देऊन टाक. सूर्यास्तापूर्वी जर तू माझी दक्षिणा दिली नाहीस तर मी तुला शाप देईन."

विश्वामित्र अशी धमकी देऊन निघून गेला. त्यानंतर थोड्याच वेळाने एक वेदपरायण ब्राह्मण तिकडे आला. त्या ब्राह्मणाला पाहून शैब्या हरिश्चंद्राला म्हणाली–"हा ब्राह्मण कित्येक लोकांबरो-बर येत आहे. हा श्रीमंत असावा. राजा तीन वर्णीयांना पित्यासारखा असतो. म्हणून आपल्याच मुलांकडून धन घेतल्यास काही दोष लागणार नाही.



तेव्हां हरिश्चंद्र म्हणाला–"मी क्षत्रिय आहे. इतरांसमोर याचनेसाठी मी हाथ कसा पसरूं? दान घेण्याचा अधिकार फक्त ब्राह्मणाला असतो. ब्राह्मणच इतर सर्व वर्णीयांना गुरुसमान असतो. गुरूजवळ याचना कशी करू?"

"कालमानाप्रमाणे योग आला की भोग सुटत नाही. मान, अपमान, दान देणे व घेणे हा भेद मानला जात नाही. नाहीतर धर्माचं रक्षण करणारा ब्राह्मण अन्याय करायला धजला असता का?" राणीने विचारले.

हरिश्चंद्राला राग आवरला नाही. तो म्हणाला–"देवी, मी आपली जीभ कापून टाकीन, परंतु इतरासमोर हात पसरून "देही!" म्हणून मागणार नाही. त्रिशंकूच्या मुलाने असे दैन्य दाखवावे, म्हणतेस? मला शक्य झालं तर मनगटाच्या बळावर मी धन संपादन करीन. परंतु याचना करून धन ग्रहण करणार नाही."

"याचना करण्यास हरकत वाटत असेल तर मला विकून आपण आपली कीर्ती व यश राखावं! पत्नीला विकलं काय, सिंहासनावर बसविले काय, किंवा उतरविलं काय, पत्नी नावाची एक वस्तूच तर आहे!" शैब्या म्हणाली. ते बोलणे हरिश्चंद्राला अनावर दुःख होण्यास कारण झाले.

शैब्या, हरिश्चंद्राचं सांत्वन करीत म्हणाली–"तुम्ही जुगार खेळण्यासाठी, दारू पिण्यासाठी किंवा अशाच इतर कामासाठी पत्नीला विकत नसून सत्य रक्षणार्थ दिलेल्या वचनाचे पालन करण्यासाठी विकीत आहां, तर त्यांत दोष तो कोणता?" अशी अनेक प्रमाणे देऊन तिने हरिश्चंद्राला समजावून सांगितले.

तेव्हां हरिश्चंद्र तिला म्हणाला–"ठीक, तू म्हणतेस तसे करण्याची इच्छा नसूनही मी ते करण्यास तयार आहे. पूर्वी कधी असलं नीच कृत्य कोणी केले असेल का? आपल्या बायकोला विकणारा महापापी आजपर्यंत या जगात कधी जन्माला आला असेल का? मीच तो प्रथम दुर्दैवी आहे!"

त्यानंतर हरिश्चंद्राने आपल्या बायकोला एका जागी उभे केले आणि रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्याकडे पाहून गद्गद् स्वरात म्हणाला–"दयाळू नागरिक हो! ही माझी बायको आहे. कोणी हिला विकत घेण्यास तयार असेल तर योग्य किंमत देणाऱ्याने पुढे यावे!"

थोड्या वेळाने हरिश्चंद्राच्या चारही बाजूला लोकांची गर्दी जमा झाली. कित्येकांनी त्याला विचारले की बायकोला विकण्यापर्यंत प्रसंग कसा काय आला?

हरिश्चंद्राने त्यांना या शब्दांत सर्व परिस्थिती समजावून सांगितली–"सज्जन हो! मी एक पापी आहे. माझं नाव घेतलं तर तुम्हांला पाप लागेल. अशा माणसाची ओळख करून घेण्याची तुम्हांला गरजच का पडावी? तुम्ही या बाईची तुम्हांला योग्य किंमत वाटेल ती देऊन हिला घेऊन जा."

त्याच वेळी विश्वामित्र एका ब्राह्मणाच्या रूपे प्रगट होऊन म्हणाला–"माझ्याजवळ पुष्कळ धन आहे. माझी बायको शरिराने फार नाजुक आहे. तिला घरातली कामे होत नाहीत. तू मागशील तेवढे धन मी द्यायला तयार आहे. तू खरोखरच आपल्या बायकोला विकायला तयार आहेस का?"



हरिश्चंद्राला त्याचे उत्तर न देत असलेला पाहून विश्वामित्र पुन्हां म्हणाला–"शास्त्रांप्रमाणे बत्तीस लक्षणे असलेल्या स्त्रीची किंमत एक कोटी स्वर्णमुद्रा असते व पुरुषाची किंमत अब्ज स्वर्णमुद्रा असते. तर मी तेवढी रक्कम देऊन तुझ्या बायकोला विकत घ्यायला तयार आहे."

तरी हरिश्चंद्र काही बोलला नाही.

तेव्हां मात्र ब्राह्मणरूपधारी विश्वामित्राला राग आला. त्याने हरिश्चंद्रासमोर एक मोठी धनराशी ओतली व शैब्याला म्हणाला–"आतां तू माझी दासी झालीस, चल माझ्याबरोबर." असे म्हणत असता विश्वामित्राने तिचे केस धरून तिला फरा-



फरा ओढत नेले. तिला बळबरीने ओढून नेणाऱ्या ब्राह्मणाला राणी म्हणाली–"अहो, मला सोडा. मी आपल्या मुलाला सोडून एकटी जायला तयार नाही. मी पतिव्रता आहे. माझ्या अंगाला हात लावू नका."

तेव्हां रोहितसुद्धा 'आई, आई!' असा ओरडत आईला घट्ट मिठी मारून उभा राहिला. ब्राह्मणाने त्याला दोन थोबाडीत दिल्या व म्हणाला–"तू हो बाजूला!"

ते दृश्य पाहून शैव्या म्हणाली–"अहो, तुम्ही माझ्यावरोबर माझ्या मुलालासुद्धा विकत घ्या. तो माझा एकुलता एक मुलगा आहे मी त्याला दूर ठेवून तुमच्या घरातली कामं मन लावून करू शकणार नाही."

ब्राह्मणाने त्या विनंतीस मान दिला. रोहित पुरुष होता म्हणून त्याची किंमत एक अब्ज स्वर्णमुद्रा देऊन त्या मायलेकांना आपल्याबरोबर चलायला सांगितले.

त्या साध्वीने पतीला प्रदक्षिणा घालून त्याला नमस्कार केला व रडत म्हणाली–"देवा! मी किती जन्म घेतले तरी हेच माझे पती राहोत!"

हरिश्चंद्र विचार करू लागला की राजवाड्यात राहणारी राणी आपल्या गैरहजेरीत पुढले कष्ट कसे सहन करील? त्याला याही गोष्टीचे अपार दुःख वाटले की त्याचा मुलगा त्याच्यापासून आतां वेगळा होणार. त्याला राज्यत्याग करण्यापेक्षा पुत्रत्यागाचे दुःख असह्य वाटले.

ब्राह्मण त्याने खरेदी केलेल्या दासांना निर्दयपणे मारीत घेऊन चालला होता. ते दृश्य पाहूनही हरिश्चंद्र तोंडावाटे एक 'ब्र'ही काढू शकला नाही. त्या दुःखात आणखी डागण्या देण्यासाठीच की काय विश्वामित्र स्वस्वरूपात आपल्या शिष्यासह येऊन म्हणाला–"तू खोटे बोलणार नसशील तर मला माझी दक्षिणा देऊन टाक!"

हरिश्चंद्राने राणीला व राजपुत्राला विकून जे धन मिळाले होते ते विश्वामित्राला दिले. पण विश्वामित्र म्हणाला–"हे धन माझी दक्षिणा पुरी होण्यास पुरेसे नाही. मी तुला आज संध्याकाळपर्यंतचा अवधी देतो." असे सांगून विश्वामित्र निघून गेला.

त्यानंतर हरिश्चंद्र स्वतःला विकायला तयार झाला. इतक्यात एक विकृत रूप असलेला चांडाळ येत असलेला दिसला. तो हरिश्चंद्राला म्हणाला–"माझं नाव प्रवीर आहे. मी चांडाळ आहे. माझ्याजवळ कामाला रहायला तू तयार आहेस का? मढ्यांवरची कापडं काढून घ्यायचे काम तुला करावे लागेल."

हरिश्चंद्र म्हणाला–"मी फक्त ब्राह्मणाच्या किंवा क्षत्रियाच्या हाती स्वतःला विकायला तयार आहे."

"तू स्वतःला विकण्याचेच फक्त जाहीर केले होतेस. आतां तू आपलेच वचन मोडतो आहेस. खोटं बोलणाऱ्याला स्वतःची सुटका करून घ्यायला कित्येक पळवाटा सापडतात." चांडाळ म्हणाला.

चांडाळाने हरिश्चंद्राला शब्दात पकडले होते. खोटे बोलणारा म्हणविण्यापेक्षा एका चांडाळाच्या हाती विकून घेणे श्रेयस्कर आहे. तितक्यात विश्वामित्र आपले कर्ज वसूल करण्यासाठी तेथे आला. आतां हरिश्चंद्राला स्वतःला चांडाळाच्या हाती विकून घेण्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. तेव्हां हरिश्चंद्र विश्वामित्राचे पाय धरून म्हणाला–"ऋषिवर्य! मी इतर कोणाच्या



हाती स्वतःला विकण्यापेक्षा आपणच मला विकत कां घेत नाही? आपण मला उरलेल्या रकमेबद्दल विकत घ्यावे. मी आपण सांगाल ते काम करीन."

"असं!" असे म्हणत विश्वामित्र चांडाळाला म्हणाला–"हा माणूस माझा गुलाम झाला आहे. परंतु मला याची गरज नाही. मला पाहिजे आहे धन. तू याला विकत घे." तेव्हां चांडाळ प्रवीरने विश्वामित्राला सहस्रावधी अमूल्य रत्ने, मोती व पुष्कळसे सोने देऊन हरिश्चंद्राला विकत घेतले.

चांडाळाला वाटले की हरिश्चंद्र पळून जाईल. म्हणून त्याला दोरीने बांधून आपल्याबरोबर घेऊन निघाला. चार दिवस



हरिश्चंद्राला बांधूनच ठेवले. त्यानंतर त्याला सोडले व मढ्यांवरची कापडे काढून घेण्याच्या कामावर नेमले.

शहराच्या दक्षिण दिशेला स्मशान होते. हरिश्चंद्र तेथे गेला. जी प्रेते येत त्यांच्या चितेला अग्नी देण्यापूर्वी कर वसूल करायचा व प्रेतावरचे कापड काढून घ्यायचे ही कामे हरिश्चंद्राला करावी लागत.

काही दिवस लोटले. रोहित त्याच्या मालकासाठी समिधा आणायला गेला. एका वारुळावर चढून तो समिधा काढू लागला. त्याचवेळी त्याला एक साप चावला आणि तो बेशुद्ध होऊन पडला. नंतर मरण पावला. ती बातमी त्याच्या आईला कळली. ती हंबरडा फोडून रडू लागली. तेव्हां तिचा मालक तिच्यावर ओरडला–"मी इतके पैसे खर्च करून तुला विकत घेतले ते तू रडत वेळ घालवावे आणि जमिनीवर लोळावे यासाठी नाही, लक्षात ठेव!"

ते सर्व शैब्याला कळलेच नाही. ती आणखी जोरजोराने रडू लागली. परंतु त्या ब्राह्मणाने मध्यरात्र होईपर्यंत तिच्याकडून कामे करवून घेऊन नंतर तिला आपल्या मुलाला पहायला जायला परवानगी दिली. शैब्या निघाली तेव्हां तो पुन्हा म्हणाला– "तू उजाडण्यापूर्वी आपल्या मुलाचे प्रेत जाळून परत आले पाहिजेस!"

मध्यरात्री ती आपल्या मुलाच्या शोधार्थ निघाली. त्याचे प्रेत पाहून ती रडू लागली. त्याच वेळी तेथे काही चांडाळ आले ते तिला व तिच्या मुलाच्या प्रेताला पाहून म्हणाले– "ही कोणी मुलांना मारून खाणारी डंखीण दिसते आहे." नंतर ते तिचे केस धरून तिला ओढीत स्मशानात चांडाळ प्रवीर होता तेथे घेऊन गेले व त्याला म्हणाले– "या डंखिणीला ठार कर." प्रवीरने हरिश्चंद्राला हाक मारून त्याला तलवार दिली व तिचा वध करायला सांगितले.

हरिश्चंद्राने आपल्या बायकोला ओळखले नाही. तो म्हणाला–"देवी, मी तुझा शिरच्छेद करीत आहे!"

शैव्या पतीला न ओळखून म्हणाली– "अहो, माझा मुलगा मेला आहे, त्याच्या प्रेताला अग्नी देईपर्यंत मला सवड द्या."

धार्मिक वृत्तीच्या हरिश्चंद्राने त्या गोष्टीस होकार दिला.

शैव्या आपल्या मुलाचे प्रेत घेऊन आली आणि ते समोर ठेवून शोक करू लागली. हरिश्चंद्राने धर्मपालनार्थ प्रेतावरचे कापड ओढून घेतले.

परंतु हळूहळू हरिश्चंद्राला ती बाई त्याची बायकोच असल्याचे लक्षात आले. म्हणजे तिचा मृत पुत्र म्हणजे रोहितच असल्याचे त्याला कळले व तो पुत्रशोक आवरू शकला नाही व रडू लागला. तेव्हां चांडाळाचा नोकरच तिचा पती असल्याचे शैव्याच्या लक्षात आले. दोघांवर केवढा मोठा प्रसंग गुजरला आहे, याची दोघांना तेव्हां कल्पना आली. हरिश्चंद्राने मुलाच्या प्रेताला मिठी मारली व बेशुद्ध झाला.

त्यानंतर हरिश्चंद्र शुद्धीवर आल्याबरोबर शैव्याने आपले दुःख आवरून हरिश्चंद्राला आपला धर्म पालन करण्यास आग्रह केला. म्हणाली–"आपल्या मालकाच्या आज्ञेप्रमाणे माझा शिरच्छेद करावा!" परंतु हरिश्चंद्राला त्याच्या जीविताचा वीट आला. तो सपत्नीक मुलाच्या चितेत उडी टाकून आत्महत्या करून घ्यायला तयार झाला.

हरिश्चंद्राने चिता रचून तिच्यावर मुलाचा देह ठेवला. त्यानंतर पतिपत्नी देवीचे स्मरण करून चितेला अग्नी द्यायला सरसावले. तत्काळ ब्रह्मदेवादि इंद्राबरोबर प्रगट झाले आणि त्यांनी रोहितावर अमृताचे प्रोक्षण केले. रोहित पुनर्जीवित होऊन उठून बसला. ब्रह्मदेवाने हरिश्चंद्राला स्वर्गलोकी यायला निमंत्रण दिले. यमराज हरिश्चंद्राला म्हणाला– "मीच चांडाळाचे रूप घेऊन तुझी परीक्षा घेतली."

त्यानंतर हरिश्चंद्राने रोहिताचा राज्याभिषेक केला व तो पत्नीसमवेत इंद्राबरोबर स्वर्गलोकी गेला. (समाप्त)





# शेरास सव्वाशेर

सदोबा एक गरीब गृहस्थ होता. मुलीचं लग्न ठरलं. त्याने कुटुंबाचा खर्च कापून काही पैसे वांचविले होते, ते घेऊन तो शहरात मुलीसाठी दागिने विकत घ्यायला निघाला. लखूशेटच्या दुकानात त्याने एक दागिना विकत घेतला. तो इतर दुकानांपेक्षा त्याला स्वस्त मिळाला.

सदोबा आपल्या जुन्या फाटक्या कपड्यात तो दागिना लपवून ठेवून आपल्या गावी निघाला. वाटेत तीन चोरांनी त्याला विचारले–"तू काय लपविले आहेस? मुकाट्याने काढतोस की तुझे डोके फोडू!"

सदोबा चकित होऊन म्हणाला– "बाबांनो! माझ्यासारख्या भिकाऱ्याकडे असणारच काय? मला सोडा!"

एकाने सदोबाच्या खांद्यावर काठी ठेवली व विचारले–"तू आपल्या कपड्यात जो दागिना लपवून ठेवला आहेस, तो बाहेर काढतोस की हाणू?"

सदोबाच्या अंगाला घाम सुटला. या लोकांना माझ्याजवळ दागिना असल्याचे कळलेच कसे? तो विचार करू लागला.

सदोबाने नाइलाज झाल्याने तो दागिना काढून चोरांना दिला. चोर दागिना घेऊन पसार झाले.

दागिना गेला खरा, पण सदोबाच्या डोक्यात विद्युत्वेगाने विचारांचे थैमान सुरू झाले. आपल्या फाटक्या कपड्यातल्या दागिन्याची गोष्ट या चोरांना कळलीच कशी? एका लखूशेटच्या दुकानात पाहिल्याचे सदोबाला आठवले.

ते आठवताच सदोबा पुन्हा शहराकडे परतला. तो दुकानात गेला तेव्हां त्याला ते तिघे चोर दुकानाबाहेर उभे असलेले दिसले. त्याच्या मनात विचार आला की



ओरडून लोकांना जमा करावे. परंतु लगेच दुसरा विचार आला की लोक जमले तरी आपल्या सारख्या फाटक्याच्या बोलण्यावर कोण विश्वास करणार? चोरीची गोष्ट सिद्ध कशी करावयाची?

सदोबाच्या हातातून दागिना काढून घेणारा चोर दुकानाच्या आतल्या बाजूला गेला. तो काही पैसे घेऊन बाहेर आला व तिघां चोरांनी ते पैसे वांटूनही घेतले.

ते पाहून सदोबाच्या सर्वांगाचा भडका उडाला. त्याने विचार केला. 'कदाचित् हा लखूशेटच या चोरांच्या मदतीने गरीब गिऱ्हाइकांना लुटीत तर नाही? याच्या दुकानातदागिने इतके स्वस्त कां? ही गोष्ट अधिकाऱ्यांच्या कानावर घातली तरी लखूशेट अधिकाऱ्यांना पैसे चारून आपली सुटका करून घेईल. तेव्हां अशा भामट्याला चोरीच्या मालासकट पकडविणे आवश्यक आहे. तो संधीची वाट पहात दुकानाजवळच बसून राहिला. त्याच वेळी त्याने त्याच्याच सारख्या एका गरीब शेतकऱ्याला त्या दुकानात पाऊल टाकताना पाहिले. नंतर तो इतर लोकांबरोबर दुकानात शिरला व कायकाय होत आहे हे पहात राहिला.

लखुशेट त्या शेतकऱ्याला एक दागिना विकत घेत असतां विचारीत होता—"अहो, तुम्ही कोठले हो राहणारे? लगेच परतणार वाटतं? पायी इतक्या दूरचा प्रवास कर-णार तर?" या शब्दात खोटी सहानुभूती दर्शवीत दुकानदाराने तो शेतकरी कोणत्या गावी जाणार आहे हे काढून घेतले होते.

शेतकरी दुकानातून बाहेर पडला आणि एका गल्लीत शिरला. सदोबाला लुटणारे तिघे चोर थोडे अंतर त्याच्या पाठोपाठ निघाले व झपाझप पावले टाकीत गावाबाहेर त्या शेतकऱ्याच्या वाटेवर जाऊनलपून बसले.

संधी पाहून सदोबा त्या शेतकऱ्याला एका दुसऱ्या गल्लीत बोलावून घेऊन गेला. त्याने थोडक्यात आपली ओळख सांगून त्याच्या चोरी गेलेल्या दागिन्याची गोष्ट सुद्धा सांगितली.

[illegible] नातेवाईक सदोबाच्या गावात रहात होते.

नंतर सदोबाने त्या शेतकऱ्याला सर्व गोष्टी समजावून सांगितल्या. म्हणाला—"हे पहा, दादा! तुमचा दागिना त्या दुकानदाराचे नोकर लुटून नेणार. तुम्ही त्याच्या जागी एक खोटा दागिना ठेवा व तो चोरांना चोरून नेऊ द्या. तुमचा खरा दागिना कोठेतरी लपवून ठेवा. मी त्या चोरांची खोड मोडतो."

"खरा दागिना तु आपल्या जवळ ठेवून घे. चोरांना धरल्यानंतर तो मी तुझ्या-कडून घेईन." असे सांगून त्या शेतकऱ्याने खरा दागिना सदोबाजवळ ठेवून दिला. नंतर स्वस्तात एक खोटा दागिना विकत [illegible] आपल्या गावाकडे निघाला. त्यानंतर सदोबा लखूशेटच्या दुकानात गेला व रडक्या स्वरात म्हणाला—"शेटजी, मी तुमच्या दुकानात जो दागिना विकत घेतला होता त्याच्या बरोबर आमच्या गावच्या एका मित्रासाठी मी हिऱ्यांचा एक हारही विकत घेतला होता. ते दोन्ही दागिने वाटेत तिघां चोरांनी लुटले हो! आतां मी आपल्या गावी जाऊन आपल्या मित्राला तोंड कसे दाखवू? मी त्या तिघां चोरांपैकी एकाला आपल्या दुकानात पाहिले आहे. तुम्हांला त्याच्याविषयी काही माहिती असेल असे समजून मी आपल्याकडे धावत आलो आहे."लखूशेट मनातल्या मनात दचकला की चोरांनी हिऱ्यांच्या हाराची



गोष्ट त्याच्यापासून लपवून कां ठेवली? लखूशेट आपला राग आवरण्याच्या प्रयत्नात असतां सदोबा मध्येच म्हणाला– "शेटजी, आणखी एक गोष्ट. हे लोक चांगले दागिने विकून त्यांच्या जागी नकली दागिने करण्याचा धंदा करीत आहेत."

"तू ज्या लोकांविषयी हे सर्व बोललास त्यांच्याविषयी मला काही एक माहीत नाही." अशी बतावणी करून लखूशेटने सदोबाला निरोप दिला आणि तो चोरांची वाट पहात बसला.

थोड्या वेळाने चोर शेतकऱ्याच्या हातातून लुटून आणलेला नकली दागिना घेऊन आले आणि त्यांनी तो लखूशेटच्या हातात दिला. लखूशेटने तो कसोटीवर कसून खोटा असल्याची खात्री करून घेतली.

लखूशेटने संतापून तिघां चोरांना विचारले–"खरा दागिना कोठे गेला?"

चोरांचे चेहेरे फिक्के पडले. त्यानंतर लखूशेटने पुन्हां दरडावून विचारले–"तुम्ही यापूर्वी आणखी एकाकडून हिऱ्याचा हार काढून घेतला होतात तो कोठे आहे? तो मला आणून दिला असतात तर मी त्यांची बरोबर किंमत दिली नसती का?"

"काय म्हणालात? हिऱ्यांचा हार?" चोर चकित होऊन लखूशेटकडे पाहू लागले.

त्याच वेळी सदोबा न्यायाधिकारी व शिपायांबरोबर दुकानात आला. तोपर्यंत गल्लीत वाट पहात उभा राहिलेला शेतकरीसुद्धा दुकानात आला.

चोरांना अटक झाली. सदोबाने शेतकऱ्याला त्याचा दागिना देऊन टाकला. न्यायाधिकाऱ्याला शेतकऱ्याने त्याच्या हातातून चोरांनी खोटा दागिना कसा चोरला हे सांगितले. तो नकली दागिना त्यावेळी लखूशेटच्या हातातच होता.

सदोबाला त्याचा दागिना परत मिळाला, त्याचबरोबर चोरांना पकडून देण्यात त्याने जे चातुर्य दाखविले त्याबद्दल बक्षिस म्हणून त्या दागिन्याची किंमतसुद्धा मिळाली.

त्यानंतर चोरांना व लखूशेटला शिपाई धरून घेऊन गेले.



# अनुभव

मेवाड राज्यात एक जुना रिवाज होता. राजाच्या वडिलांच्या किंवा आजाच्या वार्षिक श्राद्धाच्या दिवशी राज्यातल्या कोणत्यातरी कुटुंबातल्या एका व्यक्तीला राजा होण्याची संधी दिली जात असे.

एका वर्षी हे सौभाग्य एका शेतकऱ्याच्या कुटुंबाला लाभले. त्या कुटुंबात तो शेतकरी, त्याची बायको व त्याचा मुलगा जयराम तिघे जण होते. तिघांपैकी कोणा एकाला त्या दिवशी राजपद मिळणार होते. परंतु शेतकऱ्याने त्या संधीचा स्वतःच फायदा घ्यायचे ठरविले, म्हणून त्याची बायको व मुलाला ती संधी मिळाली नाही.

दुसऱ्या वर्षीसुद्धा संयोगवश त्याच कुटुंबातल्यांना ती संधी मिळाली. शेतकऱ्याच्या बायकोने संधीचा फायदा घेतला. जयरामच्या मनातली इच्छा अपूर्णच राहिली.

वीस वर्षे लोटली. जयरामचे लग्न होऊन त्याला एक वयात आलेला मुलगाही होता. अचानक राजा व्हायची संधी जयरामच्या कुटुंबालाच मिळाली. जयराम पागोटे घालून चांगला पोशाख वगैरे करून राजा व्हायला घरातून निघाला.

परंतु दोनच मिनिटांनी तो परतला व पोशाख व पागोटे काढू लागला. बायकोने त्याला विचारले–"हे काय हो?" जयराम लगेच म्हणाला–"यावेळेस मुलाला पाठवू या!"






**श्रीकंठ माधवराव**

प्र. : विश्वास व विज्ञान यांचा परस्पर संबंध समजावून सांगा. विश्वास कोणत्या संदर्भात विज्ञानापलीकडे जातो?

उ. : मनुष्य कोणत्याही कार्यास सुरवात करतो तेव्हां त्याचा त्यावर एक तऱ्हेचा पूर्ण विश्वास असतो. उजाडल्यापासूनच माणसाच्या अनेक गरजांना सुरवात होते. त्याला दूध पाहिजे, भाजी-पाला पाहिजे, मीठमसाला, तांदूळ, डाळ, गहू पाहिजे. आजारी पडल्यावर डॉक्टर पाहिजे. मुलांच्या शिक्षणासाठी चांगली शाळा पाहिजे. आपण या विश्वासावर आयुष्य चालवीत असतो की दुधातेलात काही मिसळ नसेल, तांदुळात खडे नसतील, डॉक्टर बरोबर औषध देतील, भेसळ औषधे नसतील. परंतु आपला हा विश्वास नेहमी खरा ठरतो असे नाही. पैसे खर्चून आपण तूप आणतो आणि त्याला दुसऱ्या दिवसापासून वास यायला लागतो. शाळेत चांगले शिकवीत नाहीत-तेव्हां आपण इतरांना त्यांच्या अनुभवावरून कोणत्या दुकानात चांगले सामान मिळते, कोणता डॉक्टर चांगला आहे, कोणती शाळा चांगली आहे इत्यादी गोष्टी विचारून त्यांच्यावर विश्वास करून त्या-प्रमाणे करतो. आपल्या एकट्याच्या विश्वासापेक्षा चार चौघांचा विश्वास जास्त उपयोगी पडतो.

अशा प्रकारे जो विश्वास कित्येक वेळी खरा ठरतो तोच विज्ञानाच्या कक्षेत पोचतो. कित्येक वेळी जेव्हां विशिष्ट खाद्यपदार्थात पोषक द्रव्ये जास्त असल्याचे व ते शरीरस्वास्थ्याला उपयोगी असल्याचे सिद्ध होते.तेव्हां तो अनुभव विज्ञानात सामील होतो. याचप्रमाणे काही रोगांना काही विशिष्ट औषधे घेणे आवश्यक होते. विशिष्ट पिकांना विशेष प्रकारची रसायने आवश्यक असतात. अशातऱ्हेने हळूहळू अनुभव वाढत जातो. अंधविश्वासाच्या जागी विज्ञानाला जागा देणे यालाच प्रगती म्हणतात. विज्ञानाविरुद्ध अंधविश्वासांना थारा देणे खुळेपणा आहे. परंतु मानवांच्या गरजांप्रमाणे विज्ञान प्राप्त होत नसते. तेव्हां माणसाला विश्वासावर चालावे लागते. उदाहरणार्थ देशाचे हित ज्यावर अवलंबून आहे त्या निवडणुकात विज्ञान निरुपयोगी होते. म्हणून आपल्याला विश्वासाप्रमाणे चालावे लागते.



**गो**पाळपूरचा जमिनदार रत्नाकर एकदा आपल्या शेताची पाहाणी करायला गेला. रामजी नावाचा एक शेतकरी ते शेत खंडावर करीत असे. त्या शेतातले पीक रामजी आपल्या घरातच कोठारात साठवून ठेवीत असे.

रामजीच्या घराशेजारीच एका घरात जमिनदार उतरला होता. म्हणून रामजीच्या मुलीने जमिनदारासाठी सुद्धा सैंपाक केला होता. जमिनदार जेवायला बसला व रामजीची मुलगी शांती वाढायला आली. तिला पाहून जमिनदाराचे डोळेच फिरले. शांती दिसायला सुंदर होती व तिचं लग्न झालेलं नव्हते. जमिनदाराने रामजीच्या मुलीला मागणी घातली व लग्न त्याच्याशी करून द्यायला सांगितले.

रामजी थक्कच झाला. कारण जमिन-दाराचे लग्न झालेले होते व त्याला दोन मुलेसुद्धा होती. रामजी म्हणाला—"मालक, तुम्ही काय म्हणता आहां, मला नाही कळले?"

"यांत न समजण्यासारखे काय आहे? मी शांतीला दुसरी बायको म्हणून घरात आणणार आहे." जमिनदार म्हणाला

"मी गरीब आहे, म्हणून आपण हे बोललात, पण हे बरोबर नाही! मेहरबानी करून पुन्हां असे बोलू नका." रामजी थोडा रागानेच म्हणाला.

परंतु ती गोष्ट जमिनदाराला अप-मानास्पद वाटली. त्याला वाटत होते की त्याच्याबरोबर दुसरी बायको म्हणून रहा-यला कोण्या स्त्रीला हरकत असण्याचे कारणच काय? रामजीला गर्व चढलेला दिसतो आहे. असा विचार करून त्याने संधी पाहून एके दिवशी शांतीलाच सरळ जाऊन विचारले. शांती तर घाबरूनच



गेली. रत्नाकर शांतीचा हातच धरायला जाणार तितक्यात एका तरुणाने "शांता!" म्हणून हाक मारली.

"माधव, तू केव्हां आलास रे?" शांतीने विचारले.

रत्नाकर प्रश्नार्थक दृष्टीने शांतीकडे पाहू लागला. तेव्हां शांती म्हणाली–"हे आमच्या नात्यातले आहेत. यांचे नाव माधव आहे. शहरात कॉलेजात शिकत आहेत. परंतु राहणारे या गावचेच आहेत!"

त्यानंतर रत्नाकर माधवकडे करड्या नजरेने पहात निघून गेला.

शांतीचे माधवशी लग्न ठरले होते. माधवची चांगली वागणूक वगैरे पाहून रामजीने त्याच्याशीच शांतीचे लग्न करून द्यायचे ठरवून त्याच्या आईवडिलांशी बोलणी केली होती.

त्याच दिवशी संध्याकाळी दिवे लागल्यावर रत्नाकर संधी पाहून पुन्हां शांतीला भेटला व त्याच्याशी लग्न करून घ्यायला आग्रह करू लागला. परंतु शांती समोरून निसटून पळून गेली. रत्नाकर चिडला व दिव्याला लाथाडून शांतीच्या घरातून बाहेर निघून गेला. दिव्यातले तेल घरभर पसरले आणि घराला आग लागली. शेजारपाजारच्या लोकांनी येऊन आग विझविली.

ती गोष्ट शांतीने रामजीला व माधवला सांगितली.

तिकडे रत्नाकरने गांवातल्या पंचांना बोलाविले. त्याने, रामजीने आपल्या घरात शेतावरचे पीक जाळून मोठे नुकसान केल्याचा रामजीवर आरोप लावला.

पंचांनी आश्चर्यचकित होऊन उलट विचारले–"अहो, जमिनदार साहेब! तुमच्या पिकाबरोबर रामजीचे घर जळलं नाही का? तुम्ही आपलं पीक मागितलंत तर तो बिचारा कोठून देणार? म्हणून तुम्ही आपली फिर्याद मागे घ्यावी!"

"मी आपलं पीक कां सोडीन? माझं पीक काढून मला द्यायची जबाबदारी [illegible] आहे, [illegible] रत्नाकरने उलटा प्रश्न विचारला.

पंचांनी नाइलाजाने रामजीला बोलाविले. रामजी पंचांसमोर जाण्यापूर्वी शांतीचा हात माधवच्या हातात देत म्हणाला–"बाबा रे! शांतीचा हात धरण्याच्या हेतूने रत्नाकरने हा डाव टाकला आहे. माझं काय वाटेल ते नुकसान झालं तरी मी शांतीला विहीरीत लोटणार नाही. तिच्या रक्षणाची जबाबदारी आतां तुझ्यावर सोडतो!"

"मामा, तुम्ही जा, पंचांना खरं काय ते सांगा, आम्ही येतोच तुमच्या पाठोपाठ!" माधव म्हणाला.

"तसं नव्हे रे बाबा! ज्या लाकडात अग्नी असतो तेच लाकूड जळते!" असे सांगून रामजी निघून गेला.

रामजी म्हणाला ते ऐकून माधवच्या मनात एक विचार आला. तो कॉलेजात रसायन शास्त्राचा विद्यार्थी होता. रसायनशास्त्रातील एका प्रयोगाने रामजीला वांचविता येईल, असा तो विचार होता. लगेच त्याने त्या प्रयोगासाठी लागणारी सामुग्री जमविली आणि शांतीला बरोबर घेऊन पंच बसले होते तेथे गेला.

रत्नाकर त्यांना सांगत होता–"रामजी आपल्या मुलीचं लग्न माझ्याशी करून द्यायला तयार असेल तर मी आपली फिर्याद मागे घ्यायला तयार आहे."

माधवने पंचांना नमस्कार केला व नम्रपणे म्हणाला–"पंच हो! आपण कृपा करून शांतीला काय म्हणावयाचे आहे ते सुद्धा ऐकून घ्यावे!"

शांतीने अथपासून इतिपर्यंत सर्व गोष्टी उघडपणे सांगितल्या. परंतु रत्नाकरने ते सर्व खोटे असल्याचे सांगितले व उलट आरोप लावला–"माझ्या शेतातलं पीक कोठे तरी लपवून ठेवून घर व घरातले पीक जळून गेल्याचे सोंग करता यावे यासाठी शांतीनेच किंवा रामजीने घराला आग लावली असावी."



परंतु माधव म्हणाला–"पंचहो! अशा तऱ्हेने खोटेखरे कळणार नाही. आपण खरे की खोटे देवालाच विचारू या. आपण रामजी, शांता व रत्नाकर जमिनदार तिघांच्या नावाच्या चिठ्ठ्या तयार करून त्यांच्यावर देवावरचा अभिषेक करून त्याचे तीर्थ शिपडून पाहू या. तेव्हां अपराधी कोण ह्या गोष्टीचा देवच कौल देईल!"

अशा प्रयोगाने खरंखोटं कळण्यावर कोणाचाच विश्वास नव्हता. परंतु तो प्रयोग करून पाहण्यात कोणाला हरकत दिसली नाही. असले प्रयोग कधी यशस्वी होणेच शक्य नाही व अपराध सिद्ध होणार नाही. या विश्वासावर रत्नाकरने प्रयोग करून पाहण्यास त्याची हरकत नसल्याचे सांगितले.

माधव देवळात गेला व अभिषेक केलेले तीर्थ घेऊन आला. त्यानंतर त्याने तीन कागदांवर तिघांची नावे लिहिली. पंचांनी अभिषेकाचे पाणी तिन्ही कागदांवर शिपडले आणि आश्चर्याची गोष्ट म्हणजे जमिनदाराचे नाव ज्या कागदावर होते, नेमका तोच कागद जळून गेला.

ते पाहून सर्व आश्चर्यचकित होऊन जमिनदाराकडे पाहू लागले. रत्नाकरने घाबरून जाऊन आपली चूक मान्य केली. पंचांनी त्याच्याकडून रामजीला नुकसान भरपाई देवविली. रामजीने ते पैसे खर्च करून शांतीचे लग्न माधवशी करून दिले.

त्यानंतर शांतीने नवऱ्याला एकांतात विचारले–"माधव, जमिनदाराच्या नांवाचा कागदच कसा काय जळला? तुम्ही कोणता प्रयोग केला होतात?"

"साखर आणि पोटॅश क्षार मिसळून त्याचा लेप एका कागदावर लावून ठेवला आणि त्या कागदावर जमिनदाराचे नाव लिहिले. अभिषेकाच्या पाण्यात सल्फरिक ॲसिड घालून ठेवले होते. ते ॲसिड लेप लावलेल्या कागदावर पडतांच तो कागद जळला. बाकी दोन्ही कागद साधेच होते. म्हणून ते जळले नाहीत." माधव म्हणाला.






[ ९ ]

[चतुराक्ष व समरसेन दोघे बोलत असतां झाडीच्या आडून पहात असलेल्या रानटी लोकांचा काळे घुबड व वनमाणूस पाठलाग करायला धावले. समरसेनाने चतुराक्षाला धनराशींनी भरलेल्या नावेसंबंधी व तिचे रक्षण करणाऱ्या नागकन्येविषयी विचारले. चतुराक्षाने शाक्तेयाजवळ चंडीदेवीने प्रगट केलेल्या इच्छेविषयी सांगितले. पुढे–]

शामन द्वीपाचा राजा शाक्तेय याच्याविषयी चतुराक्षाने सांगितले ते ऐकून समरसेन आश्चर्यचकित झाला. चंडीदेवीने तिचे देवालय दगडामातीऐवजी सोन्याचांदीचे बांधायला सांगितले. एखादे देऊळ सोन्या-चांदीचे बांधायचे झाले तर ते काम कोणत्याही मानवाला साध्य होण्यासारखी गोष्ट आहे का? म्हणून समरसेनाने चतुराक्षाला विचारले–"चतुराक्षा, चंडीदेवीने आपल्या भक्ताला असे असाध्य काम करण्यास सांगावे, हे खरोखरच आश्चर्य वाटण्यासारखेच आहे!"

चतुराक्षाने होकारार्थी मान हलवून म्हटले–"समरसेना, शक्तीची उपासना ही कशी असते हे तुला कदाचित माहीत नसावे. इहलोकात पूर्ण सुखोपभोग घेण्याची इच्छा आणि मानवजातीवर अधिकार गाजवण्याची आकांक्षा ज्यांच्या मनात

     






असते तेच शक्तीचे उपासक होतात. देवी त्यांच्यावर करुणा करण्यापूर्वी त्यांच्या धैर्य-साहसाची आणि तिच्यावर त्यांची भक्ती किती आहे इत्यादी गोष्टीची परीक्षा घेते."

"तरमग शाक्तेय राजा इतके सोने आणि चांदी जमवू शकला का?" समर-सेनाने विचारले.

"तीच तर अद्भुत कथा मी सांगतो आहे! ती धनराशीने भरलेली नाव व त्याचे रक्षण करणारी ती नागकन्या यांचा वृत्तांत आणिमी व एकाक्षी यांचे परस्परांशी हाडवैर व्हायला कारणे झाली तीसुद्धा या कथेतच आहेत. या कथेचे मूळ म्हणजे शमन द्वीपावरच्या चंडीदेवीची इच्छा आणि ती पुरी करण्यासाठी शाक्तेयाने केलेला प्रयत्न दोन्ही आहेत." असे सांगून चतुराक्ष ती गोष्ट पुढे सांगू लागला.

"शाक्तेयाने देवीची इच्छा पुरी करायचे ठरविले. देवीची ही इच्छा म्हणण्याऐवजी देवीची ती आज्ञाच होती असे म्हणणे जास्त सयुक्तिक होईल. शाक्तेयाने इतके चांदीसोने एकत्र करायचे म्हणजे तुमच्या सारखीच इतर देशांवर स्वारी करणे भाग होते, दुसरा मार्गच नव्हता.

शाक्तेय राजाने राज्यभर सैन्यभर्ती सुरू केली. बलदंड व साहसी तरुणांना सैन्यात घ्यायला सुरवात केली. त्याचे अधिकारी एकेका गावी जात. तेथल्या तरुणांना एकत्र करीत. त्यांच्या कुस्त्या, खड्गयुद्ध वगैरे करवीत आणि त्यात जे यशस्वी होत अशा निवडक तरुणांना सैन्यात घेत.

"ती सैन्य भर्ती सुरू केली त्या काळात मी वीस एक वर्षांचा तरुण होतो. एकाक्षी-सुद्धा माझ्याच वयाचा होता व तो व मी एकाच गावचे राहणारे होतो.

"येथे एकाक्षी व माझे लहानपणापासून वैर कसे वाढत गेले हे सांगणे आवश्यक आहे. लहानपणचे हे वैर वाढत आमच्या हातून अनेक दुष्ट कार्ये करवायला कारणी-भूत झाले आणि शेवटी या बेटावर मानव वस्ती नष्ट करण्यासही मुख्य कारण झाले. त्या काळात एकाक्षी हा एकाक्षी नव्हताच. या बेटावर आल्यानंतर माझ्या काळ्या घुबडाने एकाक्षीचा एक डोळा फोडून त्याला एकाक्षी केले.

"एकाक्षी व मी एकाच गावचे राहणारे होतो, हे मी सांगितले आहेच! आमच्या गावात आमची घरे शेजारीच होती. तरी आमची परस्परांची मैत्री होण्याऐवजी वैरच परस्परात वाढतच गेले. परंतु इतके हाडवैर वाढायला बराच काळ लागला.

"मी व एकाक्षी आमच्या वयाच्या सहाव्या वर्षापासून गुरे चरायला न्यायचं काम करू लागलो! आम्ही आमच्या गावाच्या एका चौधरीच्या बकऱ्या जंगलात चरायला घेऊन जात होतो. तेव्हां आम्ही फार लहान होतो. म्हणून आम्हांला शिकार वगैरे करणे त्या जंगलात शक्य नव्हतं. मोठी तरुण मंडळीच फक्त शिकारीला जात असत.

"एके दिवशी मी, एकाक्षी व आणखी काही मुले बकऱ्या चरायला घेऊन जंगलात गेलो. त्या प्रदेशात गर्द झाडी होती, इतकी की दिवसासुद्धा काळोख शिवाय त्या जंगलात वाघ, सिंह व इतर क्रूर जनावरे पुष्कळ होती. असे असूनही त्या प्रदेशातच बकऱ्या चरायला न्याव्या लागत. कारण त्या जंगलापेक्षा चांगली जागा इतरत्र कोठेही नव्हती.

"बकऱ्या चरायला सोडून आम्ही सर्व मुले एकाच झाडाखाली येऊन बसलो.






थोड्या वेळाने एक सुंदर हरिणीचे पाडस माझ्या बकऱ्या चरत होत्या तेथे पळत येऊन ओरडू लागले. बहुतेक त्याच्या आईची व त्याची ताटातूट झाली असावी, म्हणून ते आले असावे.

"त्या पाडसाला पाहून त्याला धरायची अनिवार इच्छा मनात उत्पन्न झाली. उठून एक उडी मारून मी त्याच्या जवळ गेलो. तेवढ्यात एकाक्षीने सुद्धा त्या पाडसाला पाहिले. 'मीच पहिल्याने त्या पाडसाला पाहिले!' असे म्हणत तो माझ्या पाठी-मागून पळत आला.

"परंतु मी चटदिशी पुढे गेलो आणि त्या पाडसाला धरले. मी आपल्या जवळची दोरी घेऊन त्या पाडसाच्या गळ्यात बांधली आणि त्याला ओढू लागलो. इतक्यात एकाक्षी जवळ आला आणि ते पाडस त्याचे आहे, असे सांगून भांडू लागला. मला भयंकर राग आला व हाताला एक दगड आला तो उचलून मी एकाक्षीला मारला. तो त्याच्या डोक्याला लागला. तो ओरडत जमीनवर पडला.

"त्या गडबडीत गळ्यातल्या दोरीसकट ते हरिणीचे पाडस पळू लागले मी त्याच्या पाठीमागून धावलो. झाडाझुडपात त्याचा पाठलाग करून शेवटी मी त्याला पकडलेच. मी फार दमून गेलो होतो. ते पाडस पळून जाण्यासाठी मला ओढीत होते. मी दोरी घट्ट धरून ठेवली व त्याला ओढू लागलो.

"त्या परिस्थितीत अंगाचा थरकाप उडवून देणारी एक सिंहगर्जना माझ्या कानी पडली व ती अगदी जवळूनच! मी विचार करीत न बसता त्या पाडसाला एका झाडाला बांधून ठेवले आणि त्याच झाडावर झपाझप चढून गेलो.

"झाडावर चढल्यानंतर मनाला थोडी स्थिरता आल्यावरच मला माझी चूक कळली. कारण झाडाला बांधून ठेवल्या-नंतर ते पाडस स्वतःची सुटका करून घेण्यासाठी ओरडू लागले आणि पळून जाण्यासाठी धडपड करू लागले. सिंह कोठे दूर असला तरी त्या पाडसाचे ओरडणे ऐकून नेमका याच बाजूला नक्की येईल, ही चूक तेव्हां माझ्या लक्षात आली व झाले तेच, सिंह तेथे आलाच.

"मी झाडावर चढलेलो होतो, म्हणून मला आपल्या जिवाची भीती वाटत नव्हती. परंतु बिचाऱ्या पाडसावर त्या सिंहाने उडी मारली. केविलवाण्या स्वरात बिचारे पाडस ओरडत होते. मला राहवले नाही. त्या झाडाचे एक वाळके लाकूड तोडून मी त्या सिंहाच्या अंगावर फेकले. ती माझी घोडचूकच झाली. कारण सिंहाने लगेच मान वर करून मला पाहिले.

"सिंहाने त्या पाडसाला ठार करून त्याला खाता आलं तेवढं खाल्लं. खातां खातां मधून मधून तो माझ्याकडे पहात राहिला आणि शेवटी मला धरण्यासाठी त्याने उडी मारली. मी झाडावर उंच चढून बसलो व त्याचा पंजा पोचणे शक्य नाही अशा जागी बसलो. तरी सिंहाने प्रयत्न करायचा सोडला नाही. सूर्यास्त होईपर्यंत तो झाडाखालीच पाहारा देत बसून राहिला.

"रात्रभर मला झोप लागलीच नाही. उजाडलं तरी झाडावरून खाली उतरून यायचं धाडस होत नव्हतं. सिंह झाडा-












खाली नसला तरी जवळपास कोठेतरी असणार अशी खात्री मला वसली होती. मधून मधून मला त्याची डरकाळी ऐकू येतच होती.

"त्या दिवशी ऐन दुपारी माझ्या कानाचे पडदे फुटून जातील इतक्या जोराने डफाढोलक्यांचे आवाज ऐकू आले. तो आवाज म्हणजे आमचे गावकरी माझ्या शोधार्थ येत असल्याची सूचनाच होती. माझ्याबरोबरच्या मुलांनी घरी गेल्यावर मी कोठे तरी गेलो तो परतलो नाही असे गावकऱ्यांना सांगितले असावे.

"डफांचा आवाज जवळ जवळ येऊ लागला. आतां उतरून त्यांना भेटावे असे मला वाटलं खरं, परंतु धाडस होईना. रात्रभर पाहारा देत बसलेला सिंह अजून कोठेतरी बसला असणार असे वाटत होते.

"दांडकी, भाले, बरछी वगैरे घेऊन सुमारे चाळीस पन्नास गावकरी ओरडत पुढे येत होते. त्यांचा आवाज त्या जंगलात दुमदुमत होता. काही जण ढोल वाजवीत होते. सर्व जण मी होतो, त्या झाडापासून पन्नास एक पावलावर आले होते.

"माझ्या मनात सिंहाविषयी जो संशय होता तो खराच ठरला. झाडीत दडी मारून बसलेला सिंह एकाएकी गर्जत बाहेर आला आणि त्यांच्यावर त्याने उडी



टाकली. असा प्रसंग येण्याची शक्यता आहे, हे गावकऱ्यांना वाटत होते, म्हणून ते सावधच होते.

सिंहाने उडी टाकताच ते घाबरून पळून गेले नाहीत, तर एका बलदंड गावकऱ्याने सिंहाचा पंजा एका ढालीने अडविला. पाठीमागून एका तरुणाने सिंहाला घट्ट आवळून धरले.

"सिंह गर्जना करीत मागे वळण्याचा प्रयत्न करू लागला. परंतु तेवढ्यात पहिल्या तरुणाने आपला भाला जोराने त्याच्या मानेवर मारला. सिंह जोराने ओरडत पुन्हां पुढल्या बाजूला उडी मारण्याचा यत्न करू लागला. परंतु

तेवढ्यात मागच्याबाजूने दुसऱ्या तरुणाने आपल्या सुऱ्याचा वार सिंहाच्या पाठीत केला.

"सिंहाला जबर जखम झाली होती. त्या दोघां तरुणांनी त्यांच्या हातातल्या हत्यारांनी त्या सिंहाला खूप भोसकले. सिंह जमिनीवर पडून तडफडू लागला. झाडावरून ते दृश्य मी पहात होतो. मला कमालीचा आनंद झाला. मी झाडावरून झपझप खाली उतरत येत मोठ्याने ओरडलो.

"त्या वेळी मी जे दृश्य पाहिले त्यावर माझा स्वत:चाच विश्वास बसेना, असे मी म्हटले तर कोणाला खरे वाटणार नाही. मी तसा मोठ्याने ओरडलो ते ऐकून सर्वांनी माना वर करून माझ्याकडे पाहिले. लगेच जोराने ढोल वाजवीत समोरच एकाक्षी होता, तो ओरडला. "भूत, भूत!" आणि उलटचा दिशेने पळाला. पापणी लवायच्या आत इतर सर्व "भूत, भूत!" असे ओरडत पळून गेले."

चतुराक्षाने येथवर जे काही सांगितले, ते समरसेन लक्षपूर्वक ऐकत होता. त्याच्या तोंडावर आश्चर्य झळकत होते. तो म्हणाला–"हे सर्व आश्चर्य वाटण्यासारखंच आहे. तुला पाहूनसुद्धा इतकी मोठमोठी माणसं 'भूत' म्हणून पळून कशी काय गेली?"

चतुराक्ष चिडून दांत ओठ चावून म्हणाला–"ही सर्व त्या एकाक्षीचीच लबाडी आहे. तो 'भूत' म्हणून ओरडत पळू लागल्यावर सर्व माझ्याकडे न्याहाळून पाहिल्याशिवाय घाबरून जाऊन पळून गेले. त्यांनी डोळे मिटून त्याचे अनुसरण केले. त्या लहान वयातही एकाक्षी किती दुष्ट व कारस्थानी बुद्धीचा होता हे या एका घटनेवरून सहजी कळण्यासारखं आहे. आमच्या गावातल्या लहान थोर सर्वांना मी भूत आहे असे त्याच्या मुळे वाटले. तेव्हांपासून पुढे दहा वर्षे मला एक भूत म्हणूनच जंगलात रहावे लागले."

(क्रमश:)





# रक्ताचे नाते

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो स्मशानात गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, पुष्कळदां माणसाला स्वत:चे मनच कळत नसते. खोल मनात काय घडत असते याची त्याला कल्पनाच नसते. एकेक जण तो ज्याच्याशी वैर करतो त्याच्यासाठी कधी कधी प्राणत्याग करावा लागला तरी तयार होतो. त्याचे उदाहरण म्हणून मी दोघां भावंडांची गोष्ट तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

नागू व रंगू हे दोघे सख्खे भाऊ होते, परंतु परस्परांचे हाडवैरी ही होते. दोघे शेतीभाती करीत. त्यांचे परस्परातील हेवेदावे कोणत्या कारणाने वाढत गेले, सांगणे कठीण आहे, परंतु या ना त्या



गोष्टीवरून दोघांची बाचाबाची व्हायची आणि परस्परांची तोंडे पहायची नाहीत असे ते ठरवीत. एवढेच नव्हे तर दुसरा मेला तर पीडा टळेल असेही केव्हां केव्हां त्यांना वाटे.

एकदा काही गुरे डोंगरावरून चरून उतरून येत असतां नागूच्या छान फोफावून वाढलेल्या शेतात शिरली. रंगू ते डोळ्यांनी पहात होता व मनातल्या मनात त्याला गुदगुल्या होत होत्या की नागूचे उभे पीक आतां फस्त होणार. त्याला आपल्या डोळ्याचे पारणे फिटल्यासारखे वाटले. परंतु तेवढ्यात गुराखी धावले व त्यांनी गुरांना हाकून शेतातून बाहेर काढले. तेवढ्यात नागू तेथे आला व त्याने गुराख्यांना खूप बडवून काढले. ते पाहून रंगू गांवकऱ्यांचे कान भरीत म्हणाला— "आमच्या दादाने त्या बिचाऱ्या गुराख्याने एवढं मारलं हा त्याचा घमेंडखोरपणा सोडून काय होते म्हणावयाचे? मुकी जनावरं एकाएकी शेतात शिरली तर गुराखी तरी काय करणार? तरी बिचाऱ्यांनी कळताच गुरांना शेताबाहेर काढले. नाहीतर शेतांचं वाटोळेच झाले असते. काही म्हणा, आमच्या दादाला त्याचं पीक चांगलं आलं म्हणून फारच गर्व चढला होता. देवच गर्वाचं घर असं खाली करतो!"

धाकट्या भावाने गावकऱ्यांसमोर अशी निंदा केलेली ऐकून नागू भडकला.

त्यानंतर काही दिवसांनी रंगू गाडीभर गवत घेऊन एका डोंगराळ वाटेने खाली येत असतां बैलाचा पाय मुरगळला व तो खाली पडला. गाडी सरळ करणे एकट्या रंगूला साधले नाही. म्हणून त्याने शेतात जवळपास काम करणाऱ्या दोघांतिघांना हाक मारली. बैलाचा पाय मोडल्याचे कळले.

नागूला कळलं व त्याची छाती थंड झाली व तो दिसेल त्या गावकऱ्याला म्हणू लागला—"आमच्या धाकट्याच्या बैलाचा पाय मोडला म्हणे? परंतु हे पहा, कोणाचा गर्वभंग कसा करावयाचा, ते त्या देवाला चांगलं कळतं!"



ते कळल्यावर रंगू आगीत तेल ओतल्या सारखा जळफळला.

दोघां भावंडांच्या बायका आपल्या नवऱ्यांहून कोणत्याही बाबतीत कमी नव्हत्या. मुळात जावाजावांचे परस्परांशी वैर, त्यात दोघां भावंडांचे भांडण असल्यामुळे त्यांना आपलं वैर लपविण्याची गरजच काय? दोघी परस्परांची निंदा शेजाऱ्यापाजाऱ्याजवळ मनमोकळेपणी करीत. शेजारपाजारच्या बायका तिखटमीठ लावून एकीच्या विरुद्ध दूसरीकडे तक्रारी सांगून दोघींचे भांडण झाले की गंमत पहात. अशा तऱ्हेने दोघां भावंडांचा परस्परांवरचा राग वाढवायला दोघी जावा हातभार लावीत.

एकदा रंगूच्या बायकोने एक नवा दागिना करवून घेतला आणि बोलतांबोलतां शेजारणींना म्हणाली—"तुम्हीच पहा हो, पैसा जवळ असला तरी तो उपभोगायला सुद्धां भाग्य लागते!"

ही गोष्ट इकडून तिकडून जाऊन नागूच्या बायकोच्या कानावर पडली. आपल्या जावेने आपल्याला हिणविण्यासाठीच हे म्हटले असले पाहिजे असे साहजिकच नागूच्या बायकोला वाटले. तिने मुसमुसत जाऊन ती गोष्ट आपल्या नवऱ्याला सांगितले.

"आपल्याजवळ काही नाही असं वाटलं होय तिला? मला तिच्याहून चांगला हिऱ्याचा कंठहार आणल्याशिवाय तिची घमेंड जिरणार नाही!" ती म्हणाली.

नागूने बायकोच्या म्हणण्यासारखेच केले. त्याने बायकोसाठी एक सुंदर जास्त किंमतीचा कंठहार विकत घेतला. कसलं तरी हळदीकुंकू ठेवून नागूच्या बायकोने आपला तो कंठहार शेजारपाजारच्या बायकांना दाखविला व म्हणाली—"हा कंठहार पाहून डोळ्यांतून आग पाखडणारे नाहीत वाटलं का हो?"

हळूहळू कंठहाराची गोष्ट रंगूच्या बायकोच्या कानावर गेलीच. ती चिडून म्हणाली—"नंदी बैलाच्या गळ्यात किती घंटा बांधल्या म्हणून काय? त्या भिकारड्या











कंठहाराला पाहून डोळ्यांतून आग पाखड-ण्याची गरजच काय हो ?"

अशा लहानसहान गोष्टींवरून जावा जावांची मौखिक द्वंद्वं होत आणि त्यावरून भावाभावांची मारामारीपर्यंत मजल पोचे. त्या गल्लीतल्या लोकांना दररोज काहीतरी गंमत पहायला मिळे.

असे दोघां भावंडामध्ये वैर नित्य वाढतच राहाले. एकदां एकाएकी मुसळधार पाऊस पडू लागला आणि रंगूच्या घराची दक्षिणे-कडील भिंत कोसळली.

घराचं पाणी गळू लागलं तेव्हां काहीतरी मेणकापड वगैरे घालून गळणे थांबवावं या हेतूने रंगू घरावर चढून गेला. परंतु पाहतां पाहतां छपराचा तो भाग कोसळला. नवरा छपराबरोबर खाली कोसळला म्हणून घाबरून बायको ओरडली. परंतु उत्तर आले नाही. ती धावऱ्याधावऱ्या दिराच्या घरी गेली व आपल्या जावेला घट्ट मिठी मारून रडत म्हणाली—"वहिनी, आपल्या दिराला वांचवा हो !"

ती आवाक होऊन नवऱ्याला म्हणाली—"अहो, पाहतां काय? दिवा घेऊन या की, भावजींना काय झालं पहा तरी !"

तिथे दिवा घेऊन धाब कोसळलं होतं तिकडे गेले व कोसळलेल्या छपराखाली बेशुद्धावस्थेत पडलेल्या रंगूला बाहेर काढले व नागू त्याला आपल्या घरी घेऊन आला. वैद्याने येऊन औषधपाणी केल्यावर रंगूला शुद्ध आली.

त्या दिवसापासून दोघां कुटुंबामधले वैर पार नाहीसे झाले. शत्रुत्वाची पाळेमुळे खणून पार नाहीशी झाली. ही घटना घडल्यानंतर कित्येक दिवसांनी रंगूची बायको शेजाऱ्या-पाजाऱ्यांना सांगू लागली—"त्या दिवशी भावजी देवासारखे धावले आणि त्यांनी माझ्या कुंकवाचं रक्षण केले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, त्या दोघां भावडांत खरोखर प्रेम होते की वैर? एकाचं नुकसान झालं की दुसरा आनंदाने नाचत होता नाही का? मग नागू आपल्या धाकट्या भावाला वांचवायला कसा काय धावला? त्यानंतर त्या भावंडांमधले वैर एकाएकी नष्ट कसे काय झाले? या शंकांचं समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिलं नाहीस तर परिणाम तुला माहीत आहेच, तुझ्या डोक्याची शंभर छकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला—"आत्मीयांमध्ये प्रेमाचं जसं एक बंधन असतं तसंच द्वेष करीत असतांना सुद्धां न तुटणारं असं घट्ट बंधन असतं. रक्ताचं बंधन नसेल तर कोणतंच बंधन एवढे घट्ट नसतं. कधीकधी द्वेष करून माणसं स्वतःच बंधन घालून घेतात. आत्मीय बांधवांत प्रेमाचं बंधन जितकं बळकट असतं तितकंच द्वेषाचं बंधनही बळकट असतं. अगदी जवळच्या नात्यातली मंडळी व भावंडे परस्परांशी वैर करू लागली की प्रमाणाबाहेर वैर वाढतं. सर्व शत्रुत्वांत भाऊ बंदकीचे शत्रुत्व मोठे असते. तरी रंगू मेला असतां तर नागूला आनंद झाला असता हे मानणे चुकीचे होईल. भाऊ मेल्यावर त्याच्यात व भावात असलेल्या प्रेमाचे किंवा वैराचे बंधन तुटलं असतं! एक मेला तर दुसऱ्याचा स्वार्थसिद्ध होण्यासारखेही काही नव्हते. म्हणून रंगूचा जीव वाचवायला नागू धावला हे नैसर्गिकच होते. रक्ताकडे रक्त धावले. त्यानंतर दोघांमधले वैर नाहीसे व्हायला दोन कारणे झाली. पहिले कारण हे की क्रोधापेक्षा प्रेमाचे बंधन जास्त बळकट असते. दुसरं असं की उपकाराचा फायदा ज्याला मिळाला तो उपकाराची गोष्ट कदाचित् विसरेलही, परंतु उपकार करणारा त्याने दुसऱ्याचे केलेले हित जन्म भर विसरत नाही. जेथे रक्ताचाच संबंध आहे तेथे अशा परिस्थितीत वैराला जागाच कोठे राहणार ?"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# चोरी करायला रागदारी

नारायणबुवा तंजोर गावातले सुप्रसिद्ध गवई होते. परंतु ते नेहमी नीलांबरी रागच तेवढा गात असत. कोणी कधी 'दुसरा राग घ्या' असा आग्रह केला तर ते म्हणत, परंतु ती बैठक रंगत नसे. बुवा नीलांबरी राग म्हणू लागले की त्या रागातल्या करुणरसामुळे दगडसुद्धा विरघळून जात अशी त्यांची कीर्ती होती. दगडाला पाझर फुटे की नाही नकळे, परंतु एवढे खरे की त्यांचा नीलांबरी ऐकणारे श्रोते डोलत व स्वतःला विसरून जात. कोणी म्हटले की "मी नारायणबुवांची निलांबरी ऐकली आहे" तर लोक लगेच त्याला म्हणत—"कपाळ! अरे, तो रागिणी रंगली म्हणजे तू तर झोपी गेला असशील, मग ऐकणार कोठून?" अशा तऱ्हेने नारायणबुवांच्या नीलांबरी रागाची ख्याती तंजोरच्या पंचक्रोशीत होती.

नारायणबुवांचे चाहाते म्हणायचे—"हे काय कमी झालं? अहो, या युगात गाणं म्हणून झोपविणारा आई शिवाय कोणी मिळेल तरी का?"

"अहो, आमची आजी मी लहान असतांना ओव्या म्हणायची व मला लगेच झोप यायची. आता याला तुम्ही काय म्हणाल?" असं म्हणून काही नारायणबुवांच्या नीलांबरी रागाची तुलना करून त्यांची स्तुतीच दुसऱ्या तऱ्हेने करीत.

एकूण नारायणबुवांनी नीलांबरी म्हटली की श्रोता कोणी कसाही असो त्याला झोप ही येणारच, असे त्या गावातल्या प्रत्येकाचा समज होता.

एकदां नारायणबुवांच्या शोधार्थ एक माणूस आला. तो दिसायला तसा कोणी मोठा माणूसच दिसत होता, परंतु तो होता धंदेवाईक चोर. त्याने नारायणबुवांना काही पैसे दिले व म्हणाला—"हे पहा बुवा! उद्या रात्री तुमची एक बैठक मी ठेवणार आहे. म्हणून मी तुमची बिदागी अगाऊच देऊन ठेवतो आहे!"

"उद्यां रात्री म्हणतां? कोठे, किती वाजता?" नारायणबुवांनी त्याला विचारले. त्या पूर्वी नारायणबुवांना गाण्यासाठी बिदागीची रक्कम कोणी कधी अगाऊ दिलीच नव्हती. म्हणून नारायणबुवांनी आनंदाने विचारले.

"रात्री बाराच्या सुमारास गाण्याला सुरवात करावयाची आहे. बैठक कोठे होईल हे मी आत्तांच सांगू शकणार नाही. मी रात्री येऊन तुम्हांला बोलावून घेऊन जाईन. मी सांगेन त्या जागी बसून तुम्ही गायला सुरवात करा म्हणजे झाले." तो माणूस म्हणाला.

मध्यरात्री गायनाला सुरवात म्हणजे काय, हे नारायणबुवांना कळेना. परंतु त्याने बिदागी अगाऊ दिलेली होती म्हणून नारायण बुवा त्याच्याशी वादघालीत बसले नाहीत.

दुसऱ्या दिवशी मध्यरात्र उलटल्यावर तो माणूस नारायणबुवांना बोलवायला आला. त्याच्याबरोबर त्याचा आणखी एक साथीदारही होता. दोघे नारायणबुवांना खजिन्याजवळ घेऊन आले.

रात्री दोघांनी एका जागी बसून नारायणबुवांना गायनाला सुरवात करायला सांगितले. नीलांबरी राग सुरू झाल्यावर काही वेळाने खजिन्याचे अधिकारी व पाहरेकरी झोपी जातील व त्यानंतर चोरी करावी असा दोघांचा बेत होता.

परंतु पाहरेकरी नेपाळ देशात राहणारे गुरखे होते. त्यांना दाक्षिणात्य संगीताची आवड मुळीच नव्हती.

म्हणून नारायणबुवा गाऊ लागताच दोघे चोरच पेंगू लागले आणि घोरू लागले. पहाटे गुरख्यांनी येऊन त्या दोघांना जागे केले व नारायणबुवांना म्हणाले—"आतां उजाडण्याची वेळ झाली आहे हो! उठा घरी चालू लागा!" चोरांनी आश्चर्यचकित होऊन घराची वाट धरली.





# सर्व फक्त एकदांच!

रामपूरच्या जमिनदाराला नाही नाही म्हणतां उतारवयात एक मुलगा झाला. त्याचे नाव गोपाळ ठेवण्यात आले. मुलाचे लाड फार होऊ लागले. म्हणून दहावे वर्ष लागले तरी तो एक अक्षरही शिकला नाही व कमालीचा हट्टी मात्र झाला. तो उजाडतांच उठत नसे. कित्येक दिवस आंघोळही करीत नसे.

आपला मुलगा बिघडणार असे वाटून जमिनदाराने मुलाला मार्गावर आणण्याचे ठरविले. परंतु काही उपयोग झाला नाही. मुलगा घरातल्या माणसांचे ऐकत नाही हे पाहून जमिनदाराने दोघातिघां चांगल्या विद्वानांना मुलाला शिकवायला ठेवले. परंतु तोही प्रयत्न फसला.

त्याच सुमारास गावात एक तरुण युवक आला. तो अनाथच होता. जमिनदार त्या तरुणाला बोलावून म्हणाला—"तू माझ्या मुलाला चांगल्या मार्गावर आणलास तर तुला आयुष्यभर उदरनिर्वाहाची चिंता करण्याची गरज राहणार नाही."

तो तरुण हुशार होता. त्याने गोपाळला नवनवीन खेळात गुंतवून आपला पगडा त्याच्या मनावर बसविला. काय वाटेल ते करून त्याचे चित्त विद्याभ्यासाकडे लावावे, असे त्या तरुणाने ठरविले. परंतु त्या तरुणाने अनेक तऱ्हेने समजावून सांगितले तरी गोपाळ न बदलता त्याला एकदां म्हणाला—"मला तर असंच राहण्यात मजा वाटते. मी कां बदलावे?"

"अनुभव घेतल्याशिवाय तुला ते कसे कळणार? तू दररोज एकदां आंघोळ करून पहा. एकदा थोडे वाचन करून पहा. एकदां वडीलधाऱ्यांना नमस्कार करून पहा! तुला किती बरं वाटेल हे तूच स्वानुभवाने पहा!". तो तरुण म्हणाला.

"तू म्हणतोस म्हणून मी मान्य करतो. परंतु तू म्हणालास ते सर्व मी फक्त एकदांच करीन! रोज उजाडताच उठेन, एकदां स्नान करीन, पुस्तकातले एक पान वाचीन. त्यानंतर तू दिवसभर माझ्याशी खेळलं पाहिजेस." गोपाळ म्हणाला.

गोपाळ म्हणाला ते त्या तरुणाने जमिनदाराला सांगितले.

"बरं झालं बुवा! थोडा नियमितपणा आला की तोच सुधारेल!" जमिनदार मनाचे समाधान झाल्यासारखे म्हणाला.

दुसऱ्या दिवसापासून गोपाळ कबूल केल्याप्रमाणे उजाडतांच उठू लागला व स्नान करून एकच एक पान पुस्तक उघडून वाचू लागला. नंतर तो वडिलांना एकदां नमस्कार करू लागला.

एके दिवशी जमिनदाराचे कोणी नातेवाईक भेटायला आले. गोपाळला दिवसभर खेळात रमलेला पाहून त्यांनी जमिनदाराला विचारले—"काय हो, मुलाचा विद्याभ्यास सुरू केलात की नाही?"

"अहो, तो उजाडतांच उठून आंघोळ करतो व वडीलधाऱ्यांना नमस्कार करून अभ्यासाला बसतो. त्यानंतर खेळतो." या शब्दांत जमिनदाराने आपल्या मुलाचे मोठ्या अभिमानाने वर्णन केले व मुलाला बोलावून म्हणाला—"हे तुझे मोठे काका आहेत बरं



का? तुला पहायला म्हणून मुद्दाम आले आहेत. त्यांना नमस्कार कर, बाळा! तुला ते आशीर्वाद देतील!" जमिनदार म्हणाला.

गोपाळ उद्धटपणाने नकारार्थी मान हलवून म्हणाला—"मी दररोज फक्त एकदांच वडीलधाऱ्या कोणाला नमस्कार करतो. आज सकाळी मी तुम्हांला नमस्कार केला होता ना? पाहिजे तर उद्यां सकाळी तुमच्या ऐवजी यांना नमस्कार करीन, आज नाही कोणाला नमस्कार!" असे सांगून गोपाळ निघून गेला.

जमिनदाराला मान खाली घालावी लागली. त्याने तरुणाला बोलाविले व म्हणाला—"तू माझ्या मुलाला जे वळण



लावीत आहेस त्यामुळे माझ्या नातेवाइकांसमोर माझी मान खाली होत आहे!"

तो तरुण गोपाळकडे जाऊन म्हणाला—"तुझ्यामुळे मला खाली पहावे लागले आज! थोरांमोठ्यांना नमस्कार करणे ही जगाची रीत आहे. त्यांचे आशीर्वाद तुझ्या हिताचे असतात. यापुढे आजच्या सारखा वागू नकोस!"

परंतु गोपाळ त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत म्हणाला—"मी म्हणालो त्याबाहेर काही केले नाही, सर्व फक्त एकदां मी कबूल केले होते!"

"तू अगदी हरिश्चंद्राहून मोठा एकवचनी झालास होय? तू दिलेले वचन मोडणार नाहीस का? मोडलेस तर?" त्या तरुणाने गोपाळला विचारले.

"मोडले तर तू म्हणशील ते मी करीन!" गोपाळ म्हणाला.

त्या तरुणाला गोपाळमध्ये बदल घडवून आणायला एक युक्ती सुचली. त्याने खेळाखेळात गोपाळचे अंग घाण केले. त्यामुळे गोपाळच्या अंगाला वास येऊ लागला. खेळात रमल्यामुळे गोपाळला ते कळले नाही. परंतु त्यानंतर तो वास व ती घाण त्याला असह्य झाली. तरुण गोपाळला म्हणाला—"चल, नदीवर जाऊन आंघोळ करून घेऊ."

"आज तर मी एकदां आंघोळ केली आहे. पुन्हां नाही आंघोळ करणार!" गोपाळ म्हणाला.

त्या तरुणाने एकट्याने नदीवर जाऊन आंघोळ करून घेतली. गोपाळ आंघोळ केल्याशिवाय घरी गेला.

"बाळा, तुझ्या अंगाला किती घाण येते आहे रे! आंघोळ करून ये!" त्याची आई म्हणाली. तरी गोपाळ गेला नाही. तो धमकावून म्हणाला—"जा, मला बळजबरीने आंघोळ करायला लावले तर मी आज जेवणार नाही!"

"तरमग, तुझ्याबरोबर आम्ही सर्वांनी कसं रे जेवायचं? घरात नातेवाईक मंडळीसुद्धा आली आहेत!" गोपाळची आई म्हणाली.



गोपाळ एकटा निराळा जेवायला बसला. अंथरूण घाण होईल म्हणून तो जमिनीवर झोपला. परंतु त्याने आंघोळ केली नाही. तरुणाने जाऊन जमिनदाराला सांगितले की त्याचे सर्व प्रयत्न व्यर्थ झाले, म्हणून त्याला माफ करावे.

जमिनदाराला कळले की मुलगा सर्वांबरोबर जेवला नाही आणि जमिनीवर झोपला, तेव्हां त्याला फार वाईट वाटले व तो त्या तरुणाला म्हणाला—"तू यापुढे मुलावर असले प्रयोग करायचे सोडून दे!"

परंतु गोपाळमध्ये सुधारणा होणे त्या तरुणाला आवश्यक वाटले. कारण गोपाळमध्ये सुधारणा होण्यावर त्याचा उदर निर्वाह अवलंबून होता. मुलाचे फार लाड केल्याने मुलगा बिघडला आहे, हे तरुणाने ओळखले.

एकदां त्या देशाचा राजा जमिनदाराच्या गावी आला आणि त्याने दिवसभर गावातच मुक्काम केला. गावातली सर्व प्रमुख गावकरी मंडळी राजाला नजराणे देऊ लागली. जमिनदारसुद्धा आपल्या सर्व कुटुंबियांसह राजाला नजराणा द्यायला गेला. बरोबर तरुणाला सुद्धा घेतले होते.

जमिनदाराने जो नजराणा दिला तो राजाला फार आवडला. त्या वेळी तरुण गोपाळला म्हणाला—"हे आपले महाराज आहेत, यांना नमस्कार कर!"



गोपाळ सवयीप्रमाणे उर्मटपणे काही बोलला. राजाला राग आला म्हणाला– "काय रे, दिवसभरात तू एकदांच नमस्कार करतोस का? राजालासुद्धा तू दुसऱ्याने नमस्कार करणार नाहीस का?"

जमिनदाराने ओळखले की मुलाच्या या वागण्याचा परिणाम भयंकर होणार. तो घाबरला. त्याने संतापून फाडकन मुलाच्या मुस्कुटात .एक दिली व म्हणाला, तुझ्या हट्टीपणाला केव्हां तरी आळा बसलाच पाहिजे! देवासारखा आपला राजा आहे, त्याला तू नमस्कार करणार नाहीस? त्यांच्या पायांपडून त्यांची माफी माग!"

"गोपाळच्या अंगाला त्यापूर्वी त्याच्या वडिलांनी कधी हातही लावला नव्हता. बापाचा रुद्रावतार पाहून तो घाबरून गेला आणि त्याने राजाचे पाय धरून त्याची माफी मागितली.

घरी परत आल्यावर जमिनदाराला गोपाळने केलेल्या प्रतिज्ञेची आठवण करून देऊन तो तरुण म्हणाला–"आपल्या मुलाने आपले वचन मोडले. आजपासून तो माझ्या म्हणण्याप्रमाणे वागेल. कारण त्याने आज दोनदां नमस्कार केला. तुम्ही स्वत:च पाहिलेत की मुलाची वागणूक किती धोक्याची आहे! त्याला मार्गावर आणण्याचा दुसरा उपाय न पाहून तुम्ही त्याच्या अंगावर हात टाकलात. मला तोच उपाय योग्य वाटला, म्हणून मी जाणूनबुजून त्याला राजाला नमस्कार करायला सांगितले. जर मी आपल्या व्यवहाराने आपल्याला दुखविले असेल तर आपण मला माफ करावे.

ही गोष्ट खरी की त्या तरुणामुळेच जमिनदाराला मुलाला मारावे लागले. परंतु हे देखील तेवढेच खरे की गोपाळ आपल्या वचनाप्रमाणे मार खाईपर्यंत वागत आला. म्हणून तो त्या पुढे तरुणाला वचन दिल्याप्रमाणे तरुणाने सांगितले तसा वागू लागला व शहाणा झाला. जमिनदाराने वचन दिल्याप्रमाणे त्या तरुणाला आयुष्यभर आश्रय दिला.





# मातृऋण

ब्रह्मदत्त काशीच्या गादीवर राज्य करीत असतां बोधिसत्वांनी गाईच्या एका पाड्याच्या रूपे अवतार धारण केला. तो पाडा सुंदर काळ्या रंगाचा होता. त्याला पाहून पाहणाराचे मन हरपून जात असे. त्याचे सौंदर्य पाहून त्याच्या मालकाला तर आनंदच झाला, इतर लोकांनाही तो हवा-हवासा वाटे.

त्या पाड्याचा मालक एका म्हातारीच्या घरात भाड्याने रहात होता. काही दिवसांनी त्याच्या मालकाला ते गाव सोडून जावे लागले. जातांना त्याला भाड्याचे पैसे देणे शक्य नव्हते. म्हणून भाड्याऐवजी तो पाडाच म्हातारीला देऊन मालक निघून गेला.

त्या म्हातारीला आपला असा दुसरा कोणी नव्हता. ती त्या पाड्यालाच आपल्या मुलासारखी प्रेमाने पाळू लागली. भाताची पेज, कोंडा, पेंड वगैरे पौष्टिक पदार्थ ती त्या पाड्याला खायला घालीत असे. दररोज ती त्या पाड्याला कालव्यावर घेऊन जाऊन वाळक्या गवताच्या बोळ्याने त्या पाड्याचे सर्व अंग घासून ती त्याला धुवी, त्या पाड्यावर तिचे वात्सल्य इतके होते की तिने त्या पाड्याला कधी बांधून ठेवले नाही.

काळा पाडा वाढत गेला तसतशी त्याला सुंदर कोवळी शिंगे येऊ लागली. तो इतर गुरांबरोबर गांवभर मन मानेल तिकडे हिंडे फिरे. मुलं त्याच्यावर चढून मजा करीत. त्याच्या गळ्याखालील पोळ्याला हाताने गोंजारीत.

एके दिवशी तो पाडा विचार करू लागला,–"मला इतक्या पुत्रवात्सल्याने लहानाचा मोठा करणारी म्हातारी किती गरीब आहे. अंगात पुरेशी शक्ती नसून

ती माझी किती सेवा करते व माझ्यासाठी किती कष्ट सहन करते. मी तिला चार पैसे मिळवून आणून दिले तर तिला थोडा हातभार लावल्यासारखा होईल."

पण पैसे मिळवायचे कसे? तो विचार करू लागला. त्याच सुमारास एक व्यापारी आपल्या पांचशे गाड्यांत धान्याची पोती घालून त्या गावाजवळ आला. त्या गाड्या त्या गावापर्यंत सरळ रस्त्यावर निर्विघ्नपणे चालत आल्या होत्या. परंतु त्या गावाला लागून जो ओढा होता तो पार करून जाणं कठीण होतं. वाळूत खूप प्रयत्न करूनही गाड्या पुढे जात नव्हत्या. म्हणून सर्व गाड्या ओढ्याच्या अलीकडच्या काठावरच थांबल्या. गावातून भाड्याने बैल आणून ओढा पार करण्याचा व्यापाऱ्याने प्रयत्न करून पाहिला. पण तो प्रयत्नही फुकट गेला.

त्याच वेळी व्यापाऱ्याला ओढ्याच्या पलीकडच्या काठावर इतर गुरांबरोबर चरत असलेला म्हातारीचा पाडा दिसला. त्याच्याबरोबर एखाददोन चांगले बैल असतील असा विचार करून व्यापारी ओढ्यापलीकडे गेला. परंतु तो काळा पाडाच त्याला कामालायक दिसला. त्याला वाटले की हा पाडा चांगला दांडगा आहे, एकामागून एक गाड्यांना जुंपलेल्या बैलांच्या मदतीने एकटाच सर्व गाड्या पार घेऊन जाऊ शकेल.

असा विचार करून व्यापाऱ्याने तेथल्या गुराख्यांना विचारले—"हा पाडा कोणाचा आहे रे? याला मी काही वेळ घेऊन जाऊ का? माझ्या गाड्या नदीपार न्यायच्या आहेत. तुम्ही मागाल ते देईन!"

"तुम्ही ह्या पाड्याला घेऊन जा आणि आपल्या गाड्या नदीपार पोचत्या करा. ह्याचा कोणी मालक असा नाहीच. हा मन मानेल तसा हिंडतो फिरतो.' गुराखी म्हणाले.

व्यापाऱ्याने एक दोरी त्या पाड्याच्या गळयात बांधली आणि त्याला ओढून नेऊ लागला, परंतु तो पाडा जागचा हललाच नाही. व्यापाऱ्याच्या नोकरांनी खूप प्रयत्न केला तरी ते त्यांना अशक्य झाले.

व्यापारी थोडा वेळ विचार करीत उभा राहिला. त्याला वाटले की कदाचित मेहनतीची मजुरी पाड्याला हवी असेल. तेव्हां तो त्या पाड्याला म्हणाला—"तुला पाहून तू कोणी वृषभराज असावास असे वाटते आहे. तू माझ्या पांचशे गाड्या ओढ्याच्या पार नेल्यास तर तुला गाडी-मागे दोन रुपये देईन. एक हजार रुपये मिळतील."

व्यापाऱ्याच्या तोंडातून ते वाक्य निघताच, सर्व काही कळल्यासारखा तो काळा पाडा जागचा हलला आणि ओढ्यापली-कडे गाड्या उभ्या होत्या त्यांच्याजवळ जाऊन उभा राहिला. व्यापाऱ्याच्या नोक-रांनी एका गाडीला त्याला जुंपला. पाडा सहजी ती गाडी पलीकडच्या तिरावर घेऊन गेला.





सर्व गाड्या पार गेल्यावर व्यापाऱ्याने एका लांब पिशवीत पांचशे रुपये घालून पाड्याच्या गळ्यात ती पिशवी बांधली. पाड्याच्या रूपात असलेल्या बोधिसत्वांनी व्यापाऱ्याची ती लबाडी ओळखली. 'या व्यापाऱ्याला लोभ दिसतो आहे. याने आपलं वचन मोडले आहे.' नंतर तो पाडा जी गाडी त्याने सर्वांत प्रथम ओढ्या पलीकडे नेली होती, तिच्या समोर अशा तऱ्हेने आडवा उभा राहिला की गाड्या पुढे जाणेच शक्य नव्हते.

व्यापाऱ्याने ओळखले की हा पाडा सामान्य नाही, खूप समजूतदार आहे. व्यापाऱ्याने आणखी पांचशे रुपये दुसऱ्या एका पिशवीत टाकले व ती पिशवी-सुद्धा पाड्याच्या गळ्यात बांधली आणि म्हणाला—"थोर आत्म्या! मी जे वचन दिले होते त्याप्रमाणे एक हजार रुपये तुझ्या गळ्यात बांधले आहेत. आतां माझ्या गाड्या पुढे जायला वाट दे!" पाडा तेथून निघाला व सरळ म्हातारी रहात असे तेथे जाऊन उभा राहिला. त्याने पांचशे गाड्या वाळूतून ओढून ओढ्याच्या पार नेल्या होत्या. म्हणून तो दमला होता व त्याचे सर्व अंग धुळीने व वाळूने माखून निघाले होते. म्हणून म्हातारीने एक कपडा घेऊन त्याचे सर्व अंग पुसून काढले व त्याच्या अंगाखांद्यावर गोंजारीत हात फिरवू लागली. तिने पिशव्या पाहिल्या, त्यांत पांचपांचशे रुपये होते.

ती चकित झाली. तितक्यात गुराख्यांनी येऊन घडलेली गोष्ट सांगितली. म्हातारी-च्या डोळ्यांत प्रेमाश्रू झळकू लागले. त्याचे पोळे गोंजारीत ती म्हणाली—"बेटा, तू माझ्यासाठी एवढी मेहनत केलीस? मला कशाला रे एवढे पैसे?" नंतर तिने पाड्याच्या अंगाला तेल चोळले व गरम पाण्याने त्याला न्हाऊं घातले.

अशा तऱ्हेने इतक्या वात्सल्याने पाळ-णाऱ्या मातृस्वरूप त्या म्हातारीचे मातृ-ऋण फेडून बोधिसत्वांनी आपला अवतार समाप्त केला.



# महाकवी कालिदास

कौमार्यावस्थेत असलेला एक युवराज आपल्या आईला म्हणाला—"आई, मला एक तलवार दे!" आईने विचा-रले—"कशाला रे बाळा?" युवराज म्हणाला—"युद्ध करायला." आई स्मित करून म्हणाली—"बाळा, तू थोडा मोठा हो. तलवार हातात धरायचे वय येऊ दे. देईन हो!"



तोच युवराज पुढे शककर्ता विक्रमा-दित्य नावाने प्रसिद्ध झाला. मध्य आशियातील शक जातीने भारतावर स्वारी करून येथे आपले राज्य स्थापन केले. त्यांचे राज्य जिंकून विक्रमादित्याने आपल्या शौर्य पराक्रमाचा परिचय दिला.





त्यानंतर विक्रमादित्याने अनेक राज्ये जिंकून आपली राजधानी उज्जयिनी येथे स्थापन केली. त्याच्या कार-कीर्दीत उज्जयिनी नगरी मोठमोठ्या इमारती व देवळांमुळे शोभिवंत होती.



विक्रमादित्याच्या विषयी अनेक अद्भुत आख्यायिका प्रसिद्ध आहेत. त्यांतील एक कालिदासाच्या चरित्रावर आहे. कोण्या एका राजकन्येने (ती विक्रमादित्याच्या राजपरिवारातील नव्हती) अशी प्रतिज्ञा केली होती की तर्कशास्त्रात तिला जिंकणाऱ्याशीच ती विवाह करणार आहे. कित्येक पंडितांनी तिच्या समोर तर्कशास्त्रात आपली हार मान्य केली.

अशा तऱ्हेने राजकन्येसमोर मान खाली झालेल्या काही पंडितांनी एक योजना आखून एका मूर्खाबरोबर तिचे लग्न करून द्यायचे ठरविले. त्यांना तसा एक वज्रमूर्ख भेटलाही. तो ज्या फांदीवर बसला होता तीच तो तोडीत होता व फांदी तुटताच खाली पडलाही. त्या मूर्खाला राजवाड्यात ते पंडित घेऊन आले.





तो एक विद्वान पंडित असल्याचे सर्व पंडितांनी तिखटमीठ लावून राजाला समजावून सांगितले. शेवटी राजकन्येचे त्या मूर्खशिरोमणीशी लग्न झालेच. परंतु राजकन्येने लवकरच तिचा पती मूर्ख असल्याचे ओळखले व त्याला राजवाड्यातून हाकलून लावले.

अशा तऱ्हेने अपमानित होऊन तो तरुण कालीच्या देवळात जाऊन श्रद्धाभक्तिपूर्वक देवीची आराधना करू लागला. परंतु देवी प्रसन्न होत नसलेली पाहून तो जवळच्या एका विहिरीत जीव द्यायला निघाला.





तत्क्षण काली सरस्वतीरूपात दर्शन देऊन म्हणाली–"मुला, आणखी सात जन्म तरी पंडित होण्याचे तुझ्या प्रारब्धात नाही!" ते ऐकून तो मूर्ख नदीत उडी टाकून जीव द्यायला निघाला.

तेव्हा देवीला त्याची करुणा आली व तिने त्याला आशीर्वाद दिला जेणे करून त्याला त्याच जागी देहत्याग करून सात जन्म एकामागून एक घेता आले.





अशातऱ्हेने देवीच्या कृपेने तो एक महापंडित झाला. त्याने देवीचे एक स्तोत्र स्वतः रचून म्हटले आणि आपले नाव कालिदास ठेवून घेतले आणि विक्रमादित्याच्या दरबारात गेला.

त्यानंतर विक्रमादित्याच्या दरबारातील नवरत्नात कालियास एक प्रमुख रत्न ओळखला जाऊ लागला. धन्वंतरी, क्षपणक, अमरसिंह, शंख, वेताळभट, घटकर्पक, वराहमिश्र आणि वररुचि ही इतर रत्ने होत.





एकदा विक्रमादित्याला काही कारणा-वरून कालिदासाचा राग आला आणि त्याला रामगिरी पर्वतप्रदेशात जाऊन रहायला विक्रमादित्याने सांगितले. तेथेच आख्यायिकेप्रमाणे कालिदासाने आपले सुप्रसिद्ध 'मेघसंदेश' महा काव्य लिहिले. त्यानंतर राजा कालि-दासाची मैत्री विसरू शकला नाही आणि त्याला दरबारात बोलावून त्याने त्याचा योग्य सत्कार केला.

# हेंच तें खोटें!

एक राजा विनोदप्रिय होता. त्याच्या दरबारात विदूषकाला फार मोठा मान मिळे. म्हणून दरबारी पंडित रामशर्माचा जळफळाट होई. त्यांना हे पाहून आश्चर्य वाटे की विद्वत्ताशून्य असूनही विदूषकाला दरबारात एवढा मान का ?

एके दिवशी राजाने जाहीर केले की जो दरबारी सर्वांत मोठे खोटे बोलेल त्याला इनाम दिले जाईल. सर्वात मोठे खोटे काय याचा निर्णय देण्याची जबाबदारी राजाने विदूषकावरच टाकली.

सर्व दरबारी आपापल्या परीने खोटे बोलले. काहीजण म्हणाले–"आम्ही पांढरे कावळे पाहिले आहेत." काही जण म्हणाले–"आम्ही माणसांना आकाशात उडताना पाहिले आहे." सर्व खोटे बोलले हे कपाळाला आंठ्या घालून पहात बसलेल्या रामशर्मांना पाहून विदूषकाने विचारले–"महाकवी ! आपणही या स्पर्धेत भाग घेणार का ?"

रामशर्मा चिडून म्हणाले–"आमच्या वंशात कोणी कधी खोटे बोललेच नाही. ते आमच्या रक्तातच नाही. खोटे काय हेच आम्हांला माहीत नाही !"

विदूषक राजाकडे वळून म्हणाला–"महाराज ! खोटे बोलण्याचे इनाम रामशर्मांनाच द्यावं !"

सर्व दरबारी खदखदा हंसत टाळ्या वाजवू लागले.





# तुरटी-खडीसाखर

अच्युतला तालुक्याच्या गावी मामलेदाराच्या कचेरीत नोकरी लागली. त्याने भाड्याने एक घर घेऊन बिऱ्हाड थाटले. तो घरून कचेरीत जाई त्या वाटेवर एक कौलारू घर होते. त्या घराच्या ओसरीत सुमारे पन्नास वर्षांची एक विधवा बाई बसलेली दिसे. ती अच्युतकडे आत्मीयतेने पहात असे.

एक दिवशी संध्याकाळी ती देवळातून घरी परत येत होती. वाटेत तिला अच्युत भेटला. ती त्याला म्हणाली–"मुला, ही घे खडीसाखर! देवाचा प्रसाद आहे. डोळ्यांना लावून खा बरं!" असं सांगून तिने खडीसाखर अच्युतच्या हातात दिली.

अच्युतने ती खडीसाखर तोंडात टाकली त्यानंतर ती बाई त्याला म्हणाली–"बाबा रे, तुला पाहिले की मला माझ्या धाकट्या भावाची आठवण होते. तो शेजारच्या गांवचा कुळकर्णी आहे. परंतु त्याचं आणि माझं पटत नाही. माझा त्याच्यावर किती जीव आहे!" असे म्हणत त्या बाईने डोळ्याची टिपे पदराने पुसली.

त्या बाईचे नाव होते ठकूबाई. तिने आपली रडकथा सांगितली. म्हणाली–पांच वर्षां पूर्वी माझं कुंकू पुसलं गेलं. मला मूलबाळ नाही. आपला म्हणून एकुलता एक भाऊ होता. माझं कपाळ फुटलं त्या दिवसापासून मी आपल्या धाकट्या भावाकडे मोलकरणीसारखी राबले. परंतु माझ्या भावजयीने माझ्याशी नेहमी दुष्टावा ठेवला. ती माझ्या विरुद्ध नवऱ्याचे कान भरी. माझा भाऊ मला मारायला धावायचा. सर्व सहन करून मी आपल्या भावाकडेच पडून रहात होते. परंतु दोन वर्षांपूर्वी त्याने मला घराबाहेर

श्री ओ. दि. बोराळे

काढलं. त्या दिवसापासून परगावी येऊन राहते आहे!

ठकुताई आपली रडकथा सांगून म्हणाली–"बाबारे, मला एकट्याने जगणं नकोसे वाटू लागलं आहे. त्याने मला घराबाहेर काढले तरी मी त्याला कशी विसरेन? तुला पाहून मला त्याची आठवण होते. तू मधून मधून माझ्याकडे येऊन भेटत जा. माझ्या मनाला हलकं वाटेल. मी आपलं दुःख विसरेन." असे म्हणत तिने आपले डोळे पुसले.

अच्युतला ठकूताईची कीव आली. एकटी आहे बिचारी! तो म्हणाला–"ताई, मी येत जाईन बरं का मधून मधून!"

ते उत्तर ऐकून ठकुताईंना परमानंद झाला. तिने अच्युतला बसायला सांगून भरभर सैंपाक केला आणि खूप आग्रह करून त्याला जेवायला वाढले. त्या दिवसापासून अच्युत ठकुताईच्या घरी येऊ जाऊ लागला. ती सुद्धा अच्युतच्या घरी जाऊ येऊं लागली. तो कचेरीत गेला म्हणजे ठकुताई झाडलोट करी व कपडे धुऊन टाकून रात्रीचा सैंपाक करून ठेवी.

एके दिवशी रात्री अच्युतच्या दारावर कोणीतरी थाप दिली. अच्युतने दार उघडले तर समोर ठकुताई थरथर कापत उभी असलेली दिसली.



त्याने घाबऱ्या स्वरात विचारले–"ताई! काय हो झाले? अशा घाबऱ्या गुबऱ्या कां?" म्हणत तो घरात आला.

ठकुताईसुद्धा पाठोपाठ घरात आली. तिने त्या रात्री घडलेली एक गोष्ट सांगितली. म्हणाली–"रात्री माझा नुकताच डोळा लागला होता. बाहेर कोणीतरी चालत असल्याची चाहूल आली. मी खिडकी उघडून बाहेर पाहिले. माझ्या परसातली झाडे चरत असलेली एक म्हैस मला दिसली. मी दार उघडले व म्हशीला बाहेर काढून दार बंद करणार इतक्यात एक काळाकभिन्न माणूस एक सुरा दाखवून म्हणाला–"गळ्यातली माळा व



हातातले बिलवर काढून दे, ओरडलीस तर हा सुरा पहा!

"इतक्यात मुदैवाने गस्त घालणारा शिपाई त्या बाजूला आला. चोर दातओठ चावून माझ्याकडे डोळे वटारून पहात म्हणाला—"तू या वेळी वांचलीस. पण तुझे दागिने मी सोडणार नाही." आणि पसार झाला. मी घाबरून गेले. मला काय करावे कळेना. मी त्या शिपायाच्या पाठोपाठ चालत तुझ्याकडे आले आहे.

"आणि हे पहा, हे दागिने माझ्या आईचे आहेत. माझा भाऊ माझ्या पाठीस लागला आहे की मला म्हातारीला आणि या वैधव्यावस्थेत ह्या दागिन्यांची गरजच काय? भावजयीला कां नाही देत? पण आतां तूच विचार कर, म्हातारपणी जगायला माझ्याजवळ दुसरं आहेच तरी काय? यातलाच एक एक दागिना विकून मला दिवस काढावे लागणार आहेत आणि माझे प्रेत जाळायला लाकडांचा खर्च आहेच की!" असे सांगून ठकुताईने तिची सोन्याची माळा, पाटल्या व इतर दागिने अच्युतला दिले.

एका आठवड्यानंतर ठकुताई पुन्हां येऊन म्हणाली—"अरे बाबा! चोराच्या भीतीने तर मला रात्री झोपच येईनाशी झाली आहे. मी ते दागिने आपल्या भावाकडेच नेऊन ठेवावे म्हणते."

अच्युतने दागिने परत करण्यासाठी पेटी उघडून पाहिली तर सर्व दागिने नाहीसे झाले होते. दागिने न मिळालेले पाहून ठकूताई रडू लागली व म्हणाली—"त्या चोराने म्हणाल्यासारखं केलं. ते दागिने तीन हजार रुपयांचे होते. माझ्या धाकट्या भावाला हे कळलं तर तो माझा जीव घेईल. त्याच्या डोक्यावर कां हे पाप येऊ द्यायचं, मीच विहिरीत उडी टाकते." असे म्हणत ठकुताई आपल्या घरी निघून गेली.

अच्युत विचारात पडला, इतकी मोठी रक्कम आणायची कोठून? तो जास्त विचार करीत न राहतां सरळ ठकुताईच्या भावाकडे गेला आणि सर्व वृत्तांत थोडक्यात



सांगून नम्रपणे म्हणाला—"दादा! हे सर्व माझ्या निष्काळजीपणाचे फळ आहे. तुम्ही मेहेरबानी करून आपल्या अक्कांवर राग काढू नका. मी दागिन्यांची सर्व किंमत हप्त्याहप्त्याने फेडीन."

तो कुळकर्णी सर्व ऐकून घेतल्यावर खदखदां हसून म्हणाला—"आमच्या अक्काची कल्पनाशक्ती तिच्या वयाबरोबर वाढत चालली आहे. तुम्हांला तिच्या स्वभावाची ओळख झालेली नाही!"

त्यानंतर त्याने आपल्या बहिणीचे पूर्वचरित्र या शब्दात सांगितलं:

"अहो, लहानपणापासूनच तिला चोरी करण्याची वाईट संवय आहे. आमचे मेहुणे वारल्यानंतर दोन वर्षे ती आमच्या घरी होती. तिने आम्हांला खूप त्रास दिला. घरातल्या वस्तू ती चोरून न्यायची. खायच्या प्यायच्या वस्तू सुद्धा चोरून नेऊन विकायची. माझ्या मुलांना विनाकारण मारायची. खोटे बोलून आम्हां नवराबायकोचे भांडण लावायची. मी दोन वर्षे सर्व पहात राहलो. शेवटी आपल्या घरची लाज राखण्यासाठी मी आमच्या अक्काला घरातून काढलं. मी तिला घरखर्चासाठी दर महिन्याला पैसे पाठवितो. तरी माझ्या विरुद्ध तक्रारी ती शेजारपाजारच्या लोकांकडे करतेच आणि इतरांची सहानुभूती मिळवून शेवटी त्यांना देखील फसविते. तुमच्याकडून तीन हजार रुपये काढून घेण्यासाठी तिने हे सर्व नाटक केले आहे. तुम्ही सर्व घर तिच्या विश्वासावर टाकलेत, तिचा गैरफायदा तिने घेतला. तिनेच ते दागिने चोरले आणि ते दागिने सोन्याचे कोठून असणार? सर्व नकली असणार! तिला चांगला धडा दिला पाहिजे. मी सांगतो तसं करू या." असे सांगून ठकुताईच्या भावाने अच्युतला आपली युक्ती सांगितली.

अच्युत घरी आल्यावर ठकुताईने त्याला विचारले—"काय रे बाबा! कळलं का काही दागिन्यांविषयी?"

"ताई, मी तुमच्या भावाच्या गावाला जाऊन आतांच येतो आहे. त्यांनी सांगितलं की दागिन्यांची किंमत तीन हजार नाही, चांगली पांच हजार आहे. मी नाइलाजाने तुमच्या भावाला पांच हजार देऊन आपला गळा सोडवून आलो आहे." अच्युत म्हणाला.

ठकुताई अच्युत म्हणाला ते ऐकून 'आ' वासून पाहू लागली. ती आपल्या भावाच्या गावी जाऊन त्याच्यावर खिसकावून ओरडली–"लबाडा, त्या नकली दागिन्यांची किंमत पांच हजार आहे का? माझ्या हातात येणाऱ्या पैशावर तू गिधाडासारखी झडप मारलीस का? मला मुकाट्याने ते पैसे दे, नाहीतर मी तुला सोडणार नाही!"

"वा ग वा अक्का! तू माझ्या घरात पाऊल टाकतांच माझ्या डोक्यावर लाखोली वाहते आहेस का? तू मोठी आहेस म्हणून मला रागावण्याचा तुला अधिकार आहे. परंतु काय ग? तू या वयात हे धंदे करू लागलीस तर मेल्यावर भूत होशील. तू आमच्या घरी येऊन रहा आणि देवाचं नाव घे!" ठकुताईच्या धाकट्या भावाने तिला सांगितले.

ठकुताईच्या पाठोपाठ बैलगाडीत बसून अच्युत आला व सर्व ऐकून म्हणाला– "ठकुताई, मी तुम्हांला मोठी बहीण म्हणून मानलं, परंतु मला त्याची आज लाज वाटते आहे. तुम्ही माझाच गळा कापायला निघाला होतां!"

अच्युतच्या तोंडी ते सर्व ऐकून ठकुताई मान खाली करून गप्प उभी राहिली.

ठकुताईचा भाऊ अच्युतला म्हणाला– "बाबा रे, अजून तुला जगाचा अनुभव नाही. ही पहिलीच ठेच आहे. थोडा सावध रहा. तुरटी आणि खडी साखरेतला फरक नुसतां पाहून कळत नाही, तोंडात खडा टाकल्यावरच कळतो. माणसातसुद्धा तुरटी व खडीसाखरेसारखी माणसे असतात. सावधपणे माणसाची पारख करावी लागते.



# म्हशा जमिनदार

एका चिक्कू जमिनदाराच्या घरी जाऊन एका उपाशी भुकेल्या भिकाऱ्याने भीक मागितली. जमिनदाराने आपल्या नोकरांना सांगून त्या भिकाऱ्याला गर्दन्या देऊन परासमोरून बाजूला ढकलवले. म्हणून रागाने तो भिकारी नोकरांना म्हणाला–"तुमचा जमिनदार माणूस आहे की म्हशा?"

जमिनदाराने ते ऐकले व रागाने त्याने फिर्याद केली. न्यायाधिशाने भिकाऱ्याला बोलावून विचारले–"काय रे तू जमिनदाराला 'म्हशा' म्हणालास?"

भिकाऱ्याने आपला गुन्हा कबूल केला. म्हणून न्यायाधिशाने त्या भिकाऱ्याला दहा दिवसाचा तुरुंगवास भोगायची शिक्षा केली.

भिकाऱ्याने न्यायाधिशाला विचारले–"प्रभो, आपण जमिनदार साहेबांना 'म्हशा' म्हणणे गुन्हा आहे, म्हणालात, पण मी रेड्याला जमिनदार म्हटलं तर गुन्हा होईल का?"

"त्यात काही गुन्हा नाही!" न्यायाधीश म्हणाला.

"बरं तर मी येतो, जमिनदार साहेब!" भिकारी शिपायांबरोबर जात जमिनदाराला म्हणाला.





# दोन वस्ताद

हारून अल रशीद जेव्हां बगदादचे खलीफा होते. तेव्हां राज्यात सर्वत्र कबुतरांद्वारे टपालाची नेआण होत होती. ती टपाल व्यवस्था करणारा एक हुशार व योग्य व्यक्ती होता. खलीफा त्याला दरमहा एक हजार रुपये पगार देत होते.

पुढे काही दिवसांनी तो मरण पावला, म्हणून कबुतरांद्वारे टपालाची व्यवस्था बंद झाली. ती व्यवस्था चालू असतां खलीफाने त्या कामासाठी चाळीस निग्रो, चाळीस शिकारी कुत्री व कबुतरे दिली होती. त्यांना खलिफाने बोलावून घेतले.

कबुतरांद्वारे टपाल व्यवस्था पाहणाऱ्या अधिकाऱ्याला जीनाब नावाची मुलगी होती व त्याच्या बायकोचे नाव दिलैला असे होते. दिलैलाने खलीफाकडे निरोप पाठविला की तिला कबुतरांद्वारे टपाल व्यवस्था चालू ठेवण्याची माहिती आहे, म्हणून तिच्या नवऱ्याच्या जागी टपाल व्यवस्था चालू ठेवण्याचे काम तिला देण्यात यावे व पगार तोच बहाल करण्यात यावा. परंतु खलीफाने तिचा अर्ज नामंजूर केला.

ही घटना घडली त्यानंतर काही दिवसांनी खलीफाने अहमद व हसन नांवाच्या दोघां अट्टल दरोडेखोरांना कोतवाल नेमले. त्या दरोडेखोरांना पकडण्याच्या कामी खलिफाला कधीच यश मिळाले नव्हते. म्हणून खलिफाने विचार केला की चोरी अट्टल चोरांनाच कोतवाल म्हणून नेमले तर चोरांना पकडणे जास्त सोपे जाईल. दिलैलाला जेव्हां कळले की तिचा अर्ज खलिफांना नामंजूर केला आणि दोघां दरोडेखोरांना कोतवालासारख्या उच्च पदावर नेमले तेव्हां तिला भयंकर राग आला. ती आपली मुलगी जीनाबला म्हणाली–"या राज्यात चोराभामटयांना उच्च पदांवर नेमून त्यांचा गौरव होत आहे तर आपणच नालायक ठरलो का? दाखवून देऊ की अहमद आणि हसन दोघे आपल्यासमोर कुचकामाचे आहेत."

तशी दिलैला म्हातारीच होती. परंतु फार हुशार व कर्तबगार होती. तिची मुलगी जिनाबसुद्धा आईहून कोणत्याही प्रकारे कमी नव्हती. आईने केलेली प्रतिज्ञा ऐकून तिला परमानंद झाला.

दिलैलाने बगदाद शहर हालवून सोडायचे आपल्या मनाशी ठरविले. तिने एके दिवशी गळ्यात फकिरांसारख्या जपमाळा घातल्या, तोंडावर बुरखा घातला आणि हातात सूफी फकिरांसारखा झेंडा घेऊन सूफी फकीरणीसारखी घरातून बाहेर पडली.



बगदादच्या नागरिकात मुस्तफा एक प्रमुख नागरिक होता. तो खलिफाच्या रक्षकदलात एक होता. त्याला पगारही तसा मोठाच होता. त्याचे घर म्हणजे एक मोठी हवेलीच होती. हवेलीची दारे खिडक्या चंदनी होत्या आणि दारांना चांदीची कुलपे होती. त्याची बायको फार सुंदर होती आणि राजधानीतल्या सुंदर स्त्रियांत तिची बरोबरी करणारी दुसरी स्त्री नव्हती. तिचं वयही कमी होते. तिचे नाव होते खातून. मुस्तफा तिच्या सौंदर्यावर आपला जीव ओवाळून टाकायला तयार होता. म्हणूनच त्याने तिला मूळबाळ काही झाले नाही तरी दुसरे लग्न केले नव्हते.

खातून स्वतः नेहमी अन्यमनस्क रहात असे. नवऱ्याला मूल नसल्याचे फार दुःख होत आहे हे तिला चांगले माहीत होते. म्हणून तिने हकिमांकडून निरनिराळी औषधे घेतली व मंत्रतंत्र करविले, परंतु एकाचाही उपयोग झाला नाही.

दिलैला सूफी फकीरांचा वेष करून अल्लाचे नाव घेत बगदाद शहराच्या गल्लोगल्लीत फिरत होती. तिने मुस्तफाच्या घरासमोर आल्यावर घरात डोकावून पाहिले, हवेलीच्या एका खिडकीसमोर



दागदागिन्यांनी मढलेली खातून उभी होती. ती नव्या नवऱ्यामुलीसारखी दिसत होती.

दिलैलाने मनात विचार केला की या सुंदर गृहिणीला पळवून नेऊन तिचे सर्व दागिने लांबविले नाहीत तर मी नावाची दिलैला नाही. दिलैलाला पाहून खातूनला वाटलं की ही फकीरीण काहीतरी मंत्र, अंगारा किंवा ताईत देऊन आपल्याला मूल देईल. लगेच तिने एका गुलाम स्त्रीला पाठवून दिलैलाला बोलावून घेतले. दिलैला वाटच पहात होती.

दिलैलाने घरात पाऊल टाकतांच खातून तिच्या पायां पडली व मन मोकळं करून खूप रडली.

दिलैलाने तिच्या मनाचे सांत्वन या शब्दात केले—"बेटा, हा काही मोठा प्रश्न झाला? या शहरातच संतान देणारा एक फकीर आहे. तू त्याच्या दर्शनाला जाऊन तर पहा, तुझी मनोकामना पूर्ण होईल!"

खातून म्हणाली—"मी या हवेलीचा उंबरठा कधी ओलांडला नाही."

"तू माझ्याबरोबर चल, मी तुला त्या फकिराकडे घेऊन जाईन. तुझा नवरा घरी परत यायच्या आत तुला घरी परत पोचती करीन." दिलैलाने समजावून सांगितले.

खातूनला परमानंद झाला की तिला फकिराचं दर्शन घडल्यावर मुलगा होणार. तिने अंगावर आणखी चार सुंदर दागिने घातले व दिलैलाबरोबर निघाली.

थोड्या अंतरावरच सिद्दी मोहसिनचे दुकान लागले. तो एक सुंदर तरुण होता व त्याचे लग्न झालेले नव्हते. त्याला पाहतांच दिलैलाच्या मनात एक विचार आला. तिने खातूनला बाहेर ओटयावर बसविले व ती मोहसिनच्या दुकानात शिरली.

मोहसिनला ती म्हणाली—"हे पहा मुला! बाहेर ओटयावर बसलेली मुलगी माझीच मुलगी आहे." तुझ्यासारख्या होतकरू सुंदर तरुणाशी मी तिचे लग्न करून द्यावे म्हणते आहे. तिच्या बापाने व्यापार करून पैसे मिळवून ठेवले आहेत. मी तू मागशील तो हुंडा देईन. तुला अशी आणखी दोन दुकाने काढतां येतील.

मोहसिन खूष होऊन म्हणाला—"मला मान्य आहे, पण लग्न केव्हां होणार?"

"माझ्याबरोबर आलास तर आजच निकाह उरकून टाकू." दिलैला म्हणाली. तेव्हां मोहसिन एक हजार दीनार एका पिशवीत घेऊन दिलैलाच्या पाठोपाठ निघाला.

त्यानंतर दिलैला खातून व मोहसिन दोघांना घेऊन पुढे निघाली. वाटेवर रंगारी हाजी मोहंमदचे दुकान होते. दिलैलाने मोहसिन व खातून दोघांना बाहेर उभे केले व आत जाऊन मोहंमदला म्हणाली—"हे पहा रे, बाहेर उभे आहेत ते माझा मुलगा व मुलगी आहेत. माझं घर पडायला झालं आहे. म्हणून मी घराची दुरुस्ती करवीत आहे. म्हणून तुझ्या ओळखीपैकी कोणाचे घर रिकामे असेल तर आम्हांला रहायला दे."

मोहंमद थोडा वेळ विचार करून म्हणाला—"माझ्या घराचा वरचा मजला तूर्त रिकामा आहे. चार आठ दिवसांकरितां पाहिजे तर तुम्हांला तेथे रहायला हरकत नाही." असे सांगून मोहमदने किल्ली दिली.

दिलैला खातून व मोहसिनला घेऊन हाजी मोहमदच्या घरी गेली. खालची खोली उघडून देऊन मोहसिनला खुणेने म्हणाली की त्याने त्या खोलीत जावे. त्यानंतर खातूनला वरच्या मजल्यावर घेऊन जाऊन म्हणाली—"मुली, तो फकीर याच घराच्या खालच्या मजल्यावर राहातो. मी त्याला भेटून आलेच! तू आपले सर्व दागिने काढून एका बोचक्यात बांधून ठेव आणि फकीर साहेबांच्या दर्शनाला जायला तयार हो. त्यांच्यासमोर दागिने अंगावर घालून जाणे फार मोठा अपराध आहे, त्यांना ते आवडत नाही!" असे सांगून दिलैला जिना उतरून खाली आली. तिला पाहून मोहसिनने विचारले—"अम्मा! लग्नाविषयी बोलणी करून घ्यायची का?"



दिलैला रडक्या स्वरात म्हणाली–"बेटा, कोणीतरी दुष्टाने तुला कोड असल्याचे सांगून तिचे मन तुझ्या विरुद्ध फिरविले आहे. तिने तुझ्याशी लग्न करायला ती तयार नसल्याचे मला सांगितले. म्हणून तू अंगारखा काढून बैस. मी आपल्या मुलीला घेऊन येते व तिची खात्री करून देते. तुझ्या हातातली ती पिशवी माझ्याकडे दे! मी वर सुरक्षित जागी ठेवून देते."

मोहसिनला दिलैला म्हणाली ते सर्व खरे वाटले व एक हजार दीनार भरलेली पिशवी आणि अंगरखा तिला दिला. ते घेऊन दिलैला वरच्या मजल्यावर गेली व खातूनला म्हणाली–"मुली! फकीरसाहेब! तुझी वाट पहात आहेत. तुझं भाग्य उजळलं म्हणून समज. तू खाली उतरून जा. मी तुझ्या दागिन्यांचे गाठोडे सुरक्षित जागी ठेवून येते."

खातून उतरून खालच्या मजल्यावर गेली. तिच्या पाठोपाठ दिलैला दीनार भरलेली पिशवी व दागिन्यांचे गाठोडे घेऊन आली आणि सरळ घराबाहेर निघून गल्लीत शिरली.

खातून दिलैलाने सांगितल्याप्रमाणे खाली उतरून खोलीत गेली. तेथे तिला मोहसिन दिसला. तो खातूनला म्हणाला–"तू पाहून खात्री करून घे अंगावर तुला कोठे कोडाचे डाग दिसतात का?"

खातूनला काहीच कळेना. ती घाबरून गेली आणि वरच्या मजल्यावर धावली. परंतु तेथे ती सूफी फकीरीण नव्हती व तिच्या दागिन्यांचे गाठोडेसुद्धां नव्हते.

मध्यंतरी दिलैला पिशवी व गाठोडे एका ओळखीच्या दुकानात नेऊन ठेवले व हाजी मोहंमदकडे जाऊन म्हणाली–"तुमचं घर सोयीचं आहे. तुमचे उपकार मी विसरणार नाही. माझी दोघं मुलं उपाशी बसली आहेत. जातांना त्यांच्यासाठी काहीतरी खायला घेऊन जा. मी सामान घेऊन यायला घरी जाते. हा घ्या एक दीनार. माझ्या मुलांबरोबर तुम्हीसुद्धां थोडे खाऊन घ्या." दिलैला म्हणाली. (क्रमशः)





# गणेश पुराण

सत्य लोकात कमलासनावर बसून दिवसभर सृष्टी करण्याचे काम करीत राहल्याने ब्रह्मदेव दमून गेला आणि कल्पांत जवळ येताच ब्रह्मदेव पेंगू लागला. डोळ्यावर झोप आली असतां तो जांभया देऊ लागला. तेव्हां पर्वत शिखरे दुभंगून जाऊ लागली व त्यांतून अग्निज्वाळा बाहेर येऊ लागल्या. त्याला झोप लागण्याच्या सुमारास त्याचे डोळे थोडे पाणावले तेव्हां आकाश प्रळय काळातल्या ढगांनी व्याप्त झाले आणि हत्तीच्या सोंडेसारखी पावसाची संततधार सुरू झाली आणि चतुर्दश लोक पाण्याखाली बुडून गेले. पापण्यांवर झोपेचे ओझे असल्याने त्या थरथर कापत होत्या. सर्वत्र प्रळय काळातला अंधःकार पसरला.

असा प्रळय सुरू झाल्यावर ब्रह्मदेव झोपला. प्रळयकाळ म्हणजे त्याची रात्र. पुन्हां कल्पान्त प्रारंभ व्हायची वेळ जवळ येऊन ठेपली. नव्या जगतावर प्रकाश येण्याच्या पुण्यसमयी सरस्वतीने वीणेचे तार स्वरात लावले व त्यांवर बोटे फिरवीत भूपाळी म्हणू लागताच ब्रह्मदेवाला जाग आली.

तो पद्मासन घालून बसला व आपल्या चारही मुखांनी त्याने चतुर्दिक नजर फिरवून पाहिली.

खालचे सर्व जगत जलमग्न झाले होते. मोठमोठ्या पर्वताकार लाटा येत होत्या. त्या लाटांच्यावर एका जागी शुभ्र कांतिरेखा दिसत होती. त्या प्रकाशात लाटांवर तरंगत



असलेल्या मोठ्या वटपत्रावर चंद्रासारखा एक सुंदर शिशू पहुडला होता व तो आपल्या उजव्या पायाचा अंगठा चोखत असलेला दिसला.

ब्रह्मदेव हात जोडून डोळे मिटून क्षणभर ध्यानमग्न झाला. डोळे उघडून पाहतो तर त्याला विचित्र दृश्य दिसले.

तो शिशू आणखी दुसरा कोणी नसून विश्वविराट स्वरूप परब्रह्मच असल्याचे ब्रह्मदेवाला खात्रीपूर्वक वाटले. परंतु या वेळी त्या शिशूचे डोके हत्तीसारखे होते व तो आपल्या लहानग्या सोंडेने आपला उजवा पाय धरून तोंडात घालीत असल्यासारखा दिसला.

त्याचे ते स्वरूप प्रसन्न होते. तो शिशू चंद्रकांतीसारखा प्रकाशित होत होता. त्याला चार हात होते. ब्रह्मदेव त्याच्याकडे आश्चर्यचकित होऊन पहात असतां एकाएकी तो शिशू वटपत्रासह अदृश्य झाला व त्या जागी मातीची एक उंच टेकडी दिसू लागली.

क्रमाक्रमाने पाण्यातून विशाल भूभाग वर आला आणि महासागर निर्मित झाले.

ब्रह्मदेवाने पुन्हां सृष्टीची निर्मीती करण्याचे ठरविले. सर्व प्रथम पर्वत व नद्या यांची सृष्टी व्हावी यासाठी संकल्प करून त्याने कमंडलातून पाणी घेतले व जगतावर प्रोक्षण केले. त्यानंतर वृक्ष वनस्पती, धान्य व खनिज निर्मितीसाठी संकल्प सोडला. त्यानंतर प्राण्यांची सृष्टी करायचे ठरवून क्रमाने सर्वप्रथम समुद्रात माशांची, जमिनीवर जीवजन्तू, कृमीकीटक व पक्ष्यांची सृष्टी केली. त्यानंतर मानव सृष्टी करायचे ठरवून कमंडलातले पाणी घेऊन प्रोक्षण केले.

इकडे ब्रह्मदेव सृष्टीची निर्मिती करण्यात गुंतला होता, त्या वेळी तिकडे सरस्वतीचे वीणावादन चालू होते. परंतु कां कोणास ठाऊक वीणेतून सर्व अपस्वरच निघत होते. सरस्वती थक्कच झाली व खाली पाहू



लागली आणि आणखी जास्तच थक्क झाली. ब्रह्मदेवाने आश्चर्यचकित झालेल्या अर्धांगीकडे पाहिले. परंतु ती चकित कां झाली हे त्याला कळले नाही. म्हणून त्याने खाली वाकून पाहिले.

सर्व पर्वत लोळत असलेले व पर्वत शिखरे उलटी पुरल्यासारखी व त्यांचा पाया वर पसरलेला होता व सूर्यकिरणांना छत्रीसारखा अडवीत असलेला दिसला. नद्या समुद्राकडून उंच प्रदेशाकडे वहात असलेल्या दिसल्या. वृक्ष वनस्पती उलटे आकाशाला आपल्या मुळांच्या पायांनी लाथा मारीत होते.

समुद्राच्या लाटांवर जलचर प्राणी तरंगत बेडकासारखे उड्या मारीत होते. काही जागच्या जागी उभे होते तर काही पक्ष्यांसारखे उडत होते.

कित्येक प्राणी विचित्र स्वरूपात निर्मिले गेले होते. काहींना डोकीच नव्हती, तर काहींना मागचे पायच नव्हते. काहींना एकच एक पाय होता तर काहींना तीन पाय होते. काहींना डोळे, कान वगैरे सर्व होते पण तोंडच नव्हते, काहींच्या शेपटीलाच तोंड होते तर काहींच्या डोक्यालाच शेपटी होती. पक्ष्यांना पंखच नव्हते. काहींना चालायचे झाले तर पाय नसल्यामुळे लोळणे आवश्यक होते.

ब्रह्मदेव ते सर्व पाहून गोंधळून गेला व आपली सर्वोत्तम सृष्टी मानव सृष्टी कशी आहे हे आतुरतेने पाहू लागला. तेव्हा





त्याला काही मनुष्य दोन डोकी असलेले दिसले. त्यात एक डोके स्त्रीचे होते तर एक पुरुषाचे.

पुरुष हातभर किंवा वीतभर उंचीचे होते तर बायका मोठ्या हत्ती एवढ्या लठ्ठ व ताडाच्या झाडाएवढ्या उंच होत्या. काहींना पाठीला तोंडे चिकटविलेल्या-सारखी होती तर काहींना चार, तीन किंवा एकच पाय होता. पोटालाच मोठे तोंड असलेले काही कबंध आक्रंदन करीत असलेले दिसले.

प्राणी तोंडे वर करून असहाय अवस्थेत दीन वाणीने ओरडत होते. ब्रह्मदेवाची निंदा करीत असल्यासारखे तडफडत आदळआपट करीत असल्यासारखे दिसत होते.

एक हातभर उंचीचा माणूस ताडा-एवढ्या एका विकृत आकृतीच्या बाईकडे बोट दाखवून आकाशाकडे पहात ओरडत होता–"अरे ब्रह्मदेवा! मी अशा बायकोसह संसारसागर कसा तरून जाणार?"

विकृत आकारवाले काही लोक आक्रोश करून रडत ब्रह्मदेवाची निंदा करीत होते–"अरे चार डोकी असूनही खरे डोकेच नसलेल्या व डोक्यात मेंदू नसलेल्या ब्रह्मदेवा! आमची अशी सृष्टी कां केलीस रे?"

तो सर्व आक्रोश ऐकून ब्रह्मदेवाची चारही डोकी गरकन फिरल्यासारखी झाली. आठही डोळ्यांना अंधेरी आल्यासारखे झाले. ब्रह्मदेव किंकर्तव्यविमूढ होऊन सर-स्वतीकडे पाहू लागला. त्याची चारही तोंडे पांढरी फट्ट पडलेली पाहून सरस्वती स्मित करून त्याच्याकडे पाहू लागली. परंतु बोलली मात्र नाही.

"असं कां बरे झालं? नियमितपणे सृष्टीची कार्ये चालू व्हावीत यासाठी मी सत्संकल्प करूनच तर सृष्टीची पुनर्रचना सुरू केली होती? मग असं कां बरं व्हावं?" असं स्वतःशीच मोठ्याने बोलत ब्रह्मदेव चारही डोक्यांनी वर आकाशाकडे



पहात जोराने उच्चारला. त्याचा तो आवाज दशदिशात दुमदुमला.

किंकर्तव्यविमूढ अवस्थेत चारीबाजूला पहात असलेल्या ब्रह्मदेवाला एक अत्यंत उज्वल मूर्ती दिसली. त्या मूर्तीला हत्तीचे डोके होते. चार हातात क्रमाने पाश, अंकुश, कलश व परशु धारण केले होते त्या गजाननाने. पूर्णचंद्रासारखी सौम्य कांती होती त्याची. त्याच्या खांद्यावरचे पांढरे शुभ्र उपरणे आकाशात फडफडत उडत होते.

तेव्हां सरस्वतीने आपल्या वीणेवर 'ओंकार' नाद केला. सरस्वतीची बोटे वीणेवर चालू लागली व नादनामक्रिया रागाचे स्वर आसमंतात तरळू लागले. नंतर ते भैरव रागात बदलून हंसध्वनि रागात प्रवेश करते झाले. गजानन रूपात ब्रह्मदेवाला त्या मूर्तीचा साक्षात्कार झाला. वटपत्रावर ती बालगणेशाची मूर्ती अभय-हस्ते उभी राहून ब्रह्मदेवाला अभयदान दान देत होती. त्या मूर्तीच्या चौफेर शरद् पौर्णिमेच्या चांदणीसारखे ज्योतिर्वलय होते.

ब्रह्मदेवाचे हात आपोआप जोडले गेले व म्हणाला–"प्रभो, या अद्भुत स्वरूपात तू कोण आहेस? तुला ओळखू न शकण्या इतका मी अज्ञानी आहे. म्हणून आता अनुग्रह कर!"



"बाबा रे, ब्रह्मदेवा! संकल्पापाठोपाठ विकल्प येत असतो. त्यालाच विघ्न म्हण-तात. विघ्नांचे हरण करून संकल्पपूर्ण करणारा मी विघ्नहर्ता आहे! विघ्नांचे नायकत्व करणाऱ्या विकल्पाचा मी माझ्या परशूने नाश करून प्रत्येक कार्य पूर्णकुंभवत यशस्वी करणारा मी विघ्नविनायक आहे! पृथ्वी, आप, तेज, वायू व आकाश नावाची जी पंच महाभूते आहेत त्या भूत गणांचा अधिपती मी गणपती आहे! आहार धान्यांची पिके नष्ट करणाऱ्या मदोन्मत्त हत्तीसारख्या विघ्नांना मी आपल्या अंकुशाने आपल्या काबूत ठेवून आपल्या पाशाने बांधून ठेवतो. म्हणून तू मला विघ्नहर्ता गणेश



या नावाने हाक मारीत जा!" विघ्ननायक गणेशाची अशी गंभीर वाणी झाली.

तेव्हां ब्रह्मदेव म्हणाला—"हे विघ्ननाशा गणाधिपा! माझ्या सृजनशक्तीला अशी भयंकर विघ्ने कां आली? ही सर्व सृष्टी अशी विकृत कां झाली? उत्तम सृष्टी कशी होईल हे सांगण्याचा अनुग्रह कर!"

"विघ्नांची तुला कल्पना असावी म्हणूनच हे सर्व झालं. वटपत्रावर बाल-गणपति रूपे प्रगट झालेला मीच तो वटपत्रशायी गणपती होतो. त्या वेळी तू माझ्याविषयी काहीच विचार केला नाहीस. माझा विचार करणे म्हणजेच विघ्नाविषयी प्रथमच सावध राहण्याचे ज्ञान असणे होय! ते ज्ञानस्वरूपच मी आहे! ब्रह्मदेवापासून सर्व प्राणिमात्रांपर्यंत प्रत्येकाने कार्यारंभ करण्यापूर्वी निर्विघ्नपणे कार्यसिद्धी व्हावी या साठी योग्य ती सावधगिरी व ज्ञान ठेवणे आवश्यक आहे! हत्ती कोठेही पाय ठेवण्यापूर्वी जमीन आपले वजन पेलण्या इतकी घट्ट आहे की नाही हे पाहातो. प्राण्यांत आपल्या आकाराइतकाच हत्ती हा प्राणी थोर बुद्धीचा असतो. हत्तीसारखी बुद्धी असावी ही सूचना देण्याच्या हेतूनेच मी गजानन रूप धारण केले आहे. तू झोपला होतास तेव्हां सोमकासुर नावाच्या राक्षसाने तुझे चार ही वेद चोरून नेऊन समुद्राच्या बुडाजवळ लपवून ठेवले. विष्णूने मत्स्यावतार धारण करून त्या राक्षसाचा संहार केला आणि मी वटपत्रावर पहुडलो असतां माझ्याजवळ आणून ते वेद ठेवले. ते वेद आणि सृष्टीची कार्ये चालू ठेव." हे घे असे सांगून विघ्नहर्त्या गणेशाने ब्रह्मदेवाला वेद दिले.

ब्रह्मदेवाने ते घेतले व परमानंदाने विघ्नहर्त्याचे स्तवन करू लागला—"विघ्ननाशा गणनायका! सृष्टीची रचना करण्यापूर्वी तुझे स्मरण करून आणि हृदयपूर्वक तुझे पूजन करून मी विनवितो की माझ्या हातून कार्यारंभ व्हावा, असा वर देण्याचा माझ्यावर अनुग्रह कर! आणि ही जी विकृत

रूपात सृष्टी झालेली आहे ती पुन्हा सुस्वरूप व्हावी असं काहीतरी करण्याची कृपा कर!"

विघ्नहर्त्याच्या कृपेने आतापर्यंत झालेली व विकृत रूपात असलेली सृष्टी क्षणार्धात सरळ झाली. तेव्हां विघ्नहर्ता गणेश म्हणाला—"अरे ब्रह्मदेवा! तुझ्या या वक्र सृष्टीची वक्रता मी तुकडे तुकडे करून टाकली म्हणून मी वक्रतुंड झालो. या वक्रतुंडाचे स्मरण करून कोणतेही कार्य प्रारंभ केल्यास ते कार्य यशस्वीच होईल. तू माझे स्मरण करून तुला जशी सृष्टी करावयाची असेल तशीच कर. सृजन ही एक कला आहे. ती कला कोणत्याही प्रकारे वाकडी तिकडी न होता तू निर्मिलेले जग हे कलेचे सत्स्वरूप म्हणूनच दिसेल. तू सृष्टी केलेल्या जगतात सुरवातीला माझी पूजा करून कोणी कार्यारंभ केला तर मी त्याला पावेन व त्याची विघ्ने दूर करीन व त्याची संकल्पसिद्धी व्हावी म्हणून मी सिद्धिविनायक या नावे ओळखला जाईन. सर्व गणांचा अधिपती होऊन गणपती या नावे शिवपार्वतीचा पुत्र म्हणून अवतार धारण करीन!" असे सांगून व ब्रह्मदेवाला आशीर्वाद देऊन गजानन अंतर्धान पावला.

सरस्वतीने भैरवी रागात सर्व आकाशाला पुलकित करून टाकणारे वीणेवरचे स्वर काढले.

ब्रह्मदेव—"विघ्नाशो गणाधिपाय नमः!" म्हणाला आणि त्याने सृष्टीचा आरंभ केला. सृष्टी पूर्वीपेक्षा जास्त सुंदर निर्विघ्नपणे होऊ लागली. उच्च हिमाच्छादित शिखरांसह सुंदर पर्वत, अमृततुल्य जलप्लावन करणाऱ्या नद्या, मनोहर वने, विविध प्रकारचे बाहुल्यासारखे सुंदर प्राणी, शरीर सौंदर्य असलेले बलवान व मेधावी मानव यांची सृष्टी होऊन सर्व जग ब्रह्मदेवाच्या कलेचे प्रतीक झाले. वाग्देवी सरस्वतीने आपली वाणी सुमधुर संगीतासारखी प्राण्यांना प्रदान केली. जीवजंतूंनी पृथ्वी व्याप्त होऊन अधिक सुंदर दिसू लागली. पारंब्यांच्या आधारे पसरणाऱ्या वटवृक्षासारखे सर्व जग वाढू लागले.





# खडकाला माणसाचा चेहेरा

शेकडो वर्षापूर्वी घडलेली ही गोष्ट आहे.

अरवली पर्वतप्रदेशातील एका खडकावर माणसाच्या चेहेऱ्यासारखा चेहेरा कोणी तरी शिल्पकाराने कोरून ठेवल्यासारखा दिसतो असे. परंतु वास्तविक तो चेहेरा कोणी कोरलेला नव्हता. निसर्गानेच ती कलाकृती निर्मिली होती. त्या पर्वताच्या आसपास राहणाऱ्या गावकऱ्यांना दररोज तो चेहेरा दिसत असे. लोकांना त्या चेहऱ्यावर नैसर्गिक दया, करुणा व शांती इत्यादी भाव दिसत. त्या चेहेऱ्याचें कपाळ रुंद होते जे विद्वत्तेचे सूचक आहे. त्याचे डोळे वात्सल्यभावाने जनतेकडे पहात असल्यासारखे वाटत.

दगडाची ती मूर्त पाहून प्रजेत त्या मूर्तीविषयी अनेक आख्यायिका पसरलेल्या होत्या. काही लोक म्हणत की त्या चेहेऱ्यासारखे रूप असलेला कोणी थोर पुरुष कधी काळी त्या प्रदेशात रहात असे. त्याच्या कृपेने प्रजा फार सुखी होती. कित्येक वर्षापूर्वी एक मुनी त्या गावी आले होते. त्या मुनींच्या दर्शनास त्या पंचक्रोशीतले गावकरी गेले. त्यांपैकी काही जणांनी त्या मुनीला त्या खडकावरच्या मूर्तीविषयी विचारले. मुनीने काही वेळ त्या मूर्तीकडे पहात राहल्यावर म्हटले—"असाच एक मनुष्य कधी तरी या प्रदेशात दिसेल. तो एक थोर ज्ञानी व महात्मा असेल. त्याच्या हातून प्रजेची अनेक प्रकारे सेवा होईल."

त्यानंतर कित्येक वर्षे लोटली. पिढ्यान् पिढ्या त्या मुनीने सांगितलेली गोष्ट लोकांच्या तोंडी ऐकायला मिळे. परंतु त्या दंतकथेवरचा विश्वास हळूहळू कमी होत गेला. परंतु एका मुलाचा त्यावर पूर्ण विश्वास होता. त्याचे नाव वसू असे होते.



वसू लहान असतांना त्याचे आजोबा त्याला मांडीवर घेऊन त्या दगडी चेहेऱ्याविषयीची दंतकथा, मुनीने ,जशी सांगितली होती तशी सांगत असत. कित्येक वर्षे ती दंतकथा ऐकत असल्यामुळे वसूच्या मनावर त्या दंतकथेचा ठसा चांगला बसला होता. वसूला असेही वाटू लागले की मुनी म्हणाले ते ज्योतिष्य खरे होणार.

एकदा वसू राही त्या गावी एक विद्वान साधू आला. लोकांकडून त्याला कळले की तो साधू वेद, वेदांत, तर्क आणि व्याकरण याविषयांचा एक पारंगत विद्वान आहे. परंतु त्या साधूचा चेहेरा व दगडावरचा चेहेरा यांत काहीच साम्य नव्हते. तरी वसू श्रद्धाभक्तीने तो साधू म्हणे ते सर्व शांतपणे ऐके. साधू बोले त्यात ज्ञानबोध पुष्कळच होई, यात शंकाच नाही, परंतु त्याला जगाचा प्रत्यक्ष अनुभव बेताचाच होता. वसू एका सामान्य स्थितीतल्या कुटुंबात जन्मला असल्या कारणाने मध्यमवर्गीय समाजाच्या सुखदु:खांची त्याला चांगली कल्पना होती. म्हणून त्याला त्या साधूच्या बोलण्यावागण्यावरून वरील सर्व गोष्टी कळल्या.

शिवाय तो साधू फार रागीट स्वभावाचा होता. त्याचे प्रवचन होई त्या वेळी कोणी खोकला किंवा शिंकला तरी ते त्याला आवडत नसे. तो ज्या विद्वत्तापूर्ण गोष्टी सांगे त्या कळल्या नाहीत व त्यांनी काही शंका काढली तर तसे प्रश्न करायला त्यांना परवानगी नव्हती. तो साधू एवढेच सांगे—"हे तुमचे दुर्भाग्य आहे. ज्यांना कळत असेल त्यांनीच बसावे व ऐकावे, नाहीतर उठून चालू लागावे."

म्हणून त्या साधूविषयीचा आदर कमी होत गेला. काही दिवसांनी तो साधू निघून गेला. वसूला वाईट वाटले की त्याची आशा पूर्ण झाली नाही.

काही दिवसांनी त्या प्रदेशात एक महापराक्रमी व शूर योद्धा आला. त्याने अनेक युद्धात यश संपादन केले होते. काही लोक





म्हणाले की तो शूर योद्धा ज्या प्रदेशात राहील त्या प्रदेशातल्या लोकांना सुखाने राहतां येईल व त्यांना शत्रूची भीती बाळगण्याचे कारण नाही. असा विचार करून वसू त्या योद्धयाला जाऊन भेटला. त्याला वाटत होते की मुनीने सांगितलेली ती थोर व्यक्ती हा योद्धाच असावा. परंतु त्या योद्धयाच्या चेहेऱ्यात व दगडावरच्या चेहेऱ्यात मुळीच साम्य नव्हते. त्या योद्धयाला सामान्य लोकांच्या सुखदु:खाची कल्पनाच नव्हती. कोणी त्याचे ऐकले नाही तर तो त्यांना त्रास देई. म्हणून त्याचा आदर कमी होऊ लागला. काही दिवसांनी तो सुद्धा निघून गेला.

आणखी काही दिवसांनी एक मोठा व्यापारी आला. त्याने समुद्रपार व्यापार करून कोट्यावधी रुपये संपादन केले होते. तो ज्या प्रदेशात वर्ष दो वर्ष राही त्या प्रदेशाची सर्व तऱ्हेने भरभराट होई.

वसूला हे कळत होते की तो राही त्या प्रदेशातले लोक मेहनती आहेत, परंतु त्यांच्या आयुष्यात सुख नावाची वस्तूच नाही. त्याला वाटत होते की खडकावरच्या चेहेऱ्यासारखाच त्या व्यापाऱ्याचा चेहेरा असणार व तो प्रदेशाच्या उद्धारासाठी आलेला असणार. परंतु व्यापाऱ्याला प्रत्यक्ष



पाहाल्यावर त्याच्या चेहेऱ्यात व खडकावरच्या चेहेऱ्यात थोडेदेखील साम्य नसल्याचे त्याला आढळून आले. तरी त्याला वाटले की तो व्यापारी त्या प्रदेशात राहल्याने त्या प्रदेशाची उन्नती होईल. व्यापाऱ्याने त्या प्रदेशात नव्या तऱ्हेने लागवड करविली. शेतातून आलेली पिके त्याने स्वत:च खरेदी केली. शेतकऱ्यांना पुष्कळच फायदा झाला. सर्वांच्या घरात लक्ष्मीने नव्या रूपात प्रवेश केला. उद्योगधंद्यांत लागलेल्या लोकांना सुद्धा व्यापाऱ्याने नवी हत्यारे व साधने दिली व उद्योगधंद्यांची उन्नती होऊ लागली. परंतु तीन वर्षांनी व्यापाऱ्याने पिकांची किंमत व उद्योग-



धंद्यांतून येणाऱ्या मालाची किमत इतकी कमी केली की शेतकऱ्यांना व कारागिरांना नुकसान सोसावे लागले. नव्या तऱ्हेचा माल तो व्यापारी घ्यायला तयार होईना. म्हणून नुकसान सहन करून सर्व माल त्या व्यापाऱ्यालाच विकावा लागला.

पुढे तर त्या प्रदेशातले खाद्यपदार्थ इतर प्रदेशात निर्यात झाल्यामुळे खाद्यान्नांच्या किमती भडकल्या व प्रजेला फार त्रास सोसावा लागला. जे लोक पूर्वी सुखवस्तू समजले जात त्यांनासुद्धा सुखाने जीवित घालविणे कष्टाचे होऊ लागले. खाद्यान्न व धन दोन्हींची उणीव भासू लागली व दुष्काळासारखी स्थिती आली. त्या व्यापाऱ्याने जो माल कोठारात विकत घेऊन जमा करून ठेवला होता तो सुद्धा गाड्या भरून त्याने उचलून परमुलखात नेला. ते सर्व पाहून वसूला फार वाईट वाटले. त्या-बरोबर त्याच्या बुद्धीचा विकास होऊ लागला होता.

आणखी काही दिवस गेले. त्या प्रदेशात कोणी महाकवी आला. त्या महाकवीला सामान्य प्रजेच्या सुखदुःखाची कल्पना होती. त्याने सामान्य प्रजेच्या जीवनावर कविता लिहिल्या. त्याची गीते देशाच्या कानाकोपऱ्यात लोक गाताना दिसू लागले. त्याची ख्याती देशभर पसरली.

वसूला वाटले, कदाचित या कवीच्या चेहऱ्यात व खडकावरच्या चेहऱ्यात साम्य असेल व त्या मुनीची वाणी सत्य ठरेल. परंतु त्या कवीचा चेहरा सुद्धा तसा नव्हता. त्या कवीची गीते लोक तन्मय होऊन ऐकत व त्याला देवतुल्य मानत. त्याची सेवा-शुश्रूषासुद्धा करीत. परंतु त्या कवीच्या मनात प्रजेविषयी सहानुभूती तिळमात्रही नव्हती.

कवीने आपल्या गीतांत प्रजेच्या निष्ठेची व प्रयत्नांची प्रशंसा केली होती. परंतु त्याच्या हृदयात त्या प्रयत्नांविषयी आदर भाव थोडादेखील नव्हता. तो नेहमी आळशी व श्रीमंत लोकांच्या संगतीत राही. वसूच्या मनात त्या कवीविषयी आदरभाव मुळीच उरला नाही. तो कवी ढोंगी असल्याचे त्याला आढळून आले. त्याने कविता किती चांगली लिहिली असली तरी त्या कवितांत व गीतांत फक्त कोरे शब्दच असत, आत्मा नसेच.

हळूहळू प्रजेला कवीची वृत्ती कळू लागली व त्याचा आदर कमी होऊ लागला. काही दिवसांनी तो कवी तो प्रदेश सोडून निघून गेला.

वसूला फार वाईट वाटले. तो आशा धरून बसला होता की मुनीने सांगितल्या-प्रमाणे कोणी थोर पुरुष येईल, परंतु कोणी आला नाही. त्याच्या आजोबांनी सांगितलेल्या गोष्टींवरचा विश्वास त्याच्या मनातून पार नाहीसा झाला. कारण त्याने अनेक थोरपुरुषांना पाहिले, परंतु त्यांच्या मनात दया, करुणा इत्यादी गुण नव्हतेच व त्यांचा चेहरासुद्धा खडकावरच्या चेहऱ्या-सारखा नव्हता. वसू याच विचारात जागच्या जागी निश्चळ उभा होता. रस्त्या-वरून जाणाऱ्या येणाऱ्या लोकांनी वसूकडे पाहिले व आश्चर्यचकित झाले. कारण वसूचा चेहरा हुबेहूब खडकावरच्या चेहऱ्या-सारखाच होता.

ती बातमी पाहतांपाहतां गावभर पसरली. जे लोक आपल्या पूर्वजांच्या तोंडी त्या खडकावरच्या मूर्ती संबंधी दंतकथा ऐकत होते व कथांवरचा विश्वास ज्यांच्या मनातून पार नाहीसा झाला होता ते लोक सुद्धा वसूला पहायला धावले. वसूच्या चेहऱ्यात व खडकावरच्या चेहऱ्यात साम्य पाहून ते थक्कच झाले.

शेकडो वर्षांपूर्वी मुनीने वर्तवलेले भविष्य खरे ठरले. वसूने अनेक थोरपुरुषांच्या तोंडी ज्या ज्ञानाच्या गोष्टी ऐकल्या होत्या त्यांचा उपयोग त्याने जनहितासाठी केला. तो प्रजेबरोबर राहून त्यांच्या सुखदुःखात वाटेकरी झाला. त्याने त्यांना ऐश्वर्य संपादन करून दिले व तो धन्य झाला.






श्री स. न. गद्रे

प्र. : भारतातले आदि निवासी द्राविड होते असे म्हणतात व नव्हते असेही म्हटले जाते. तुमचं काय मत आहे या बाबतीत ?

उ. : आज आपण ज्यांना मानव जाती मानतो ३०-४० हजार वर्षांपूर्वी त्या नव्हत्या म्हणे नरी एवढे खरे की भारतात वानर जातीचा वानराची लक्षणे सोडून वनमाणूस रूपात बदल झाला. उदाहरणार्थ (१४० लक्षवर्षांपूर्वीचे) रामा पितिकस या एका कारणावरून आपल्या देशात राहणाऱ्या आदि मानवांना एका विशिष्ट जातीचे,–'द्राविड' हे नाव देणे योग्य होणार नाही, हे कळते. शिवाय 'द्राविड' हे नाव एका विशिष्ट जातीचे आहे, की भाषेचे, की एका विशिष्ट जीवन पद्धतीचे, हे स्पष्ट कळायला हवे. अंतर्जातीय म्हणून म्हटल्या जाणाऱ्या जाती, किंवा उपजाती मध्ये 'द्राविड' नावाची जात नाही. आपल्या देशात जे अत्यंत प्राचीन वैदिक वाङ्मय आहे त्यात आर्य, दास (दस्यु) ही नावे मिळतात, परंतु 'द्राविड' नावाचा उल्लेख ही नाही. त्या काळातील अनार्य, "नाक नसलेले" (चपट्या नाकाचे) लोक काळे लोक असे वर्णन आले आहे. ही जातीची लक्षणे मानली तर ही लक्षणे असलेल्या जाती भारतात कोठेही नव्हत्या. एवढेच नव्हे तर 'आर्य' शब्दही जातिवाचक नाही. तो तसा असेल तर विष्णू राम, कृष्ण यांच्यासारखे अवतार पुरुष आर्य नव्हते असे म्हणावे लागेल. भारतात ज्या व्यासांचा उल्लेख आहे ते सुद्धा आर्य होते असे म्हणावयाला जागा राहणार नाही. भारतातले त्याचे वर्णन राक्षसाला साजेल असेच आहे. म्हणून 'द्राविड' 'आर्य' हे शब्द वापरणारे, ती जातीची नावे असल्याच्या भ्रमात स्वत: पडलेले आहेत व जगाला भ्रमात पाडत आहेत. आज आपल्याकडे आहेत ती वास्तविक द्राविड भाषा कुटुंबे आहेत. या भाषा अनादि आहेत हे मानणे सुद्धा गैर होईल. हरप्पा सभ्यतेत जी लिपी आढळते ती द्राविड भाषा होती असे काही लोकांचे म्हणणे आहे. ते खरे आहे व ती भाषा बोलणारे द्राविड लोक होते असे मानावे तर भारतात आदि काळापासून हरप्पा संस्कृतीचे निर्मातेच होते असे म्हणायलाही आधार मिळत नाही.




विश्वशांत महाराजांची राज्यव्यवस्था अपूर्व होती असे सांगितले जाते. त्यांच्या राज्यात प्रत्येक गावात स्वायत्तता होती. महाराज दरवर्षी काही गावांना भेट देत आणि तेथे राज्यव्यवस्था कशी आहे या गोष्टीची स्वत: पाहणी करीत असत. देशभरच्या मुख्यमुख्य बातम्या घोड्यावरून देशातल्या कानाकोपऱ्यात पोचत. प्रत्येक गावाच्या मध्यवर्ती स्थानी ताबडतोब बातम्या पोचविल्या जात.

एका वर्षी राजा पर्यटनाला निघाला तो सर्वात प्रथम रामपूर नावाच्या गावी आला. तिथला अधिकारी राजाराम याने राजासमोर त्या गावच्या व्यवस्थेसंबंधी सविस्तर निवेदन केले.

रामपूर हे फार मोठे गाव होते. तेथील राज्यव्यवस्था पाहणारे शंभरावर सरकारी नोकर होते. ते सकाळपासून संध्याकाळपर्यंत आपापली कामे पहात. परंतु सकाळी कोणी वेळेवर हजर होत नसे. काही जण तर फार उशिरा कामावर येत. या गोष्टीस आळा बसावा यासाठी राजाराम दररोज सर्वांच्या आधी कचेरीत येऊन सदर दरवाजाच्या उंबरठ्याजवळ उभा राही आणि उशिरा येणाऱ्यांना योग्य शिक्षा करी. त्याने असे एक आठवडाभर सतत केल्यानंतर नोकर वर्गाचे वेळेवर हजर न होणे कमी झाले.

राजारामाने ही गोष्ट निवेदन केल्यावर महाराज म्हणाले–"कचेरीत द्वारपालक नाहीत का ? तू स्वत: केलेली गोष्ट त्याच्याकडून करविणे शक्य झाले असते !"

"महाराज, द्वारपालक हा एक सामान्य नोकरच असतो. तो सरकारी नोकरांना भिऊन नमून राहातो. शिवाय इतर अधिकारी त्याला लाच देऊन त्याचे तोंड बंद करण्याची शक्यता असते. मी सर्वांवरचा



अधिकारी असल्या कारणाने मीच दारात उभा राहीलो तर वचक राहातो."

"दारात उभं रहायला तुला अपमान वाटत नाही का?" राजाने विचारले.

"आपल्या कर्त्तव्याचे पालन करीत असतां मला लाज किंवा अपमान वाटण्याचे कारण दिसत नाही!" राजाराम थोडया स्वाभिमानानेच म्हणाला.

"तरमग तू उद्यापासून द्वारपालकाचेच काम कर. मी या गावाचा प्रमुख अधिकारी म्हणून आणखी कोणाला तरी नेमतो." महाराज म्हणाले.

राजा आपली पाठ थोपटील अशी राजारामाची अपेक्षा होती. त्याचा चेहरा फिक्का पडला. म्हणाला–"प्रभो, हा अन्याय आहे!"

"त्यात अन्याय काही नाही. तू या कचेरीत नोकरी करणाऱ्या सर्व सरकारी नोकरांवरचा अधिकारी आहेस, तरी येथला द्वारपालक तुझ्यापेक्षा, तुझ्या हाताखाली काम करणाऱ्या अधिकाऱ्यांना जास्त मान देत आहे. दारात तू उभा राहल्याशिवाय हाताखालचे अधिकारी तुझी पर्वा करीत नाहीत. त्याचबरोबर तुझा त्यांच्यावर विश्वास नाही! या सर्वाहून अधिक तू आपला मोलाचा वेळ द्वारपालक म्हणून खर्च करतो आहेस. हीच एक जबाबदारी तू नीटपणे पार पाडित असल्यासारखं दिसतं आहे!"

राजाने तो भीमपूरला जात असल्याचे आधी कोणाला सांगितले नव्हते. राजा पोचण्यापूर्वी फक्त एकच तास आधी राजा येत असल्याची बातमी भीमपूरला पोचली. तेथला अधिकारी भीमराज, महाराज येत असल्याची बातमी गावाच्या मध्यवर्ती जागी कळली तेव्हां त्याच्या कचेरीत नव्हता, गावात कोठेतरी होता. बातमी कळताच तो कचेरीत धावला व राजाच्या स्वागतार्थ सर्व तयारी करण्यास त्याने कचेरीतल्या नोकरवर्गास सांगितले.



भीमपूर पोचल्यावर त्याच्या स्वागतासाठी झालेली तयारी पाहून राजा थक्कच झाला. अकस्मात भेट देऊन तेथल्या अधिकाऱ्याला चकित करण्याच्या विचारात तो होता, याउलट त्यालाच आश्चर्यचकित व्हावे लागले.

"मी येत असल्याची बातमी तुम्हांला आधीच कशी कळली?" राजाने विचारले.

आपण फार मोठे कार्य करून राजाची प्रशंसा मिळविण्यास पात्र ठरलो आहो, या विचाराने भीमराज म्हणाला–"मला एकाएकी आपण येणार हे कळले, प्रभो! लगेच मी आपल्यासाठी ही सर्व तयारी करविली."

"तुझी कचेरी तर गावाच्या टोकाला आहे. बातमी आली ती गावाच्या मध्यवर्ती जागी नाही का? त्यावेळी तू कचेरीत न राहता गावाच्या मध्यवर्ती जागी कशासाठी गेला होतास?" राजाने त्याला विचारले.

"मला एका कामासाठी तिकडे जावे लागले होते, प्रभो!" भीमराज म्हणाला.

"तुझ्या हाताखाली कचेरीत इतके लोक काम करीत असतां कामाच्या वेळी तू कचेरीबाहेर होतास. तुला आपली जबाबदारी बरोबर कळलेली दिसत नाही. तुझ्या जागी मी दुसऱ्याला नेमतो आहे." असे सांगून राजाने ताबडतोब दुसऱ्या अधिकाऱ्याला नेमले.



त्यानंतर राजा सोमपूरला निघाला. सोमपूरचा अधिकारी सोमराज होता. त्याने राजाचे स्वागत उत्तम तऱ्हेने केले. राजा म्हणाला–"माझ्या स्वागत सत्काराची व्यवस्था फार उत्तम झाली आहे. अधिकारी म्हणून तू काय काम केलेस?" राजाने विचारले.

"सर्वात मोठे विशेष हे की मी गावात आहे हे शुभसूचक असल्याचे सर्व म्हणतात. त्याचं प्रमाण म्हणजे मी गावात नसतो तेव्हांच गावात शोकसभा होतात!" सोमराज म्हणाला.

"शोकसभा कशा काय?" विश्वशांत राजाने विचारले.

"राज्यात किंवा गावात कोणी दिवंगत झाले तर कचेरीत शोकसभा घेऊन सभेत दिवंगत आत्म्यास शांतिलाभ व्हावा यासाठी प्रार्थना करण्यात येते व दिवंगत व्यक्तीस श्रद्धांजली अर्पण करण्याचा ठराव पास होतो. हा कार्यक्रम अधिकाऱ्याच्या अध्यक्षतेखाली होतो. माझ्या खालचा अधिकारी वीरभद्र आहे. त्याच्या अध्यक्षतेखाली गेल्या वर्षी सव्वीस दिवंगत आत्म्यास शांतिलाभाचा ठराव पास झाला." सोमराज म्हणाला.

"मग शुभकार्ये म्हणालास ते काय?" राजाने विचारले.

"मी नसतो तेव्हां शुभकार्ये प्रारंभ होतच नाहीत! ती सर्व कामे माझ्या अध्यक्षतेखालीच होतात. म्हणूनच सर्व शुभकार्यांस मी व अशुभकार्यांस वीरभद्र असा प्रघातच पडून गेला आहे. यात वीरभद्राची काही चूक आहे असे म्हणतां येणार नाही. अशुभ कार्ये वीरभद्र असल्या कारणाने होतात असे नाही. मी नसतो म्हणून तर होतात." सोमराज म्हणाला.

विस्वशांत राजा संतापून वटारलेल्या डोळ्यांनी सोमराजकडे पहात म्हणाला–"म्हणजे वर्षातून सव्वीस वेळा, म्हणजे दर महिन्यात सरासरी दोनदां तरी कोणी प्रमुख दिवंगत होतात म्हणावयाचे आणि तू त्यांपैकी एकाही सभेला नसतोस आणि बाहेर भटकतोस असाच अर्थ झाला. तू फक्त शुभकार्य असेल तेव्हांच गावात असतोस वाटते? जबाबदार प्रमुख अधिकाऱ्याने गावाला चिकटून राहिले पाहिजे, असे बाहेर भटकता कामा नये. मी तुझ्या जागेवर वीरभद्राला नेमतो."

सोमपूरहून निघताना राजाला प्रधानाने विचारले–"आपण आणखी एखाद्या गावी जायचं आहे का महाराज?"

राजा म्हणाला–"कोठे जायची गरजच नाही. मी या तीन गावात अधिकाऱ्यांच्या व्यवस्थेविषयी काय काय केले हे राज्यभर कळले तरी पुरे!"

विश्वशांतच्या राज्यात त्यानंतर सर्वदा सुगी व सुखशांतीच नांदत होती.






[ १० ]

[ चतुराक्षाने समरसेनाला त्याचे आणि एकाक्षीचे लहानपणापासून वाढत गेलेले शत्रुत्व वर्णन करून सांगितले. दोघांचे एका हरणाच्या पाडसावरून भांडण झाले. सिंहाच्या भीतीने चतुराक्ष झाडावर लपला असतां एकाक्षीने चतुराक्ष भूत असल्याचे गावकऱ्यांना सांगितले. सांगत असतां डोंगराखालच्या दरीत कसला तरी ओरडा झाला. पुढे–]

चतुराक्ष एकाक्षीने त्याच्या विरुद्ध गावकऱ्यांना चिथविले याचे वर्णन सांगत असतांच डोंगराच्या पायथ्याशी कसला तरी ओरडा झाला. समरसेनाला व सैनिकांना तो ओरडा ऐकू आला. त्या बाजूला ते आश्चर्यचकित होऊन पाहू लागले.

तोपर्यंत सूर्यास्त होऊन गेला होता आणि कोळाख पडू लागला होता. डोंगरावर काळोखी येऊ लागली होती. दूर लोकांचा गलका ऐकू येत होता, परंतु ते कोठे जात आहेत हे काळोखामुळे दिसत नव्हते. त्याच वेळी एकाक्षीचा खणखणीत आवाज ऐकू आला–"काळभुजंगा! कंकाला!" असा तो हाक मारीत असल्याचा आवाज स्पष्ट ऐकू येत होता.

चतुराक्षाने आवाज आला त्या बाजूला फक्त एकदाच नजर फेकली व म्हणाला–"समरसेना! एका बाजूने तुमच्या कुंडलिनी



बेटावरचे लोक व दुसऱ्या बाजूने एकाक्षी येत आहेत. नावेची व त्या नागकन्येची गोष्ट मी मागाहून सांगेन. प्रथम हे लोक जे येत आहेत त्यांच्या नजरेस पडल्याशिवाय राहणेच बरं होईल."

समरसेनालासुद्धा त्या परिस्थितीत त्या-शिवाय दुसरे काही करणे शक्य नाही, असेच वाटले. कुंडलिनी बेटावरचे लोक म्हणताच समरसेनाला साहजिकच वाटले की त्याचा अर्थ बंडखोर कुंभांड व त्याचे रानटी अनुयायी असणार.

"ते पहा, इकडेच येत आहेत, डोंगर चढून." असे म्हणत चतुराक्षाने आपले तर्जनी बोट डोंगराच्या उताराकडे दाखविले. समरसेनाने व सैनिकांनी त्या बाजूला पाहिले. सुमारे चाळीस पन्नास जण मशा-लीच्या उजेडात त्या बाजूने डोंगर चढून येत असलेले दिसले.

समरसेन तलवारीच्या मुठीवर हात ठेवीत म्हणाला—"चतुराक्षा! आतां पुढे? तो एकटाच कुंभांड असता तर मी व माझे सैनिक त्याचा व त्याच्या अनुयायांचा समाचार घ्यायला पुरे आहोत. माझे सैनिक धनुर्विद्येत पारंगत असल्याने त्या जंगली माणसांना ठार करू शकतील. परंतु हा मांत्रिक एकाक्षीसुद्धा आहे ना, त्याचे काय?"

"त्या एकाक्षाला मी पाहून घेईन. परंतु एक गोष्ट मात्र विसरू नकोस. तू आपल्या सैनिकांसह या डोंगराळ प्रदेशात आणि काळोखात या रानटी लोकांशी चार हात करणे बरोबर होणार नाही. समज, हा कुंभांड व त्याचे अनुयायी रानटी लोक त्या एकाक्षाला दिसले तर तू आपल्या शत्रूचा संहार करण्याची गरजच राहणार नाही. ते काम परस्पर तो एकाक्षच छान करील." चतुराक्षाने समरसेनाला सावध करीत सांगितले.

इकडे चतुराक्ष समरसेनाला सांगत होता आणि तिकडे कुंभांड व त्याचे अनुयायी डोंगर चढून वर येत असलेले दिसले व त्यांना चतुराक्षाने म्हटले होते तसे एका-एकी एकाक्षीने समोर आडवा उभा राहून अडविले ही.

ते पाहून समरसेनाला परमानंद झाला. "ह्याच वेळेची तर वाट पहात होतो आपण!" समरसेन अत्यंत उत्साहाने म्हणाला.

चतुराक्ष नकारार्थी मान हलवीत म्हणाला—"समरसेना, अशी घाई करू नकोस व नाही ती आशा मनात बाळगू नकोस! धनराशीने भरलेली नाव व तिच्या रक्षणाला उभी असलेली नागकन्या यांची माहिती तुला पुरेशी नाही. त्याच्या विषयींचे खरे गुपित मी तुला शेवटी सांगू शकलो नाही. शिवाय एकाक्षी घमेंडखोर असला तरी पूर्ण मूर्ख नाही. काय घडते आहे ते पाहू या. त्या मोठ्या दगडाआड लपूया, चला!"

सर्वजण निःशब्दपणे चतुराक्षाच्या पाठो-पाठ गेले आणि थोड्याच वेळात ते सर्व कुंभांड व रानटी लोक होते त्या बाजूच्या एका मोठ्या दगडाच्या मागे लपून काय होत आहे ते पाहू लागले.

एकाएकी एकाक्षाला पाहून कुंभांड व त्याचे अनुयायी घाबरूनच गेले. रानटी लोक पळून जायला कोठे मार्ग आहे का, पाहू लागले परंतु तेवढ्यात करड्या आवा-जात, पण हसत एकाक्षाने विचारले—"कोण तुम्ही सर्व? तुम्ही आहात ती जागा सोडून तुमच्यापैकी कोणी हलला तर ठार झालाच






समजा. माझ्या दृष्टीस पडलेला कोणताही प्राणी माझ्या आज्ञेशिवाय हलणे शक्यच नाही लक्षात ठेवा!" नंतर मान वळवून हांक मारू लागला–"कालभुजंगा आणि ए कवची! या सर्वांना चारी बाजूंनी वेढा द्या पाहू!"

लगेच काल भुजंग पुढे सरकून फूत्कार सोडीत जंगली लोकांच्या चारीबाजूला फिरू लागला. कवची हवेत 'गरगर' फिरत त्यांच्या डोक्यांवर तरंगत राहिली. भयभीत होऊन थरथर कांपत असलेल्या कुंभांडाकडे व रानटी लोकांकडे लाललाल डोळे वटारून पहात एकाक्षाने विचारले–"कोण तुम्ही सर्व? कोठे निघालां आहांत?"

तो प्रश्न ऐकून कुंभांड जास्तच थरथर कापू लागला. त्याला आपण खरं बोलल्याने की खोटं बोलल्याने सुटका होईल हे कळेना. त्याने रानटी लोकांच्या तोंडी त्या बेटा-वरच्या मांत्रिकांविषयी पुष्कळ ऐकले होते, परंतु त्यांना त्याने पहिल्यानेच प्रत्यक्ष पाहिले होते.

"मी या रानटी लोकांचा राजा आहे. माझे नाव कुंभांड!" कुंभांडच्या तोंडी एवढेच वाक्य निघाले.

आता खरं बोलल्याशिवाय गत्यंतर नाही असे त्याला वाटले. आपण खरं लपविले तरी रानटी लोक प्राणभयाने खरे लपवू शकणार नाहीत, कुंभांडला वाटले.

"ह्या डोंगराच्या टोकावरून पाहिले तर समुद्रावर एक नाव दिसते असे मी ऐकतो, ती पहायला जात आहोंत!" कुंभांड म्हणाला.

ते उत्तर ऐकून एकाक्ष खदखदा मोठ्याने हसला. कारण कुंभांड व रानटी लोक तिकडे कशासाठी जात आहेत हे त्याला चांगले माहीत होते.

"या अंधारात फक्त ती नाव पहायला तुम्ही हा एवढा डोंगर चढून येत होता तर! अस्सं! तुझं डोकं सुपीक दिसतं आहे! तू या असभ्य रानटी लोकांवर राज्य करण्याऐवजी सर्व देवांवर राज्य करणाऱ्या इंद्राच्या आसनावर बसायला हवा होतास! खरं बोल; त्या नावेतल्या धनावर तुझी नजर आहे की नाही? म्हणून तुम्ही तिकडे निघाला होता ना?" एकाक्षाने विचारले.

कुंभांड थरथर कापत जमिनीकडे पाहू लागला. एकाक्ष गरजला–"होय की नाही?"

कुंभांड घाबऱ्या आवाजात म्हणाला–होय?"

एकाक्ष समाधान झाल्यासारखी मुंडी हलवून म्हणाला–"या बेटावर पुष्कळ दिवसांपूर्वी मी पांच सहा नव्या लोकांना पाहिले. त्यांचे कपडे वगैरेवरून ते तुझ्या-सारखेच वाटले. ते तुझ्यासारखेच त्या नावेतल्या धनराशीसाठी निघालेले असणार. तू त्यांच्या पैकीच का?" एकाक्षने विचारले.

तो प्रश्न ऐकून कुंभांडला एकाक्षाने विचारले ते कोण लोक असावेत हे कळलं. त्याच्या आधी कुंडलिनी बेटावरून निघालेले समरसेन व इतर सैनिकच ते असावेत, असे त्याला खात्रीपूर्वक वाटले.

"मी त्यांच्यापैकी नाही. पण ते कोण हे मला माहीत आहे. ते लोक या बेटावर आले आहेत हे कळल्यावरूनच त्यांचा शोध काढण्यासाठी आलो आहे. धनलोभाने ते बंडखोर लोक नावेच्या शोधार्थ नक्कीच हिंडत असणार असे समजून मी या बाजूला



आलो. वाटेत आपण भेटलात." कुंभांड खरी गोष्ट लपवून म्हणाला.

ते संभाषण दगडाआडून ऐकत असलेल्या चतुराक्षाला तीच वेळ बाहेर यायला उत्तम आहे असे वाटले. त्याने हांक मारली–"घुवडा! वनमाणसा!" आणि दगडा-आडून बाहेर येत समरसेनाला त्याने सावध केले. समरसेनाने व सैनिकांनी धनुष्यबाण घेऊन कुंभांडावर व रानटी माणसांवर शरवृष्टी सुरू केली.

'घुवडा!' असा आवाज ऐकून एकाक्ष दचकला आणि चारी बाजूला पाहू लागला. तोपर्यंत बाण लागल्याने काही रानटी लोक जमिनीवर लोळू लागले

होते. कुंभांड, होता त्या जागेवरून लगेच उडी मारून डोंगराच्या उतारावरून खाली पळू लागला.

कुंभांड व रानटी लोक पळू लागल्यावर समरसेन व सैनिक त्यांचा पाठलाग करू लागले. काळोख असल्या कारणाने सैनिकांना नेम धरून बाण मारणे अशक्य झाले. कुंभांडाने तलवार उपसली व ओरडून आपल्या अनुयायांना म्हणाला–"थांबा! पळू नका!" आणि रानटी लोकांना एकत्र करू लागला.

इकडे घुबडाचे नाव ऐकूनच दचकलेला एकाक्ष स्वत:ला सावरून तलवार फिरवीत दोन एक पावले पुढे टाकीत दातओठ चावून ओरडला–"काय रे चतुरा! आतां तू फक्त बाताड्याच आहेस हे कळलं. मंत्रतंत्रविद्येत तुझी बरोबरी करू शकेल असा कोणी नाही असे बडबडणारा तू या तुच्छ मानवांच्या बाण वगैरेची मदत घेऊन मला जिंकायला निघाला आहेस, नाही का? मी नुसतं "हुँ:" म्हटलं की तुझ्या या सर्व मित्रांना तुकडे करून लाकडासारखी मोळी बांधून ठेवायला ही रानटी माणसं पुरतील."

चतुराक्ष पापण्या लवू न देतां एकाक्षाकडे नुसता पहात राहिला. डोंगराच्या पायथ्याजवळून कुंभांडाचा आवाज व रानटी



लोकांचे ओरडणे ऐकू येत होते. समरसेनावर काही संकट तर येणार नाही अशी शंका वाटू लागली होती त्याला.

"एकाक्षा, तुझ्या या गर्वोक्तीला उत्तर द्यायला मला आतां वेळ नाही. शिवाय आपल्या नोकरांमध्ये होण्याऱ्या युद्धामुळे काही निष्पन्न होईल असेही वाटत नाही. तुझी तलवार आणि कटारींचा माझ्यावर प्रयोग करणे शक्य नाही, हे तुला माहीत नाही, असेही नाही. तो दिवसही एकदा उजाडणारच आहे–तू राहतोस की मी, हे देखील कळेलच! तोंपर्यंत तोंडाच्या नुसत्या वाफांनी काही होणार नाही." चतुराक्ष म्हणाला.

एकाक्ष त्याचे काहीतरी उत्तर देण्याच्या विचारात होता तेवढ्यात चतुराक्षाने आपल्या हाताने आपल्या गोंडेदार टोपीला हात लावला आणि तत्क्षण कुंभांड व समरसेन दोघांमध्ये भयंकर खड्गयुद्ध चालू होते तेथे येऊन पोचला. एका बाजूने रानटी लोक भाले फेकीत पुढे येण्याच्या प्रयत्नात होते तर दुसऱ्या बाजूने समरसेनाचे सैनिक त्यांच्यावर बाण सोडून त्यांना एकही पाऊल पुढे टाकू देत नव्हते.

अशा परिस्थितीत समरसेन व कुंभांड तलवारीचे वार एकमेकावर करीत उभय पक्षांच्या मध्ये दाखल झाले. त्याचवेळी चंद्रोदय झाला आणि त्या प्रदेशावर स्वच्छ चांदणे पडले.

चतुराक्ष थोडा दूर उभा राहून आतां पुढे काय करायचे याचा विचार करू लागला. कुंभांडाच्या मदतीला एकाक्ष धावून येईल अशी एक शंका त्याच्या मनात आली. म्हणून तो येण्यापूर्वीच कुंभांडाला व त्याच्या अनुयायांना ठार करणे बरे होईल असे त्याला वाटले. ते जर साध्य झाले नाही तर समरसेनाला व त्याच्या अनुयायांना एखाद्या सुरक्षित जागी घेऊन जाणे योग्य होईल असाही त्याने विचार केला.

चतुराक्षाच्या मनात तो विचार चालू असता लांडग्याचे कर्णकर्कश ओरडणे ऐकू आले. चांदण्या रात्री आहाराच्या शोधार्थ रक्ताचा वास आल्याबरोबर त्यांचा कळप भूक भागविण्यासाठी या बाजूला येत असावा.

लांडग्यांचा कळप ओरडत दगडावरून उड्या टाकीत झाडाझुडपामागून पळत येत असलेला सर्वांनी पाहिला. युद्ध करून शत्रूला ठार करण्यापूर्वीच लांडगे आपल्याला ठार करतात की काय, ही भीती सर्वांना वाटली म्हणून युद्ध करीत असलेले रानटी लोक आणि सैनिक तेथून पळू लागले. समरसेन व कुंभांडसुद्धा खड्गयुद्ध थांबवून त्यांचे त्यांचे अनुयायी ज्या दिशेला पळू लागले होते त्या दिशेला पळू लागले.

(क्रमशः)



# फसवा आरसा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—" राजा, अद्भुत शक्तींची प्राप्ती झाल्याने पुष्कळ फायदा होतो, या भ्रमात पुष्कळ लोक असतात. परंतु कधीकधी त्यांच्यामुळे फार नुकसान सोसावे लागते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला वज्र-गिरीचा राजा अमरदीप याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वज्रगिरीचा राजा अमरदीप याच्या मनात एक आदर्श राजा म्हणून कीर्ती मिळावी अशी फार इच्छा होती. परंतु त्यासाठी आवश्यक असलेले गुण व योग्यता त्याच्या अंगी नव्हती. तरी तो भेटे त्या



प्रत्येक साधुसंन्याशाला आपल्या मनाची महत्वाकांक्षा सांगे व त्यांच्या कडून काही मदत मिळण्यासारखी आहे का विचारी. परंतु कोणताही साधुसंन्यासी अमरदीपाला मदत करू शकला नाही.

एकदां एक साधू अमरदीपाच्या दर्शनासाठी आला. राजाने त्याचा योग्य आतित्थसत्कार करून त्याच्याजवळ आपल्या मनातली इच्छा व्यक्त केली. तेव्हां तो साधू राजाला एक आरसा देऊन म्हणाला— "राजा, हा अद्भुत शक्ती असलेला एक आरसा आहे. हा तुझ्या मंत्र्यांच्या व अधिकाऱ्यांच्या मनात काय आहे हे ओळखेल. हा तुझा एक गुप्त हेरच आहे, असे समज. तुला कोणाचा संशय आला की त्याचे स्मरण करून तू या आरशात पहा, त्या व्यक्तीच्या मनात काय चालू आहे हे या आरशात तुला दिसेल. या आरशाच्या सहाय्याने तुझ्याकडे काम करणाऱ्यांच्या मनातल्या गोष्टी पूर्वीच ओळखून तूं छान राज्यकारभार चालवू शकशील."

तो आरसा मिळाल्याने आपण एक आदर्श राजा म्हणून इतिहासात प्रसिद्ध होऊ, असे अमरदीपाला वाटले. म्हणून त्याने तो आरसा कोणाची नजर पडणार नाही अशा जागी लपवून ठेवला आणि पूर्णपणे त्या आरशावरच अवलंबून राहून राज्यकारभार पाहू लागला. त्याने स्वत:च्या बुद्धीचा उपयोग करण्याचे व मंत्र्यांचा सल्ला घेण्याचेही सोडले. त्यापूर्वी त्याचा काही जणांवर पूर्ण विश्वास होता व त्यांच्या सल्ल्याप्रमाणे तो वागत असे. परंतु त्यानंतर आपल्याला कोणावर विश्वास करून राहण्याची गरज नाही, प्रत्येकाच्या मनातल्या गोष्टी आरशावरून आपल्याला कळतील असे राजाला वाटले.

राजाच्या वागण्यात झालेला बदल मंत्र्यांना कळून आला. परंतु त्याचे कारण मात्र त्यांना कळले नाही. राजा स्वत:च काहीतरी ठरवून हुकूम सोडू लागला व त्याची अंमलबजावणी झाली पाहिजे, असे सांगू लागला. त्याने कोणाचे मत विचारायचे सोडूनच दिले. कोणाला त्याचा निर्णय आवडला नाही असा त्याला संशय आला तर त्या व्यक्तीच्या मनात काय घडते आहे हे त्याला त्या आरशात पाहिल्यावर कळे.

अमरदीपाला त्याचा प्रधान विक्रमसेन याचाच संशय आला. आरशात पाहिले तेव्हां विक्रमसेन हा आपल्याला महामूर्ख मानीत असल्याचे व आपली थोडीदेखील फिकीर करीत नसल्याचे कळले. राजाने ताबडतोब प्रधानाला तुरुंगात टाकले.

त्यानंतर स्वाभाविकपणे राज्याच्या सर्व अधिकाऱ्यांना राजाच्या सदसद्विवेकबुद्धीविषयीं शंका वाटू लागली. सर्वच्यासर्व अधिकाऱ्यांचा राजाला संशय येऊ लागला. सर्वांच्या मनात येणाऱ्या विचारांचे चित्र आरशात दिसू लागले. राजाने सर्वांना तुरुंगात टाकले.

याच सुमारास राज्यात सर्वत्र बंडाळीने डोके वर काढले. राज्यात सर्वत्र सुखशांती नांदावी यासाठी सेनापतीला सर्व अधिकार देण्याचे ठरवून राजाने त्यापूर्वी मंत्र्याच्या मनात काय आहे हे कळावे म्हणून आरशात पाहिले. राजाला आरशात पाहिल्यावर काय करावे हेच सुचेना. कारण सेनापती शेजारच्या राजाशी संगनमत करून राजाला सिंहासनावरून कसे काढता येईल या विचारात होता.





दुसऱ्या क्षणाला सेनापतीसुद्धा तुरुंगात पडला. वज्रगिरीच्या प्रजेला आतां शंका करण्याची गरजच उरली नाही. राजाचे डोके फिरले आहे की काय असे वाटू लागले. असा राजा राज्य कारभार काय पाहणार असेही वाटले.

अमरदीपाला काय करावे सुचले नाही, तेव्हां त्याने आपल्या मुलाचा सल्ला घेण्याचे ठरविले. त्याच्या मनातले विचारही आरशात स्पष्ट दिसत होते. कोणाकरवी तरी पित्याचा वध करवून किंवा त्याला तुरुंगात टाकून स्वतः गादीवर बसावे का? या विचारात युवराज कांतिदीप असल्याचे आरशात स्पष्ट दिसले

आपल्याच मुलाच्या मनात असे विचार उत्पन्न होत असतां आपण आदर्श राजा कसे होणार, हे सर्व स्वप्नच आहे! राजाने आपल्या मुलाला बोलाविले व म्हणाला— "बाळा रे, मला राज्याचा मोह उरलेला नाही. उद्यां मी तुझा राज्याभिषेक करून देऊन स्वतः वानप्रस्थाश्रमात प्रवेश करणार आहे." असे सांगून राजाने सर्व अधिकाऱ्यांना तुरुंगातून मुक्त केले.

दुसऱ्या दिवशी कांतिदीप राजा झाला. अमरदीपाने तो जादूचा आरसा फसवा आरसा म्हणून फोडून टाकला व भगवी वस्त्रे धारण करून तपश्चर्या करण्यासाठी निघून गेला. ते ऐकून आनंद झाला नाही अशी एकही प्रजा वज्रगिरीत नव्हती.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला— "राजा, इतका अपूर्व जादूचा आरसा अमरदीपाला इतका कुचकामाचा कसा काय वाटला? तो राजाचा दोष होता की आरशाचा? आपल्याला उपयोगी न पडलेला आरसा मुलाला तरी उपयोगी होतो का हे न पाहतां राजाने तपश्चर्या करायला जाण्यापूर्वी तो कां फोडून टाकला? आपला मुलगा त्याच्या मदतीने कदाचित् आदर्श राजा होऊ शकला तर या विचाराने का फोडला? या सर्व शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू



दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"त्या आरशात कितीही अद्भुत शक्ती असली तरी आदर्श राजा म्हणून राज्यकारभार चालविण्यासाठी उपयोगी होईल अशी शक्ती त्याच्यात नव्हती. त्याला माणसाच्या मनातले विचार कळत होते. राजाच्या मनात कोणाच्या विषयी कधी संशय उत्पन्न झाला तर आरशात पाहून त्याला त्यांचे विचार कळत होते. अर्थातच ते राजाच्या विरुद्धच असत. काही कारण नसेल तर राजाच्या मनात संशय येण्याचे कारणच नाही. सामान्य परिस्थितीत राजाचे अधिकारी त्यांच्या स्वतःच्या समस्यांविषयींच विचार करतात, राजाला राज्यकारभारात कशी मदत करावयाची याविषयी विचार करीत नाहीत. त्या जादूच्या आरशावरून अधिकाऱ्यांची योग्यता कळत नसे. राजाला उपयोगी पडण्यासारखे त्याच्या अधिकाऱ्यांचे गुणावगुणच तर होते. माणसाच्या मनात परिस्थितीप्रमाणे निरनिराळे विचार येतच असतात, परंतु त्या सर्वांप्रमाणे तो वागतोच असेंही नाही. ते विचार मनातल्या मनातच राहून जातात. परंतु ते विरुद्ध प्रकारचे असले तर राजाला वाटे की ते आपल्याच विरुद्ध आहेत. जादूच्या आरशामुळे राजा फसला तो अशा तऱ्हेनेच! आरशामुळे राजाचे जे थोडे नुकसान झाले ते हे की राजाने त्याच्या हिताचे म्हणून जे जे उपाय केले किंवा मार्ग काढले ते सर्व आरशाने बळकावले. परिणाम काय झाला? राज्यकारभार उत्तम तऱ्हेने चालविणारा मंत्री आरशामुळे निरुपयोगी निरर्थक ठरला! आपल्या मुलाची तीच दुर्गत होईल की काय असे वाटून राजाने तो आरसा फोडून टाकला असावा."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.





# देवाची ठेव

रामपुर येथे रामनवमीचा उत्सव मोठ्या थाटामाटाने होत असे, त्या करिता गावकरी चंदा वसूल करीत. देवाच्या विश्वस्तांपैकी वैशाख हा एक होता. सर्वांचा त्याच्यावर फार विश्वास होता. एके वर्षी जे पैसे वसूल झाले ते वैशाखजवळ ठेवावे असे सर्वानुमते ठरले. वैशाख हा तसा फार श्रीमंतही नव्हता, परंतु नीतिवान व धर्मभीरू होता. ही गोष्ट सर्वांना माहीत होती.

देवळाच्या विश्वस्तांत भद्रेश्वर नावाचा एक श्रीमंत माणूससुद्धा होता. देवाचे पैसे त्याच्याजवळ न ठेवतां वैशाखजवळ ठेवण्याचा निश्चय झाल्याचा त्याला थोडा राग आला. ती गोष्ट कळल्यावर वैशाखने देवाची म्हणून जेवढी रक्कम होती ती एका पिशवीत ठेवली व भद्रेश्वरला देत म्हणाला— "ही रक्कम माझ्यापेक्षा तुमच्याचकडे जास्त सुरक्षितपणे राहील. गरज पडेपर्यंत तुम्हीच ही आपल्याजवळ ठेवून घ्या!"

गावकऱ्यांनी दिले नसले तरी वैशाखने त्याला थोरपण दिले याबद्दल भद्रेश्वराच्या मनाचे समाधान झाले व तो म्हणाला— "ठीक आहे, वाटेल तेव्हां येऊन रक्कम घेऊन जा!"

परंतु मध्यंतरी अनपेक्षितपणे एक भानगड झाली. भद्रेश्वराचा मुलगा दुर्व्यसनी होता. जुगारीशिवाय त्याचा दिवस जात नसे. वैशाखने बापाकडे आणून दिलेले पैसे त्याने स्वतःच्या डोळ्यांनी पाहिले होते व बापाने ते कोठे ठेवले होते हेही त्याने पाहिले होते. ते त्याने लांबविले.

दोन दिवसांनी प्रमुख ग्रामस्थांची सभा झाली. उत्सवासंबंधी कार्यक्रम वगैरे ठरला. वैशाखाला त्यांनी पैसे आणायला सांगितले. वैशाख भद्रेश्वरकडे गेला व त्याच्याकडे ठेवलेली रक्कम मागितली. पैशाची पिशवी नाहीशी झाल्याचे भद्रेश्वरने पाहिले व ती कशी नाहीशी झाली असेल हे त्याने ओळखले. आतांपर्यंत आपल्या चिरंजीवांनी ती रक्कम खर्च केली असणार हेही ओळखले. आतां ती रक्कम स्वतः भरून देणे भाग होते. परंतु ते भद्रेश्वरला मान्य नव्हते. वैशाखने देवाचे पैसे आपल्याकडे ठेवल्याची पावती त्याला दिली नव्हती व त्या संबंधीचा दुसरा पुरावाही त्याच्याजवळ नव्हता. म्हणून भद्रेश्वर त्याला त्या पैशासंबंधी काही माहीत नसल्याचे निस्संकोच सांगून मोकळा झाला.

वैशाखाला डोक्यावर आकाश कोसळल्यासारखे वाटले. आतां आपण ग्राम प्रमुखांना काय उत्तर द्यायचे? ते पैसे देणे त्याला स्वतःला शक्य होईल का? शक्य झाले नाही तर लोक काय म्हणतील?

काय वाटेल ते होवो असे ठरवून वैशाखने ग्रामस्थ प्रमुखांना व विश्वस्तांना जे झाले ते जसेच्या तसे सांगून टाकले. भद्रेश्वर किती चिक्कू असला तरी गावातला एक मोठा माणूस म्हणून त्याचा नावलौकिक होता. म्हणून वैशाख म्हणाला त्या गोष्टीवर ग्रामस्थांचा विश्वास बसला नाही.

"काय वाटेल ते कर व उद्याच्या आत पैसे हजर कर!" विश्वस्तांनी वैशाखला सांगितले.

"पैसे भरणे तर भागच होते, परंतु त्याबरोबर चार चौघासमोर त्याची मान



श्री को. नि. निजसूरे

खाली झाली होती. घरी येऊन तो चिंतामग्न स्थितीत बसला.

भद्रेश्वराच्या मुलाने, पैशाविषयी बाप काही विचारपूस करतो का, यासाठी दोन दिवस वाट पाहिली, परंतु त्या दोन दिवसात पैशाची गोष्ट निघालीच नाही, तेव्हां त्या पैशाने जुगार खेळून इतर दोघांपैकी एकाला सर्व पैसे घालवून बसला.

भद्रेश्वरचा मुलगा तोंड झांकून घरी गेला. परंतु जिंकणाऱ्याला तिसऱ्या जुगाऱ्याने सोडले नाही. गोडगोड बोलून दारूच्या गुत्त्यावर नेऊन त्याला दारू खूप पाजली व तो झिंगून पडल्यावर त्याच्या जवळचे पैसे घेऊन पसार झाला.

वाटेत त्याला दुरून गस्त घालणारे शिपाई दिसले. त्यांना पाहतांच तो मागे फिरला व पळाला. गस्त घालणाऱ्या शिपायांना त्याचा संशय आला व त्यांनी त्याचा पाठलाग केला. आतां सुटका नाही हे ओळखून त्याने एका गल्लीत शिरून एका घराच्या उंबरठ्यात पैशाची पिशवी टाकली व पळून गेला.

त्याने ती पिशवी टाकली ती भद्रेश्वरच्या घराच्या पडवीतच टाकली होती. चोरांच्या भीतीने भद्रेश्वरला रात्री कधी शांत झोप येतच नसे. उंबरठ्यात धप्पदिशी पडल्याचा आवाज ऐकून भद्रेश्वर उठून आला व दार उघडून पिशवी उचलली.

त्याच वेळी शिपायांनी घरासमोर येऊन पिशवी हातात धरून उभ्या असलेल्या भद्रेश्वराला पकडले. तो चोर नसल्याचे भद्रेश्वरने किती सांगितले, परंतु तिकडे दुर्लक्ष करून भद्रेश्वरला पैशाच्या पिशवीसह न्यायालयात हजर केले.

चवकशीच्या वेळी ती पिशवी या हातातून त्या हाती जात पुन्हां भद्रेश्वराकडे कशी आली सर्व गोष्टी बाहेर पडल्या. भद्रेश्वराची लबाडी सर्वांना कळली. वैशाखाला दोषी ठरविल्याबद्दल त्यांनी त्याची माफी मागितली. भद्रेश्वरला व त्याच्या मुलाला दंड भरावा लागला.



# खरे थोरपण

पूर्वी कधी विदर्भ देशात एक कोट्याधीश व्यापारी रहात असे. त्याला सर्व मुलीच होत्या. एकही मुलगा झाला नाही. त्याची बायको एकदा म्हणाली—"आपल्याजवळ इतके पैसे तिजोरीत कुजताहेत. तुम्ही एकदा जरी सर्व गांवकऱ्यांना जेवण दिलेत तर त्यांच्या आशीर्वादाचे फळ म्हणून होईल कदाचित मुलगा !"

व्यापाऱ्याला ती गोष्ट पटली व त्याने सर्व गावाला एक मेजवानी दिली. त्याने स्वत: जाऊन बोलावणी केली. त्या मेजवानीला सर्व गावकरी आले. आला नाही तो एक लाकूडफोड्या रामू. त्यानंतर तो व्यापारी पुढे केव्हां तरी रामूला भेटला. त्याला विचारता तो म्हणाला—"अहो, तुम्ही सर्व गावाला मेजवानी दिलीत त्या दिवशी माझ्या वखारीत कोणी लाकडे घ्यायला आलाच नाही. आम्हां सर्वांना उपाशीच झोपावं लागलं.

"तुम्ही सर्वांनी माझ्याकडे येऊन जेवायचं सोडून उपाशीच झोपण्याची गरजच काय होती ?" व्यापाऱ्याने चकित होऊन विचारले.

फक्त एक वेळ तुमच्या घरी जेवल्याबद्दल आजन्म तुमच्यासमोर मान वाकवावी लागली असती ! मनगटात बळ असेपर्यंत मी तसं कशाला करायचं हो ?" रामूने विचारले.

त्यानंतर गावातले चार लोक भेटले म्हणजे म्हणत, "या गावात तुमच्यासारखे थोर लोक नाहीत हो !" तेव्हां कोट्याधीश व्यापारी म्हणे, "माझ्याहून मोठा, लाकूडफोड्या रामू आहे !" असे सांगून तो म्हणाला होता ते व्यापारी त्यांना सांगे.





# श्रमाचे फळ

एका गावी एक गरीब ब्राह्मण रहात असे. त्याचं एक लहानसं घर व त्याच्या मागे लहानशी परसाची जागा होती. त्याशिवाय त्याच्याकडे काही नव्हते. म्हणून तो दररोज चार घरी भिक्षा मागे व त्याला त्या दिवसापुरेसे तांदूळ मिळाले की त्यावर संतोष मानून घरी परत येई. त्याची बायको भात व परसात जी थोडी पालेभाजी मिळे ती शिजवी. दोघे जेवीत व सुखाने रहात.

काही काळ लोटल्यावर त्या ब्राह्मणाला वार्धक्य आले व भिक्षाटन करणेसुद्धा कष्टाचे वाटू लागले. तेव्हां त्याची बायको त्याला म्हणाली—"तुम्ही आयुष्य भरात उद्याचा विचार केला नाहीत. आधी विचार केला असतात तर हे दिवस पहायला मिळाले नसते. सुदैवाने या गावचा राजा मोठा दानी आहे. तुम्ही त्याच्याकडे जाऊन मागितलेत तर तो आपले दारिद्र्यच नाहीसे करील."

ब्राह्मण त्याप्रमाणे राजाला भेटला व राजाला आशीर्वाद दिला. राजाने विचारले—"बोला, काय हवे आहे तुम्हांला?"

"महाराज, आपण वैभव संपन्न आहां, आपल्या वैभवापैकी किंवा संपदेपैकी मला काही नको. आपण स्वत: कष्ट करून काही मिळविलं असेल तर त्यातले फूल नाही फुलाची पाकळी दिलीत तरी पुरे मला!" ब्राह्मण म्हणाला.

राजाजवळ पैशाला काय तोटा? परंतु त्यांतली एक पैसुद्धा त्याची स्वत:ची कष्टार्जित नव्हती. या ब्राह्मणाला द्यायचं ते स्वत: मेहनत करून मिळविलेले दिले पाहिजे. असा विचार करून राजा त्या ब्राह्मणाला म्हणाला—"तरमग उद्यां संध्याकाळी येऊ शकाल का?"

२५ वर्षापूर्वीची चांदोबातली गोष्ट

ब्राह्मण 'हो' म्हणून निघून गेला. दुसऱ्या दिवशी उजाडतांच ब्राह्मण जुने मळके कपडे घालून मजुरासारखा गावात निघाला. तो थोडेच अंतर चालून गेला असेल, वाटेत त्याला एक कुंभार दिसला. तो मडकी करण्याच्या तयारीत होता.



राजाने त्याला विचारले—"काय हो, मला काही काम द्याल का?"

"कामाला काय तोटा रे? मी चाकावर मडकी करायला बसतो, ती माती तयार कर. संध्याकाळपर्यंत काम केलेस तर चार रुपये देईन." कुंभार म्हणाला.

राजाने ते मान्य केले. परंतु त्याला कुंभाराने सांगितलेले काम करता येईना. माती तुडवीत असतां त्याचे पाय दुखू लागले. ते सर्व कुंभाराला कळत होते. "मजुरीची कामे तुला काय येणार रे? पुरे झालं, चालू लाग! मी कबूल केले होतं म्हणून देतो आहे! हे घे चार रुपये. पुन्हां मजुरी करतो म्हणून सांगत माझ्याकडे येऊ नकोस!" या शब्दात राजाला त्याने पाठवून दिले.

यायला सांगितल्याप्रमाणे ब्राह्मण दुसऱ्या दिवशी आलाच. राजाने त्याला चार रुपये देत म्हटले—"हे माझ्या श्रमाचे फळ आहे!"

"हे मला हजार रुपयांसारखे आहेत, महाराज!" असे म्हणत ब्राह्मण राजाला मन:पूर्वक आशीर्वाद देऊन निघून गेला.

नवरा राजाकडून पुष्कळशा भेटवस्तू गाड्या भरून घेऊन येईल ही आशा धरून बसलेल्या त्याच्या बायकोने ब्राह्मणाला रिकाम्या हाताने येत असलेला पाहून विचारले—"काय हो, काय झाले? राजाने पुन्हा यायला सांगितले वाटतं?"

"नाही, दान घेऊनच आलो आहे. हे घे चार रुपये!" म्हणत ब्राह्मणाने चार रुपये बायकोला दिले.

ते पाहतांच बायको भडकली. "काशीला जाऊन हेच पुण्य कमाऊन आलात वाटतं! राजाला सुद्धा भीक लागली की काय, फक्त चार रुपये तुमच्या तोंडावर फेका-

यला?" असे म्हणत तिने ते रुपये परसात फेकून दिले.

तोंपर्यंत चांगला काळोख पडला होता. उजाडल्यावर ते रुपये उचलून आणता येतील, असे ब्राह्मणाने ठरविले. सकाळी उठून पाहिले तर ते रुपये त्याला दिसले नाहीत. परंतु पूर्वी कधी न पाहिलेली अशी चार रोपटी मात्र दिसली.

पाहतां पाहतां ती रोपटी वाढू लागली व सुंदर दिसू लागली. लवकरच त्यांना फळे लागली. ब्राह्मणाने व त्याच्या बायकोने ती फळे काढून चिरून पाहिली तर त्यांतून मोतीच मोती निघाले. त्या म्हातान्या जोडप्याचा स्वतःच्या डोळ्यांवरच विश्वास बसेना. ते मोती मोत्याच्या व्यापान्यांकडे नेऊन दाखविले तर ते मोती चांगल्या जातीचे असल्याचे कळले.

इतक्या वर्षांनी त्या म्हातान्या जोडप्याचे दारिद्र्य गेले. ती चारही रोपटी कल्पवृक्षांसारखी वाढत राहिली व त्यांना फळं लागत राहिली. त्यांनी गावभरच्या लोकांना ती वांटायला सुरवात केली.

काही दिवसांनी राजाला त्या ब्राह्मणाविषयी सर्व माहिती कळली. श्रमाचं फळ चारच रुपये घेऊन गेलेला ब्राह्मण इतका श्रीमंत कसा काय झाला, राजाला कळेना. ते कळावे म्हणून चवकशी करायला राजा त्या ब्राह्मणाकडे आला.

ब्राह्मण म्हणाला–"राजा, तू त्या दिवशी दिलेले चार रुपये मी खर्च केले नाहीत. मी बायकोला दिले ते तिने चिडून जाऊन परसात फेकून दिले. दुसऱ्या दिवशी ते मला दिसले नाहीत. परंतु चकित करून सोडणारी चार रोपटी दिसली. त्यांच्यामुळे माझं पिढ्यान्‌पिढ्या चालून आलेलं दारिद्र्य कायमचे गेले!"

श्रमाचं फळ हे कसं असतं हे राजाला कळलं. त्या दिवसापासून तो स्वतःच नव्हे तर प्रजेनेसुद्धा स्वतःच्या श्रमाचे फळ चाखावे यासाठी प्रयत्न करू लागला.





# पंचायुध

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी युवराज म्हणून अवतार धारण केला. बारशाच्या दिवशी निरनिराळ्या देशातून थोर विद्वान व अनेक ज्योतिषी आले. ते राजाला म्हणाले–"आपला हा मुलगा कोणी थोर महापुरुष दिसतो आहे! पंचायुधे धारण करून हा जगज्जेता होईल आणि शूर पराक्रमी म्हणून याचा नावलौकिक होईल!" म्हणून मुलाचे नाव पंचायुध असेच ठेवण्यात आले.

काही काळ लोटला. मुलाला समजूत येऊ लागली, तेव्हां राजाने त्याला गांधार देशाच्या तक्षशिला नगरीतील एका सुप्रसिद्ध गुरुकुलात विद्याभ्यासासाठी पाठविले.

पंचायुधने तक्षशिला येथील गुरुकुलात काही काळ अभ्यास केला व सर्व विद्या पारंगत झाला. गुरुकुलातून समावर्तन संस्कार झाल्यावर घरी निघते वेळी कुलगुरूने शिष्याला आशीर्वाद देऊन पांच आयुधे दिली. गुरुवर्यांचा निरोप घेऊन पंचायुध काशीला परत निघाला.

पंचायुधाला वाटेवर एक भयंकर अरण्य लागले. त्या अरण्यातून चालत असतां पंचायुधाला वाटेत काही ऋषी व मुनी भेटले. ते म्हणाले–"बाबा रे, तुला पाहिले तर तू वयाने फारच लहान दिसतो आहेस! या रानात रोमांच नावाचा एक भयंकर राक्षस राहतो आहे. तू त्याच्या दृष्टीस पडलास तर तो तुला जिवंत सोडणार नाही. म्हणून तू या वाटेने न जाता आणखी एखाद्या वाटेने जा."

पराक्रमी पंचायुधाच्या मनावर मुनींच्या त्या सल्ल्याचा काही एक परिणाम झाला नाही. त्याने त्यांच्या म्हणण्याकडे दुर्लक्ष केले व तो त्याच अरण्यमार्गे पुढे निघाला.

वाटेत एका जागी त्याला ताडामाडा एवढा उंच व अवाढव्य देहधारी रोमांच राक्षस भेटला.

तो राक्षस दिसायला भयंकरच होता. त्याचे डोके हत्तीसारखे मोठे होते. त्याला आग पाखडणारे डोळे होते आणि हत्तीच्या सारखेच दोन मोठे सुळे देखील होते. शिवाय सर्व अंगावर अस्वलासारखे लांब लांब केसही होते.

रोमांच राक्षस पंचायुधाच्या वाटेवर आडवा उभा राहून हुंकारला—"कोण रे तू? कोठे निघालास? उभा रहा! या जंगलात पाऊल टाकायला तुझी छाती कशी झाली? माझे नाव ऐकूनच लोक थरथर कांपतात. मी तुला आतां गिळतो!"

पंचायुध जरासुद्धा न भितां म्हणाला—"राक्षस राजा, मी सर्व कळल्यावरच या वाटेने आलो आहे. खबरदार, तू जवळ आलास तर!" असे दरडावून पंचायुधने धनुष्यावर बाण चढवून नेम धरला व राक्षसावर सोडला.

तो बाण राक्षसाने अंगात घातलेल्या कातडचाला लागला. राक्षसाला लागलाच नाही. तेव्हां पंचायुधाने बाणामागून बाण सोडून रोमांचावर शरवृष्टीच केली. परंतु तो प्रयत्नही निष्फळ ठरला. शेवटी पंचायुधाने विषारी बाण सोडले. परंतु त्यामुळे सुद्धा राक्षसाचे काहीही नुकसान झाले नाही.

आतां मात्र राक्षस मोठ्याने हुंकारला व पंचायुधावर धावला. पंचायधाने आपली तलवार उपसली व राक्षसावर वार केला. परंतु राक्षस जागचा हूलला सुद्धा नाही.

तेव्हां पंचायुध राक्षसाला म्हणाला—"तू आपल्या मूर्खपणाने मला ओळखलेले दिसत नाहीस. माझं नाव पंचायुध आहे, लक्षात असू दे. मी या अरण्यात पाऊल टाकतांना फक्त आपल्या आयुधांवरच अवलंबून राहून इकडे आलो नाही!" असे म्हणत पंचायुधने मूठ आवळून राक्षसाला एक ठोसा दिला. राक्षस जागचा हूलला नाही.

राक्षस जोराने हसला व म्हणाला—"पोरा! तुझे हे धाडस पाहून तू कोणी सामान्य माणूस असशीलसे मला वाटत नाहीं. माझ्या सारख्या प्रळय भयंकराशी युद्ध करायचे साहस तू दाखविलेस. इतर लोक मला नुसते पाहूनच बेशुद्ध होऊन पडतात. मग तुला माझी भीति न वाटण्याचे काय कारण रे!"

"भय वाटण्याचे कारणच का असावे? जो जन्मतो त्याला मरण हे असतेच! शिवाय माझ्या अंगात वज्रायुधासारखे एक खड्ग आहे. ते खड्ग म्हणजे ज्ञान. तू मला गिळलेच समज तर ते खड्ग तुला उभे चिरून काढील!"

राक्षस एक दोन क्षणच विचार करीत राहिल्यावर म्हणाला—"पोरा, तू म्हणालास त्यात काही अर्थ असावा असे मला वाटू लागले आहे! ते काही असो, एवढे खरे की तू निर्भय आहेस आणि शूर पराक्रमीही





आहेस. मी तुझ्यासारख्याला गिळायचं म्हटलं तरी कदाचित् पचवू शकणार नाही. आतां तू तुला जिकडे जावयाचे असेल तिकडे खुशाल जा."

पंचायुध रूपे अवतार घेतलेल्या बोधिसत्वांनी रोमांच राक्षसाला आशीर्वाद दिला व म्हटले—"तू मला सोडलेस, ठीकच झालं. परंतु तुझं पुढे काय? तू कितिदां या जगात जन्म घेऊन कुकर्मं करीत निकृष्ट जीवन जगत राहिला आहेस, आणि अज्ञान अंधकारात कोणास ठाऊक, किती काळ भटकत राहिला आहेस? तू आणखी कितीही दिवस नाहीं युगानुयुगे जिवंत राहिलास तरी तुला गती नाही का?"

"तरमग महात्मन्, या अज्ञानांधकारातून बाहेर निघायला काही मार्ग आहे का? असला तर कृपा करून सांगा." राक्षसाने विचारले.

"तू या अरण्यात राहून अरण्यमार्गाने येणाऱ्या जाणाऱ्यांचा वध करून त्यांना खातोस व अशातऱ्हेने तू आपले पाप वाढवीत आहेस. तुझी पापकर्मं जितकी वाढत जातील, तुला तितकाच जास्त काळ हा निकृष्ट राक्षस जन्मच मिळणार, तुला मोक्षलाभ मिळणेच शक्य नाही. तुला उत्तम मानव योनीतच जन्म हवा असेल तर तू पापकृत्ये करण्याचे सोडून दे!"

असा उपदेश करून बोधिसत्वांनी त्या राक्षसाला मानवांचे हित व्हावे यासाठी त्याने पालन करण्यालायक व पुण्यप्राप्तीस आवश्यक असलेली पांच सूत्रे सांगितली व अधम मानवत्व आणणारी पांच तंत्रे सांगितली.

त्या दिवसापासून रोमांच राक्षसाने आपली राक्षसी कृत्ये सोडली आणि तो त्या अरण्यमार्गे येणाऱ्या लोकांचा अतिथिसत्कार करू लागला आणि धर्मबुद्धी नावे प्रसिद्ध झाला.

अशा तऱ्हेने बोधिसत्वांच्या उपदेशामुळे भयंकर राक्षस देखील सन्मार्गाने चालू लागला.





## खारवेल

कलिंग देशाच्या राजधानीत एके काळी महावीर जिनचा पुतळा होता. कलिंग देशाची प्रजा त्याला फार मान देत असे. मगध देशाच्या एका नंदवंशीय राजाने कलिंग देशावर स्वारी करून महावीरचा पुतळा उचलून नेला.

त्यानंतर काही काळ लोटल्यावर अशोकाने स्वारी केली. कलिंग देशाच्या प्रजेने अशोकाच्या बलाढ्य सैन्याशी निकराचे युद्ध केले आणि असंख्य शूर सैनिकांनी वीरगती प्राप्त केली. त्या युद्धात झालेला रक्तपात पाहून अशोकाचे हृदयपरिवर्तन झाले. परंतु कलिंग देशाच्या प्रजेचे जीवित मात्र नष्ट झाले.





मौर्य साम्राज्यात कलिंग राज्य महत्त्वाच्या क्रमांकावर होते. अशोकानंतर ते पुन्हा स्वतंत्र झाले. आणखी काही काळ लोटल्यावर वादळी तुफाने येऊन कलिंग देशातील नगरे व गावे यांच्याबरोबर



राज्यावर अशी संकटे कोसळली असतां खारवेल नावाचा एक शूर तरुण कलिंग देशाच्या सिंहासनावर बसला. त्याने आपल्या पराक्रमाने राज्याला बळकटी आणून अलीकडच्या भुवनेश्वर-जवळ नवीन राजधानी स्थापन केली आणि शेतीभाती वाणिज्यव्यापाराला प्रोत्साहन दिले.

प्रजेच्या हृदयात आत्मविश्वास व स्वाभिमान उत्पन्न व्हावा, यासाठी त्याने सर्व ललितकलांना प्रोत्साहन दिले. नृत्यगायनामुळे प्रजेला सुखप्राप्ती लाभली. कित्येक वर्षांपासून निसर्गाच्या कोपामुळे दुःखी झालेल्या प्रजेला पुन्हां सुखोपभोग अनुभवायला मिळाला.





परंतु एवढ्याने खारवेलाच्या मनाचे समाधान झाले नाही. प्रजेत पुन्हां चैतन्य आणायचे झाल्यास काहीतरी महान कार्य करून दाखविले पाहिजे, असे त्याला वाटले. त्याने त्या हेतूने एक मोठे सैन्य उभे केले. आपल्या सैन्याचा शक्तिसामर्थ्याविषयी पूर्णविश्वास उत्पन्न झाल्यावर त्याने दिग्विजय करण्याचे

त्याने मगध राज्यावरच स्वारी करावी आणि कलिंगच्या राजधानीतील महावीरचा पुतळा परत आणावयाचा असा त्याने निश्चय केला. त्या पुतळ्याची पुन्हा स्थापना करून झालेला अपमान धुवून काढला पाहिजे. त्याप्रमाणे कलिंग देशाचे सैन्य मगधच्या राजधानीच्या दिशेने निघाले.





त्याच सुमारास डिमिट्रियस नावाच्या ग्रीस राजाचे सैन्य मगधच्या राजधानी-वर चालून येत होते. मगधराज दोन्ही बाजूंनी येत असलेल्या सैन्यांची बातमी ऐकून घाबरला.

खारवेलाने राजधानीला वेढा दिला. डिमिट्रियसने त्याच्याकडे आपला एक दूत पाठवून दोघांनी मिळून मगधच्या राजधानीवर दोन्ही बाजूंनी चालून जावे अशी सूचना केली.





डिमिट्रियसच्या मदतीने राजधानी जिंकणे सोपे जाईल, हे खारवेलाला माहीत होते. परंतु परकीयांना स्वदेशात शिरकाव करू देणे देशहिताचे नाही हे ओळखून खारवेला ती सूचना अमान्य करून डिमिट्रियसवरच चालून गेला व त्याला पळवून लावले.

त्यानंतर खारवेल अनेक राज्ये जिंकून भारत देशातील एक चक्रवर्ती म्हणून प्रसिद्ध झाला. त्यानंतर तो मगध देशावर चालून जाण्याचे ठरवून निघाला. परंतु मगध राजाने स्वतःच कलिंग देशाच्या वीरपुरुषाचा पुतळा देण्याचे वचन दिले. म्हणून मगध व कलिंग राज्यामधील युद्ध झाले नाही.





खारवेलाने आपल्या कारकीर्दीत जैन मताच्या प्रचारार्थ पुष्कळ प्रोत्साहन दिले. जैन पंडितांची एक मोठी परिषद बोलाविली. जैन साधुसंतांच्या निवासासाठी भुवनेश्वर नजीक उदय गिरी व खंडगिरी पर्वतांमध्ये गुंफा बांधून दिल्या.



# कोदंडराम

नारायणपूर नावाच्या गावी राहणाऱ्या लक्ष्मणशेट नावाच्या व्यापाऱ्याने व्यापारात पुष्कळ फायदा मिळविला आणि लक्षाधीश झाला. त्याने गावातल्या कोदंडरामाचा नवस केल्याप्रमाणे शंभर सोन्याच्या मोहोरा देवाच्या चरणी सपत्नीक वहायला जाण्यासाठी मुहूर्तसुद्धा ठरविला.

त्याने रात्रीच पेटीत शंभर मोहोरा व इतर सामान व कपडे वगैरे घालून तयारी करून ठेवली होती. परंतु रात्री चोर घरात शिरले आणि ती पेटी चोरून नेली. लक्ष्मणशेट, त्याची बायको आणि त्यांचा मुलगा भिकूशेट तिघांनी पेटीचा घरभर शोध केला. मागचे दार उघडे असल्याचे पाहून परसात धावले, तेव्हां चोरी झाल्याचे कळले. पोलीस स्टेशनावर फिर्याद नोंदविली. देवाच्या चरणी वाहायला तयार ठेवलेली रक्कम चोरीला गेली याबद्दल लक्ष्मणशेटला फार वाईट वाटले. पुन्हां मोहोरा पाहिजेत त्या मिळाव्या यासाठी काही दिवस प्रवास लांबणीवर पडला.

मध्यंतरी कोणीतरी येऊन लक्ष्मणशेटला एक चिट्ठी आणून दिली. चिट्ठीतला मजकूर असा होता.

"पूज्य श्री दानशूर लक्ष्मणशेट यासी सा. न. वि. वि.

आपल्या अनुग्रहाने येत्या रविवारी आमची मुलगी इंदिराच्या विवाहाचा मुहूर्त धरला आहे. या संदर्भात आपण केलेले उपकार आम्ही कधीही विसरणार नाही. अ.पण विवाहसमयी येऊन वधुवरांना आशीर्वाद द्यावा ही विनंती. कळावे लोभ असावा हे विज्ञापना,

आपला

नृसिंह, रामपूर

हे पत्र वाचून लक्ष्मणशेट चकितच झाला. चिट्ठी आणून देणारा किंवा चिट्ठी लिहिणारा नृसिह कोणीच त्याच्या ओळखीचे नव्हते. त्याने त्या गृहस्थाला केव्हां व काय मदत केली हे देखील त्याला कळेना. याच्या मागचे गुपित काय हे कळावे यासाठी लक्ष्मणशेट रामपूरला गेला.

नृसिहरावांनी लक्ष्मणशेट येताच पुढे होऊन आदरपूर्वक नमस्कार केला व म्हणाले–"जवळ पैसा नसल्यामुळे लग्न मोडणार की काय या संकटात सापडलो असतां आपण देव पावल्यासारखे पैसे पाठवून कृपा केलीत. मी आपले उपकार जन्मोजन्मी विसरणार नाही!"

"तुम्हांला पैसे कोणी आणून दिले?" लक्ष्मणशेटने नृसिहरावांना विचारले.

"कोणीतरी कोदंडराम नावाचा माणूस होता हो! 'हे पैसे घ्या व मुलीचे लग्न उरकून घ्या. हे पैसे नारायणपूरच्या लक्ष्मणशेटनी पाठविले आहेत!" असे म्हणाले नृसिहराव.

त्याला वाटलेले आश्चर्य मनातल्या मनात ठेवून लक्ष्मणशेट लग्न होताच नारायणपूरला परतला.

दुसऱ्याच दिवशी विक्रमपूरहून काही शेतकरी आले व म्हणाले–"आपण विहीर खणवून दिलीत तिचा प्रारंभोत्सव आपल्या हस्ते व्हावा, म्हणून विनंती करायला आलो आहों!"



लक्ष्मणशेट त्यांच्याकडे आश्चर्यचकित होऊन पाहू लागला. "एवढ्यात कसे विसरलात मालक? पाण्याभावी आमचे गावकरी किती कष्ट सहन करीत होते? तुम्ही कृपा करून कोदंडरामाच्या हाती विहीर खणण्यासाठी पैसे पाठविले नव्हतेत का?" शेतकऱ्यांनी हात जोडून विचारले.

पुन्हा कोदंडरामच!

लक्ष्मणशेटने आपले आश्चर्य चेहेऱ्यावर प्रगट होऊ न देता, काहीतरी आठवल्यासारखं सोंग करून त्यांना काहीतरी उत्तर दिले आणि निरोप दिला. नंतर ठरल्या मुहूर्तावर विहिरीचा प्रारंभोत्सव करून गावकऱ्यांचा निरोप घेऊन परतला.

आपण नवसासाठी म्हणून काढून ठेवलेल्या मोहारा चोरीला गेल्या ते कळल्यानेच साक्षात कोदंडरामानेच आपले नांव सांगून आपल्या वतीने ही कामे करविली असावीत अशी शंका लक्ष्मणशेटला आली.

आणखी एका दिवशी कोणी अपरिचित माणूस आला व नमस्कार करून म्हणाला– "शेटजी, माझं नाव नागनाथ. मी एका भयंकर आजाराने आजारी होतो. रामाचार्य वैद्यबुवांनी त्या आजारासाठी औषध तयार करायला सोने पाहिजे असल्याचे सांगितले. मी पडलो गरीब. सोने कोठून आणणार? आतां मी वांचत नाही असे सर्वांनी सांगून टाकले. तेव्हां कोणी कोदंडराम नावाचा माणूस आला व











लक्ष्मणशेटनी मला तुला हे सोने पोचते करायला पाठविले आहे, असे सांगून निघून गेला. रामाचार्यांनी ते सोने घेऊन सुवर्ण भस्म केले. त्या औषधाने मी चांगला बरा झालो. तुमच्या कृपेने मी यमपाशातून वाचून बाहेर पडलो."

लक्ष्मणशेटने त्याची योग्य प्रकारे सर्व चवकशी करून त्याला काही फळफळावळ देऊन निरोप दिला. तितक्यात सोनाराने येऊन शंभर सोन्याच्या पुतळ्या दिल्या व मजुरी घेऊन निघून गेला.

लक्ष्मणशेटने पुन्हां नवस फेडण्यासाठी प्रयाणाची तयारी सुरू केली. त्यावेळी शेजारच्या खोलीत त्याचा मुलगा भिकू कोणाशी तरी हे बोलत असल्याचे ऐकू आले.

"राजा, तू म्हणालास तसे मी कोदंडरामाचे सोंग केले होते. माझ्या बाबांना खरोखरीच वाटलं की साक्षात् देवानेच त्यांना कीर्ती मिळावी यासाठी त्यांच्या भक्तीवर प्रसन्न होऊन हे सर्व केले असणार! एकूण माझ्या बाबांना फसवून आपण ज्या सोन्याच्या पुतळ्या मिळविल्या त्या सत्कार्यी लागल्या."

त्याचा मुलगा ते बोलत होता तो त्याचा मित्र आनंदशी बोलत होता, हे लक्ष्मणशेटने ओळखले.

दुसऱ्या दिवशी लक्ष्मणशेटने आपल्या मुलाला बोलावून त्याच्या हातात शंभर सोन्याच्या पुतळ्यांची पिशवी देत म्हटले– "अरे, हे बघ पुन्हां नवस फेडायचा विचार मी सोडला आहे. हे सोनेसुद्धा तू सत्कार्यी लाव. मला ऐकू येईल अशा तऱ्हेने तू काल रात्री आपला मित्र आनंदशी बोललास त्यावरून सर्व वृत्त मला कळले. कोदंडरामाला दिलेल्या सोन्याचा उपयोग सत्कार्यी होतो की नाही हे मला पाहतां येणार नाही. परंतु तुम्ही केलेली सत्कार्ये पाहून मात्र मनाला फार आनंद झाला व मनाचे समाधान झाले.

स्वतःच सुसंस्कृत असलेल्या त्याच्या वडिलांत झालेला बदल पाहून भिकूला परमानंद झाला.



# अव्यापारेषु व्यापार:

भीमू फार गरीब होता. तो घाऊक व्यापाऱ्याकडून फळे विकत घेऊन दारोदारी ती विकी. जो फायदा होई त्यावर त्याचा उदरनिर्वाह चाले. त्याच्याकडून शंकरराव फळे विकत घेत. त्यांना त्याची कीव आली. ते त्याला म्हणाले–"काय रे, तू फळांचे दुकान काढलेस तर बसल्या जागी तुला ही मिळकत होईल की!"

"त्यासाठी भांडवल पाहिजे हो!" भीमू म्हणाला. म्हणून शंकररावांनी त्याला एक हजार रुपये देऊन फळांचे दुकान काढायला सांगून कर्जाची रक्कम सावकाश फेडायला सांगितले. एक हजार रुपयांच्या भांडवलावर फळांचं दुकान काढण्यापेक्षा किराण्या मालाचे दुकान काढावं, फायदा जास्त होईल, असे भीमूच्या बायकोने सुचविले. भीमूने बायकोच्या म्हणण्यासारखे केले. परंतु लाभ तर झाला नाहीच, भांडवलसुद्धा संपुष्टात आले.

त्याने शंकररावांना घडलेली गोष्ट सांगितली व म्हणाला–"मी फुटक्या नशिबाचा आहे! म्हणून डोक्यावर फळांचं टोपलं घेऊन पुन्हां फिरतो आहे!"

"तुझं नशीब फुटकं नाही! तुझ्या कपाळावर ते काही लिहिलेले नाही! तुला फळं विकायची माहीत आहेत, ते सोडून तुला माहीत नसलेला किराण्या मालाचा धंदा करून नुकसान करून घेतलंस! मी तुला आणखी एक हजार रुपये देतो. फळांचं दुकान काढ." शंकरराव म्हणाले.

भीमूने या खेपेस फळांचं दुकान काढलं व त्याला खरोखरीच फायदा होऊ लागला.





# शकुन

एकनाथ व रघुनाथ दोघे बालस्नेही होते. दोघे शेजारीशेजारीच राहात. दोघांची घरं निरनिराळी असली तरी एकाच घरच्यासारखी दोन्ही कुटुंबे रहात.

एकनाथ जुन्या विचाराचा होता. मुहूर्त पाहिल्याशिवाय घराबाहेर कोठे जात नसे. शकुन चांगला असेल तर हरकत नाही, परंतु शकुन चांगला नसेल तर किती जरूरीचे काम असले तरी ते बिघडेल याची फिकीर तो करीत नसे व उंबरठ्याबाहेर पाऊल टाकीत नसे.

एकनाथच्या बायकोला ते सर्व आवडत नसे. शकुन चांगला असो की वाईट जे व्हायचं असेल ते होणारच, टळणे शक्य नाहीं, असेही ती मानीत असे.

म्हणून तिने नवऱ्याच्या मनातला हा अंधविश्वास काढून टाकण्याची जबाबदारी रघुनाथावर टाकली. रघुनाथाने एक युक्ती योजून ती सविस्तर एकनाथाच्या बायकोला सांगितली.

त्या दिवशी रात्री एकनाथाची बायको त्याला जेवायला वाढतांना म्हणाली— "रघुनाथभावजींना तुम्ही शंभर रुपये द्यायचे होते ते मी देऊन टाकले!"

एकनाथाने चकित होऊन विचारले— "शंभर रुपये? कशासाठी द्यायचे होते?"

"तेच हो! काल रघुनाथभावजी कोणत्यातरी कामाला म्हणून निघाले तेव्हां तुम्ही त्यांना समोर भेटलां होता म्हणे. त्यांचे ते काम तर झालेच नाही आणि वाटेत ते शंभर रुपये घालवून बसले! तुम्ही समोर भेटलात हा चांगला शकुन समजून निघाल्याबद्दल त्यांना शंभर रुपयांचे नुकसान सोसावे लागले. त्याला तुम्हीच कारण म्हणून तुम्ही त्यांना शंभर रुपये द्यायला हवेत असे सांगून त्यांनी शंभर रुपये मागून घेतले हो!" एकनाथची बायको म्हणाली.

सर्व ऐकून घेतल्यावर एकनाथ संतापला व म्हणाला—"ही शुद्ध लबाडी आणि लुच्चेगिरी आहे. मी आतांच जाऊन त्याला विचारतो" असे म्हणत तो निघाला.

आपला नेम बरोबर बसला असा विचार करून रघुनाथ म्हणाला—"बस रे! एक्या! कसा काय आलास आज?"

"मी आतां बसायला आलेलो नाही! विचारायला आलो आहे, ही काय लबाडी?" एकनाथ खवळल्यासारखा म्हणाला.

"काय रे, कशा विषयी रे?" रघुनाथाने काहीच माहीत नसल्याचे सोंग करीत विचारले.

"तू माझ्या बायकोला फसवून शंभर रुपये तिच्याकडून घेतलेस त्या विषयी!" रघुनाथ म्हणाला..

"ते होय? त्यात फसवणूक कसली? तू मला समोर भेटलास म्हणून मी आज शंभर रुपये घालवून बसलो. न्यायाने तूच दिली ते पैसे मला दिले पाहिजे होतेस!" रघुनाथ म्हणाला.

एकनाथ ज़ास्तच चिडून म्हणाला— "कसला न्याय रे? मी समोर येण्याशी आणि तू तुझे पैसे घालवून बसण्याशी काय रे संबंध? तू आपल्या निष्काळजीपणाने पैसे घालवून बसलास आणि त्याबद्दल शकुनापशकुनाची गोष्ट काढतोस का?"

रघुनाथ हंसत म्हणाला—"तूच बोलतो आहेस का एकनाथ हे? म्हणजे शकुनावर काहीच विश्वास करता कामा नये म्हणतोस होय? शकुनाचा व त्याच्या परिणामाचा परस्पर काहीच संबंध नसतो असे तुझे म्हणणे आहे का? तुझ्या बायकोने मला खरोखरी पैसे दिलेच नाहींत व मी घेतले ही नाहीत! तुझं हे वेड नाहीसे व्हावं यासाठी आम्ही हा एक प्रयोग करून पाहिला होता!"

त्यानंतर एकनाथाने कामासाठी कोठे निघताना शकुन पाहायची खोडसोडून





# दोन वस्ताद

[ २ ]

हाजी मोहंमद आपलं दुकान एका नोकरावर टाकून बाहेर निघाला. दिलैला पळवून नेलेल्या सामानासह काही वेळाने आली व नोकराला म्हणाली–"अरे, तुझे मालक डबलरोटीच्या दुकानात आहेत. तुला तावडतोब यायला त्यांनी बोलावलं आहे. जा बाबा! तू परत येईपर्यंत मी बसते दुकानात!" नोकराला ते खरे वाटले. तो निघून गेला.

दिलैलाने दुकानात उचलून नेण्यासारखं जेजे दिसलं ते उचलून एका बाजूला ठेवलं. दुकानासमोरून एक मुलगा गाढव हाकीत घेऊन जात होता. त्याला बोलावून ती म्हणाली–"काय रे, हा दुकानदार तुला माहीत आहे ना रे? तो माझाच मुलगा आहे बरं का? त्याच्यावरचं कर्ज वसूल होत नाही म्हणून कर्ज देणारे त्याला धरून ओढून घेऊन गेले आहेत. हे सर्व सामान गावातल्या लोकांचं आहे. ते गावकऱ्यांना परत केले पाहिजे. तर हे सामान गाढवाच्या पाठीवर टाकून मी घेऊन जाते. हा घे एक दीनार मी तुला देऊन ठेवते! मी पुन्हां येईपर्यंत या निळीच्या व रंगाच्या बाटल्या व इतर लाकडी सामान फोडून टाक, नाही तर जप्त करून नेतील कर्ज देणारे!"

गाढव हाकणारा पोरगा 'बरं!' म्हणाला. दिलैलाने सर्व सामान गाढवाच्या पाठीवर टाकले व मागे न पाहतां सरळ आपल्या घरी निघून गेली.

आईला पाहतांच जीनाबने विचारले–"काय करून आलीस ग?"

"चौघांजणांच्या डोळ्यात धूळ फेकली. हे आहेत एका मोठ्या अधिकाऱ्याच्या बायकोचे दागिने. ही एका दुकानदाराची पिशवी व त्याचा अंगरखा आणि हे सर्व निळीचा व्यापार करणाऱ्या एका रंगाऱ्याचा माल आणि हे गाढव चौथ्याचे! दिलैला विजयगर्वाने म्हणाली.

"हे सगळं ठीक झालं आई! परंतु हे बघ, तू आता घराबाहेर पाऊल टाकतां कामा नये. ते चौघे जण तुझ्या शोधार्थ हिंडत असणार!" जीनाब म्हणाली.

"अग वेडे! हे तर काहीच झालं नाही!" दिलैला म्हणाली.

तिकडे रंगारी डबल रोटीच्या दुकानातून डबलरोटी व भाजी वगैरे विकत घेत असतां नोकर आला व विचारू लागला–"मालक, कशाला हो, बोलाविलेत?" दुकानदाराला संशय आला आणि तो दुकानकडे धावला. त्याला गाढवं पाळणारा दुकानात तोडफोड करीत असलेला दिसला.

"हे काय रे, चालल आहे, मूर्खा!" रंगाऱ्याने विचारले.

"तुम्हांला कर्ज देणाऱ्यांनी सोडलं का हो?" गाढवं पाळणारा विचारू लागला.

तो प्रश्न ऐकून दोघे परस्परांकडे काही न कळल्यासारखे पाहू लागले. शेवटी "ती म्हातारी कोठे मेली रे?" असे रंगाऱ्याने विचारले आणि "माझं गाढव कोठे आहे?" असे त्या गाढव पाळणाऱ्याने विचारलं.



रंगाऱ्याने घरी जाऊन खालच्या मजल्याचे दार ठोठावले. तेव्हां अंगरख्याशिवाय उघड्या अंगाने बसलेल्या मोहसिनने दार उघडले. रंगाऱ्याने संतापून विचारले–"चोरा, गाढवा, कोठे आहे रे तुझी आई?" मोहसिनने चकित होऊन त्याच्याकडे पहात म्हटलं–"तुझी आई वारल्याला कित्येक दिवस झाले!" दोघे परस्पराकडे पहात उभे राहिले. दोघांना वस्तुस्थितीची कल्पना व्हायला थोडा वेळ लागला. नंतर मोहसिन म्हणाला–"त्या म्हातारीने आपल्या मुलीचे लग्न माझ्याशी करून द्यायचे सांगून मला इकडे बसवून ठेवले आहे. त्या दोघी वरच्या मजल्यावर आहेत."



रंगारी जिना चढून माडीवर गेला व दारावर थाप मारली. खातूनने दार उघडले व्यापाऱ्याने विचारले–"तुझी आई कोठे आहे?" ती म्हणाली–"माझी आई वारल्याला पुष्कळ दिवस झाले हो!"

परस्परांशी बराच वेळ बोलत राहल्यावर तिघांना ते फसविले गेल्याचे कळले. खातूनला त्यांनी तिच्या घरी पोचते केले व शहराचा कोतवाल खलीद याच्याकडे गेले आणि घडलेला वृत्तांत सांगितला.

खलीदने आश्चर्यचकित होऊन सर्व वृत्तांत ऐकून घेतला व म्हणाला–"या राजधानीतल्या म्हाताऱ्यांपैकी तुम्हांला फसविणाऱ्या म्हातारीला कसं काय हुडकायचं? तुम्हीच थोडे कष्ट सहन करून तिला पकडून दिलेत तर मी तिला योग्य ती शिक्षा करीन."

निरुपाय होऊन ते तिघे तीन दिशांनी त्या म्हातारीच्या शोधार्थ निघाले.

तिकडे दिलैला सुफी फकीरणीचा वेष बदलून श्रीमंताच्या घरात काम करणाऱ्या मोलकरणीचा वेष करून आपला प्रताप दाखवायला बगदादच्या नागरिकांमध्ये फिरु लागली. ती एका गल्लीत शिरली तेव्हां तिला समोरच एका घरासमोर गालिचे अंथरलेले दिसले. वाजंत्री वाजत होती, दिव्याच्या झगझगाटात गायन, वादन व नृत्य चालू होते. कसल्या तरी उत्सवाचे वातावरण होते. एक गुलाम बाई एका मुलाला कडेवर घेऊन उभी होती. मुलाच्या अंगावर जरीचे कपडे व सोन्याचांदीचे व मोत्याचे दागिने होते.

त्या घराचा मालक बगदादचा कोणी मोठा व्यापारी होता. त्या दिवशी त्याच्या मुलीच्या लग्नाचा साखरपुडा होता. गावातल्या पुष्कळ बायका आल्या होत्या. व्यापाऱ्याची बायको पाहुण्यांचा आथित्य-सत्कार करण्यात गुंतली होती. मुलाला घेऊन बसणे शक्य नव्हते. म्हणून तिने एका गुलाम मोलकरणीला मुलाला घेऊन बाहेर रहायला सांगितले होते. ही सर्व माहिती



दिलैलाने पहिल्यानेच काढून घेतली होती. त्या मुलाच्या अंगावरचे दागिने लांबवायचे दिलैलाने ठरविले.

दिलैला लोकांच्या गर्दीतून वाट काढीत घराच्या पुढल्या दारात आली व मोठ्याने म्हणाली–"मला शेवटी उशीर व्हायचा तो झालाच, बाई!" आणि एक खोटा दीनार काढून त्या गुलाम दासीच्यां हातात ठेवीत म्हणाली–"तुमची जुनी दाई उमल 'खैर सलाम' सांगायला आली आहे, म्हणून आपल्या मालकिणीला जरा आत जाऊन सांग मुली!" हातात एक सोन्याचं नाणं आलं होतं ते घेऊन ती मोलकरीण म्हणाली–"हा मुलगा मासाहेबांना पाहतांच हट्ट करील व सोडणार नाही. सर्व घर डोक्यावर घेईल. मी याला सोडून कसं जाऊ म्हणतां आजी?"

"तू परत येईपर्यंत मी घेते की या छोट्या मालकाला?" दिलैला म्हणाली. गुलाम बाईला तें मान्य झालं. तिने मुलाला दिलैलाच्या हातात दिला आणि घरात गेली.

दिलैलाने मुलाला घेऊन लगेच पाय काढला आणि एका निर्जन गल्लीत शिरली आणि मुलाच्या अंगावरचे मूल्यवान दागिने व कपडे काढून घेतले. नंतर त्याला घेऊन एका श्रीमंत जव्हेऱ्याच्या दुकानात गेली.



त्या दुकानदाराने त्या मुलाला ओळखले व दिलैलाला विचारले–"तुझ्या मालकाला किंवा मालकिणीला काय हवं आहे ग?"

"या मुलाच्या थोरल्या बहिणीचा आज साखरपुडा आहे. एक बिलवरांची जोडी, दोन सोन्याची जोडवी, एक कर्णफुलांची जोडी व सोन्याचा कंबरपट्टा, सर्व मिळून सुमारे एक हजार दीनारांच्या वस्तू घेऊन यायला सांगितलं आहे मालकीणबाईंनी. वस्तू घेऊन जाऊन मासाहेबांना दाखविते. त्यांना आवडेल त्या वस्तू त्या ठेवून घेतील, बाकीच्या परतपावली आणून देईन. तोंपर्यंत पाहिजे तर मुलाला इकडेच ठेवून जाते." दिलैला म्हणाली.

"तुला वाटेल ते कर. परंतु मुलाला ठेवून जायची गरज काय ग?" जव्हेरी म्हणाला. दिलैला दुर्लक्ष करून दागिने घेऊन सरळ आपल्या घरी गेली.

तिकडे व्यापाऱ्याच्या घरात गोंधळ उडून गेला होता. आनंदोत्सव शोकसागरात बुडविणारा झाला. व्यापारी घरी आला तेव्हां घरात रडारड सुरू होती. मुलाची आई मुलाचें नाव घेऊन रडत जमिनीवर लोळत होती. मुलगा कोठे कसा गेला कोणालाच सांगता येईना. बराच वेळ शोध केल्यावर मुलगा जव्हेऱ्याच्या दुकानात सापडला.

व्यापारी जव्हेऱ्यावरच कावला—"चोरा, भामट्या! तू माझ्या मुलाला कां उचलून घेऊन आलास रे? त्याच्या अंगावरचे दागिने आणि कपडे काय झाले?"

"तुमच्या घरी मी तुमच्या मोलकरणी-बरोबर एक हजार दीनारांचे दागिने पाठविले, त्याचं काय?" जव्हेरी उलट खवळून जाऊन विचारू लागला.

दोघे परस्परांकडे चकित होऊन पाहू लागले. परिस्थितीची कल्पना यायला दोघांना काही वेळ लागला. त्याच वेळी दिलैलाने ज्या तिघांना फसविले होते ते तिघेही तेथे आले. सर्वांना फसविणारी एक वस्ताद म्हातारीच असल्याचे सर्वांना कळले. प्रत्येकाने त्याच्यावर आलेल्या प्रसंगाचे वर्णन केले. "या थेरडीचा पत्ता लागेपर्यंत मी झोपणार नाही" अशी प्रतिज्ञाच व्यापाऱ्याने केली. जव्हेरी इतर तिघांना म्हणाला—"तुमच्या बरोबर मी सुद्धा त्या म्हातारीला पकडायला येतो. परंतु सर्व मिळून गेलो तर काही उपयोग नाही, आपण आपापल्या पद्धतीने शोध काढू या. दुपारी आपण सर्व हाजी मसूद नावाच्या न्हाव्याच्या दुकानाजवळपास भेटू या."

दुपारी गाढव हाकणारा पोरगा मसूद न्हाव्याच्या दुकानाकडे जात असतां त्याला दिलैला दिसली. ती वेष पालटून आलेली होती तरी त्याने तिला ओळखले व म्हणाला—"सांपडलीस ग लबाड थेरडे!"





# गणेश पुराण

देवादानवांनी मिळून क्षीरसागराचे मंथन केले आणि समुद्रातून अमृत निघाले. विष्णूने जगन्मोहिनी रूप धारण करून राक्षसांना फसविले आणि अमृत देवांना दिले. अमृत प्राशन करून अमरत्व प्राप्त होताच देव गर्वाने हिंडू फिरू लागले. तो अन्याय पाहून राक्षस चिडले. त्यानंतर देवांवर सूड उगवण्याचे ठरवून तारकासुराने घोर तपश्चर्या सुरू केली. ब्रह्मदेवाने प्रसन्न होऊन दर्शन दिले. तारकासुराने त्याच्याकडे अमरत्वाचा वर मागितला.

'जातस्य हि ध्रुवो मृत्युः' जो जन्मतो त्याला मृत्यु टळत नाही असे सांगून ब्रह्मदेवाने त्याला आणखी एखादा वर पाहिजे तर मागून घेण्यास सांगितले.

तारकासुराने बराच विचार करून शंकराच्या मुलाशिवाय आणखी कोणाच्या हातून मृत्यू येणार नाही असा वर प्राप्त केला.

त्यापूर्वीच शंकराची पत्नी सतीने दक्ष-यज्ञात उडी टाकून देहत्याग केला होता. संतान प्राप्ती होण्यापूर्वीच सतीवियोग सहन करावा लागल्यामुळे शंकराला उन्माद चढला आणि तो हिमालय पर्वतात वैराग्य धारण करून घोर तपश्चर्या करू लागला.

तारकासुराने राक्षसांचे सैन्य जमविले व युद्धाला तयार झाला. त्याने त्रिलोक जिंकला आणि देवांवरचा सूड उगविण्यासाठी देवांवर अत्याचार सुरू केला. इंद्रादिक



देव आपली दीन अवस्था निवेदन करण्यासाठी ब्रह्मदेवाकडे गेले.

"शंकराला मुलगा झाला पाहिजे व त्याच्या हातीच तारकासुराचा वध होईल! असा वर मी तारकासुराला दिला आहे! आणखी कोणाच्याही हाताने तारकासुराच्या केसालाही धक्का पोचणे शक्य नाही, किंबहुना, आणखी कोणत्या ही रीतीने त्याला ठार करणे शक्य नाही!" असे सांगून ब्रह्मदेव सर्व देवांना बरोबर घेऊन काहीतरी मार्ग काढायला विचारण्यासाठी विष्णूकडे गेला.

विष्णू म्हणाला–"सती हिमालय पर्वताची पुत्री पार्वती म्हणून जन्मली आहे व ती त्याच्या घरात वाढत आहे. तेव्हां शंकरपार्वतीचा संबंध कसा जुळवून आणता येईल हे पहा!"

देवांनी नारदाला हिमवंताकडे पाठविले. नारदाने केलेल्या सूचनेप्रमाणे हिमवंत, शंकर तपश्चर्येत समाधी धारण करून बसला होता तेथे गेला व त्याने शंकराची पूजाकरून तपश्चर्येच्या वेळी आवश्यक ती सेवा करण्यासाठी पार्वतीला ठेवून घेण्यासाठी शंकराजवळ विनम्रपणे विनंती केली.

पण शंकर तर बोललाच नाही. तरी 'मौनं सम्मति लक्षणम्' या न्यायाने शंकराचे मौन होकारार्थी असल्याचे मानून हिमवंताने पार्वतीला शंकराच्या सेवेसाठी तेथेच ठेवले आणि निघून गेला.

पार्वतीला बालीपणीच शिवभक्तीचा नाद लागला होता. नारद पार्वतीला शंकराच्या गोष्टी नित्य सांगत असे. शंकराच्या आशुतोष आदि अनेक सद्गुणांची माहिती व शंकराचे महात्म्य कळावे म्हणून पार्वतीला क्षणोक्षणी कुतूहल असे. म्हणून लग्न करायचं तर शंकराशीच असेही तिने मनाशी ठरविले होते. अशा शंकराची सेवा करायला संधी मिळाल्याबद्दल पार्वतीला परमानंद झाला.

उजाडण्याच्या सुमारास शंकर तपश्चर्या करीत असे त्याच्या चारी बाजूचा प्रदेश



पार्वती मोरपिसांच्या केरसुणीने झाडून स्वच्छ करी. बर्फाच्या पाण्यांत सुगंधी द्रव्ये घालून ती सडा घाली आणि मोत्यांनी रांगोळी घाली. सोन्याच्या तारेत विविध रत्ने घालून विणलेल्या परडीत शंकराला आवडणारी फळेफुले, बिल्वपत्रे व शुभ्र पांढरी कमळे आणून ठेवी. सुवर्णकमंडलात हिमालयाच्या शिखरावरून वहात येणारे स्फटिकासारखे स्वच्छ पाणी जपमालेजवळ आणून ठेवी. शंकराला स्वत:कडे आकर्षित करून घेण्यासाठी सर्वदा वेणी घालून व पुष्पमालांनी नटून राही. शंकराला प्रिय असलेले केदार वगैरे राग व भैरवी वगैरे रागिणींचे आलाप गाई. शंकराची दृष्टी तिच्यावर पडावी यासाठी ती निरनिराळे प्रयत्न करी. शंकराच्याजवळ रहायला मिळाले या गोष्टीमूळ तिला फार बरे वाटले.

समाधी लावून बसलेला शंकर एखाद वेळ तरी आपल्याकडे पाहील व त्याची ती शांत दृष्टी आपल्यावर पडेल या हेतूने पार्वती निर्निमेष शंकराकडे पहात राही. परंतु शंकर चुकूनसुद्धा आपल्याकडे पहात नाही हे पाहून तिला फार निराशा वाटे.

शंकराच्या मनात चलबिचल होण्यास कामदेवाच्या मदतीची आवश्यकता असल्याचे ओळखून इंद्राने कामदेवाकडे बोलावणे



पाठविले. सर्व प्रकारे त्याचा आदरसत्कार करून त्याला आपल्या सिंहासनावर आपल्या बाजूला बसवून घेतले व त्याची स्तुती करून त्याला खूष केले आणि पार्वतीवर शंकराचा अनुराग होईल असे काहीतरी करण्यास विनंती केली.

वसंत ऋतु सारथ्य करीत असता उसरच्या धनुष्यावर पुष्पबाण चढवून कामदेव रतीसह पोपटाच्या रथात बसून शंकर तपश्चर्या करीत होता त्या हिमशिखराच्या जवळ आला. दऱ्याखोऱ्यात एकाएकी वसंत ऋतु आल्यासारखा सर्व प्रदेश कसा मनोहर दिसू लागला. कोकिळा 'कू कू' करू लागली आणि भ्रमरांचा गुंजारव सुरू



झाला. आपण राहतो तो प्रदेश एकदम कसा काय बदलला असे वाटून शंकराने डोळे उघडून पाहिले. अकाली वसंत आगमन झाल्याचे पाहून त्याला आश्चर्य वाटले. आपला तपोभंग कां बरं व्हावा, असा विचार करीत असतां त्याच्या हातातली जपमाला निसटून खाली पडली. पार्वती ती माळा उचलून शंकराला देऊ लागली त्या वेळी कामदेवाने खूप फुललेल्या वेलींवर भ्रमण करीत असलेल्या काळ्या भ्रमरांच्या आडून नीलकमळाचा बाण शंकराच्या हृदयाला लागेल अशा बेताने सोडला. तो लागताच शंकर दचकला. त्याने डोळे उघडून पाहिले. निर्निमेष त्याच्याकडे पहात बसलेल्या पार्वतीचे मनोहर मुखबिंब त्याला दिसले. ते पाहून त्याचे मनच हरपले.

आपला तपोभंग झाल्याबद्दल शंकर आश्चर्यचकित झाला. त्याने रुद्ररूप धारण करून आपला तिसरा डोळा उघडून कामदेवाला पाहिले. त्या पाठोपाठ त्याच्या भालनेत्रातून अग्निज्वाळा बाहेर आल्या आणि कामदेव भस्मीभूत झाला. शंकर उठून उभा राहिला आणि झपाझप पावले टाकीत आपल्या कैलास शिखराकडे निघून गेला.

कामदेवाच्या बरोबर आलेली रती पतीच्या राखेच्या ढिगावर पडून रडू लागली. शंकराचा तपोभंग करण्यासाठी मन्मथाला इंद्रादि देवांनी पाठविले होते. म्हणून ती इंद्राला शाप देण्याच्या बेतात असतां ब्रह्मदेवादि देव आले व म्हणाले— "शंकर पार्वतीचे लग्न होईल तेव्हां कामदेव पुनर्जीवित होईल," असे तिच्या मनाचे समाधान करून देऊन इंद्रादी देव परतले. रती रात्रंदिवस कामदेवाच्या राखेच्या ढिगावरच दृष्टी ठेवून त्या जागी बसून राहिली.

पार्वतीच्या मनांतून तिच्या स्वतःच्या सौंदर्यावरचा विश्वासच उडाला,—आपल्या लावण्याविषयीचा अहंकार पार नाहीसा झाला. शंकराला आकर्षू न शकलेला देह तिला निरर्थक वाटला. तिने शिवरंजनी रूपे तपश्चर्या करण्याचे ठरविले. माता मेनकेने तिला तो विचार सोडण्याविषयी किती सांगितले तरी तिने तिकडे दुर्लक्ष केले. थोडी पर्णे (पाला) मात्र खाऊन तिने शरीर कृश करून तपश्चर्या केली. जया व विजया नांवाच्या तिच्या मैत्रिणी नित्य तिच्या सेवेला हजर रहात व तिच्या प्रकृतीची माहिती मेनका व हिमवंताला येऊन सांगत. काही दिवसांनी पार्वतीने पर्णे खायची सुद्धा सोडून दिली. म्हणून पार्वती अपर्णा नावे ओळखली जाऊ लागली.



शंकराने कामदेवाला भस्म केले खरे, परंतु कामदेवाचा पुष्पबाण व्यर्थ गेला नाही. पार्वतीची तपश्चर्यासुद्धा यशस्वी झाली. शंकर वेष पालटून पार्वतीजवळ गेला व पार्वतीची परीक्षा घेतली. त्याने पार्वतीच्या तपश्चर्येची स्तुती करून तिच्याशी लग्न करण्याचे ठरविले. नंतर त्याने सप्तर्षींना लग्नाविषयी बोलणी करण्यासाठी हिमालयाकडे पाठविले. हिमवंताला इतका आनंद झाला की त्याची शिखरे आणखी उन्नत झाली. सप्तर्षी मुहूर्त ठरवून निघून गेले.

शंकराचे सर्व गण वऱ्हाडी होऊन पुढे चालले व शंकर नवरामुलगा होऊन हिमवंताच्या घरी निघाला. हिमालय पर्वताची सर्व शिखरे मांडवाचे खांब झाले. विष्णू, ब्रह्मदेव इत्यादी देव, सप्तर्षी व नारद वगैरे सहस्रावधी मुनींद्र लग्नाला आले.

वडील धाऱ्या सौभाग्यवती अरुंधतीने शंकराच्या विशाल कपाळावरच्या डोळ्याच्या वरच्या बाजूला मंगल तिलक लावला. लग्नाच्या वेळेला अनुकूल अशा सर्व वस्त्रालंकारासह शंकर फार सुंदर दिसू लागला. तेव्हां सर्व देव शंकराला सुंदरेश्वर या नव्या नावाने हाक मारू लागले.

सर्व वस्त्रालंकार धारण केल्यावर विद्युल्लतेसारखी दिसणारी पार्वती नवरीमुलगी शोभू लागली. तिला घेऊन विष्णु आला व शंकराला म्हणाला—"तू सुंदरेश्वर आहेस



तर माझी धाकटी बहीण पार्वती मीनाक्षी देवी आहे!" असे सांगून त्याने पार्वतीचा उजवा हात शंकराच्या उजव्या हातात देत दोघांना बोहोल्यावरच्या पाटावर बसविले.

शंकरपार्वतीचा विवाह शंकरपार्वतीला शोभेल अशाच थाटाने झाला.

हिमालय पर्वताच्या खोऱ्यांत शंकर-पार्वतींनी जेथे तपश्चर्या केली होती तेथे देवांचा शिल्पकार विश्वकर्मा याने नवदंपती पार्वतीपरमेश्वरांसाठी एक दिव्य अंतःपुर बांधून तयार केले.

मंगलवाद्ये व वाजंत्री वाजत असतां परस्परांचा हात धरून पार्वतीपरमेश्वर गर्दीमधून चालत त्या अंतःपुर मंदिराकडे निघाले. त्या मंदिराच्या वाटेवरच कामदेवाच्या राखेचा ढिगारा होता. त्या ढिगाजवळ गुढगे टेकून पतिभिक्षा मागणारी रती बसली होती.

शिवपार्वतीने तिच्या जवळ जाऊन तिच्या डोक्यावर हात ठेवला व तिला दीर्घ काळ 'सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद दिला. शंकराने पुन्हा आपला तिसरा डोळा उघडला. परंतु या खेपेस मृदु शांत चंद्रकिरणांसारखी शीतल कांती त्यांतून आली व भस्माचा ढीग नाहीसा होऊन कामदेव स्वस्वरूपात उठून उभा राहिला आणि एकदांच आपल्या उसाच्या धनुष्याचा झनत्कार करून अदृश्य झाला.

तेव्हां शंकर रतीला म्हणाला—"मुली, तुझा पती पुनर्जीवित झाला आहे.. तुला नेहमीप्रमाणेच दिसत राहील. तुझ्याशिवाय इतर कोणालाही तो दिसणार नाही. म्हणून कोणी कोणत्याही प्रकारे त्याच्यावर वार करू शकणार नाही. अज्ञातऱ्हेने त्याने सोडलेल्या पुष्पबाणांपासून कोणी वांचणेही शक्य होणार नाही. तुझ्याशिवाय इतर कोणाच्या दृष्टीस पडणे किंवा न पडणे त्याच्या इच्छेवर अवलंबून राहील. मी असाच वर त्याला देत आहे."

शिवपार्वतींनी गृहप्रवेश केला. कोणाला दिसत नसल्यामुळे कामदेवाने सुद्धा अदृश्य



पुष्पबाणांसह त्या गृहात प्रवेश केला. अरुंधतीने नवदंपतीची तांबड्या पाण्याने दृष्ट काढली व त्यांना ओंवाळले. तेव्हां विश्वकर्म्याने पडद्यामागे झांकलेली एक मोठी तसबीर समोर उभी केली व म्हणाला— ही एक अपूर्व तसबीर आहे. या चित्रांत दोघे जण आहेत. त्या दोघांपैकी कोण जास्त सुंदर आहे, हे आमच्या सारख्या सामान्यांना सांगता येणार नाही. तुम्हां दोघांनाच ते शक्य होईल, असे मला वाटते आहे, म्हणून मी ही तसबीर तुमच्या समोर ठेवीत आहे, तरी कोण जास्त सुंदर आहे, सांगण्याची कृपा करावी!" असे सांगून त्याने तसबिरीवरचा पडदा बाजूला सारला.

ती तसबीर नसून तो एक उभा आरसा होता. शिवपार्वती त्यात आपले प्रतिबिंब पाहून खदखदां हसू लागली.

"खदखदां हसून भागणार नाही. सांगितले पाहिजे!" नारद म्हणाला.

शंकर स्मित करून पार्वतीकडे कटाक्षपात करीत म्हणाला—"शुक्राच्या कांतीसारखी झगझगणारी नथ घातलेली चित्रांगीच जास्त सुंदर आहे!" शंकराने असे म्हणतांच पार्वतीचे मुखकमळ लाजेने लाल झाले व ती लाजतच हसऱ्या मुखाने म्हणाली—"त्रिनेत्र असलेल्यांचेच सौंदर्य मोठे आहे!" तिचा तो स्वर वीणेच्या स्वरासारखा झंकारला.



सर्वांनी शिवपार्वतीवर फुलांचा व अक्षतांचा वर्षाव करून निघून गेल्यावर नवदंपती रेशमी अशा व गादी अंथरलेल्या झोपाळ्यावर बसली.

त्यांच्या समोरच्या भिंतीवर दिव्य चित्र काढलेले होते. त्यात एक हत्तीचे सुंदर जोडपे समोरचे पाय उचलून व सोंड एकमेकींत अडकवून नाचत असल्यासारखं चितारलेले होते. तोरण बांधल्यासारख्या त्या दोन्ही हत्तींच्या मधून पलीकडे दिसणाऱ्या सरोवरात एक मोठे कमळ फुललेले होते. त्या चित्रात चितारलेल्या हत्तींच्या जोडप्यावर शिवपार्वतींची दृष्टी खिळली. इतक्यात कमळ दिसत होते तेथे चांदणीसारखी









ज्योती दिसू लागली व ती हळूहळू मोठी होत गेली. त्या ज्योतीतून चंद्रकांतीसारखे विघ्ननाशाचे रूप दोघांना दिसले.

विघ्ननाशाचे रूप हत्तीसारखेच दिसत होते तरी ते दिव्यच होते व प्रसन्नही होते. त्याची दृष्टी शांत ऋद्धि, सिद्धि व शक्ति युक्त होती. त्याचे सुंदर विशाल उदर मोहक होते अभयहस्त धारण करून उभा असलेला तो विघ्नेश्वर पार्वतीला लहान बालकासारखा काही तरी बोबडा बोलत असल्यासारखा भासला.

विघ्ननाशाकडे पहात असतां शिव-पार्वतीला एक अपूर्व व अनिर्वचनीय आनंद उमळून आल्यासारखा वाटला. त्या आनंदात देहभान विसरून गेल्यामुळे दोघांच्या तोंडावाटे शब्दही उमटत नव्हते व दोघे निर्निमेष विघ्नेश्वराकडे पहात राहिले. विघ्नेश्वर डाव्याबाजूला वळलेल्या सोंडेवर हात फिरवीत गोड बोबड्या स्वरात म्हणाला–"मी विघ्नेश्वर आहे! विघ्नांचा नाश करणारा विनायक आहे! पंच महाभूत व गणाधिपती आहे! गणपती आहे! चित्रविचित्र रूप धारण करणारा चित्र गणपति आहे! तुमच्या दोघांच्या परस्पर प्रेमामुळे उत्पन्न शंकराच्या तेजातून कुमारस्वामीचा जन्म होईल व तो तारकासुराचा वध करील. कुमारस्वामीच्या आधी मी अवतार धारण करीन व तुमचा मुलगा म्हणून राहीन." असे तो म्हणत असतांच हात पुढे करून पार्वती त्याला घ्यायला सरसावली. तो विघ्नेश्वर एकाएकी अंतर्धान पावला.

आतापर्यंत पाहिले ते स्वप्न होते की खरे होते या अर्थी पार्वतीपरमेश्वरांनी परस्परांकडे पाहिले. दोघांच्या दृष्टी भिडल्या व दोघेही सर्व विसरले. त्यांनी पाहिलेले अद्भुत दृश्य जणुकाही घडलेच नाही इतक्या ती दोघं सहजी विसरून गेली.

शंकरपार्वतीने त्या मंदिरात आनंदाने संसार थाटला. त्या वेळी पूर्वी कधी न पाहिलेली व न ऐकलेली अशी एक भयंकर गोष्ट जगात घडली.





# मेहुणी

दुकान बंद करून शंकरशेट घरी आले तर समोरच्या खोलीत ट्रंक दिसली. चिडून बायकोला त्यांनी विचारले–"आणखी कोण अवतरले, पुख्खा झोडून जायला?"

"जरा हळू बोलाल का? मला भेटायला माझी धाकटी बहीण आली आहे! मागल्या बाजूला आंघोळ करते आहे!" त्यांची बायको पार्वती म्हणाली.

शंकरशेट मोठ्याने हसून म्हणाले–"तुझ्या सारख्या आकार रूप नसलेलीला भेटायला येणारे लोक सुद्धा आहेत म्हणावयाचे तर!"

पार्वतीच्या मनाला ते वाक्य झोंबलं. दोन वर्षांपूर्वी मोठा हुंडा घेऊन शंकरशेटनी तिच्याशी लग्न करून घेतलं होतं. त्या दिवसापासून तिच्या रंगारूपाविषयी बोलून बोलून तिच्या मनाला घरे पाडली होती त्यांनी. स्वभावाने पार्वती गरीबच होती, म्हणून हृदयाला बोचणारे ते वाग्बाण ती निमूटपणे सहन करीत आली होती.

नवऱ्याला प्यायला पाण्याचा पेला हातात देत ती म्हणाली–"उद्यां एक चांगलंसं पातळ घेऊन या."

"नवं का? कशाला?" शंकरशेटने आश्चर्याने विचारले.

"माझ्यासाठी नको आहे, धाकट्या बहिणीसाठी म्हणते आहे! येतां येतां कित्येक दिवसांनी आज आली आहे!" पार्वती म्हणाली.

"वा:, छान! तुमच्या कडच्यांनी साड्या, पातळं द्यावी लागतील असे पूर्वीच सांगितले असते तर तुझ्या वडिलांकडून हुंड्याचे आणखी थोडे जास्त पैसे काढले असते!" शंकरशेट फटकळपणे म्हणाले.

इतक्यात आंघोळ करून मेहुणी लक्ष्मीला घरात येतांना पाहून शंकरशेट स्मित करून



म्हणाले—"किती दिवसांनी येणं हे? निदान ताईला भेटायला यावंसंसुद्धा वाटलं नाही वाटतं?"

"कसं हो जमणार? अभ्यासच इतका असतो!" लक्ष्मी हसत म्हणाली.

"ते खरं असलं तरी, येता येता तुम्ही अशा वेळी कश्या काय आलांत? सर्व गांवभर चोरांच्या भीतीने गोंधळ माजला आहे! वाटेत तुम्हांला कोणी अडविले असतं तर?" शंकरशेट म्हणाले.

"त्यांना मी तुमचं नाव सांगितलं असतं. माझ्या पायां पडून त्यांनी माफी नसती का मागितली?" असं म्हणत लक्ष्मी खदखदां हसू लागली.

लग्नाच्या दिवशी शंकरशेटनी आपल्या शौर्य साहसाच्या अनेक गोष्टी सांगितल्या होत्या. लक्ष्मी त्यातली एकही गोष्ट विसरली नव्हती. मेहुण्याला त्याची आठवण करून देण्यासाठी टोमणा देत तिनं ते उत्तर दिले होते.

"तु म्हणालीस ते खरेच म्हणा!" असे म्हणत शंकरशेट थोडे नाटकी हसले.

त्याच वेळी रंगनाथ नावाचा एक माणूस शंकरशेटच्या हातात शंभर रुपयाची एक पिशवी देऊन गेला. त्याने दोन वर्षांपूर्वी शंकरशेटकडून कर्ज घेतले होते आणि ते फेडण्यापूर्वीच गाव सोडून पळून गेला होता. शहरात नोकरी करून, पैसे मिळवून तो त्या दिवशी अनपेक्षितपणे कर्ज फेडायला आला होता.

शंकरशेटने बायकोला हाक मारून पैशाची पिशवी तिच्या हातात देऊन तिजोरीत ठेवायला सांगितले. पार्वतीने नवऱ्याला आत बोलाविले व विनवण्या करीत म्हणाली—"न फिटणारं कर्ज कसं सहजी फिटलं नाही का? एक छानसं पातळ घेऊन या तर!"

"बरं झालं की! आधी तिजोरीचे दार बंद कर पाहू!" म्हणत शंकरशेट बायकोवर कावले.



बायको पुन्हां त्याविषयी बोलली नाही. त्यानंतर तिघांची जेवणे झाली.

पार्वती ताटे उचलीत बहिणीला म्हणाली—"चोरांची भीती आहे ना, म्हणून खरकटी ताटंसुद्धां सैंपाक घरातच ठेवावी लागत आहेत!"

"म्हणजे ग काय ताई! दादा बाहेर पाहारा द्यायला पडून रहात नाहीत का? ते बाहेर पडून राहिले तर कोणत्या चोराची छाती होईल भिंतीवरून उडी टाकायला? होय की नाही दादा?" मेहुण्याला लक्ष्मीने विचारले.

"होय, होय तर!" म्हणत शंकरशेटने पाण्याचं भांडं तोंडाला लावलं. बाहेर झोपायचं नाव ऐकूनच त्यांचे पाय थरथर कापू लागले होते.

लक्ष्मीने स्वतःच सर्व खरकटी ताटे विहिरीच्या चारीबाजूच्या फरशीवर नेऊन ठेवली व म्हणाली—"ताई, भीती कसली ग, दादा बाहेर परसात झोपतील की!"

पार्वतीला नवऱ्याच्या भितरेपणाची कल्पना होती. "ते कसे झोपतील ग? त्यांना..." असं पुढे ती काही म्हणणार होती.

परंतु तिचं वाक्य पुरे करीत शंकरशेट म्हणाले—"मला भीती वाटते आहे, असं वाटलं का तुम्हांला? दांडकं खाटेखाली



ठेवून झोपतो. कोणी लबाड चोर आला की त्याचं डोकंच फोडतो."

पार्वतीने नवऱ्यासाठी परसात खाट टाकली. शंकरशेटनी एक जाडजूड दांडकं खाटेखाली आणून ठेवलं. दोघी बहिणींनी आतून कडी लावून घेतली आणि अंथरुणावर पडल्या. शंकरशेटला इकडे कापरं भरलं होतं. मध्यरात्र उलटेपर्यंत त्यांचा डोळा लागला नाही. त्यानंतर डोळा लागला असेल नसेल कोणीतरी हांत लावल्यासारखं वाटलं आणि झोप मोडली.

समोर बुरखा घेऊन चोर उभा होता! त्याच्या हातात चकाकणारा सुरा होता.



शंकरशेटचे डोळे पांढरे झाले, तोंडावाटे शब्द उमटेना. त्यांनी हाताने खाटेखाली खुणेने काही दाखविले. चोराने खाटेखालचे दांडकं उचललं व म्हणाला–"मला मारायला हे दांडकं खाली ठेवलं होतंस वाटतं?" म्हणत त्याने सुरा मारायला हात वर केला.

शंकरशेट गळा दाबल्यासारखा घाबऱ्या आवाजात म्हणाला–"सुरा पाहिला की माझ्या तोंडावाटे शब्दही उमटणार नाही. ते दांडकं हातात घ्या!"

"पहिल्याने दार उघड, मला पैसे पाहिजेत." म्हणत त्याने सुऱ्याचा धाक दाखविला.

"घरात बायका आहेत. माझी मान खाली होईल. विहिरीच्या फरशीवर ताटं आहेत, ती घेऊन जा." शंकरशेट म्हणाले.

चोर दात ओठ चावून म्हणाला–"तुमची खरकटी ताटं उचलून घेऊन जाऊ म्हणतोस का? पुन्हां तोंड उघडलंस तर तुला उभा चिरून काढीन!"

"थोडं हळू बोला हो! आत माझ्या बायकोशिवाय दमेकरी माझी मेहुणीसुद्धा आहे!" असं म्हणत शंकरशेटने खिडकीतून हळूच हांक मारली–"पार्वती, पार्वती!"

पार्वती डोळे चोळीत उठून येऊन विचारू लागली–"भीती वाटते आहे का? आत येतां का?"

"तुझं डोंबल! इकडे एक थोर पुरुष आले आहेत! त्यांना थोड्या पैशाची गरज आहे. संध्याकाळी रंगा देऊन गेला तेवढेच पैसे आहेत नाहीत का घरात? तेवढे घेऊन ये!" शंकरशेट म्हणाले.

पार्वतीने चकित होऊन नवऱ्याकडे पाहिले व पैशांची पिशवी आणून दिली. शंकरशेटनी ती नेऊन चोराच्या हातात दिली. त्यानंतर चोर मुकाट्याने निघून गेला व काळोखात दिसेनासा झाला. त्यानंतर शंकरशेटला झोप लागली नाही. पैसे गेले म्हणून डोळे पुशीतच सारी रात्र काढली.



दुसऱ्या दिवशी लक्ष्मी म्हणाली–"दादा, मी संध्याकाळी निघते आहे. येतांना ताईसाठी एक लुगडं आणावं म्हटलं, पण जमलं नाही. मी पैसे देते, एक लुगडं घेऊन या." असे म्हणत तिने पैशाची पिशवी शंकरशेटच्या हातात दिली. ती पिशवी पाहून शंकरशेट दचकले. ती पिशवी त्यांनी स्वतः चोराच्या हातात दिली होती.

लक्ष्मी फिदीफिदी हंसत म्हणाली–"असं पाहता काय हो दादा! चोराला दिलेली पिशवी माझ्या हातात कशी आली म्हणून का? तो चोर तर मीच होते! शाल पांघरून फळं कापायची सुरी घेऊन, आवाज बदलून मीच तर तुम्हांला भिववले. तुम्ही फक्त भितरेच नाही तर लोभीसुद्धा आहां. आंघोळ करून येऊन मी शेजारच्या खोलीतून तुमचं ताईशी झालेलं संभाषण सर्व ऐकलं. ताई आमची रूपरंग नसलीच आहे! ती तिची चूक नाही! आपलं रूप बदलणे कोणाला शक्यही नसतं. परंतु माणसाचं मन पालटण्याचा प्रयत्न केल्यास ते मात्र साध्य होते. यापुढे तरी तुम्ही या संकुचित बुद्धीतून बाहेर पडाल आणि जिच्या गळ्यात मंगळसूत्र बांधलंत तिच्याशी सरळ बोलाल आणि हृदयाला लागेल असे बोलायचे सोडाल असं मी मानते."

शंकरशेटच्या सर्वांगाचा फणफणाट झाला आणि पैशाची पिशवी लक्ष्मीच्या अंगावर जाईल अशी फेकून ते घराबाहेर पडून रस्त्यावर गेले.

"तुझ्या मेहुण्याला किती राग आला, पाहिलास! कशाला गेलीस एवढं नाटक करायला?" पार्वती म्हणाली. ती तर घाबरूनच गेली होती.

परंतु थोड्याच वेळात शंकरशेट दोन उत्तम साड्या विकत घेऊन हंसतमुखाने घरी आले. पार्वतीचा आनंद गगनात मावेना. ती लक्ष्मीच्या खांद्यावर हाताने थोपटत म्हणाली–"तुझ्या मेहुण्यात बदल झाला बाई! कित्येक वर्षे न बदललेली व्यक्ती मेहुणीमुळे एका दिवसात किती बदलली!"





# सहजी बदलत नाही

भीमपूरचा भीमू नेहमी दुःखी कष्टीच असे. याउलट रामपूरचा रामू नेहमी आनंदात राहतो त्याची माहिती करून घेण्यासाठी भीमू रामपूरला गेला. भीमू पोचला तेव्हां रामू एका खाटेवर बसलेला होता. त्याच्या पायाला मोठी पट्टी बांधलेली होती.

"शेतात घसरून पडलो. हाड मोडलं आहे म्हणे!" भीमूने विचारल्यावर रामूने या शब्दात उत्तर दिले.

"म्हणजे तुमच्यावर फारच मोठे संकट ओढवले म्हणावयाचे." भीमू म्हणाला.

"त्यात संकट कसलं आलं हो! असंच काही तरी झाल्याशिवाय मी विश्रांती घेत नाही ना! कालिदासाचा मेघसंदेश वाचण्याची इच्छा माझ्या मनात कित्येक दिवसांपासून होती. ती आतां पुरी होते आहे." रामू हसत म्हणाला.

इतक्यात रामूचा मुलगा येऊन तक्रार सांगू लागला–"बाबा, मला त्या सोमूने शिव्या दिल्या हो!"

"त्याने शिव्या दिल्या तर देऊ दे! आपलं काय गेले रे?" रामू शांतपणे म्हणाला.

"तुम्हांला तो निरुपयोगी ठोकळा म्हणतो आहे, बाबा!" रामूचा मुलगा म्हणाला.

"त्याला तसेच म्हणू दे रे! मी ठोकळाच आहे, असे तूही सांग!" रामू म्हणाला.

"त्याने तुम्हांला ठोकळा म्हटले म्हणून मी ठोकळा म्हणावयाचे का?" रामूच्या मुलाने विचारले.

"मी ठोकळाच असतां त्याने मला ठोकळा म्हटले तर त्यात काय चुकले? जसं आहे तेच नाही का म्हणाला तो?" रामू म्हणाला.

"बरं झालं की! त्यानं म्हटल्याबरोबर तुम्ही ठोकळा झालात का?" मुलगा चिडून म्हणाला.

"नाही ना, मग त्याने म्हटले म्हणून आपलं काय गेलं?" रामू म्हणाला.

"नुकसान होवो की न होवो, त्याने तसं म्हटल्यावर आपण तरी गप्प का रहावयाचं?" रामूचा मुलगा म्हणाला.

"कायरे, मला माहीत नाही म्हणून विचारतो, मला हे सांग, मुळात तो तसं म्हणालाच कां? या पूर्वी तो तसं कधी म्हणाला नव्हता, होय ना?" रामूने विचारले.

"पूर्वी आपल्याकडे त्यांच्यापेक्षा शेत कमी होतं आतां तुम्ही मेहनत करून एवढी इस्टेट वाढविलीत की त्यांच्याहून जास्त आपली इस्टेट झाली. म्हणून तो चिडला आहे!" रामूचा मुलगा म्हणाला.

"पाहिलंस, कधी कोणी आपल्याला निष्कारण शिव्या देऊ लागला की समजावे की त्याच्या मुळाशी काही तरी हेतू असला पाहिजे. कोणी आप ला विनाकारण शिव्या देऊ लागला, म्हणजे समजावं की आपण चांगल्या स्थितीत आहो! त्याबद्दल आपल्याला आनंद झाला पाहिजे, रागयेण्याचं दुःखी होण्याचं कारण नाही!" रामू म्हणाला.

"तुम्ही असेच आहा, बाबा!" असं म्हणत मनाचं सामाधान न झाल्यासारखा त्याचा मुलगा निघून गेला!

नंतर रामू भीमूला म्हणाला–"खोलात जाऊन विचार केला तर या जगात दुःखी होण्यासारखे काहीच नसते, भीमराव! हे मी अनुभवाने सांगतो आहे. तुम्हांला नाही का वाटत तसं?" रामूने भीमूला विचारले.

"तुम्हांला खाटेवरून उठता येत नसता तुमची बायको तुमच्या सेवेला हजर असते. किती रागात असलेला तुमचा मुलगा तुम्ही म्हणालात ते मुकट्याने ऐकतो. तुमच्यासारखा पाय मोडल्यावर मी खाटेवर पडून राहालो तर माझी बायको माझी अशी सेवा नाही करणार. माझा मुलगा माझं मुळीच ऐकणार नाही. माझं दुर्भाग्य!" असं म्हणत भीमू निघून गेला.







# योग्य धडा

एका गावी रघुजी नावाचा एक श्रीमंत शेतकरी रहात असे. त्यांच्या हातून चुकूनही दानधर्म होत नसे. सर्वांना ते माहीत होते. म्हणून कोणी भिकारी त्यांच्या घरासमोर फिरकतही नसे.

एके वर्षी पाऊस पडला नाही व त्या प्रदेशात दुष्काळ पडला. गावात थोडी फार चांगली स्थिती असलेल्या काही लोकांनी म्हणून घरामागे इतके धान्य चंदा म्हणून वसूल करायचे ठरवून त्या प्रमाणे वसूल केले व गोरगरिबांना वांटले. ते रघुजीकडे सुद्धा गेले व त्यांनी धान्य रूपे चंदा द्यायला विनंती केली.

रघुजीला ते आवडले नाही व तो संतापून त्यांना म्हणाला—"ज्याचं त्याचं कर्म ज्याच्या त्याच्याबरोबर. मी मेहनत करून मिळविलेली मिळकत या लोकांना वांटण्यासाठी का आहे? तुम्ही पुन्हां कधी माझ्या कडे चंदा मागायला येण्याची गरज नाही."

या चिक्कू माणसाबरोबर वाद घालण्यात अर्थ नाही, असा विचार करून चंदा मागायला आलेली गावकरी मंडळी रघुजीला मनांत शिव्या देत निघून गेली.

त्यानंतर काही दिवसांनी त्या गावी कोणी एक थोर साधुपुरुष येऊन राहू लागला. तो गावातल्या रामाच्या देवळातच रहात असे. तो दिवसभर ध्यान पूजा आदि धार्मिक कार्यातच मग्न असे. रात्री देवदर्शनाला येणाऱ्या लोकांसमोर त्याचे पुराणप्रवचन होई. कोणी काही प्रश्न विचारला तर त्याचे योग्य उत्तर देऊन त्यांच्या मनाचे समाधान करी.

साधु दररोज फक्त चार पांच केळी खाई व थोडे दूध पिई. कोणी काही जास्त देऊ केले तरी तो म्हणे—"अहो, हे सर्व मला कशाला? घेऊन चला!" असे सांगून हाताने स्पर्श करून त्यांना परत पाठवी.

साधूची ती वृत्ती पाहून ग्रामस्थांच्या मनात त्या साधू विषयी श्रद्धा व भक्ती वाढतच गेली. तरी सुद्धा त्याला गरज असे त्यापेक्षा जास्तच खाद्य पदार्थ व फळफळावळ साधूकडे येऊ लागली.

रेशमी कापड विणणारा कोष्टी व्यंकोबा एक रेशमी पीतांबर विणून आणून देऊन गेला. साधूने त्याला स्पर्श केला आणि "घेऊन जा बाबा!" सांगून तो परत पाठविला.

सोन्याचे दागिने करणारा गणपतसोनार दोन सोन्याची कुंडले करून घेऊन साधूला देऊ लागला तेव्हां तेच झाले.

पुढे काही दिवसांनी काही लोक कावडी भरभरून धान्य, फळफळावळ भाजीपाला आणून सांष्टांग नमस्कार करून देऊ लागले, तेव्हां साधु आपल्या कमंडलातल्या पाण्याने प्रोक्षण करून 'घेऊन जा!' म्हणाला.

अर्थातच गावात साधूचा आदर जास्तच वाढत गेला. त्याने कोणतीही भेट न घेतां हाताने नुसता स्पर्श केला व ती भेट घरी परत नेली तर त्याचा त्या घरवाल्याला शुभलाभच होतो, असा हा अनुभव काही जणांना आल्याची वार्ता गावात पसरली.

रामाच्या देवळातल्या साधूविषयी बातम्या त्या रघुजीच्या कानावरही आल्या व त्याच्या मनात एक विचार आला. आपण चिक्कू कवडीचुंबक नसल्याचे व योग्यपात्र



व्यक्तीला सढळ हस्ताने दानधर्म करण्यात आपण दानशूर असल्याचे सिद्ध करावे असा विचार रघुजीच्या मनात आला. कारण काही झाले तरी आपण दिलेले दान साधू घेणार नाही व सर्व वस्तू घरी परत आणतां येतील.

असा विचार करून रघुजीने एका गाडीत नवीन धान्य कित्येक पोत्यात भरून ठेवले व त्याबरोबर नवीन कापडाची ठाणं, फळ-फळावळ व एक पेटी भरून रुप्याची नाणी गाडीत ठेवून साधूच्या दर्शनास निघाला. त्याने साधूला साष्टांग नमस्कार करून साधूला विनंती केली–"आपल्या सारख्या थोर देवमाणसांच्या दर्शनाने प्रत्यक्ष देव दर्शन झाल्याचे पुण्य लाभते. महापुरुषांच्या दर्शनाला रिकाम्या हातांनी जाऊ नये, म्हणतात. आपण या भक्तावर दया करून या गाडीत आणलेली भेट स्वीकारावी!"

साधूने या चिक्कू कवडीचुंबकाविषयी ऐकले होते. त्याचबरोबर रघुजीच्या मनातील खरा हेतूसुद्धा त्याने चांगला ओळखला होता. म्हणून तो रघुजीला म्हणाला– "बाबारे! तुझी भक्ती पाहून मनाला फार बरं वाटले. आजच माझं व्रत समाप्त झालं आहे. म्हणून तू आणलेली भेट मी खरंच स्वीकारतो!" असे म्हणत साधूने उठून कमंडलातलं पाणी घेऊन गाडीवर प्रोक्षण केले.

साधू म्हणाला ते रघुजीला कळलं नाही व तो गोंधळल्यासारखा झाला. परंतु साधू तेथे जमलेल्या दोघांतिघां प्रमुख ग्रामस्थांना बोलावून म्हणाला–"असं माझ्याकडे पाहतां काय, सद्गृहस्थहो! या भक्ताने केलेल्या दानाचा सदुपयोग करा. गोरगरिबांना नेऊन हे सर्व वांटा!"

रघुजी 'आ' करून पहात राहाला, लोकांनी गाडीतलं सर्व सामान उतरवून देवळाच्या मांडवात आणून ठेवलं. त्या दिवशी संध्याकाळी रघुजी जणुकाही त्याच्यावर आकाशच कोसळल्यासारखा पडून राहिला असता त्याने दान केलेल्या वस्तू गोरगरिबांना वाटण्यात आल्या.






[११]

[चतुराक्ष व समरसेन डोंगरावरच्या भागात असतां त्या बाजूला एकाक्षी मांत्रिक कुंभांडाला आडवा आला. समरसेनाने कुंभांडावर व त्याच्या रानटी अनुयायांवर हल्ला केला. काही रानटी लोक ठार झाले. रक्ताचा वास आल्याने काही लांडगे त्या बाजूला आले. सर्व जण वाट फुटेल तिकडे पळाले. पुढे–]

समरसेन व सैनिक काही अंतर पळत राहाल्यावर एका जागी थांबले. दुरून कुंभांडाच्या रानटी अनुयायांचा आवाज ऐकू येत होता. त्यांनी समरसेनाचा पाठलाग करायचे सोडले व लांडग्यांच्या हातून स्वतःचा जीव वांचविण्यासाठी दूर रानात पळून जाणेच त्यांना श्रेयस्कर वाटले. समरसेनाने ते ओळखले. एकाक्षी व चतुराक्ष कोठे गेले हे मात्र कळले नाही. लांडग्यांचे ओरडणे अद्याप चालूच होते. ते त्यांना स्पष्टपणे ऐकू येत होते.

सैनिक दमले होते. म्हणून समरसेनाने एका झाडाखाली विश्रांती घ्यायचे ठरविले. विचार करीत असतां कुंभांडही धनराशीने भरलेली नाव बळकावण्याच्या प्रयत्नात असल्याचे समरसेनाला निश्चितपणे वाटले. म्हणजे त्या नावेवर चौघांजणाची नजर



आहे म्हणावयाचे–स्वत: आपण, कुंभांड, एकाक्षी व चतुराक्ष!

समरसेन या विचारात असतां सैनिक स्वदेशी कसे व किती लवकर जातां येईल या विचारात होते.

एक सैनिक तसे म्हणालाही–"सेनापती, आपण हे भयंकर बेट सोडून जाणेच योग्य होईल, व ते सुद्धा जितक्या लवकर होईल तितके चांगले. त्यासाठी काय तो प्रयत्न करावा!"

त्यांनाही तसेच वाटत असल्याचं दर्शविण्यासाठी इतर सैनिकांनी होकारार्थी माना हलविल्या. समरसेनाच्या लक्षात ते आलं व तो म्हणाला–"इतकी घाई करू नका. हे बेट सोडून जायचा निश्चय आपण सर्वांनी केव्हांच केला, नाही का? त्याविषयी पुन्हा पुन्हा बोलण्यात तरी काय अर्थ आहे? खरा प्रश्न आहे तो हा की हे बेट सोडून जायची वाट कोठली?"

बेट सोडून जायची वाट सैनिकांना तरी कोठे ठाऊक होती? ते समुद्र किनाऱ्यावर जे गलबत सोडून आले होते ते आतां कोणत्या स्थितीत असेल याची कल्पनाही कोणाला नव्हती. त्यांना काळजी वाटत होती ती एकाक्षी मांत्रिकामुळे आणि कुंभांडामुळे काही संकट तर येणार नाही या गोष्टीची. त्यांच्या दृष्टीस न पडतां कसे निसटून जाता येईल हीच काळजी त्यांना सतावत होती.

"आपल्याला या बेटावरून सुखरूप निसटून जायला चतुराक्ष काही मदत करणार नाही का?" एका सैनिकाने समरसेनाला विचारले.

त्या प्रश्नाचे उत्तर समरसेनाला सुचत नव्हते. येथून आपल्याला कुंडलिनी बेटापर्यंत परत जायला चतुराक्षाला विचारणे समरसेनाला योग्य वाटले नाही. शिवाय तशी मदत तो कसा काय करणार? ही शंकाही त्याला वाटत होती.

हा प्रश्न कसा सोडवायचा या विचारात सर्व असतां कोठून तरी एक बाण 'सूं' असा आवाज करीत आला आणि समरसेनाच्या डोक्यावरून फक्त एकाच फुटावरून जाऊन एका झाडाच्या बुंधात शिरला.

तत्क्षण समरसेन दचकून उभा राहून म्हणाला–"चला, झाडांआड जाऊन उभे रहा. कुंभांड इकडेच जवळपास कोठेतरी आहे व आपणा सर्वांना ठार करण्याच्या प्रयत्नात आहे." नंतर तो चटदिशी जवळच्या एका झाडीत पळू लागला.

सैनिकसुद्धा आपल्या नायकाच्या पाठोपाठ धावले. "पकडा त्यांना, जिवंत सोडू नका!" असा कुंभांडचा आवाज ऐकू आला.

भाले घेऊन रानटी लोक सगळे जंगल दुमदुमून टाकणाऱ्या घोषणा करीत पलीकडच्या झाडीतून बाहेर येत असलेले दिसले.

आपण चांगल्याच भयंकर संकटांत सांपडलो आहों, हे समरसेनाने ओळखले. आपल्या बरोबरच्या फक्त पांचच सैनिकांच्या मदतीने इतक्या रानटी माणसांना तोंड देणे कठीण आहे हे त्याला कळत होते. कुंभांड रानटी जातीच्या लोकांना प्रोत्साहन देत त्यांच्याबरोबर येत होता. आपल्या अनुयायांना वांचविणे, आपले प्रथम कर्तव्य आहे हे समरसेनाने चांगले ओळखले.

झाडीत झाडाच्या सावलीत लपत व शक्य होईल तेव्हां पळत जात समरसेन व सैनिक काही अंतर दूर निघून गेले.





त्यानंतर चांदणे थोडे कमी झाले आणि हळूहळू काळोखच झाला. म्हणून समरसेनाला कुंभांडाच्या नजरेआड दूर निघून जाणे शक्य झाले.

शेवटी ते सर्व एका गुहेजवळ येऊन पोचले. कुंभांड व त्याचे अनुयायी अद्याप पाठलाग करीत असल्याचे त्यांच्या ओरडण्यावरून त्यांना कळत होते. आणखी दूर कोठे पळण्याच्या भानगडीत पडण्याऐवजी जवळच्या गुहेत लपून बसून तेथेच रात्र काढणे बरे होईल असे समरसेनाला वाटले.

समरसेन समोरच्या गुहेकडे खोल नजरेने पहात असतां त्याच्या बरोबरच्या सैनिकांनी समरसेनाच्या मनात चालू असलेला विचार ओळखला असावा व ते त्याच्याजवळ जाण्यासाठी चार पावले चालत गेले. लगेच समरसेन त्यांना सावध करीत म्हणाला—"घाई करू नका, जरा वेळ थांबा!"

तो पुढे म्हणाला—"घाईत आपण गुहेत शिरलो तर जिवाला धोका होण्याची शक्यता आहे. या गुहेत सिंहासारखा कोणी हिंस्र प्राणी असू शकेल!"

"सेनापती, मग काय करू म्हणतां? कुंभांड आपल्या रानटी लोकांबरोबर आपल्या पाठीवर आहे ना!" एक सैनिक मागे वळून पहात समरसेनाला म्हणाला.

"गुहेत सिंह आहे की नाही, हे कसे कळणार? आणखी एखाद्या गुहेत शिरायाचे झाले, तर तीच शंका!" आणखी एक सैनिक म्हणाला.

सैनिकांनी विचारलेले प्रश्न ऐकून समरसेन हंसला. कारण त्या पूर्वी सावध केले नसते तर सैनिक गुहेत नक्कीच शिरले असते. तेथे एखादा सिंह किंवा वाघ असता तर ते त्याचा आहार झाले असते.

समरसेन धनुष्यावर बाण ठेवून सिद्ध होऊन आपल्या अनुयायांना म्हणाला—"तुम्ही सर्व हातांत तलवारी घेऊन सिद्ध रहा. मी गुहेत बाण सोडतो. आत कोणी हिंस्र पशू असेल तर एकदम आपल्या अंगावर धावून येईल. म्हणून सावध रहा!"

सैनिकांना सावध केल्यावर समरसेनाने एक बाण गुहेत सोडला. दुसऱ्या क्षणाला, त्याने अनुमान केले होते तसे झालेच. एक भयंकर गर्जना करीत एका सिंहाने गुहेच्या अंधारातून बाहेर उडी टाकली. तलवारी उपसून सज्ज असलेल्या सैनिकांनी त्याला तोंड दिले. सैनिकांचे दोन तीन वार सिंहाच्या अंगावर पडले व तो आणखी मोठ्याने गर्जना करीत जंगलात पळून गेला.

समरसेनाने आतां एका सैनिकाच्या हातातली तलवार घेतली व गुहेत प्रवेश केला. इतर सैनिकांनी त्याच्या पाठोपाठ गुहेत प्रवेश केला. सर्वांनी गुहेत पाऊल टाकला तेव्हां सर्वांना थोडे थोडे गुरगुरणे ऐकू आले.

समरसेन चटदिशी एक पाऊल मागे सरकला व सैनिकांना म्हणाला—"गुहेत जखमी झालेला आणखी एक सिंह असावासा वाटतो आहे. तो या वेळी कोणत्या स्थितीत आहे हे कळल्याशिवाय आत शिरणे धोक्याचे आहे. जाळ करून पहा."

लगेच दोघां सैनिकांनी गुहेच्या तोंडाजवळ चकमकीच्या दगडांनी ठिणगी पाडून जाळ केला. त्याला लावून समरसेनाने



एक मशाल तयार केली व तिच्या उजेडात तो गुहेत पुढे गेला आणि गुहेत काय काय आहे, हे लक्षपूर्वक पाहू लागला. तेथे बाण लागल्यामुळे एक सिंहाचा छावा तडफडत पडलेला दिसला व त्याच्या बाजूला आणखी एक छावा ओरडत असलेला दिसला.

"भिण्याचं कारण नाही, या आत!" म्हणत समरसेन गुहेत पुढे जाऊ लागला.

सिंहाच्या छाव्यात जो छावा घायाळ झाला नव्हता तो हळूहळू गुहेच्या आतल्या बाजूला जाऊ लागला. समरसेन गुहेत थोडा आत जाऊन सावधपणे बसला. सैनिकसुद्धा गुहेत आले.

तोपर्यंत चांगली रात्र पडली होती. कुंभांड व रानटी लोक अजून समरसेनाच्या शोधार्थ सारे जंगल चाळून टाकीत असल्याचे त्यांच्या मधून मधून ऐकू येणाऱ्या आरोळ्यावरून कळत होते. आपण कोठे लपलो आहो हे कोणाला कळू नये यासाठी समरसेनाने गुहेच्या तोंडाजवळ केलेला जाळ विझवायला सांगितले.

गुहेत चांगलाच काळोख होता. बाण लागून जखमी झालेला छावा मेला होता. दुसरा जखमी न झालेला छावा गुहेत खोल कोठेतरी बसून तो अजून जिवंत असल्याची खूण म्हणून हळूहळू गुरगुरत गर्जत होता. बाहेर पळून गेलेला सिह आपल्या छाव्यासाठी पुन्हां परत येण्याची भीती समरसेनाला वाटत होतीच. दुसरीकडे कुंभांड व त्याचे रानटी अनुयायी आपल्या शोधार्थ हिंडत असणार ही भीतीदेखील त्याला वाटत होतीच.

यामुळे समरसेनाच्या बरोबर सैनिकसुद्धा डोळ्यावर आलेली झोप आवरून काळोखात तसेच बसून राहिले. इतक्यात समरसेनाच्या मनात एक शंका आली. कदाचित् कुंभांडाला आपण लपून बसलो आहो ती गुहा कोठे आहे ते कळल्यावर तो आपल्या रानटी अनुयायांसह गुहेच्या



तोंडावर येऊन कशावरून बसणार नाही? आपल्याला युद्ध करून आपला जीव वाचविणेसुद्धा कदाचित अशक्य होईल. म्हणून त्यापूर्वी सैनिकांना झाडावर चढून हेरणी करायला सांगणे बरोबर होईल असे त्याला वाटले.

"आपण सर्व या गुहेत बसलो असल्या कारणाने अकस्मात् कुंभांडाने आपल्यावर हल्ला केला तर आपण येथे अडकून राहू. म्हणून तुम्ही झाडांवर चढून कुंभांड व त्याचे अनुयायी आपला शोध काढीत कोणत्या बाजूला फिरत आहेत, जरा पहात रहा. ते या बाजूला येत असलेले दिसले. तर आपल्याला दुसऱ्या कोठल्यातरी जागी

निघून जाता येईल." समरसेन सैनिकांना म्हणाला.

सैनिक आपल्या नायकाची आज्ञा मिळताच गुहेबाहेर आले व तेथे दाट पाने असलेल्या झाडांवर चढून कुंभांड रानात कोठे दिसतो का लक्षपूर्वक पाहू लागले.

समरसेन आतां गुहेत एकटाच राहिला. त्याला जवळच कोणीतरी बोलत असल्यासारखे भासले. तो आवाज त्याच्या सैनिकांचा नव्हता हे त्याने ओळखले. कदाचित् कुंभांडाचे अनुयायीच तर नसतील, हा संशयही त्याच्या मनाला चाटून गेला. आपली चाहूल दिल्याशिवाय गुहेच्या तोंडाजवळ जाऊन त्याने बाहेर वांकून पाहिले. पण कोणीही त्याला दिसला नाही. समाधान झाल्यासारखी मान हलवून पुन्हा आत गेल्यावर त्याला बोलणे जास्त स्पष्टपणे ऐकू येऊ लागले.

समरसेनाला फारच आश्चर्य वाटले. गुहेत एखादा चोरदरवाजा तर नाही या विचाराने त्याने चांचपून पाहिले. ते बोलणे गुहेच्या पाठीमागून ऐकू येत असल्यासारखे वाटून तर तो थक्कच झाला. या मोठ्या डोंगरात असलेल्या या गुहेच्या पाठीमागच्या बाजूला लोक कसे काय जाऊ शकले असतील ही शंकाही त्याच्या मनात आली. नक्कीच चोरदरवाजा असला पाहिजे असे वाटून त्याने जास्त लक्षपूर्वक पहायला सुरवात केली.

अकस्मात् त्याच्या हाताला लहान खिळ्यासारखे काहीतरी लागले. ते धरून त्याने जोराने ओढले तेव्हां दगडात दिसत नसलेले एक विचित्र दार उघडले गेले. त्या बाजूने गुहेत चांदणे आले. तेथून काही पावलांवर कोणी दोघेजण बोलत असलेले समरसेनाला दिसले. त्यांच्या पोशाखावरून ते रानटी लोक वाटत नव्हते.

आतां काय करायचे, या विचारात समरसेन असतां त्यांची नजर त्याच्यावर पडली. विद्युत्वेगाने त्यांनी समरसेनावर झडप मारली व त्याचे दोन्ही हात घट्ट धरून ठेवले. (क्रमश:)



# धर्ममार्ग

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा, तू कोणती गोष्ट साध्य करून घेण्यासाठी इतके कष्ट सहन करीत आहेस, मला माहीत नाही. परंतु एक गोष्ट मात्र लक्षात असू दे, साध्य शुद्ध असेल तर साधनाची शुद्धीसुद्धा असली पाहिजे. कारण अधर्म मार्गाने जाऊन थोर कार्याची सिद्धी प्राप्त करणे धर्मविरुद्ध होते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला धर्मानंद योगी याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

फार पूर्वी शिल्लंगेरी नावाच्या गावी धर्मानंद नावाचा एक योगी रहात असे.

काही काळ अनेक गांवांचं भ्रमण करीत प्रजेकडून फंड गोळा करीत राहल्यावर त्याने एक गुरुकुल स्थापन केले. त्या गुरुकुलांत वेदवेदांग व षड्शास्त्रांच्या शिक्षणाबरोबर विद्यार्थ्यांना सदाचार व थोर मानव मूल्यांच्या विषयी आदर भाव उत्पन्न होण्यालायक शिक्षण दिले जात असे.

या कारणास्तव धर्मानंद योगीने स्थापन केलेल्या गुरुकुलाची प्रसिद्धी देशभर पसरली. प्रत्येक वेळी फक्त प्रजेकडून धनसहाय्य वसूल करण्याव्यतिरिक्त त्या देशाच्या राजाकडून आपल्या गुरुकुलाला अनुदान मिळविणे सुद्धा बरं होईल असा विचार करून धर्मानंद योगी राजाच्या दर्शनाला गेला.

त्याने सांगितले ते सर्व ऐकून घेऊन राजा म्हणाला–"योगिराज, आपण इतके दिवस माझ्या मदतीशिवाय गुरुकुल उत्तम तऱ्हेने चालवीत आलांत, होय ना? मग आजच माझ्याकडे येऊन धनसहाय्य मागण्याची गरज आपणांला कशी काय भासली? आपण विद्यार्थ्यांना उत्तम विद्यादान करीत आहांत हे खरे असेल तर प्रजाच आपणाला कमी पडणारं धनसहाय्य नक्कीच करील!"

आपण स्थापन केलेले गुरुकुल अनुदिन उन्नत व्हावे, हेच एक ध्येय धर्मानंद योगीच्या आयुष्यात होते. नित्य अनेक गावे फिरून खूप परिश्रम करून चंदा वसूल करीत राहूनसुद्धा त्यांना पूर्वीसारखी धनप्राप्ती होत नव्हती. अशा परिस्थितीत त्या योग्याने गुरुकुल बंद करून टाकायचे ठरविले.

अशा परिस्थितीत धर्मानंदकडे भीमदेव नावाच्या एका व्यक्तीने येऊन सल्ला दिला की ते गुरुकुल बंद करण्याचा विचार मनातून काढून टाकावा. गुरुकुल चालू ठेवण्यास जितक्या धनसहाय्याची गरज असेल तेवढे देण्याचे वचनही त्याने दिले. धर्मानंदाने अत्यंत आनंदाने भीमदेवाला नम्रपणे त्याच्याविषयी जास्त माहिती सांगायला विनंती केली.

भीमदेव म्हणाला–"योगिराज, माझी वृत्ती व इतर जास्त माहिती विचारण्याची गरजच काय? त्यापासून मिळणार काय? आपल्यांला गरज असलेल्या धनाचे सहाय्य मी दर महिन्याला पाठवीत जाईन म्हणजे झालं!"

त्यानंतर धर्मानंदांना दर महिन्याला भीमदेवाकडून एक रक्कम नियमितपणे येऊ लागली. धर्मानंद निश्चिंत झाले. निरनिराळ्या तऱ्हेने चवकशी केल्यावर भीमदेव त्या प्रदेशातला एक थोर दानी असल्याचे धर्मानंदाला कळले.

काही काळ लोटल्यावर धर्मानंदाला भीमदेवाविषयी एक आश्चर्यजनक गोष्ट कळली. आपल्याला धनसहाय्य करणारा भीमदेव एका चोरांच्या टोळीचा नायक आहे. त्याच्या दानधर्म कार्यामागे वाटमारीसारखी समाजविरोधी कार्यं आहेत.





त्याला धरून देणाऱ्याला मोठे इनाम देण्याचे राजाने जाहीर केले होते.

धर्मानंदाने एका आठवड्याच्या आत राजाला भीमदेवाची लपण्याची जागा कळविली. राजाच्या शिपायांनी भीमदेवाला अटक केली व तुरुंगात टाकले. धर्मानंदाने जी मदत केली होती त्याबद्दल राजाने आनंद व्यक्त करून गुरुकुलाला त्यानंतर कोणत्याही प्रकारे धनाभाव भासणार नाही व आवश्यक तेवढे धन पुरविण्याची काळजी बाळगली.

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला– "राजा, धर्मानंदाने जे केले ते तुला योग्य वाटते का? आपल्या आयुष्याचे एक ध्येय मानून तो चालवीत असलेले गुरुकुल धनाभावाने बंद पडण्याची परिस्थिती आल्यावर ज्या व्यक्तीने धनसहाय्य केले त्याच्याशी द्रोह केल्यासारखे होत नाही का? एका अट्टल चोराने धन लुटून ते सत्कार्यासाठी खर्ची केले तर त्यात दोष काय? शिवाय ज्या राजाने धनसहाय्य नाकारले होते त्याच्या हाती एका आपल्या हितैषी व्यक्तीला कैद करून देणे न्याय्य मानणे योग्य होईल का? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"धर्मानंदाने आपल्या गुरुकुलात विद्यार्थ्यांना वेदशास्त्र पुराणादींच्या शिक्षणाबरोबर सदाचरण व नीतिशास्त्राचाही बोध व्हावा हे ध्येय आपल्या समोर ठेवले होते. त्या ध्येयाविरुद्ध प्राप्त झालेल्या धनाचा अव्हेर त्याने केला नसता तरच आश्चर्य. साध्य साधन शुद्धीच्या ध्येयाविरुद्ध कार्य करणे त्याला निरर्थक वाटले. म्हणून त्याने केले ते अन्याय्य किंवा धर्माविरुद्ध म्हणता येणार नाही."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# पांढरे भूत व काळे भूत

रघूला पंचविसावे वर्ष लागले होते तरी त्याच्यावर कसली जबाबदारी नव्हती की त्याला कोणते कामही येत नव्हते. तो कोणत्यातरी देवळाच्या कठड्यावर बसून कोणी देवळात येणाऱ्याने पैसे दिले तर त्यावर आपला उदर निर्वाह चालवीत असे. काम करायला त्याचे अंग वाकतच नसे. परंतु खूप पैसे मिळविण्याची इच्छा मात्र त्याला फार होती.

एके दिवशी रात्री तो गावाच्या तळ्याच्या काठावर एका झाडाखाली पडून झोपला होता. एकदम काहीतरी आवाज झाला व त्याची झोप मोडली.

तळ्याच्या काठावर दोन भुते मोठमोठ्याने बोलत होती. एक भूत पांढरे होते तर दुसरे भूत काळे होते. रघूला भुतांची भीती वाटत नव्हती. तो उठून बसला व मोठ्याने दरडावून त्यांना म्हणाला–"मध्यरात्रीच्या वेळी ही काय गडबड चालविली आहेत? कोठल्यातरी जंगलात जाऊन का नाही मरत?"

भुतांनी आपले भांडण थांबविले व रघूच्या पाया पडले.

"म्हणजे, मला काही दुसरं काम नाही असे वाटलं वाटतं तुम्हाला? चालू लागा, उठा!" रघू चिडून म्हणाला.

"नाही हो, असं नका बोलू! तुम्ही सांगाल तो न्याय मानायला तयार आहो आम्ही, आमच्या पैकी जास्त सुंदर कोण आहे हो?" या शब्दात दोघांनी विनवणी करून रघूला निवाडा द्यायला सांगितले.

रघू काहीतरी बोलण्याच्या बेतात असतां पांढरे भूत म्हणाले–"मी पांढरा शुभ्र आहे व हा कोळशासारखा काळा आहे की नाही हो?" पांढऱ्या भुताने विचारले.



"मी काळा असलो तरी माझ्या अंगा-वर तकाकी आहे आणि हा पिठाच्या बाहुलीसारखा फिक्कट आहे की नाही हो?" काळया भुताने विचारले.

"मी तुम्हां दोघांना आत्तां तर कोठे पाहातो आहे. आपले मत लगेच कसं काय सांगता येईल?" रघू म्हणाला.

"आम्ही पुढल्या अमावास्येला पुन्हां या झाडाजवळ येऊ. या अवधीत चांगला विचार करून ठेवा बरं का?" असे सांगून दोन्ही भुते निघाली.

"थांबा जरा! तोपर्यंत मी मरून तुमच्या जातीत येऊन जाईन! मला कोणताही ... पोरं कसं धरणार?" रघूने हुशारीने विचारले. भुते आपसात काहीतरी बोलली व रघूच्या हातात पैशांनी भरलेली एकेक पिशवी देऊन अदृश्य झाली.

पैसे मोजून पाहिले व रघूला परमानंद झाला. त्याने छान स्वच्छ कपडे विकत घेऊन अंगात घातले व एक चांगलंसं घर भाड्याने घेऊन त्यात राहू लागला.

त्यानंतर तो अमावास्येच्या दिवशी रात्री बरोबर त्याच झाडाजवळ आला. त्याच वेळी भुतांनी येऊन उतावळेपणाने विचारले–"तुम्ही आपले मत कायते सांगतां का?"

"इतकी घाई नाही बुवा चालायची! मी तुम्हांला दुसऱ्यांदाच तर पाहातो आहे! थोरां मोठ्यांच्या म्हणण्याप्रमाणे त्रिवार पाहू द्या!" रघू म्हणाला.

भुते निराश होऊन म्हणाली–"बरं तर पुन्हां पुढल्या अमावस्येला येऊ!"

"तोपर्यंत कदाचित् मला हे गावच सोडून जावे लागेल. भाड्याच्या घरात सोसावे लागणारे हाल तुम्हांला काय माहीत स्वतःचे घर असल्याशिवाय हे जिणं जगणं कठीण आहे!" रघू म्हणाला.

भुते काही वेळ आपसात काहीतरी बोलली व तत्क्षण त्यांनी तळघापासून थोड्याच अंतरावर असलेल्या झाडीशेजारी एक घर बांधून दिले.

रघूने मनाचे समाधान न झाल्यासारखं तोंड करून म्हटले–"तुम्ही मला घर बांधून दिलेत, छान! परंतु घर चालू रहा-यला पैसे नकोत का? अहो, बाजारभाव कडाडले आहेत ना!" असे म्हणत रघूने भुतांकडून आणखी पैसे वसूल केले.

तो लगेच त्या घरात राहू लागला. ते घर खानावळीपेक्षा अर्थातच पुष्कळ चांगले होते. बायको असती तर तिने सैपाक करून जेवायला वाढलं असतं.

दुसऱ्याच दिवसापासून तो स्वतःसाठी चांगल्याशा स्थळाचा शोध करू लागला. त्याला जानकी नावाची एक मुलगी पसंत पडली. तिला त्याने पूर्वी देवळात पाहिले होते.

"अशा आळशी भिकाऱ्यांना कधी कोणी भिक्षा घालू नये!" असं म्हणत ती शेजारी एक आंधळी म्हातारी भिकारीण होती तिच्या हातात चार पैसे टाकून निघून गेली होती.

आतां रघूचा वेषच बदलला होता, म्हणून तिने त्याला ओळखले नाही. तिच्या वडिलांनी रघूचे घर पाहिले व त्याच्या-जवळ खूप पैसे असले पाहिजेत असे मानून त्याच्याशी मुलीचे लग्न करून दिले लग्नाच्या पंक्तिभोजनात व मेजवान्यात अमावास्या केव्हां आली हे रघूला आठ-



वलेच नाही. मध्यरात्री भुतांनी येऊन दाराची कडी वाजविली ती ऐकून रघूने जाऊन दार उघडले व समोर भुतांना पाहून तो दचकला.

बायको त्यांना पाहून भिऊन जाईल असे वाटून रघू भुतांना रागावून दटावीत म्हणाला–"तुम्हांला अक्कल म्हणतात ती थोडीसुद्धा नाहीसे दिसते आहे. एकदम घरीच येऊन समोर उभे राहतात का कोणी? चला, चला!" म्हणत रघू भुतांना घरापासून दूर बोलावून घेऊन गेला.

"मग विचार केलात ना? मी पांढरा शुभ्र आहे, चांगला आहे की नाही?" पांढऱ्या भुताने विचारले.

"मी काळा असलो तरी मी सुंदर आहे की नाही?" काळ्या भुताने विचारले.

रघू जोराने एकदां खाकरून गळा साफ करून म्हणाला—"तोंड पहा! पांढरं झालं किंवा काळं झालं तर त्यात असतंच काय? जे आहे ते पैशात आहे! 'धनमूल मिदं जगत्!' सर्वांला मूळ कारण धनच आहे! ते असलं की सर्व उणीवा भरून निघतात! हेच पहा ना, माझ्याजवळ पैसा नव्हता तेव्हां मला तुच्छ मानणाऱ्या मुलीनं माझ्याजवळ पैसा दिसताच आनंदाने माझ्या गळ्यात माळ घातली. म्हणून रूपलावण्य, सगुण व गौरव वगैरे हे सर्व पैसा असेल त्याच्या जवळच असतात. बरं ते असू द्या, मी आतांच लग्न केलं आहे, पाण्यासारखा पैसा खर्च होतो आहे! मला पैशाची गरज आहे!"

रघू म्हणाला ते सर्व ऐकून भुतांची तोंडे फिक्की पडली व ती—"तू म्हणालास ते खरंच आहे, म्हणा! आमचे डोळे उघडले. आमच्याजवळ होते त्या पैशातले वरचसे आम्ही तुला दिले. आम्ही आमचे पैसे घेऊन जातो!" असे म्हणत अदृश्य झाली.

दुसऱ्या क्षणाला रघूचं घर नाहीसं झालं व घरातले पैसे नाहीसे झाले.

"हे काय झालं हो? काय बाई विचित्र!" या शब्दात चकित होऊन जानकीने रघूला विचारले.

इतके दिवस कसाही राहिला असला तरी यापुढे बायकोची जबाबदारी येऊन पडली असल्या कारणाने मेहनत करून पैसे मिळविण्याचे रघूने ठरविले. बायकोला त्याने सर्व वृत्तांत घडला तसा सांगितला व म्हणाला—"मला क्षमा कर!"

"कष्ट केल्याशिवाय मिळालेले पैसे शिवरीच्या कापसासारखे उडून जातात. त्या दिवशी मी देवळात घृणा केली ती तुमची नसून तुमच्या आळशीपणाची केली होती. आता यापुढे तरी तुम्ही स्वतःच्या पायांवर उभे राहलात तर मी तुमचा गौरव पहिल्यापेक्षा जास्तच करीन." जानकी म्हणाली.



# स्थितप्रज्ञ

एक महर्षी मृत्युशय्येवर पडले होते. त्यांचे सर्व शिष्य त्यांच्या चारीबाजूला गुरूचा शेवटचा संदेश कानी पडावा म्हणून निःशब्द उभे होते.

महर्षीला श्वास धरल्यासारखे झाले होते.

"कसं वाटतं आहे, गुरुवर्य?" एका शिष्याने विचारले.

"फार त्रास होतो आहे रे!" महर्षी म्हणाले.

ते ऐकून सर्व चकित झाले. त्यांनी सर्वांनी गुरूला कित्येकदां सुखात व दुःखात दोन्ही वेळा एकाच समाधान वृत्तीने असल्याचे पाहिले होते.

"का बरं, गुरुवर्य?" दुसऱ्या एका शिष्याने विचारले.

"वेड्या, का काय विचारतोस? चौघांनी उचलून न्यायच्या या देहाचं ओझं मी एकटाच वाहातो आहे! मग त्रास नाही का होणार?" असं म्हणत स्मित करून मुनिवर्यांनी डोळे मिटले.





# सुंठवाचून खोकला गेला

धर्मूचे आईवडील तो लहान असतांनाच वारले, म्हणून त्याचा मामा श्याम याने धर्मूला आपल्या घरी नेऊन त्याला शिकवून सवरून वाढविले. त्यानंतर स्वतःच्या वशिल्याने धर्मूला सरकार दरबारात चांगली नोकरी लावून दिली आणि काही दिवसांनी चांगली मुलगी पाहून त्याचे लग्नही करून दिले.

धर्मूचा संसार काही दिवस सुखानेच चालला. परंतु त्यानंतर नवराबायकोचे लहानसहान गोष्टीवरून भांडण होऊ लागले. आपण ह्या दोघांचे लग्न करून दिलं आणि यांची दररोज होत असलेली भांडणे पाहून श्यामला फार वाईट वाटू लागले. येथवर परिस्थिती आलीच कशी, याची चांगली माहिती जातीने काढून घेण्याच्या हेतूने श्याम भाचा व भाचेसुनेला भेटायला गेला.

तो गेला त्या दिवशी घरात त्याला काही नवीन नवीन तोंडेच दिसली. श्याम व त्याची बायको विशालाक्षी दोघांचा उत्तम आतिथ्यसत्कार झाला.

श्यामने भाच्याला व सुनेला एका बाजूला बोलावून विचारले—"हे घरात आलेले दुसरे लोक कोण रे?"

"आमचे नातेवाईक आहेत, मामा! दूरचं आहे काहीतरी नातं. ही राजधानी आहे ना, असतातच कितीतरी कामं. चार दिवस राहतात व कामं झाल्यावर निघून जातात!" धर्मू म्हणाला.

"बरं!" म्हणून मान हलवून श्याम गप्प राहिला. घरात आलेली मंडळी एकेक करून श्यामकडे येऊन त्यांची इकडची सात पिढ्यांची व तिकडची सात पिढ्यांची नाती सांगू लागली. तेव्हां श्यामला कळलं की हे बादरायण नाते सांगून घुशीसारखी ही 'नातेवाईक' मंडळी धर्मूच्या घरात ठाणं देऊन बसली आहेत तर!

धर्मू कामावर निघून गेल्यावर श्यामने विशालाक्षीला बोलावून घेतले व विचारले—"मुली, कसा चालला आहे तुमचा संसार?"

विशालाक्षी तोंड थोडेसे लांब करून म्हणाली—"काय सांगू म्हणतां, मामा? दररोज कोणीतरी घरात येऊन पाय पसरून बसतो. त्याची उष्टी काढता काढतां कंबर मोडली आहे माझी! महिन्याभरासाठी घेतलेले सामान दहा दिवसात संपून जाते. पुन्हा आणून द्या म्हणावं तर हे ओरडतात!"

तेव्हा नवराबायकोचे भांडण होण्याचं हेच मुख्य कारण असल्याचं श्यामला अनायासे कळलं.

दुसऱ्या दिवशी धर्मू एकटा आहे हे पाहून श्यामने त्याच्या संसाराविषयी चवकशी सुरू केली.

धर्मू थोडा आवेशानेच म्हणाला—"मामा, तुम्ही माझ्या गळ्यात एक वरवंटा अडकविला आहे आणि माझ्या जिवाला स्वस्थपणा असा नाहीच. तुम्हांला वाटली तशी विशालाक्षी हुशार तर नाहीच, साधी घरातली कामंसुद्धा तिला नीट करतां येत नाहीत. सारखी भांडत असते."

"अस्सं! असं झालं तरी काय, ऐकू दे!" श्याम म्हणाला.



"लहानसहान गोष्टींवरून घर डोक्यावर घेते. घरात महिन्याभरासाठी सामान आणून टाकावं, तर एका आठवड्यात खलास! पंचपक्वान्नं हवीत ना, तिला! पुन्हां सामान घेऊन या, म्हणते. मी काय लक्षाधीश आहे का मामा? मला मिळणाऱ्या पगारात सर्व संसार चालवून घ्यायला नको का?" आवाजात थोडी मृदुता आणीत धर्मू म्हणाला.

श्यामने काहीच उत्तर दिले नाही, फक्त मान हलवून गप्प राहिला. नातेवाईक मंडळी व नातेवाइकांची नातेवाईक मंडळी येणारच, सुटका नाही. धर्मूला जी नोकरी होती, खरं पाहिले तर, तेवढी लहान नव्हती. त्याला मिळणाऱ्या पगारावर दोघां नवराबायकोचा संसार सुखाने चालणे शक्य होते, एवढेच नव्हे तर चार पैसे मागे टाकतां आले असते.

नवराबायकोंचे वाढते भांडण पाहून श्यामला फार काळजी वाटली. नातेवाइकांची रीघ लागल्याने नवराबायकोला परस्परांशी बोलणेसुद्धा अशक्य झालं होतं. परस्परांचं सुखदुःख परस्परांशी बोलून टाकलं म्हणजे मनं हलकी होतात आणि परस्परांना समजून घेतां येते.

श्याम राजधानीत एक दोन दिवस भाच्याकडे राहिला आणि वरच्या अधिकाऱ्यांना भेटून त्याने धर्मूची बदली राजधानीपासून दूरच्या एका गावी करविली.

सुरवातीला राजधानीत मिळत तशा सुखसोयी त्या गावी नसल्याबद्दल धर्मूला थोडं अवघड वाटलं, परंतु या कोपऱ्यातल्या गावी नातेवाइकांची रीघ बंद झाल्यामुळे नवराबायकोला परस्परांशी बोलायला, मोकळेपणी गप्पा मारायला वेळ मिळू लागला व परस्परांच्या मनात जवळीक निर्माण झाली.

भाचा व त्याची बायको दोघांच्या संसाराचा गाडा सुरळीत चालू झालेला पाहून आणि बायको मागेल ते लगेच भाचा आणून देऊ लागल्याचं ऐकून श्यामच्या मनाला शांती मिळाली.





# वराहांचे गाठोडे

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी एका जमिनदाराचा मुलगा म्हणून अवतार धारण केला. ते वयात आले तोंपर्यंत त्यांच्या कुटुंबाची प्राप्ती आणखी जास्तच वाढली. बोधिसत्वांना एक भाऊ सुद्धा होता.

काही काळ लोटल्यावर जमिनदार वारला. त्यांच्या कुटुंबाच्या मालकीच्या एका गावात वसूलीसाठी दोघे भाऊ निघाले. कुळांकडून त्यांना यावयाचे खंडाचे पैसे, धान्य वगैरे वसूल केल्यावर त्यांच्या जवळ एक हजार वराह (एक सोन्याचे नाणे) त्यांच्या जवळ जमा झाले.

ते पैसे घेऊन दोघे भाऊ काशीला निघाले. त्यांच्या वाटेवर एक नदी लागली, ती पार करून जावयाची होती. नाववाला यायला आणखी थोडा उशीर होता, म्हणून दोघांनी आपल्याबरोबर आणलेले फराळाचे सामान काढले व दोघे खायला बसले. धाकट्या भावाने खाणे झाल्यावर पाणी पिऊन घेतले.

बोधिसत्वांनी संवयी प्रमाणे खायला घेतलेल्या फराळाच्या सामानापैकी थोडे उरविले आणि ते नदीच्या पाण्यात फेकून दिले.

बोधिसत्वांनी फराळाचे जे सामान फेकून दिले ते पाण्यातल्या एका भुताने घेतले. ते खाल्यावर त्याच्या अंगात एक दिव्य शक्तीचा संचार झाला. त्यामुळे त्या भुताला त्याला फलाहार घालणारा कोण हे कळले.

बोधिसत्व खाऊन पिऊन झाल्यानंतर नदीकाठावर एक पंचा अंथरून झोपले. त्यावेळी त्यांच्या भावाच्या डोक्यात एक दुष्ट विचार आला. तो विचार म्हणजे आलेल्या पैशातील भावाचा वांटा सुद्धा

उडविण्याची दुर्बुद्धी त्याला झाली. लगेच त्याने दगडगोटे गोळा करून वराहांच्या गाठोड्यासारखेच दुसरे एक गाठोडे तयार केले आणि दोन्ही गाठोडी थोरल्या भावाला दिसणार नाहीत अशा तऱ्हेने त्याने ती आपल्या कपड्यांबरोबर लपवून ठेवली.

त्यानंतर काही वेळाने नावाडी आला व बोधिसत्वांची झोप मोडली. दोघे भाऊ नावेत बसले. नाव नदीच्या मधोमध आली. त्याने योजलेल्या युक्तीप्रमाणे धाकट्या भावाने दगडगोट्यांचे गाठोडे नदीत निसटून पडल्यासारखे दाखवून नदीत पाडले. त्याने हे काम दुष्टबुद्धीनेच केले होते. तरी कांपऱ्या हाताने बोलतां बोलतां गाठोडे पाण्यात टाकतांना ओरडला—"दादा, वराहांचे गाठोडे पाण्यात पडले की रे!"

ते ऐकून बोधिसत्व म्हणाले—"पडले तर जाऊ दे रे! नाही तरी ते आपले पैसे नव्हतेच, म्हणून तर नदीत पडले! त्यासाठी मनाला लावून घेणे वेडेपणा होईल!" असे सांगून बोधिसत्व गप्प राहिले.

बोधिसत्वांनी पाण्यात टाकून दिलेला फलाहार ज्या भुताने खाल्ला होता त्याने पाण्यात पडलेले गाठोडे खऱ्या वराहांचेच होते, ते ओळखले, एवढेच नव्हे तर धाकट्या भावाने केलेली लबाडी सुद्धा ओळखली. त्याने एका मोठ्या माशाला चिथवून ते गाठोडे त्याच्याकडून गिळविले. त्यानंतर तो मासा नजरेआड कोठे जाऊ नये, यासाठी सतत त्याच्यावर नजर ठेवली.

बोधिसत्व व त्यांचा धाकटा भाऊ दोघे काशीला परतले. घरी आल्यावर धाकट्या भावाने त्याच्या जवळचे दुसरे गाठोडे सोडून पाहिले. त्यात त्याला दगडगोटेच मिळाले. त्याची चूक कळल्यावर त्याच धक्याने तो आजारी पडला.

नंतर एकदा कोळ्यांनी नदीत मासे धरायला जाळे टाकले. पाण्यातल्या भुताने त्याला प्राप्त झालेल्या मंत्रशक्तीने वराहांचे गाठोडे गिळणाऱ्या माशाला जाळ्यात पडेल असे केले. त्याप्रमाणे तो मासा जाळ्यात पडलाही. कोळ्यांनी तो मासा राजधानीत नेला. मासा पाहून ग्राहकांनी त्याची किमत विचारतां कोळ्यांनी त्याची किमत एक हजार वराहांहून एक वराह जास्त असल्याचे सांगितले.

ग्राहकांना कोळ्याचे डोके फिरले तर नाही असे साहजिकच वाटले आणि ते हसू लागले. तेव्हां कोळी तो मासा बोधिसत्वांकडे घेऊन गेले. बोधिसत्वांनी त्याची किमत विचारली.

कोळी म्हणाले—"तुम्हीच घेणार असाल तर फक्त एक वराह!"

"इतर कोणाला हवा असेल तर काय किमत घ्याल? तुमचे हे विचित्र बोलणे ऐकून मला तर आश्चर्य वाटते आहे!" बोधिसत्व म्हणाले.

"इतर कोणाला विकायचा झाला तर एक हजार एक रुपयांहून कमीला





देणार नाही." कोळी म्हणाले. बोधिसत्वांना आश्चर्यच वाटले. तरी त्यांनी एक वराह देऊन तो मासा विकत घेतला. नंतर पतिपत्नींनी तो चिरून पाहिला तर माशाच्या पोटात एक हजार वराहांचे गाठोडे सापडले. बोधिसत्वांनी ते ओळखलेही.

"अग, हे वराहांचे गाठोडे आपलेच आहे!" असे म्हणत बोधिसत्वांनी घडलेली गोष्ट नायकोला सांगितली व म्हणाले— "परंतु या कोळयांना दिव्यज्ञान असावेसे मला वाटू लागले आहे. माशाच्या पोटातून निघालेले हे एक हजार वराहांचे गाठोडे माझे असल्याचे या कोळयांना कसे काय कळले? म्हणून तर त्यांनी इतरानाच विकायचं झालं तर एक हजार एक वराह घेणार असल्याचं व मला विकायचं झाल तर फक्त एक वराहाला विकायचं त्यांनी ठरविलं! त्यांनी जास्त मागितला तो एकच वराह तो त्यांच्या मेहनतीचा मोबदला म्हणून!"

नंतर कोळयांना इतकं दिव्यज्ञान कसं काय मिळालं याविषयी बोधिसत्व विचार करीत असतां एक दिव्यवाणी झाली :

"देवमाणसा, मी पाण्यात राहणारं एक भूत आहे. एकदां तू फलाहार करीत असतां त्यांतला काही वांटा पाण्यात टाकून दिलास. तो फलाहार मी केला व मला दिव्यज्ञान प्राप्त झाले. नदीत पडलेले वराहांचे गाठोडे मीच माशाकरवी गिळविले आणि मीच कोळयांना तुझ्याकडे तो मासा-न्यायला प्रेरणा दिली. अशा तऱ्हेने मी तुझे उपकाराचे ऋण फेडण्याचा अल्प प्रयत्न केला. तू आपल्या कपटबुद्धी असलेल्या धाकटया भावाला यांतले काही देऊ नकोस."

पाण्यातल्या भुताने केलेले उपकार व त्याची सौजन्य वृत्ती दोन्हींची बोधिसत्वांनी खूप वाखाणणी केली व त्यांना फार आनंद-ही झाला. परंतु बोधिसत्वांनी, भुताने दिलेला सल्लामात्र न मानून उदारवृत्तीने धाकटया भावाला पांचशे वराह दिले आणि आपले भ्रातृप्रेम राखले.



## कनिष्क

दोन हजार वर्षांपूर्वी भारताच्या पश्चिमोत्तर सरहद्द प्रदेशावर अनेक भटक्या जातींच्या स्वाऱ्या होत असत. या जातींपैकी एकही कोठे स्थिर-पणे राहल्या नाहीत. म्हणून त्यांचा विमोड करणे कोणत्याही राजाला शक्य झाले नाही.



पुढे काही काळ लोटल्यावर या भटक्या जातीचे लोक वस्त्या करून जागो-जागी राहू लागले आणि शेतकी व व्यापारव्यवसाय करू लागले.





आणखी काही काळ लोटल्यावर त्यांच्या नायकांपैकी काही चांगले पराक्रमी निघाले त्यांच्यातला कड्-फैसीस याने पुरुषपुर नावाचे नगर वसविले. हेच इल्लीचे पेशावर नगर होय. याने या नगरी एका राजवंशाची स्थापनाही केली. या वंशातला तिसरा राजा कनिष्क याने पुरुषपुर ही एक



इ. स. ७८ या वर्षी कनिष्काने एक नवीन शक सुरु केला. तोच आपण शकसंवत्सर म्हणून ओळखतो. एक साम्राज्य स्थापन करण्याचा निश्चय करून कनिष्काने एक मोठे सैन्य उभे केले व चिनी तुर्किस्तान, यारखंड, काशगार, इत्यादी नगरांवर स्वाऱ्या केल्या. याशिवाय जवळ पासची अनेक राज्ये जिंकून त्यांच्या प्रमुखांना आपले मांडलिक करून घेतले.

त्यानंतर कनिष्क एक शांत साधुवृत्तीचा शासक म्हणून प्रसिद्ध झाला. त्याने बौद्ध विद्वानांची एक मोठी परिषद बोलावली. ही परिषद काश्मीर राज्यात कुंडलवन विहार नांवाच्या गावी भरली होती. या परिषदेत जे ठराव पास झाले ते कनिष्काने पुढील पिढयांना सुद्धा उपयोगी व्हावेत यासाठी ते शिलालेखांवर लिहून जागोजागी ठेवले.





कनिष्काच्या दरबारात थोर विद्वान व कवी होते. कवी अश्वघोष, तत्ववेत्ता नागार्जुन, वैद्यक शास्त्राचा मर्मज्ञ चरक त्याच्या दरबारात होते. त्याच्या कार-कीर्दीत ललितकलांची उन्नती झाली. मुख्य करून गांधार शिल्पकला परि-पक्वतेला पोंचली.

अश्वघोष एकांतात बसून आपल्या मनातील भाव कवित्वरूपे गाऊ लागला की ते ऐकून घोडयांच्या डोळयांतून आश्रुधारा वहात. म्हणूनच त्याला अश्वघोष हे सार्थक नाव प्राप्त झाले. त्याने 'बुद्ध चरित' हा ग्रंथ लिहिला.





थोर तत्ववेत्ता नागार्जुन याचा आर्यदेव नावाचा एक शिष्य होता. त्या दोघांची अगदी प्रथम भेट झाली तेव्हां नागा-र्जुनाच्या हातांत एक लहानसे पाण्याचे पात्र होते. आर्यदेवने आपल्या हातातील सुई त्या पात्रात खुपसली. अशा तऱ्हेने आर्यदेवने त्याच्या ज्ञानाचे गांभीर्य कळावे अशी इच्छा असल्याचे सुचविले.

पुराणकालात आत्रेय ऋषींनी, त्यांचा शिष्य अग्निवेष याला व्याधींची कारणे व ती निवारण करण्याचा मार्ग या संबंधी उपदेश केला. या गुरु शिष्यांत जे संभाषण झाले, तेच अग्निवेषसंहिता नामे प्रसिद्ध झाले. या ग्रंथातील बराच भाग कालगर्भात विलीन झाला आहे.



कनिष्क राजाच्या आश्रयाखाली चरकाने वैद्यकशास्त्राविषयी अनेक शोध लावले. ते शोध म्हणजेच चरक संहिता होय. विविध औषधांतील मूल द्रव्ये व तत्वे कळावी यासाठी चरक अनेक वर्षे हिमालय पर्वतात जाऊन राहिला होता.

कनिष्काच्या कारकीर्दीतच कुशान लोक भारतातील इतर जातींची मैत्री व सख्यभावाने राहू लागले. या कारणा मुळेच त्यानंतर दीर्घकाळपर्यंत पश्चिमोत्तर सरहद्द प्रांताकडून भारतावर असभ्य जातींच्या स्वाऱ्या झाल्या नाहीत.





कनिष्काने पुरुषपुर येथे एक मोठा स्तूप बांधून त्यांत बुद्धाच्या अस्थी सुरक्षित करून ठेवल्या. त्या काळातील परकीय यात्रेकरूंनी जे यात्रा वृत्तांत लिहून ठेवले आहेत त्यांच्या आधारे हा स्तूप साठ फूट उंचीचा होता. आज हे पुरुषपुर (पेशावर) नगर पाकिस्तानात आहे.

# छान युक्ती

तुळसीच्या गळयात दहा तोळयांची एक सोन्याची माळ होती. तुळसी विहिरीत घागर भरली का वांकून पाहू लागली आणि सरफास सुटल्यामुळे माळ विहिरीत पडली. विहीर चांगली शंभर फूट खोल होती व पाणी अगदी तळाला होते. विहिरीत उतरता येईल अशी गावात मोजकीच माणसं होती. विहिरीतून माळ काढून द्यायला तिने सांगितलं, तर माळेची किंमत माहीत असल्याने बुडी मारणारे "दहा रुपये देता का हो?" विचारू लागतील. म्हणून तुळसी गप्प राहिली.

इतक्यात रंगा त्या बाजूला आला. तो एक अट्टल चोर होता. त्याला ऐकू जाईल एवढया मोठयाने तुळसीने तिची माळ विहिरीत पडल्याचे मोठयाने सांगितले. जणुकाही ते त्याच्या कानावर पडलेच नाही, अशा तऱ्हेने रंगा पुढे निघून गेला. "राहू द्या हो, मागाहून पाहीन !" असे सांगून तुळसी निघून गेली.

त्या दिवशी रात्री रंगाने विहिरीत बुडी मारुन माळ काढली असेल नसेल घराच्या भिंतीआड लपून बसलेली आठ दहा मंडळी समोर आली व त्यांनी त्याला पकडले. त्यांनी तुळसीला तिची माळ दिली आणि रंगाला कोतवालाच्या हवाली केले.

एक पैसा खर्च केल्याशिवाय माळ तर परत आलीच आणि तिच्याबरोबर अट्टल चोरसुद्धा सहजी पकडला गेला. म्हणून गांवकऱ्यांनी तुळसीची पाठ थोपटली.





# या काळातलं कावळ्याचं पोर

गोव्याच्या दक्षिणेला समुद्र किनाऱ्यावर बदकपुर नावाचे एक गाव होते. त्या गावात एक मोठे जांभळाचे झाड होते. त्या झाडावर पुष्कळ पक्षी रहात असत. तेथून थोडया अंतरावर पाण्याचा एक नळ होता. त्या झाडावरचे कावळे त्या नळाखाली जमा झालेले डबक्यातले पाणी पीत व त्यातच काकस्नानही करीत.

पुढे उन्हाळ्याचे दिवस आले. एका लहानग्या कावळ्याला फार तहान लागली. तो नळाजवळ गेला. परंतु नळाखाली एक थेंबही पाणी नव्हते. कारण, दोन दिवसांपासून त्या नळाला पाणीच येत नव्हते.

लहानगा कावळा पाण्याच्या शोधार्थ फिरफिर फिरला, परंतु एक थेंबही पाणी मिळाले नाही. म्हणून तो जांभळाच्या झाडावर परतला. त्याने एका म्हाताऱ्या कावळ्याला विचारले—"आजोबा, मला फार तहान लागली आहे हो, कोठेही पाणी मिळाले नाही."

म्हातारा कावळा काही वेळ विचार करून म्हणाला—"असं सांगतात की आपल्या जातीतल्या एका पक्ष्याला एकदां खूप तहान लागली होती. तो खूप फिरला त्याला एका जागी एक मडकं दिसलं व त्या मडक्यात तळाला थोडं पाणीही दिसलं. परंतु पाण्यापर्यंत त्याची चोंच पोचेना. म्हणून त्याने एकेक करून पुष्कळ खडे पाण्यात टाकायला सुरवात केली. काही वेळाने पाणी वर आले व त्याने पाणी पिऊन आपली तहान भागवून घेतली. म्हणून आपणसुद्धा त्याच्याच सारखा पाण्याचा शोध काढू या."

असं सांगून म्हातारा कावळा लहानग्या कावळ्याबरोबर पाण्याच्या शोधार्थ उडू लागला. त्यांना कोठेही पाणी दिसले नाही, परंतु त्यांना एक मडकं दिसलं. त्याच्या तळाला पाणीही होतं. सुदैवाने जवळच खडयांचा एक ढीग पडलेला होता. म्हणून दोघे कावळे उत्साहाने त्या मडक्यात खडे टाकू लागले. उन्हामुळे आणि तहानेले असल्यामुळे दोघे लवकरच दमून गेले. मडक्यातले पाणी फारच थोडे वर आले. तरी गोष्टीतल्या कावळ्याची आठवण करून दोघे मडक्यात खडे टाकीत राहिले. तरी त्यांना ते काम त्यांच्या शक्तीबाहेर असल्यासारखे वाटले नाही.

लहानगा कावळा म्हणाला—"आजोबा, गोष्टीतला कावळा तर एकटाच होता, तरी तो यशस्वी झाला होता. आपण दोघे आहो, तरीसुद्धा आपल्याला ते कां साध्य झालं नाही? तुम्ही मला खोटी काहीतरी गोष्ट सांगितल्यासारखं वाटतं आहे!" लहानगा कावळा खूप दमलेला होता.

"मी तरी स्वतःच्या डोळ्यांनी ते पाहिलं, म्हटलं का रे? आपल्या गावातल्या शाळेतल्या मास्तरांनीच तुला, मला सर्वांना खोटे सांगितले म्हणावे लागेल. ते मुलांना दररोज गोष्टी सांगत त्यात ही गोष्ट कितीदां त्यांनी सांगितली व ती मला खरी वाटली!" म्हातारा कावळा म्हणाला.

नंतर कावळ्यांनी बराच वेळ खडे मडक्यात टाकले तरी पाणी वर येत नसलेले पाहून दोन्ही कावळे दमून भागून निराश होऊन जांभळाच्या झाडावर परतले.



त्याच वेळी शाळामास्तर जेवणखाण आटोपून बाहेर ओसरीत खुर्चीवर येऊन बसले. झाडावर बसलेल्या दोघां कावळ्यांना मास्तरांना पाहून मास्तरांबरोबर पाणी भरत येत असलेली मडकी मास्तरांच्या घरात दिसली.

म्हाताऱ्या कावळ्याने सावध करण्या-पूर्वीच लहानगा कावळा "काव, काव!" करीत उडत जाऊन दारात बसला.

"हत्, घाणेरडा कावळा घरात शिरतो आहेस का रे!" कावळ्याला उडवीत मास्तरांची बायको खरकटी भांडी परसात घेऊन गेली.

लहानग्या कावळ्याच्या डोक्यात चट-दिशी एक कल्पना आली. त्याने एक चमचा चोचीत धरला आणि उडत जाऊन समोरच्या घराच्या छपरावर जाऊन बसला.

"अगोबाई! कावळा चमचा घेऊन गेला की हो!" असं म्हणत मास्तरांची बायको कावळ्याच्या पाठोपाठ धावली.

ओसरीत पंगत बसलेल्या मास्तरांची झोप बायकोचा आवाज ऐकून मोडली आणि उठून तेसुद्धा पाठोपाठ धावले.

लहानगा कावळा चमचा समोरच्या घराच्या छपरावर टाकून झाडावरच्या म्हाताऱ्या कावळ्याबरोबर मास्तरांच्या घरात शिरला. दोघे कावळे एकेका पाण्याच्या मडक्यावर जाऊन बसले आणि त्यांनी पोटभर थंड पाणी पिऊन घेतले.

मास्तरांनी शेजारच्या घरी जाऊन शिडी आणली व छपरावर चढून चमचा घेऊन खाली उतरले. त्यांना दोन्ही कावळे मडक्यांवर बसून आनंदाने पाणी पीत असलेले दिसले.

त्या दिवसापासून मास्तरांनी ती जुनी गोष्ट सांगायचे सोडून दिले व कावळ्यांची ही नवी गोष्ट सांगू लागले.

"पहा तरी, हल्लींच्या पोरांना जी अक्कल आहे, ती आमच्या काळात आम्हांला नव्हती!" म्हातारा कावळा म्हणाला.



# आदर्श

श्रीपती रात्रंदिवस आदर्श अशा गप्पा मारी. परंतु आदर्श व्यवहारात आणण्याची गोष्ट तो कधी काढीत नसे. त्याचे उदाहरण म्हणजे हुंडाच पहा. त्याच्या लग्नासाठी मुली सांगून येत तेव्हां तो आपल्या आईवडिलांना सांगे की पन्नास हजाराहून कोणी कमी हुंड्याची गोष्ट काढली तर माझ्यापर्यंत येण्याची गरजच नाही. परंतु इतर वेळी मात्र तो हुंड्याच्याविरुद्ध व्याख्याने देई.

त्याचा मित्र रघुपति एकदा त्याला म्हणाला–"काय रे, तू हुंडा घेऊन लग्न करणे हा समाजद्रोह असं म्हणतोस ना, मग तू का नाही रे केलेस लग्न? हुंडा न घेणाऱ्या मुलाला शेकडो स्थळे सांगून येतील!"

"मला स्थळे सांगून येत नाहीत असं वाटलं का रे तुला? मुलगी मनासारखी नाही मिळत रे! सुंदर फटाकडी मिळाली तर नक्की लग्न करीन." श्रीपती म्हणाला.

एकदां दोघे मित्र आठवड्याच्या बाजाराला गेले. बाजारातील कामे संपल्यावर धर्मशाळेत आले. समोर व्हरांड्यात एक मुलगी बसलेली होती. दिसायला सुरेख होती. श्रीपतीला टक लावून तिच्याकडे पहात असलेला पाहून रघुपती म्हणाला–"काय रे, मुलगी सुरेख आहे, नाही?" श्रीपती म्हणाला–"अगदी नक्षत्रच आहे बघ!"

"अरे, ती परकी नाही कोणी! माझी बहीण गिरिजा तर आहे! तुला ती आवडली म्हणतोस तर हुंड्याशिवाय तुझ्याशी तिचे लग्न झालेच समज! हुंड्याचे पैसे आणायचे कोठून म्हणून आम्ही सर्व तिच्या लग्नाविषयी फार काळजीत होतो!" रघुपती म्हणाला.

श्रीपतीला हुंड्याशिवाय गिरिजाशी लग्न करून घ्यावे लागले.





# थोर पुरूष कोण?

मलकापूरचे इनामदार महिपतराव यांच्या घरी दर रविवारी दुपारी तीन वाजायच्या सुमारास गप्पा गोष्टीला गावातली प्रमुख मंडळी हजर असत. त्यावेळी फक्त गावातल्या प्रश्नांवरच लोक बोलत असे नसून देशातली परिस्थिती, वाढत्या किमती महागाई भत्ता, शिक्षणक्षेत्रात चालू असलेला गोंधळ सर्व विषयांवर मंडळी मोकळेपणे बोलत.

एके दिवशी इनामदार हजर असलेल्या लोकांना म्हणाले–"समाजात आपण पाहतो, वैद्य असतात, न्यायाधीश असतात, मोठमोठे पोलीस ऑफिसर असतात. यांच्यात मोठा कोण हो?"

गाव प्रमुख गणपतराव म्हणाले–"आपल्याला वांचविण्यासाठी औषध पाणी देणारा जीवदान देणारा वैद्यच देवतुल्य आहे, असे मला वाटते."

"न्यायनिवाडा करणाऱ्या न्यायाधिकाऱ्याला धर्माधर्माचा विचार करावा लागतो. चांगला पुरावा पहावा लागतो योग्य न्याय द्यायचा झाला म्हणजे बंधु मित्र विसरून जो अपराधी असेल त्याला शिक्षा द्यावी लागते. म्हणून माझ्या मते न्यायाधीशच मोठा आहे!"

माधवराव सावकारांनी आपले मत सांगितले.

इनामदारांचा नोकर विठू सर्व बोलत होते ते ऐकत थोड्या अंतरावर स्वस्थ उभा होता. तो हळूच थोडे खाकरल्यासारखे करून म्हणाला–"तुम्ही मालकमंडळी म्हणालां त्यापेक्षा मला तर आपल्या गावचे म्हातारे राम भाऊ मास्तरच मोठे वाटतात!"

सर्वजण, हा काय वेडयासारखा बोलतो आहे, अशा तऱ्हेने पहात स्मित करू लागले.

तेव्हां इनामदार त्याला म्हणाले–"काय रे, विठोबा, आपल्या गावी इतकी मोठमोठी मंडळी आहेत आणि तुला हे म्हातारे मास्तरच काय रे आवडले?"

विठू थोडा गोंधळल्यासारखा झाला, परंतु पुन्हा स्वतःला सावरून म्हणाला–

"मालक, मी म्हणालो ते उगाच वाद घालण्यासाठी नाही म्हणालो. लहान तोंडी मोठा घास कोणी घ्यावा? आपल्या छोटया मालकांना शाळेत पोचवायला दररोज जातो नां मी, तेव्हां ते मुलांना कसं शिकवतात ते मी पाहतो. ते प्रत्येक मुलाचा स्वभाव, बुद्धिमत्ता वगैरे ओळखून ती वाढीस लावायला कायकाय युक्त्या करणे आवश्यक आहे, त्या करून मुलांच्या डोक्यांत शिरेल अशा तऱ्हेने सर्व विषय शिकवतात.

"आतां तुम्ही पोलीस अधिकारी मोठा म्हणाल तर तो चोरांना फक्त पकडून देतो. परंतु रामभाऊ मास्तर मुलांमध्ये चोरी करण्याची इच्छाच होऊ नये अशा तऱ्हेने त्यांना सन्मार्गाला लावतात.

"न्यायनिवाडा करणारा म्हणावा तर मास्तरांनीच करावा! त्यांच्याकडे शिकायला येणाऱ्या मुलात श्रीमंत गरीब हा भेद ते करीत नाहीत. मुलं भांडू लागली की लगेच मध्ये पडून काय भानगड आहे ते याची चवकशी करतात आणि चूक केली असेल त्याला रागावतात. अशा तऱ्हेने वैद्याचे काम, न्यायाधिशाचे काम ते एकटेच करतात. शिवाय मुलांना ते चांगले अधिकारी व्हावेत यासाठी योग्य ते शिक्षण देतात." विठू म्हणाला.

विठू म्हणाला त्यातलं खरं ते इनामदारांबरोबर इतरांना सुद्धा पटलं आणि त्यांनी विठूची प्रशंसा केली.

त्या वर्षी पाडव्याला कोणत्या नागरिकाचा सत्कार करावा याविषयी इनामदार विचार करीत होते, तो प्रश्न अशा तऱ्हेने सहजी सुटला. त्यांनी त्या वर्षी गुढी पाडवा मोठया उत्साहाने साजरा केला आणि सर्व गांवकऱ्यांसमक्ष रामभाऊ मास्तरांचा सत्कार केला.





# दोन वस्ताद

[ ३ ]

गाढवं हाकणाऱ्याने तिला चांगले ओळखले असूनही दिलैला थोडी देखील भ्याली नाही व जणुकाही तिला काही न कळल्यासारखी म्हणाली–"काय रे, बाबा, तू म्हणालास ?"

"माझं गाढव देऊन मग तुला जे काही बोलावयाचे असेल ते बोल." तो म्हणाला.

"असा ओरडतोस कशाला रे? मी तुझं गाढव पळवून नेलं, असं वाटलं होय तुला? मसूद न्हाव्याकडे मी त्याला ठेवलं आहे. चल, तुझं गाढव तुला देते." दिलैला म्हणाली. गाढववाला पोरगा तिच्याबरोबर निघाला. त्याला दुकानाबाहेर उभा रहायला सांगून दिलैला आत गेली व डोळयात पाणी आणून मसूद न्हाव्याला म्हणाली–"हे आतां तूच संभाळ बाबा!"

"काय ग, मावशी? काय ते कळू दे तरी!" मसूद म्हणाला.

"तो बाहेर उभा आहे ना, तो माझा मुलगा आहे. खड्डात पडल्यापासून त्याचं डोकं फिरल्यासारखं झालं आहे. फार लहान असतांना त्याचं एक गाढव होतं. त्याच्यासाठी आतां सर्व जग त्याने डोक्यावर घेतलं आहे. त्याचं डोकं तूच कसं ते ठिकाणावर आण." दिलैला म्हणाली.

तिने एक दिनार हातात दिला तो घेऊन मसूद म्हणाला–"हे काय मोठं काम झालं? त्याचं मुंडन करून त्याला लिंबाचा रस चोळतों. त्याला मागच्या पुढच्या तिन्ही पिढ्या चांगल्या आठवतील!"

"तुझे उपकार मी कधी विसरणार नाही." दिलैला म्हणाली. मसूद दुकानाबाहेर येऊन मुलाला म्हणाला–"आत ये रे!"

"माझं गाढव!" मुलगा म्हणाला.

"तुझं गाढव ना, माझ्याजवळ आहे, बरं! आत तर ये!" मसूद म्हणाला.

मुलगा ओसरीत आल्याबरोबर मसूदच्या नोकरांनी त्याला धरले आणि त्याचे हात पाय बांधले. मसूदने त्या मुलाचे छान तुळतुळीत मुंडन केले आणि त्यावर लिंबाचा रस चोळला. मुलगा खूप ओरडला.

मसूद आपले काम उरकून दुकानात जाऊन पाहातो तर आत म्हातारी नव्हती. कात्र्या, वस्तरे, आरसे, डोक्याला लावायची निरनिराळी तेलं, एवढंच नव्हे तर खुर्च्या टेबलंसुद्धा नाहीशी झाली होती.

मसूद मुलाकडे आला. त्याचा गळा दाबीत म्हणाला–"काय रे भुता, तुझी आई कोठे गेली?"

"माझी आई मेल्याला कित्येक दिवस झाले. माझं गाढव आतां दे!" गुळगुळीत डोक्यावर हात फिरवीत म्हणाला.

दोघांची इकडे बाचाबाची चालू असतां दिलैलाकडून फसलेले इतर मसूदच्या दुकानाजवळ आले. चवकशी केल्यावर म्हातारीच्या हाती आणखी एक जण फसल्याचे कळले. मसूदला बरोबर घेऊन सर्व जण म्हातारीच्या शोधार्थ निघाले.

ते बराच वेळ फिरत राहाल्यावर एका जागी गाढववाल्या पोराला पुन्हां दिलैला



दिसली. तो चिडून तिच्या अंगावर तुटून पडला व तिला धरून म्हणाला–"ही पहा, हीच ती थेरडी!" सर्वांनी मिळून दिलैलाला धरले व खलीदच्या घरी घेऊन जाऊन तेथल्या शिपायांना म्हणाले–"आम्हांला खलीदसाहेबांना लगेच भेटायचे आहे."

त्यावेळी खलीद झोपलेला होता. तो उठेपर्यंत शिपायांनी सर्व पुरुषांना बाहेरच्या आवारात थांबायला सांगितले व दिलैलाला बायका रहात, घरातल्या त्या बाजूच्या खोलीत पाठवून दिले. दिलैला त्या खोलीतून आणखी थोडी आत गेली आणि कित्येक खोल्या ओलांडून खलीदची बेगम माडीवरच्या खोलीत राही तेथे गेली.



तिला सलाम करून दिलैला म्हणाली—"आमच्या जवळच्या गुलामांची खरेदी तुमच्या यजमानांनी बाराशे दीनारांना केली. मी त्या गुलामांना पोचते करून जायला आले आहे. तुमच्या यजमानांची झोप केव्हां मोडते न जाणे?"

खलीदची बायको म्हणाली—"ते मला नाही माहीत, परंतु एवढं खरं की त्यांनी गुलाम विकत घेतल्याचं सांगितलं होतं मला. बरं तर, तुमचे ते गुलाम आहेत कोठे?" खलीदच्या बेगमने विचारले.

"ते काय बाहेर आहेत! खिडकीतून पहा, दिसतील. सर्व कुलीनच आहेत, बरं का!" दिलैला म्हणाली.

खलीदच्या बायकोने खिडकीतून बाहेर पाहिले व चांगली खरेदी केल्याबद्दल तिच्या मनाचे समाधान झाले. ती दिलैलाला म्हणाली—"मीच पैसे दिले असते, परंतु माझ्याजवळ फक्त हजार दीनारच आहेत. मग करायचं?"

"हजार पुरे झाले हो, आत्ता! दोनशे दीनार आगाऊ मला आधीच मिळाले आहेत की!" दिलैला म्हणाली. तिने हजार दीनार घेतले व सलाम करून म्हणाली—"तुम्ही मला बसवून न ठेवतां मला मोकळे करून केवढे उपकार केलेत माझ्यावर? आपल्या गुलामांना सोडून जाणं मला जिवावर येतं आहे हो! म्हणून गैर न मानतां मला मेहेरबानी करून मागच्या दाराने जाऊ द्याल का?" दिलैला अशी निसटली.

खलीद जागा झाल्यावर त्याची बायको म्हणाली—"एकूण तुम्ही खरेदी चांगली केलीत बरं का?"

सर्व ऐकून खलीद तर चकितच झाला. म्हणाला—"तू म्हणत आहेस तरी काय? मी खरेदी केली? गुलामांची? आणि अगाऊ रक्कम दिली?"

"हे काय म्हणतां? त्या म्हातारीला तर मी फक्त एक हजार तर दिले. तिने आपल्याकडे पोचते केलेले गुलाम ते पहा, खाली बसले आहेत!" खलीदची बायको म्हणाली. खलीद चकित होऊन झपाझप जिना उतरून खाली गेला व त्याच्या-साठी वाट पहात बसलेल्या दुकानदाराला, रंगाऱ्याला, जव्हेऱ्याला, मसूद न्हाव्याला व गाढववाल्या मुलाला 'आ' वासून पहात उभा राहिला.

"मी विकत घेतलेले गुलाम ते तुम्हीच ना?". त्याने सर्वांना विचारले.

"आम्ही गुलाम? खलीफांकडे चला!" सर्व जण म्हणाले.

त्याच वेळी मुस्तफासुद्धा तेथे आला. मध्यंतरी त्याने बायकोला विचारून म्हातारीने लबाडी केली ती सर्व माहिती विचारून समजून घेतली होती. तो खलीदला म्हणाला—"तुमच्या कारकीर्दीत प्रत्येक म्हातारी वाटेल त्या घरात शिरून भोळ्या-भावड्या बायकांना फसवीत आहे! माझ्या बायकोशी लबाडी झाली, त्या विषयी तुम्हांला काय म्हणावयाचे आहे?"

खलीदला काय बोलावे, सुचेना. तो गोंधळूनच गेला. म्हणाला—"तुम्हांला सर्वांना त्या थेरडीने फसविलं आहे. तिला कैद करण्याची जबाबदारी मी स्वतःवर घेतो. तिच्यामुळे तुमचं सर्वांचं जे नुकसान झालं आहे, त्याची भरपाई पण मी देईन."



तो इतर पांच जणांकडे वळून म्हणाला—"तुमच्यापैकी म्हातारीला चांगलं ओळखू शकेल असा आहे का कोणी?"

पांचही जण ओळखत असल्याचे म्हणाले.

"तुम्ही आमच्याबरोबर दहा शिपाई द्या, आम्ही तिला पकडून घेऊन येतो." ते खलीदला म्हणाले.

ते शिपायांना घेऊन काही अंतर चालून गेले असतील, त्यांना समोरच दिलैला दिसली. त्यांना पाहून ती पळू लागली. तरी सर्वांनी तिचा पाठलाग करून शेवटी तिला पकडलेच व तिचे हात बांधून तिला खलीदकडे घेऊन गेले. दिलैलाचा सर्व खेळ संपल्यासारखे वाटले.

खलीदने दिलेलाला, तिच्या चोऱ्यांविषयी व लबाड्यांविषयी विचारले. ती म्हणाली—"तुम्ही काय विचारतां आहां, मला नाही कळलं. मी आयुष्यभरात कधी चोरी केली नाही!"

तोंपर्यंत रात्र होऊ लागली होती व चवकशी करण्याची वेळ निघून गेली होती. तिने कित्येक गुन्हे केले होते व साक्षीदारही पुष्कळच होते. ती एक गुन्हा कबूल करील असे दिसत नव्हते. म्हणून तिला त्या दिवशी रात्री अंधार कोठडीत ठेवले तर दुसऱ्या दिवशी उजाडल्यावर चवकशी करतां येईल असा खलीदने विचार केला. परंतु तुरुंगाच्या अधिकाऱ्याने तिची जबाबदारी घ्यायचे कबूल केले नाही. तो म्हणाला—"इतकी वस्ताद म्हातारी रात्री काहीतरी युक्ती काढून निसटून पळाली तर माझा गळा जाईल ना!"

खलीद म्हणाला—"तुझं म्हणणंही बरोबर आहे. परंतु चवकशी होईपर्यंत या थेरडीला चार चौघांची नजर राहील अशा जागी ठेवून तिच्यावर पाहारा ठेवणंच बरोबर होईल."

तो लगेच घोड्यावर बसून निघाला. पांच फिर्यादी दिलेलाला ओढीत त्याच्या पाठोपाठ शहराच्या दिशेने निघाले. गावाबाहेर एका खांबाला तिला बांधून ठेवून पांचही जणांना खलीदने तिच्यावर पाहारा ठेवायला बजावून सांगितले आणि स्वतः गावात गेला.

पांचही जण तिच्यावर नजर ठेवून तिला मनसोक्त शिव्याशाप देत तेथे बसून राहिले. परंतु खाऊनपिऊन घेतल्यावर सर्वांना झोपा येऊ लागल्या. कारण त्या सर्वांना लागोपाठ तीन रात्री झोपच मिळाली नव्हती.

मध्यरात्र उलटल्यावर बऱ्याच वेळाने त्या बाजूला कोणी दोघे जण परस्परांना भेटले. एक जण गावाहून कोठेतरी चालला होता. दुसरा परगावाहून गावात येत होता. दोघे परस्परांशी बोलू लागले. त्या दोघांचे संभाषण दिलेलाला चांगले ऐकू येत होते.

(क्रमशः)





# गणेश पुराण

तारकासुराचा निरंकुश अत्याचार चालूच होता. त्याच बरोबर त्रिपुरासुर नावाच्या तीन राक्षसांनी तपश्चर्या करून वर प्राप्त केले व आकाशात भ्रमण करीत फिरणारी तीन नगरे निर्माण करून त्रिलोकावर राज्य करण्याच्या हेतूने तिन्ही लोकांवर चालून गेले. त्यांनी उल्कावृष्टी करून सुंदर हिरण्यागार नगरांना आग लावली आणि त्रिलोक ध्वंस करण्यासाठी कंबर बांधली. त्या राक्षसांचा शेवट करण्याची शक्ती एकट्या शंकरात होती. म्हणून सर्व देव शंकरपार्वतीच्या अंतःपुरासमोर आले आणि शंकराला सांकडे घालून प्रार्थना करू लागले. शंकराला देवांचे ते सांकडे ऐकून आंतल्या आत जळफळाट झाल्यासारखे वाटले. परंतु त्रिपुरासुरांनी जो मारणहोम प्रारंभिला होता त्याची गोष्ट ऐकून शंकराला त्वेष चढला व त्रिशुलावरची धूळ वगैरे झाडून शंकराने तो धारण केला. नंतर त्याने आपले अनुयायी नंदी व भृंगी सर्वांना बरोबर घेतले आणि त्रिपुरासुरांचा संहार करण्यासाठी निघाला.

त्याच वेळी आणखी एक राक्षस केसाळ हत्तीचे रूप घेऊन त्रिलोकाला त्रस्त करण्यासाठी निघाला. त्याला गजासुर हे नाव होते. तसा तो शंकराचा फार मोठा भक्तच होता. स्वतः शंकराशिवाय इतर कोणाच्याही हस्ते त्याला मरण येणार नाही, असा वर त्याने मिळविला होता.



नारदाने त्याला भेटून त्याला सल्ला दिला की त्याने शंकराला आपल्या हृदयातच कायमचे ठेवून घेतले तर त्याचे हित होईल. गजासुराला तो सल्ला पटला व त्याने उग्र तपश्चर्या करून शंकराला प्रसन्न केले. शंकर त्रिपुरासुरांच्या वधासाठी निघाला होता आणि तो गजासुराच्या इच्छेप्रमाणे गजासुराच्या हृदयात वास करून राहू लागला.

"शंकर गजासुराच्या हृदयातच राहू लागला तर त्रिपुरासुरांचा वध कसा होणार? पार्वतीच्या मनाचे समाधान तरी कसे होणार? शंकरपार्वतीच्या पोटी जन्मलेल्या मुलाच्या हातीच तारकासुराचा वध होणार!" असे म्हणत सर्व देव हताश होऊन बसले असतां नारद म्हणाला—"शंकर म्हणजे वाढते लिंगच की नाही!" ती सूचना देवांना कळली. देव गजासुर होता तेथे जाऊन शंकराचे स्तोत्र गाऊ लागले.

गजासुर शंकर भक्तच होता. तो सुद्धा शंकराचे स्तोत्रगान ऐकून डोलू लागला. शिवलिंग स्तोत्र चालू असता वाढू लागले, इतके की शेवटी गजासुर उभा चिरला गेला. शंकर बाहेर आला. गजासुराने डोळे मिटतांना म्हटले—"देवा! मी तुझ्यावर भरंवसा केला होता आणि तू हे काय केलेस रे?" तेव्हां शंकर म्हणाला—"गजासुरा! शिवभक्तीचे एक उदाहरण म्हणून तुझी कीर्ती रहावी यासाठी गजमुख सर्वदा माझ्याजवळ राहील व मी नेहमी गजचर्मच धारण करीन." असे सांगून शंकराने गजासुराला कैलासलोक दिला.

शंकराने पृथ्वीचा रथ केला. चंद्रसूर्यांना त्या रथाची चाके केली, चारही वेदांना रथाश्व केले. ब्रह्मदेवाला सारथी केले, मेरु पर्वताचा धनुष्य केला आणि विष्णूला बाण केले. नंतर आपले अनुयायी नंदी, भृंगी, भृंगी वगैरे प्रथम गणांना बरोबर घेऊन त्रिपुरासुरावर स्वारी करायला निघाला. तेहतीस कोटी देव सपरिवार शंकर त्रिपुरासुराचा संहार कसा करतो, पहायला पाठोपाठ निघाले.

घरात पार्वती एकटीच होती. तिला प्रत्येक क्षण वर्षासारखा वाटत होता.

अशा समयी नारद येऊन पार्वतीला म्हणाला—"मुली पार्वती! शंकराने तुझ्याशी लग्न केले तेव्हांपासून तारकासुर तुला कसा त्रास द्यायचा याच विचारात आहे. तुझ्यावर कोणत्या प्रकारचे संकट येईल सांगणे कठीण आहे. त्या तारकासुराला वज्रदंताची मदत आहे. वज्रदंत भयंकर मायावी आहे. म्हणून तू फार काळजीपूर्वक राहिले पाहिजेस, बरं का!" नारदाने पार्वतीला या शब्दात सावध करून ठेवले.

पार्वती काळजीत पडली. चांगले न्हाहून घेतले तर कदाचित् मनाचा ताप कमी होईल असे पार्वतीला वाटले.

पार्वतीने तेल लावून डाळीचं पीठ व इतर उबटनाची द्रव्ये अंगाला चोळून लावली व अंगाचं उबटन काढून एक गोळी केली व त्या गोळीचा एक बाहुला केला व तो पाहून तिला आनंद झाला. तिने तो बाहुला खाली ठेवून जरा नजर फिरविली असेल नसेल, त्या बाहुल्यात बदल होऊन गोड बोबडे बोलणारा एक मुलगा तिला दिसला. "कोण रे बाळा तू?" पार्वतीने गोड शब्दात विचारले.

"तुझ्या लावण्याच्या उबटनाची गोळीच नाही का ग आई मी! मी तुझाच मुलगा



पुत्रगणपती!" तो मुलगा म्हणाला. पार्वतीने त्या मुलाला उचलून त्याचे मुके घेतले व त्याच्या हातात एक अंकुशाचा दांडा दिला व म्हणाली—"बाळा रे! तू कीडमुंगीलाही आत येऊ देऊ नकोस!" असे सांगून त्या मुलाला घराच्या सिंहद्वाराबाहेर उभे केले.

"आई, पण तू काही खायला नाही देणार का?" त्या मुलाने माता पार्वतीला विचारले. पार्वतीने लगेच पिठी मळून तिचा मोदक करून त्या मुलाला दिला.

पार्वतीला पळवून नेले तर आपल्याला प्राणभय रहाणार नाही, असा विचार करून तारकासुराने वज्रदंताला पार्वतीचे अपहरण करूनआणायला पाठविले. वज्रदंताचे दात



म्हणजे वज्राला सुद्धा चूर्ण करणारे होते. त्याने उंदराचे रूप धारण केले आणि डोंगर उकरून काढीत निघाला. म्हणून त्याला मूषकासुर हे नावही मिळाले. पार्वतीचे अपहरण करण्यासाठी त्याने कर्णी व गोकर्णी नावाचा आपल्या दोघां अनुयायांना पाठविले.

ते दोघे सिंहद्वाराजवळ गेले व चोर दृष्टीने पहात सिंहद्वारासमोर अंकुशाचा गदादंड धारण करून पाहारा देत असलेल्या मुलाला म्हणाले–"ये रे आपण खेळू या!"

तो बालक, त्याने जणुकाही त्यांच्याकडे न पाहाल्यासारखा हसत म्हणाला–"थोडे खाऊन घ्या रे!" असे म्हणत त्याने दोन मोदक त्यांच्या अंगावर फेकले. ते त्यांच्या डोक्यांना इतक्या जोराने लागले की त्यांची डोकी गरगर फिरल्यासारखी झाली. पुत्र-गणपतीने त्यांना बोलाविले व दरडावून म्हणाला–"आपले कान स्वतःच्या हाताने पिळून घ्या आणि थोबाडीत मारून घेऊन मग कोठे ते जा!" त्यांनी त्याप्रमाणे केले व वज्रदंत राक्षसाकडे धावत गेले आणि धापा टाकीत झालेला वृत्तांत सांगितला.

वज्रदंताने जोराने हुंकारून मूषक रूप धारण केले आणि सिंहद्वाराच्या खालून बीळ करून आत जाऊ लागला. पुत्र-गणपतीने कमरेच्या करगोटयाचा फास करून त्या मूषकावर टाकला. तो पाश मूषकासुराच्या ठीक गळयातच जाऊन पडला. मूषकासुर 'किचकिच' करीत असतां त्याच्या डोक्यावर दोन ठोसे दिले आणि त्याची शेपटी धरून त्याला गरगर फिरवून दूर फेकून दिले.

चित्रगणपतीने दूर फेकून दिलेला तो मूषकासुर स्वस्वरूपात सरळ त्याच्या राज्यातल्या अंतपुरासमोर धाडदिशी जाऊन पडला. त्याची बायको धवला फार मोठी भक्तीण होती. तिने आपल्या डोक्याचे कुंकू शाश्वत रहावे म्हणून देवीची आराधना करून तसा वर प्राप्त केला होता. धवला धावत पतीजवळ गेली व त्याचे सांत्वन करून तिला तसा वर प्राप्त असल्याचे तिने सांगितले. नंतर तिने पार्वतीच्या वाटेला कधी न जाण्याचेही पतीला बजावून सांगितले.

* * *

त्रिपुरासुरांचा संहार करून पार्वतीला जाऊन भेटण्याच्या हेतूने घाई घाईने शंकर घरात जाऊ लागला तेव्हां त्या बालकाने शंकराला अडविले. शंकर चकितच झाला त्याने त्या बालकाला करड्या स्वरात विचारले–"कोण रे तू?"

तो बालक खदखदां हसत म्हणाला–"मी का? आईचा मुलगा! तू आत कीड-मुंगीलाही येऊ देऊ नकोस, असे माझ्या आईने मला सांगितले आहे!"

"मी परमेश्वर आहे!" शंकर म्हणाला.

"मला कोणत्याही देवाची फिकीर नाही. माझी आई प्रकृती स्वरूपिणी आहे. आईच्या आज्ञेचे पालन करणे, एवढे एकच कर्तव्य मला माहीत आहे!" तो बालक म्हणाला.

त्रिपुरासुराचा वध करून शंकर परतला त्याच्या थोडे पाठीमागून नंदीभृंगी शंकराच्या पराक्रमाचे स्तोत्र गात येत होते. शंकराचा 'जयजयकार' करीत तेहतीस कोटीदेवही येत होते. ते थक्क होऊन शंकराचा एका लहानशा बालकाशी वाद चालू असलेला ऐकू व पाहू लागले.



"अरे, तुला देवबीव काही माहीत नाही म्हणतो आहेस! सृष्टीचे मूल कारण परब्रह्म आहे! तोच देव होय!" शंकर म्हणाला.

"तू एवढा मोठा दिसतो आहेस, परंतु तुला काहीच माहीत नाहीसे दिसतं आहे! आदिशक्तीने सर्व विश्वाची आणि त्रिमूर्तीची सृष्टी केली!" असे म्हणत तो बालक सांगू लागला :–

"आदिशक्तीने आपले रूप लावण्य खर्ची घालून ब्रह्मदेव, विष्णू व महेश यांची सृष्टी केली. तिने आपल्या लावण्यातील रक्तवर्ण, नीलवर्ण व शुभ्रवर्ण कांतीने अनुक्रमे तिघांची सृष्टी केली. ब्रह्मदेव व विष्णू दोघांनी देवीने त्यांना आज्ञा केली



त्या आज्ञेचे उल्लंघन केले. तेव्हां देवीने आपला तिसरा डोळा उघडून त्यांना भस्म करून टाकले. महेश हा आज्ञाधारक मुलगा होता. त्याने देवीजवळ तिचा तिसरा डोळाच मागितला. देवीने तो काढून त्याच्या कपाळावर चिकटविला. त्याने लगेच तो उघडून तिला भस्म केले. ती जळत असता अग्नीच्या ठिणग्या व निखारे उडू लागले व त्यांची तेजस्वी मंडळे दिगंतात व्यापली. राखेने सर्व विश्व व्याप्त झाले. देवी पूर्ण रूपे भस्म झाल्यावर पुन्हां स्वस्वरूपात प्रगट झाली. म्हणून तिला महामाया, महाशक्ती ही नावे प्राप्त झाली. तिने शंकराची स्तुती करून त्याला सृष्टीचा लय करण्याची शक्ती दिली. ब्रह्मदेव व विष्णूला तिने त्यांच्या भस्मस्थितीतून बोलाविले व ते पुन्हां स्वस्वरूपात प्रगट झाले. देवीने तिची जी राख उरली होती तिचे तीन भाग केले व सरस्वती, लक्ष्मी आणि उमाची सृष्टी केली. सरस्वती ब्रह्मदेवाची, लक्ष्मी विष्णूची आणि उमा शिवशंकराची अर्धांगी करून देऊन देवी अंतर्धान पावली.

"तू सांगितलीस ती केवळ कपोल कल्पित कथा आहे!" शंकर म्हणाला.

"मी सांगितली ती तू केवळ कपोल कल्पित कथा म्हणत असशील तर परब्रह्मदेव वगैरे तू म्हणालास तो कोरा वेदांतच होता! ही सर्व सृष्टी देवाच्या पोटी जन्माला आली असे म्हणण्याऐवजी आदिशक्तीच्या पोटी जन्माला आली असे जास्त खरे वाटत नाही का?" त्या बालकाने विचारले. तो म्हणाला ते तेथे हजर असलेल्या पुरुषांनी ऐकले आणि त्यांची तोंड उतरली. एकटा विष्णू, बालक म्हणाला त्याचे कौतुक केल्यासारखा स्मित करू लागला. तेथे ज्या देवी व इतर स्त्रिया होत्या त्यांच्या तोंडावर स्मित झळकू लागले.

शंकर संतापून म्हणाला—"तुला पाहून तर तू अगदी अबोध बालक दिसतोस! शहाण्यासारखा दारावर आडवा न राहता

बाजूला सरक पाहू!" रागाला दाबून ठेवलेल्या आवाजात शंकर म्हणाला. "माझ्या जिवात जीव असेपर्यंत तुला मी आत जाऊ देणार नाही!" तो मुलगा म्हणाला. शंकराने टाळी वाजवून आपल्या प्रमथगणांना खूण केली.

बालक हसत म्हणाला—"मला अबोध बालक म्हणून तू मोठा करुणेचा आव दाखविला होतास आणि माझ्यावर बल प्रयोग करायला आपल्या प्रमथगणांना पाठवीत आहेस, हे बरोबर आहे का? बरं तर ठीक आहे, मी गणाधिपती आहे!" असे म्हणत त्या बालकाने हातातल्या अंकूशाने जमिनीवर प्रहार केला. भूमी दुभंगल्यासारखी होऊन पुत्रगणपतीचेच रूप असलेले सहस्रावधी पुत्रगणपती जमीन फोडून वर आले व त्यांनी आपापल्या अंकुश, गदा, पास व शूल वगैरे शस्त्रास्त्रांनी नंदी, शृंगी, भृंगी व चंडीश्वर आदिकांना गुरांना हाकून पळवून लावतात तसे पळवून लावले. ते पाहून इतर प्रमथगण वाट फुटेल तिकडे पळून गेले. पुत्रगणपतीचे गणही अदृश्य झाले.

शंकराने रौद्र रूप धारण केले आणि त्रिशूल हाती धरला. बालकाने अंकुशाच्या दांडयाने त्रिशूलावर प्रहार करताच त्रिशूल 'ख...ण्ण!' असा आवाज करीत जमिनीवर आदळले. बालक खदखदा हसत म्हणाला—"माझ्या आईने माझ्या हातात दिलेला दंड हातात असेपर्यंत तुला काही करतां येणार नाही. तुझ्या मनात जे काही करावयाचे आहे ते निर्विघ्नपणे व्हावे यासाठी मी पूर्णपणे तयार आहे, बघ! त्यानंतर जे काही व्हावयाचे असेल ते माझी आई पाहून घेईल!" असे म्हणत त्याने आपल्या हातातला अंकुश, गदा इत्यादी दूर फेकून दिले. शंकराने आपले त्रिशूल उचलून बालकाच्या कंठावर फेकले. तत्क्षण बालक "आई!" अशी मोठयाने हाक मारीत असतां त्याचे डोके उडून आकाशांत उडाले व प्रकाशाचा झोत अखिलब्रह्मांडात फेंकीत अंतरिक्षात लीन झाले.





# मित्रप्रेम

गंगा नदीच्या काठच्या एका गावी जय-विजय नावाचे दोघे क्षत्रिय तरुणयुवक रहात असत. ते बालपणापासून मित्र होते. ते वयात येईपर्यंत एकाच गुरुगृही विद्याभ्यास करून कोणत्यातरी राजाच्या पदरी नोकरी करण्याचा विचार करून निरनिराळ्या दिशेने निघाले.

त्यांच्या पैकी जय अमरावती नगरी गेला आणि विदर्भ देशाच्या राजाच्या पदरी नोकरी करू लागला. आपला शौर्य व पराक्रम दाखवून तो अल्पकाळात मोठ्या पदावर आला. त्याचप्रमाणे विजय उज्जयिनी नगरीच्या मालव राजाच्या पदरी नोकरीला लागला व फार मोठा नावलौकिक संपादन केला.

बारा वर्षे दोघां मित्रांची एकदांही कोठे भेट झाली नाही. परंतु ते परस्परांना एकही क्षण विसरले मात्र नाहीत. अमरावतीहून कोणी उज्जयिनीला जाणारा भेटला तर जय त्याच्या हाती आपल्या बालमित्राकडे काहीतरी अपूर्व भेट व पत्र पाठवी. त्याचप्रमाणे विजयही उज्जयिनीहून कोणी अमरावतीला निघाला की त्याच्या हाती आपल्या मित्राकडे काहीतरी प्रेमाची भेट पाठवी.

काही काळाने जयच्या मनात आपल्या बालमित्राला भेटण्याची तीव्र इच्छा उत्पन्न झाली. त्याने महाराजांची परवानगी घेतली आणि अमरावतीहून उज्जयिनीला आला. विजयच्या आनंदाला पारावार नव्हता. त्याने जयच्या उतरण्याची व त्याला कोणत्याही वस्तूची उणीव भासू नये याची व्यवस्था केली. परंतु ती सर्व व्यवस्था व्यर्थ गेल्याचे विजयच्या लक्षात आले.

प्रत्येक दिवशी विजय जयला भेटायला येई तेव्हां तो जास्त जास्त थकल्यासारखा











दिसू लागला. त्याचे अन्न कमी होत गेले व त्याला झोप येत नसल्याचे आढळले. त्याचे कारण असे होते की विजयच्या घरी जयला एक अपरूप सुंदर स्त्री दिसली. तिला पाहिल्यापासून त्या मुलीशिवाय त्याच्या मनात दुसरा कोणताही विचार सुद्धा येईनासा झाला.

"काय रे, जया! तू असा वाळत कां चालला आहेस? तुला काही होत आहे का? वैद्याला बोलावू का?" विजयने मित्राला फार काळजी दाखवीत विचारले.

"मला तुझ्या व्यतिरिक्त दुसरा आप्त-बंधू कोण आहे? खरं ते सांगतो! मी तुझ्या घरी एका सुंदर मुलीला पाहिले आहे. तिच्याशी माझं लग्न होऊ शकलं नाही तर मी जिवंत राहीनसे वाटत नाही!" जय म्हणाला.

"त्या मुलीचे नाव मनोरमा आहे. तिला आईवडील नाहीत. परंतु तिच्या नांवी मोठी संपत्ती आहे. ती आमच्याच घरी वाढते आहे. मी तिच्याशी लग्न करण्याच्या विचारात होतो. परंतु तुझं तिच्यावर इतकं प्रेम असेल तर तूच तिच्याशी लग्न करून घे!" असं सांगून विजयने जयला ते लग्न करून घेण्यास आग्रह केला व तिच्याशी मित्राचे लग्नही करून दिले. काही दिवस उज्जयिनीला राहून जय मनोरमेसह अमरावतीला परतला.

काही काळ लोटला. उज्जयिनीचे महाराज निवर्तले व युवराज गादीवर आला. युवराजाच्या मित्रांनी विजयच्या विरुद्ध राजाचे कान भरून त्याला नोकरीवरून काढून टाकविले. विजय थोड्याच दिवसात एक सामान्य गरीब माणूस झाला. त्याला काय करावे, सुचेना. त्याच्या शेजार-पाजारचे लोक त्याचे शत्रू झाले.

अशा स्थितीत एकटा जय तेवढाच आपल्याला आधार असल्यासारखे विजयला वाटले व तो अमरावतीला निघाला. तो अमरावतीला पोचला त्यावेळी काळोख पडू लागला होता. "या काळोखात या मळक्या कपड्यात व माझ्या या रूपात दाढी वाढली असतां मला कोण ओळखणार? आज रात्र कोठे तरी काढावी व उजाडल्यावर जयच्या शोधार्थ जावे." असा विचार करून विजय स्मशानाच्या दिशेने गेला.

तेथे एक सोयीची जागा पाहून जय आडवा झाला. परंतु त्याला झोप आली नाही. एक प्रहर रात्र उलटल्यावर स्मशानात कोणी दोघे जण आले. ते आपसात बोलत होते आणि बोलताबोलतां ते भांडू लागले. शेवटी एक सुरा काढून दुसऱ्याला भोसकायला निघाला. लगेच दुसऱ्याने आपला सुरा काढला व पहिल्याला भोसकले. सुरा भोसकला जातांच तो किंकाळी फोडून जमिनीवर पडला. सुरा भोसकणारा तेथून पळाला आणि गोंधळून पळत विजय झोपला होता त्या बाजूला आला.

दोघांचं झालेलं भांडण, एकाने दुसऱ्याला भोसकलं ते आणि नंतर तो पळून गेला ते विजयसारखेच त्या अपरात्रीही आणखी काही जणांनी पाहिले. ते भोसकणारा पळाला त्या बाजूला त्याला धरण्यासाठी पळत आले. तेथे त्यांना विजय दिसला. तोच खुनी असावा असे समजून त्याला धरून नेले आणि त्याला कोतवालाच्या हाती कैद करविले. कोतवालाने उजाडेपर्यंत विजयला कैदेत ठेवले आणि उजाडल्यावर शिपायांबरोबर त्याला न्यायालयात पाठविले.



विजयला रस्त्याने धरून नेत असतां त्याला जयने ओळखले. "काय भानगड आहे, याला धरून कोठे नेता आहां?" या शब्दात त्याने शिपायांना विचारले.

"या माणसाने काल रात्री स्मशानात एका माणसाचा खून केला हो, चवकशी साठी याला न्यायालयात नेतो आहो." शिपाई म्हणाले.

"वेड्यांनो, खुनी मी आहे. याला सोडून द्या, व मला धरून घेऊन जा." जय शिपायांना म्हणाला.



परंतु विजय म्हणाला—"हा कोण आहे, मला माहीत नाही. रात्री खून मीच केला."

शिपायांना काय करावे कळेना. म्हणून ते दोघांना धरून न्यायालयात घेऊन गेले. न्यायाधिशाने चवकशी केली, परंतु खरा खुनी कोण हे त्याला कळेना. तो म्हणाला—"या दोघांपैकी एक खुनी असला पाहिजे. नक्की कोणी खून केला, निर्णय देणं मला तरी शक्य नाही. दोघाना वधस्थानी नेऊन फाशी द्या."

शिपायांनी जयविजय दोघांना वधस्थानी नेले आणि तेथल्या कोतवालाला न्यायाधिशाने दिलेला निकाल कळविला. फाशीची शिक्षा पाहण्यासाठी अमरावतीचे नागरिक मोठ्या संख्येने जमा झाले होते. त्यांत खरा खुनी सुद्धा हजर होता. त्याला शिपाई धरू न शकल्यामुळे कोणत्यातरी दोघां निरपराध माणसांना फाशी द्यायला निघाले आहेत हे पाहून तो चिडला व कोतवालाकडे जाऊन म्हणाला—"तुमचा न्याय विचित्रच दिसतो की. खरा खुनी तर मी आहे. या दोघांना सोडा व मला फाशी द्या!"

चवकशी शिवाय फाशी द्यायचा अधिकार कोतवालाला नसतो. अपराध्यांची संख्या तिनांवर गेली. म्हणून कोतवाल तिघाना घेऊन न्यायालयात गेला.

"या खुनासंबंधी मी आपला निकाल दिला आहे ना?" न्यायाधिशाने कोतवालाला विचारले.

"आतां आणखी एक खुनी सांपडला आहे. आपण तिघांची चवकशी करून काय तो निर्णय द्यावा." कोतवाल म्हणाला.

यावेळी जयविजयनी ते खुनी नसल्याचे मान्य केले.

"तू खुनी नसतांना तूच खुनी असल्याचे तेव्हां कां मान्य केलेस?" न्यायाधिशाने विचारले.

"महाशय, हा विजय माझा जीवश्च कंठश्च मित्र आहे. यानं माझ्यासाठी आपल्या सर्वस्वावर पाणी सोडले आहे. याला खुनी म्हणून शिपाई घेऊन जात असतां त्याला वांचविण्यासाठी मी त्याचा अपराध स्वतःवर ओढून घेतला." जय म्हणाला.

"तुला याविषयी काय म्हणावयाचे आहे?" न्यायाधिशाने विजयला विचारले.

"माझ्या मित्राने तोच अपराधी असल्याचे म्हटल्यावर मला ते खरे वाटले व त्याला वांचविण्यासाठी मी खुनी असल्याचे सांगितले. याशिवाय दुसरे काही नाही." विजय म्हणाला.

नंतर न्यायाधिशाने खऱ्या खुन्याकडे वळून विचारले—"तुला काय म्हणावयाचे आहे? त्या दोघांना फांशी देण्याची वेळ येईपर्यंत तू खरे सांगितले नाहीस, त्यानंतर कां सांगितलेस?"

"मी ज्याचा खून केला होता तो पापी व द्रोही होता. आत्मरक्षणासाठी त्याचा वध करणं मला आवश्यक झाले. त्याचा मी वध केला या बद्दल तुम्ही माझं अभिनंदनच कराल. परंतु आपण तसं करणार नाही. मला फाशी द्यालं. असा विचार करून मी आपला अपराध मान्य करायला धजलो नाही. परंतु माझ्या ऐवजी दोघे निरपराध व निष्पाप व्यक्ती फांशीवर चढले तर मला नरकवास भोगावा लागणार नाही का? म्हणून मी आपला अपराध मान्य केला. मी स्वतः प्रगट झालो, कोतवाल साहेबांच्या हुषारीने पकडला गेलो नाही." खरा खुनी म्हणाला.

न्यायाधिशाने बराच विचार केला व तिघांनाही मुक्त करीत म्हणाला—"तू खून केला असलास तरी तू एक लायक माणूस दिसतो आहेस. तुला सोडून दिल्याने आणखी खून होणार नाहीत असे वाटून, तुला माणसांच्या जिवाची काळजी असल्याची खात्री झाल्यामुळे तुला मी सोडीत आहे."

त्यानंतर विजय जयकडेच राहू लागला व मित्राच्या शिफारशीने राजदरबारात नोकरीला लागला. त्यानंतर दोघे मित्र परस्परांच्या सुखदुःखात साथी होऊन दीर्घकाळ अमरावतीला राहाले.





# विचित्रपुरी

मंदगिरी नावाच्या गावी गोपू नावाचा एक तरुण युवक रहात असे. त्याला त्याची आजी त्याच्या लहानपणी एक गोष्ट सांगत असे. म्हणे त्या गावाच्या पश्चिमेला विचित्रपुरी नावाचे एक गाव आहे. त्या गावातल्या रहिवाश्यांना काही दैवी शक्ती प्राप्त होत्या वगैरे वगैरे. त्या गोष्टीचा ठसा गोपूच्या मनावर खोल बसला होता.

गोपू मोठा झाला तोंपर्यंत त्याची आजी वारली होती. परंतु तिने विचित्रपुरीची जी गोष्ट सांगितली होती त्या गोष्टीचा ठसा अद्याप कायम होता. ती गोष्ट खरी असावी असे गोपूला फार वाटे. त्या गोष्टीची खात्री करून घेण्याची उत्सुकता नित्य वाढतच गेली. त्याने पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. कित्येकांना विचारले; पण प्रत्येकाने 'असं गांव आम्ही नाही बुवा ऐकलं' असेच उत्तर दिले. काहींनी तर असेही सांगितले की असं एखादं गांव असणेच अशक्य. तरी गोपूच्या मनात ती गोष्ट घर करून बसली होती व त्याला वाटे की असं गाव नक्कीच असलं पाहिजे.

एकदा गोपू कोणत्या तरी कामानिमित्त परगावी गेला. परंतु येताना वाट चुकून तो कोठे तरी अडकला. नेमका त्यावेळी फार मोठा पाऊस पडला आणि तो वाट शोधत शोधत कोणत्या तरी दुसऱ्याच गावी आला.

त्या गावात चालत असतां त्याने एकाला त्या गावाचे नाव विचारले—"या गावाचे नाव काय हो?"

तो माणूस म्हणाला—"म्हणजे तुम्हाला माहीत नाही का? ही विचित्रपुरी आहे!"

ते उत्तर ऐकून गोपूला परमानंद झाला. त्याला वाटलं की उशिरां का होईना आजीने सांगितलेल्या गावी आपण येऊन पोचलो. त्याला वाटलं की आपण केवढा विजय मिळविला? तो त्याच आनंदात त्या गावात फिरू लागला. वाटेत त्याला एक फळांचे दुकान दिसलं. त्या दुकानात पिकलेली मोठमोठी सुंदर केळी होती. ती केळी दिसतांच त्याला भूक लागली. त्याने दुकानात जाऊन एका रुपयाची केळी विकत घेतली आणि तेथून निघून गेला.

थोडे अंतर चालून गेल्यावर दुकानदाराला पैसे न दिल्याचे त्याला आठवले. त्याने परत येऊन दुकानदाराची माफी मागितली आणि रुपया द्यायला खिशात हात घातला. तेव्हां दुकानदार म्हणाला—"अहो, तुम्ही मला एक रुपया दिलात की! विसरलात वाटतं?"

गोपूने चकित होऊन आपल्या खिशात हात घातला व पैसे काढून मोजून पाहिले. एक रुपया कमी होता. त्याला वाटलं की आपण रुपया दिला व आपणच विसरलो.

तेथून गोपू आणखी थोडं अंतर पुढे गेला. त्याला एक माणूस कोणाचा तरी तुटलेला पाय उचलून घेऊन जात असलेला दिसला.

गोपूने त्या माणसाला विचारले—"तू हा कोणाचा पाय कोठे घेऊन चालला आहेस?"

तो म्हणाला—"हा पाय माझ्या धाकट्या भावाचा आहे. त्याला एक गळू झालं आहे.



ते कापून पट्टी बांधून आणायला वैद्याकडे नेतो आहे."

ते ऐकून गोपूला वाटले की आपल्याला वेड तर लागलं नाही? तरी तो त्या माणसाच्या पाठोपाठ पहायला निघाला.

त्या माणसाने तो पाय नेऊन वैद्याला दाखविला. वैद्याने गळू कापून औषध लावले व पट्टी बांधली, तेव्हां तो माणूस तो पाय घेऊन आपल्या घरी गेला. खाटेवर पडलेल्या आपल्या धाकट्या भावाच्या मोडक्या पायाला तो पाय लावल्याबरोबर चिकटला आणि भाऊ चटदिशी खाटेवरून उठून उभा राहिला व थोडा घरात चालला ही. नंतर त्याच्या

चेहऱ्यावर आनंदाची एक लहर दिसू लागली, जणुकाही तो इलाज झाल्याने त्याचे समाधान झाले आहे.

गोपूने त्या माणसाला सुरवातीपासून आपली ओळख सांगून आजीने सांगितलेली गोष्टपण सांगितली. त्या दिवशी रात्री दोघां भावांनी आग्रह करून त्याला आपल्या घरी जेवायला रहायला सांगितले.

जेवल्यानंतर झोपायच्या आधी तिघे बोलत बसले असतां मोठ्या भावाच्या डोळ्यात एक किडा गेला. तो गोपूने पाहिला. म्हणाला–"तुमच्या डोळ्यात पडलेला किडा मी काढतो, फुंकर घालून!"

"काही गरज नाही हो!" असं म्हणत त्या भावाने आपले बुबुळ हाताने काढून ते फिरवून पाहून त्याला लागलेला किडा रुमालाने पुसला आणि बुबुळ पुन्हां जागच्या जागी ठेवून दिले. नंतर गोपूशी पुन्हां बोलू लागला, जणु काही, काही विशेष घडलंच नाही!

दुसऱ्या दिवशी गोपूला वाटलं की ते गाव सोडून लगेच निघून जावे. कारण त्या गावच्या लोकांची राहणी त्याला विचित्रच वाटली व त्याला त्यांची धास्ती वाटली. परंतु दोघां भावांनी त्याला आणखी चार दिवस राहण्याचा आग्रह केला.

गोपू म्हणाला–"मी राहलो असतो हो, परंतु माझी घरात कित्येक कामे पडून राहली आहेत. पावसामुळे मी अडकून राहलो, म्हणून इतका वेळ तुमच्याबरोबर राहू शकलो. आतां तास भर सुद्धा रहा म्हणालात तरी मला राहतां येणार नाही. माफ करा!" असे सांगून गोपूनं तेथून पाय काढला आणि आपल्या गावची वाट धरली. ते दोघे भाऊ थोडे रागानेच म्हणाले–"तर मग जा मसणात!"

परंतु दुसऱ्याच क्षणाला गोपू आपल्या घरीच होता. त्याला आश्चर्य वाटलं की आतांपर्यंत घडलं ते सर्व स्वप्न होतं की मनाचा केवळ भ्रम होता? आणि ती विचित्रपुरी...?





# माणसाची लायकी

एकदां रामपूरच्या इनामदारांकडे दोघे तरुण आले. दोघे सुशिक्षित होते. एकाचं नाव होतं भारद्वाज व दुसऱ्याचं पंडितराव. इनामदारांच्या एका मित्राने दोघांना इनामदारांच्या नावे एकेक चिट्ठी लिहून देऊन त्यांना इनामदारांकडे पाठविले होते.

इनामदार चिट्ठ्या वाचून दोघांना म्हणाले–"माझ्या कचेरीत तूर्त रिकामी जागा नाही. परंतु माझ्या मित्राने माझ्याकडे पाठविले आहे तर मी तुम्हांला कोरा परत पाठविणार नाही. तुम्हांला मी दोन दोन एकर जमीन देतो. ती निरनिराळ्या जागी असेल. तुम्ही अंग मेहनत करून पहा, काही मिळकत होते का? तुम्हांला पैसे भांडवल म्हणून कर्जाऊ देतो. एक वर्षभर काम करा. पैसे सुटले तर कर्जफेड करा. तुमचं पोट भरेल एवढी कमाई तुम्हांला नक्कीच होईल." असे सांगून इनामदाराने चिट्ठी देऊन एकाला शिरगावला पाठविले व दुसऱ्याला शिवपूरला धाडले.

इनामदारांची चिट्ठी घेऊन भारद्वाज शिरगावी गेला व तेथल्या कुळकर्ण्याला चिट्ठी दाखवून दोन एकर जमीन त्यांच्याकडून मागून घेतली. ती ओसाड जमीनच होती. त्या जमिनीत चिंचेची व बाभळीची झाडे वाढलेली होती. भारद्वाजच्या मनात एक विचार आला.

गावकऱ्यांकडून त्याला कळले की त्या जमिनीतली माती विटांना जास्त उपयोगी आहे. त्याने विचार केला, शेतीपेक्षा हा धंदा काय वाईट आहे? त्याने विटा करणाऱ्या–दोघातिघांना भेटून विटांचा धंदा सुरू केला. जमिनीतली झाडं विटांच्या भट्टीला चांगली उपयोगी पडली. विटा भाजन झाल्यावर त्या उचलून न्यायला

व्यापारी धावले. त्याला विटांची चांगली किमत मिळाली.

त्यानंतर त्याने विटा काढण्याचा धंदाच सुरू केला. एक वर्ष संपल्यावर तो इनामदाराचं कर्जफेडायला निघाला.

इनामदारांनी भारद्वाजला विचारले– "तू हे पैसे कसे मिळविलेस रे?"

भारद्वाजाने वर्षभरात त्याने जे जे केले, ते थोडक्यात सांगितले व इनामदारांच्या उपकारांबद्दल कृतज्ञता दर्शवून म्हणाला– "तूर्त मी कित्येक गावांत विटा पुरवितो आहे. हल्ली विटांचा व्यापारी म्हणून मला लोक ओळखू लागले आहेत. पुढे मला स्वतंत्रपणे चांगली मिळकत होईल!"

इनामदार खूष होऊन म्हणाला–"तू मी दिलेले कर्ज फेडण्याची गरज नाही. हे मी दिलेलं इनाम समज व सचोटीने धंदा कर."

भारद्वाजासारखीच पंडितरावाने शिवपूरच्या कुळकर्ण्याकडून दोन एकर जमीन घेतली. ती ओसाड जमीनच होती. इनामदारांनी दिलेले भांडवल लावून त्याने मजुरांकरवी शेत नांगरविले आणि मिर्च्या लावल्या. परंतु पाऊस न पडल्यामुळे शेत वाळून गेले.

पंडितरावाने इनामदाराना घडलेले वृत्त सांगून सर्व रुपये संपल्याचे सांगितले. पुढे पैसे मिळतील तसे फेडीन असे वचनही दिले. नंतर त्या जमिनीची गरज नसल्याचेही सांगितले व दुसरे एकादे काम मिळू शकेल का विचारले.

इनामदाराने पंडितरावाला आपल्याच कचेरीत कारकुनाची नोकरी दिली. नंतर आपल्या मित्राला पत्र लिहून कळविले– "तुम्ही माझ्याकडे ज्या दोघां तरुणांना पाठविले होते ते दोघे सुशिक्षित आहेत खरे, परंतु त्यांपैकी भारद्वाज स्वतः आपल्या लायक धंदा शोधून धंदा करू लागला आहे. परंतु पंडितराव कोरा पंडितच निघाला. त्याच्यात नोकरी करण्याचीच लायकी आहे. म्हणून मी त्याला आमच्याच कचेरीत लावून घेतले आहे.






[ १२ ]

[कुंभांड व रानटी लोक आपला शोध काढीत असणार असे समजून समरसेन आपल्या सैनिकांसह एका गुहेत शिरून लपून बसला. नंतर सैनिक झाडांवर चढून पाहारा देऊ लागले. गुहेच्या आंतल्या बाजूने बोलल्याचा आभास झाल्यावर समरसेनाने तिकडे जाऊन एक चोरदरवाजा उघडला. त्या पाठोपाठ दोघां बलदंड माणसांनी त्याला धरले. पुढे–]

अकस्मात् दोघां बलदंड माणसांनी झडप घालून त्याला धरल्यामुळे समरसेन स्वतःचे रक्षण करू शकला नाही. त्याच्या तोंडावाटेही एक शब्दसुद्धां निघाला नाही. इतक्यात गुहेसमोरून एक भयंकर डरकाळी ऐकू आली. लगेच त्याला कैद करणाऱ्यांनी त्याला उचलून खांद्यावर घेतले व पळून गेले.

समरसेनाला करण्यासारखं काहीच नव्हते. तो चारीबाजूचा प्रदेश पाहू लागला. तो डोंगराळ प्रदेश होता आणि एक मोठी दरी दिसत होती. त्याला उचलून घेऊन जाणारे दोघे डोंगरावरून खाली उतरू लागले. दूर अंतरावर मिणमिणत असलेले काही दिवे दिसत होते.

समरसेनाने धरून नेणाऱ्यांना विचारले– "कोण तुम्ही, मला कां धरून नेतां आहां?"

त्या प्रश्नाचं काही उत्तर न देतां त्याला धरून नेणारे परस्परांकडे एकदां पाहून



पुढे मौनपणे चालू लागले. समरसेनाने काही वेळ थांबून त्यांना पुन्हां तोच प्रश्न विचारला.

तेव्हां त्या दोघांपैकी एकजण म्हणाला—"ते सर्व आमच्या नायकाला विचारलेस तर ते सांगतील."

ते उत्तर ऐकून त्यांना आणखी काही विचारण्यात अर्थ नाही असे समरसेनाला वाटले. उंचवटयाच्या प्रदेशातून खाली सखल प्रदेशात आल्यावर त्या दोघांनी समरसेनाला खांद्यावरून खाली उतरविले आणि त्याच्या हातापायांना बांधलेल्या दोऱ्या सोडून टाकल्या. नंतर समरसेनाचे दोन्ही हात पिळवटून धरून ते पुढे चालू लागले.

तसे काही अंतर चालून गेल्यावर दिव्यांचा उजेड जवळ येत असल्यासारखं वाटलं. वाटेत झाडावर पाहारा देत बसलेल्यापैकी एकजण मोठ्याने ओरडून म्हणाला—"आपले लोक कोणाला तरी धरून घेऊन येत आहेत. त्यांना जाऊ द्या पुढे." त्याच्या पाठोपाठ आणखी तसेच बरेचसे आवाज ऐकू आले. ते सर्व पहात असतां समरसेनाला आश्चर्याबरोबर भयसुद्धां वाटू लागले.

काही वेळाने ते दोघे समरसेनाला एका घरी घेऊन गेले. त्यांनी दाराची कडी वाजवितांच एकाने येऊन दार उघडले. त्यांनी समरसेनाला आत नेऊन पुन्हा त्याचे हातपाय बांधून टाकले व म्हणाले—"आज रात्रभर तू याच खोलीत झोपायचं! उजाडल्यावर तुझी गत काय ती तुला दिसेल!" म्हणत व दार बंद करून दोघे निघून गेले.

निरुपाय स्थितीत त्या अंधारकोठडीत रात्र काढण्याशिवाय समरसेनाला दुसरा मार्गच नव्हता. उजाडू लागल्याचं कोंबड्यांचं आरवणं सुरू होताच कळलं. आणखी थोड्या वेळाने देवळातल्या घंटा वाजल्या. त्या पाठोपाठ कोणी चालत येत असल्याची चाहूल ऐकू आली आणि नंतर 'किरकिर' असा आवाज करीत दार उघडले गेले.

समरसेनाने मान वळवून पाहिले. नवीनच कोणी दोघेजण होते. त्यांच्या हातांत तलवारी होत्या. ते करड्या नजरेने पहात समरसेनाजवळ आले. दोघे परस्परांशी खुणेने काही बोलत असल्याचे पाहून समरसेनाने त्यांना विचारले—"त्या घंटा वाजल्या त्या देवळातल्या घंटाच ना?"

त्या प्रश्नाचे उत्तर म्हणून त्यांच्यापैकी एकजण हसून म्हणाला—"त्या देवळातल्या घंटा नव्हत्या; तुझ्या मरणापूर्वीची सूचना होती. व्याघ्रदत्ताने विचारलेल्या प्रश्नांची सरळ उत्तरे तू दिली नाहीस तर तुझी शंभर वर्षं भरलीच समज! खबरदार!"

'हा व्याघ्रदत्त कोण बरे! माझ्याकडून याला कोणते असे गुपित कळण्यासारखे आहे?' या प्रश्नांची उत्तरे किती वेळ विचार केला तरी समरसेनाला सुचली नाहीत. क्रूर करड्या नजरेने आपल्याकडे पहात असलेल्या व्याघ्रदत्ताच्या नोकरांना विचारून काही फायदा नाही असा विचार करून समरसेन गप्प राहिला.

व्याघ्रदत्ताच्या अनुयायांनी काही बोलल्याशिवाय समरसेनाचे हातपाय सोडले आणि त्याला खोलीतून बाहेर घेऊन आले.

"मला कोठे घेऊन चालला आहां?" समरसेनाने विचारले.

त्या प्रश्नाचे उत्तर देतांना रागाने त्यांनी समरसेनाकडे पाहिले व म्हणाले—"तुला आमचा नायक व्याघ्रदत्त याच्याकडे घेऊन





जात आहों. तेथे तोंड संभाळून बोल व शहाणपणाने वाग!"

काही अंतर चालून गेल्यावर ते एका मोठ्या वाड्यात शिरले. तेथे निरनिराळी शस्त्रास्त्रे धारण करून अनेक सैनिक काही तरी बोलत होते.

एकाएकी वाड्यातले एक मोठे दार उघडले गेले. समोर एका उंच आसनावर एक जण ऐटीत बसलेला होता. हाच व्याघ्रदत्त असणार असे समरसेनाला अंदाजाने वाटले.

"समरसेना! मीच व्याघ्रदत्त बरं का! मी व्याघ्रमंडलाच्या वतीने तुझे स्वागत करतो. बहुतेक तुझे पूर्वज व माझे पूर्वज कुंडलिनी द्वीपावरच्या एकाच गावचे रहिवासी असावेत. या कुंडलिनी द्वीपात आपण त्यांचे वंशज अकस्मात असे भेटत आहों, याबद्दल तुला आश्चर्य वाटत नाही का?" व्याघ्रदत्त म्हणाला.

समरसेनाला, तो त्यांच्या कैदेत पडल्यापासून सर्व आश्चर्यजनक गोष्टीच ऐकायला मिळत होत्या. त्याला कोणी कां कैद केले, हीच आश्चर्याची गोष्ट होती. कुंडलिनी द्वीपाचे नाव सांगून ह्याचे पूर्वज तिथलेच होते हे हा सांगतो आहे आणि एकंदर माझे बोलणेच आश्चर्य करण्यासारखेच आहे.

अशा मन:स्थितीत समरसेन म्हणाला—"व्याघ्रदत्ता! मला तू म्हणालास ती प्रत्येक गोष्ट आश्चर्यकारकच वाटते आहे. मला तुझ्या अनुयायांनी कां धरून आणले याचेच आश्चर्य वाटते आहे. मूळ तुम्ही सर्व या द्वीपात आलां केव्हां?" समरसेनाने धीर करून विचारले.

व्याघ्रदत्ताने काहीवेळ समरसेनाकडे खोल नजरेने पाहिले व डोळे वटारून म्हणाला—"समरसेना, तू, तुला जसं काही, काहीच माहीत नाही असं सोंग करून बोलतो आहेस, अशी शंका मला वाटते आहे. ते असू दे, मला जे सांगावयाचे आहे ते मी सांगून टाकतो. ऐक! शमन-द्वीपावरच्या शाक्तेय राजाची तुला माहितीच नाही असे तर नाही ना? तो अनेक देशावर स्वाऱ्या करीत लूटमार करीत आपल्या कुंडलिनी द्वीपावर सुद्धा चालून आला व त्याने ते लुटले. आपल्या देशातल्या शूरवीरांना धरून त्याने त्यांना आपले गुलाम केले आणि आणखी काही बेटें लुटण्यासाठी जहाजातून निघाला. या प्रयत्नात तो या बेटावर आला व याच बेटावर तो मृत्युमुखी पडला ही गोष्ट तुला माहीत असावी, असे मी मानतो. तो मेल्यावर त्याचे गुलाम असलेले आपले पूर्वज स्वतंत्र झाले आणि याच बेटावर राहू लागले. आपले पूर्वज स्वतंत्र व्हायला शाक्तेयाच्या दोघां मांत्रिक शिष्यांमधील वितुष्ट चांगलेच उपयोगी पडले. त्या दोघां शिष्यांची माहिती तुला असणारच!"

"होय, आहे माहिती!" समरसेन म्हणाला.

"तर मग त्या शाक्तेयाचे त्रिशूल कोठे आहे, हे सांग. चंडीदेवीच्या प्रसादाने शक्तिसंपन्न असलेल्या त्या त्रिशूलाचा प्रताप तुला माहीतच असेल." व्याघ्रदत्त म्हणाला.

त्या त्रिशूलाची गोष्ट ऐकताच समरसेन चकितच झाला. व्याघ्रदत्ताने शमन द्वीपावरच्या शाक्तेयाविषयी जे काही सांगितले त्यातले एक अक्षरही समरसेनाला माहीत नव्हते. चतुराक्ष एकदां त्याचा गुरु शाक्तेय याच्याविषयी काही सांगत होता. परंतु शाक्तेयाने कुंडलिनी द्वीप लुटले होते हे समरसेनाने ऐकले नव्हते. चंडीदेवीने शाक्तेयाला दिलेल्या त्रिशूलाविषयी समरसेनाला काहीच माहीत नव्हते. म्हणून तो म्हणाला :

"व्याघ्रदत्ता! तुम्ही विचारलेल्या एकाही प्रश्नाचे उत्तर मला देतां येणार नाही. तुम्ही मला चुकीच्या समजुतीने कैद करविले असावे. शाक्तेयाविषयी किंवा त्याच्या जवळच्या दिव्य शक्ती असलेल्या त्रिशूलाविषयी मला काहीच माहीत नाही." समरसेन नम्रपणे म्हणाला.



समरसेनाचे उत्तर ऐकून व्याघ्रदत्त संतापला व म्हणाला–"तू अगदी भोळा असल्याचे सोंग करून मला फसवू शकशील असे मानू नकोस. उद्या सकाळी दहा वाजेपर्यंत मी तुला अवधी देतो. त्या अवधीत स्वतःच्या जिवाची तुला फिकीर असेल तर तू खरे ते सांगून टाकणे तुझ्या हिताचे आहे. तसे तू सांगितले नाहीस तर तुझा बळी भद्रचामुंडीच्या समोर दिला जाईल. येथे तुझे रक्षण करू शकेल असा कोणीही नाही, हे विसरू नकोस." त्याने करड्या आवाजात समरसेनाला बजावून सांगितले.

ते ऐकून समरसेन तर थक्कच झाला. त्याला एकही गोष्ट माहीत नसतां त्याच्यावर त्या गोष्टी सांग, म्हणून बळजबरी होत आहे. ही गोष्ट व्याघ्रदत्ताला बहुतेक माहीत नसावी, असे समरसेनाला वाटले.

व्याघ्रदत्ताचा हुकूम होताच दोघां सैनिकांनी समरसेनाला तेथून ओढून नेले आणि एका अंधारकोठडीत टाकून दिले. नंतर त्यांनी त्याचे हातपाय घट्ट बांधून ठेवले. त्या खोलीत एका बाजूला भद्रचामुंडीची एक भयंकर मूर्त होती.

शिपायांनी भद्रचामुंडीची मूर्त समरसेनाला दाखविली व म्हणाले–"उद्यां सकाळी दहावाजायच्या आत आमच्या




नायकाला तू खरे ते सांगितले नाहीस, तर या देवीसमोर तुझा बळी दिला जाईल, लक्षात ठेव!" असे समरसेनाला बजावून सांगून शिपाई तेथून निघून गेले.

समरसेनाला भुकेबरोबर हातपाय बांधले गेले असल्यामुळे फारच त्रास होत होता. उजाडल्यावर आपले मरण चुकत नाही, ही भीतीही त्याच्या मनाला सतावून सोडीत होती. अशा संकटसमयी चतुराक्षासारख्या मांत्रिकाशिवाय आपल्याला मदत करणारा दुसरा कोण मिळणार? परंतु चतुराक्षाला ही गोष्ट कशी कळणार?

समरसेन याच विचारात असतां तीन प्रहर रात्र उलटून गेली. त्याचा जीव

तडफडत होता. त्याला काय करावे सुचत नव्हते. परंतु त्याला डुलकी आल्यासारखे झाले आणि त्याच वेळी खोलीचं दार उघडल्याचा आवाज झाला.

समरसेनाने वळून एकदां पाहिले. दोघे जण आत आले. हे आपला वध करण्यासाठी व्याघ्रदत्ताने पाठविलेले त्याचे अनुयायीच असावेत, असे समरसेनाला वाटले.

त्या दोघांनी समरसेनाच्या हातापायांना बांधलेल्या दोऱ्या काही बोलल्याशिवाय सोडल्या. हे सर्व काय चाललं आहे, आश्चर्यकित होऊन समरसेन पहात असतां त्या दोघांनी समरसेनाला आपल्याबरोबर चलायला खूण केली आणि ते दोघे खोली बाहेर गेले.

समरसेन उलट काही एक बोलल्या शिवाय त्यांच्या पाठोपाठ चालू लागला. काही अंतर चालून गेल्यावर त्यांना समोरून व्याघ्रदत्ताचे दोघे सैनिक त्याच वाटेने येत असलेले दिसले. लगेच समरसेनाबरोबरच्या दोघांनी एका घराच्या भिंती आड काळोखात समरसेनाला नेले व म्हणाले–"तू भिण्याचं कारण नाही, आम्ही तुझे मित्र हितैषी आहो! ते येत आहेत ते व्याघ्रदत्ताचे गस्ती देणारे पाहारेकरी आहेत. आपण काळोखात दबा धरून राहून ते आल्यावर एकदम त्यांच्यावर तुटून पडायचं व त्यांना ठार करायचं, बरं का!"

समरसेनाला त्याचे मित्र म्हणून सांगणारे असे सांगून गप्प झाले असतील नसतील, तितक्यात व्याघ्रदत्ताचे गस्त देणारे पाहारेकरी तेथवर येऊन पोचले. काळोखात दबा धरून बसलेल्या तिघांनी अकस्मात् त्यांच्यावर हल्ला करून त्यांचे गळे दाबून तोंडे बंद केली व त्यांना धरून ओढीत नेऊन जवळच जुनी विहीर होती तीत त्यांना ढकलेले.

त्यानंतर तिघे डोंगराळ वाटेने चालत सूर्योदयाच्या सुमारास एका खेडेगावात येऊन पोचले.

(क्रमशः)





# ढळलेला निश्चय

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू या अपरात्रीच्या वेळी स्मशानात भटकतो आहेस. कधी माणसाला आपला निश्चय बदलावा लागतो व पुष्कळदा त्याचा फायदाही होतो. नागराज नावाचा एक तरुण युवक आपल्या निश्चयापासून न ढळणारा होता. तरी त्याने शेवटच्या क्षणाला आपला निश्चय बदलला. ती गोष्ट मी तुला सांगतो." असे सांगून वेताळ ती गोष्ट सांगू लागला.

नागराज नावाच्या एका तरुण युवकाला शहरात चांगली नोकरी होती. त्याचे लग्न झालेले नव्हते. त्याच्या आई-वडिलांच्या मनांत नागराजाच्या मामाची



मुलगी रत्नाला आपली सून करून घ्यायचा विचार होता. ती शिकली सवरलेली न्हती. खेडेगावातच ती जन्मली आणि वाढली होती. तशी ती सुंदरही नव्हती. तिने लग्न करायचं तर नागराजाशीच असंही मनाशी ठरविलं होतं. परंतु तिच्यात विशेष वाखाणण्यासारखा कोणताही गुण नसल्याकारणाने नागराजाच्या मनात तिच्याशी लग्न करण्याची इच्छा नव्हती.

नागराज कोणत्यातरी सणासाठी म्हणून आपल्या गावी आला होता. त्याचे आईवडील त्याला म्हणाले—"चांगल्या वेळी आलास. रत्नाबरोबर लग्न करून घे आणि शहरात जाऊन संसार थाट." नागराजाने काहीच उत्तर दिले नाही आणि दुसराच कोणतातरी विषय काढून मुख्य प्रश्न टाळला.

त्यादिवशी संध्याकाळी तो आपल्या गावापासून थोड्या अंतरावरच्या आमराईत फिरायला गेला. सूर्यास्ताच्या सुमारास पाऊस पडू लागला. तो काही अंतर पळत आला आणि एका कवलारू घराच्या ओसरीत पाऊस थांबेपर्यंत उभा राहण्याच्या विचाराने आला. परंतु तोपर्यंत तो चांगलाच भिजला होता.

"अरे रे! बराच भिजला आहेस की रे! आत ये, बाबा!" असे म्हणत एका म्हातारीने पुढे येऊन दार उघडले.

नागराज संकोच करीत नकार न देऊ शकल्यामुळे आत गेला. "संध्या, एक पंचा घेऊन ये, मुली! हा पहा, पावसात भिजून आला आहे." या शब्दात घरात वळून म्हातारीने मुलीला हाक मारली.

"संध्या! चांगलं नाव आहे!" मनातल्या मनात नागराज म्हणाला

इतक्यात पायातली पैंजणे गोड आवाज करीत जवळ येत असल्याचा भास झाला व दाराआड थांबला. म्हातारीची मुलगी दाराआड उभी राहिली व पंचा पुढे केला.

नागराज डोकं पुसू लागला. "तापवून कपभर दूध घेऊन ये बाळ!" म्हणत म्हातारीने पुन्हां मुलीला सांगितले.

नंतर तिने नागराजाविषयी चवकशी केली. त्या दोघी काही दिवसांपूर्वीच त्या गावी खंडाने दिलेले शेत स्वतः करण्याच्या विचाराने आल्या होत्या. संध्या म्हातारीची एकुलती एक मुलगी होती. मुलीचे वडील फार दिवसांपूर्वी कोणत्यातरी आजाराने वारले होते.

संध्याला पाहण्याची नागराजाच्या मनात फार उत्सुकता होती. परंतु दुधाचा पेला दारापर्यंत जाऊन म्हातारीनेच आणल्यामुळे त्याला संध्याला पाहतां आले नाही.

दुसऱ्या दिवशी काहीतरी कामाचे निमित्त काढून नागराज त्यांच्या घरी गेला. म्हातारी खिडक्यांना नवीन कशीदा काढलेले पडदे लावीत होती. ती हसत नागराजला "ये ये" म्हणत सांगू लागली—"आमच्या संध्येला काम नसलं की कशीदा कोशा वगैरेची कामं काढते!"

त्यावेळी त्याला संध्याने केलेले रुचकर फराळाचे पदार्थ खायला मिळाले. परंतु तिचे दर्शन मात्र घडलं नाही.

पुन्हां तिसऱ्या दिवशी आपल्या परसातल्या झाडावरची दोन डाळिंबे काढून नागराज संध्याच्या आईच्या घरी गेला. समोरचे दार बंद होते. आंतून गोड किरट्या आवाजात गाणे ऐकू येत होते. ते ऐकण्यात नागराज देहभान विसरून गेला.



त्याच वेळी म्हातारी देवळातून परत आली. परंतु नागराजाचे तिकडे लक्षच नव्हतं.

म्हातारीने जवळ येऊन लावलेले दार ढकलून उघडीत विचारले—"आतांच आलास वाटतं? आमची संध्या एकदां गाऊ लागली की कोणी आलंगेलं तरी तिकडे तिचे लक्षच नसतं!"

संध्या आतल्या खोलीत होती, म्हणून नागराजला दिसली नाही. त्याने डाळिंबं म्हातारीच्या हातात दिली व इकडच्या तिकडच्या गप्पा करून घरी परतला. संध्या सर्व तऱ्हेने योग्य आहे असे त्याला वाटलं. ती सुस्वरूप नसली तरी लग्न











करायचं तर तिच्याशीच असा त्याने मनाशी निश्चय करून टाकला. दुसऱ्या दिवशी संध्याला प्रत्यक्ष पहायचेच आणि म्हातारीला आपल्या मनात आहे ते सांगून टाकायचे असे त्याने पक्के ठरविले.

नागराज संध्याच्या घराजवळ पोचला असेल, तेवढ्यांत शेजारच्या गल्लीतून एका बैलाने येऊन धुशी दिली व पळून गेला. नागराज खाली पडला व दोन्ही हात रक्त बंबाळ झाले. त्यावेळी थोडी गडबड झाली, ती ऐकून म्हातारी बाहेर धावत आली. ती नागराजला पाहून म्हणाली–"हे काय झालं रे? हाताला बरंच लागलं आहे की रे! रक्त वाहाते आहे! ये आत ये!" असे म्हणत म्हातारीने पुढे होऊन नागराजचा हात धरून त्याला उभे केले.

"मी तुम्हाला भेटायला येत होतो. कोणत्यातरी विचारात होतो आणि शेजारच्या गल्लीतून धावत पळत येत एका बैलाने धुशी दिली." नागराज म्हणाला.

म्हातारीने नागराजला घरात बोलावून नेले व त्याला एका जागी बसविले आणि मोठ्याने ओरडून हाक मारली–"संध्या! तांब्या भरून पाणी तर घेऊन ये!"

माजघरातील खिडकीजवळ उभी राहून संध्या हे सर्व पहात होती. तिच्या तोंडावरून तिला काही कीवकरुणा वाटल्यासारखं दिसत नव्हतं. आईने हाक मारली तेव्हां ती खिडकीतून हलली व थोड्या वेळाने तांब्या भरून पाणी घेऊन नागराज होता त्या जागी आली.

तिचं सौंदर्य पाहून नागराज थक्कच झाला. त्याने शहरातही इतक्या सुंदर स्त्रीला कधी पाहिले नव्हते. म्हातारीने जखम धुऊन काढली आणि त्यानंतर हळद व पांढरं फडकं पट्टी बांधायला घेऊन यायला संध्याला सांगितलं.

संध्याने हळद व पांढर फडकं आणून दिलं व घरात निघून गेली. म्हातारीने जखमेवर हळद लावून पट्टी बांधली. तो काही वेळ विश्रांतीसाठी पडून राहिल्यावर म्हातारीने विचारलं–"आतां सांग, बाबा! तू काही सांगायला आला होतास ना?"

नागराज म्हणाला–"लवकरच माझ्या मामाच्या मुलीशी माझं लग्न होणार आहे, तुम्ही सर्वांनी संध्या वगैरे सर्वांनी आलं पाहिजे बरं का?" असे सांगून घरी परतला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, मला एक शंका आहे! नागराजाने संध्याला प्रत्यक्ष पाहण्यापूर्वीच तिला मनाने वरले होते नाही का? तिचं रूप अगदी सामान्य असलं तरी तिच्याशीच लग्न करायचं त्याने ठरविलं होतं. तरी अगदी शेवटच्या घटकेला त्याने आपला विचार कां बदलला? तिला तो आपल्या योग्य मानायला तयार नव्हता का? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिलं नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकलें होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"नागराजाने आपला निश्चय बदलला, ते बरोबरच होते. कोणत्याही व्यक्तीत काही विशिष्ट गुण असावेच लागतात. ते नसले तर इतर चांगले कितीही गुण असले तरी ते निरर्थकच ठरतात. पुरुषात पौरुष, आत्माभिमान, शौर्य इत्यादी गुण आवश्यक असतात. तसेच स्त्रीत दया, करुणा, शील व सेवा हे गुण असावे लागतात. हे गुण नसलेली स्त्री पत्नी, माता इत्यादी स्त्रीसुलभ भूमिका यशस्वीपणे पार पाडू शकणार नाही. संध्याने नागराजाच्या हाताला लागलेल्या जखमा व त्यांतून वाहणारे रक्त पाहिले असूनही तिच्या मनात थोडीसुद्धा खळबळ उडाली नाही. त्यावरून तिचे हृदय दगडासारखं होते हे स्पष्ट कळते. म्हणून तिच्यात इतर सर्व गुण असूनही व ती सुंदर असूनही तिच्या पेक्षा जास्त प्रेमळ, शीलसंपन्न अशा मामाच्या मुलीशी लग्न करणे नागराजला साहजिकच योग्य वाटले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# निर्भय

राजारामाला एकच एक मुलगा होता. त्याचे नाव त्याने बलराम ठेवले आणि त्याला प्रेमाने लाडात वाढविले. बलराम एक उद्धट मुलगा निघाला. त्याला भय नावाची वस्तूच माहीत नव्हती, मग श्रद्धा किंवा भक्ती कोठून असणार? काळोखात तो कोठेही निर्जन जंगलातही जायला भीत नसे. राजारामाला बलराम म्हणजे एक समस्याच होती. भय न वाटणे हा एक चांगला गुणच म्हणावा लागेल. परंतु त्याच्यामुळे जिवाला धोका असण्याची शक्यतासुद्धा असू शकते. उदाहरणार्थ निर्भयपणे तो वाघासमोर जाऊन उभा राहिला तर वाघ त्याला खाऊन टाकील. राजारामाने बलरामाला भय वाटणे म्हणजे काय हे शिकवायचं ठरविले. एकदां त्याने बलरामाला गावाबाहेरच्या वडाच्या झाडावर चढून कोवळी पाने आणायचे काम सांगितले. त्यापूर्वी त्याने एका माणसाला भयंकर रूपवेष करून त्या झाडावर बसून राहायला सांगितले होते. बलराम निर्भयपणे झाडावर चढून गेल्यावर त्या माणसाने झाडाच्या वरच्या बाजूने भयंकर आवाज काढून बलरामाला भेवडवण्याचा प्रयत्न करून पाहिला. बलराम भ्याला तर नाहीच, वर चढून गेला व त्याने त्या माणसाला झाडावरून खाली ढकलून पाडले. तो माणूस कसाबसा आपला जीव वाचवून पळाला व सरळ राजारामाकडे जाऊन त्याने त्याच्यावर गुजरलेल्या प्रसंगाचे वर्णन केले.

राजारामाने बलरामाला अनेक प्रकारे भय वाटावे यासाठी खटपट केली परंतु ती निष्फळ ठरली.

बलरामाला विसावे वर्ष लागले. तो घरी राहिला तर त्याला संभाळणे कठीण होईल. त्यापेक्षा तो काही शहरे फिरून आला तर त्याला भीतीची कल्पना येईल व थोडेफार लोकज्ञान होईल असा विचार करून राजारामाने बलरामाला चार पैसे देऊन तीन चार महिने कोठेतरी हिंडून फिरून यायला सांगितले.

बलराम एका मोठ्या शहरात आला. शहरातल्या गमती दिवसभर पाहून संध्याकाळी तो गावाबाहेरच्या एका जुन्या धर्मशाळेत झोपायला गेला. धर्मशाळेकडे त्याला जात असतांना पाहून एकजण म्हणाला–"अरे त्या बाजूला जाऊ नकोस! मध्यरात्र उलटल्यावर त्या धर्मशाळेत भुते येतात!" परंतु बलरामाने दुर्लक्ष केले.

मध्यरात्र झाल्यावर खरोखरच भुते त्या धर्मशाळेत आली व बलरामाला पाहून हसू लागली. त्यांना पाहून व त्यांचं हसू ऐकून बलराम म्हणाला–"ओहो, म्हणजे तुम्हीच भुतं वाटतं?" ते ऐकून भुतं आणखी जास्तच हसू लागली व बलरामाला उचलून घेऊन नाचत गात गावाबाहेरच्या एका जुन्या वाड्यात शिरली. त्या वाड्यात भुतांचा राजा, त्याची बायको व त्याची मुलगी रहात.

भुते उचलून घेऊन गेली त्यात बलरामाला मजाच वाटली. वाड्यात घेऊन जाऊन भुतांनी बलरामाला एका



खाटेवर टाकले आणि खाट गरगर फिरू लागली. "वाहवा! वाहवा! गंमत आहे बुवा!" म्हणत बलराम हसू लागला.

भुतांना आश्चर्यच वाटले. कारण ती कोणासमोर आली की ती व्यक्ती भिऊन जात असे. या उलट बलराम भ्याला तर नाहीच, खाट गरगर फिरत असतां हा गंमत म्हणून हसत होता. भुतांनी ती गोष्ट आपल्या राजाला सांगितली भुतांचा राजा वीतभर उंच होता तर त्याची दाढी हातभर लांब होती. तो चाले तेव्हां त्याची दाढी जमिनीवर लोळे.

बलरामाची माहिती कळल्यावर भुतांचा राजा रागारागाने खाटेजवळ आला. त्या

राजाचे रूप पाहून बलरामाला जास्तच हसू आलं. त्याने टाळ्या वाजवून राजाच्या हातातली कुऱ्हाड हिसकावून घेतली. राजाला जास्तच राग आला. त्याने खाट जास्त जोराने गरगर फिरविली. त्यामुळे बलरामाला भीती न वाटतां त्याला त्यात जास्त मजाच वाटली व त्याने राजाच्या कुऱ्हाडीने त्याची दाढी कापून टाकली. त्याची दाढी कुऱ्हाडीच्या दांड्यात अडकली व भुतांचा राजा लोंबकळू लागला.

"बाबा रे, मला कसा तरी ओढून बाहेर काढ, तू मागशील ते मी देतो." भुतांचा राजा म्हणाला. बलरामाने दाढी ओढून काढली व राजाला वांचविले.

"तू चांगलाच शूर दिसतो आहेस की रे! माझ्याजवळ जे धन आहे ते सर्व मी तुला देतो, तू ते घे आणि माझ्या मुलीशी लग्न करून घे." भुतांचा राजा म्हणाला. ती मुलगी भूत नव्हती. एका राजाची मुलगी होती. भुतांच्या राजाने तिला तिच्या बापाच्या वाड्यातून पळवून आणले होते. बलरामाने तिला घेतले आणि तिच्या बापाकडे घेऊन गेला.

लहानपणापासून नाहीशी झालेली मुलगी एकाएकी परत आलेली पाहून राजाला परमानंद झाला. त्याने बलरामाचा सत्कार केला आणि एक मोठा उत्सव केला. त्या उत्सवाला बलरामाचा बाप राजारामसुद्धा आला. मुलाचं भाग्य उदयास आलेलं पाहून त्याला आनंद झाला खरा, परंतु या मुलाला कोणाचंही, कशाचंही भय नाही तर याच्यावर केव्हा कसं संकट येईल याची भीती मात्र त्याला सतावत होती.

"बलरामाला भयभीती नाही म्हणून तुम्ही काळजी करण्याचं कारण नाही. धैर्य व साहस प्रत्येकात नसते. त्याबरोबर सावधपणासुद्धा असावा लागतो. त्याने कोणतेही काम केले तरी त्याने जागरूक राहलं पाहिजे. त्याला अशक्य असाध्य असे जगात काहीच नाही. मात्र सावधगिरी राखली पाहिजे!" राजा म्हणाला.





# न्यायाचे सूत्र

सहस्रावधी वर्षापूर्वी धर्मपाल नावाचा राजा धवलगिरी राज्याचा अधिपती होता. तो दानधर्म करण्यात प्रसिद्ध होता. न्यायनिवाडा करतांना तो आपपर भेद करीत नसे.

त्याच्या न्यायाचे एक सूत्र होते– 'जशास तसे'! कोणाकडून कोणाचं काही नुकसान झाल्यास नुकसान सोसणाऱ्या व्यक्तीस अगदी तशाच तऱ्हेने नुकसान करणाऱ्या व्यक्तीचे नुकसान करायला परवानगी होती. त्या देशाच्या न्यायनीतीचे ते सूत्र मानले जात असे.

एकदा धर्मपाल दरबारात बसला होता. मंत्री व सामंत राजे यथास्थानी बसले होते. राज्यव्यवस्थेसंबंधी राजा मंत्र्यांचा सल्ला घेत होता. त्यावेळी एक नागसाप वाट चुकून दरबारात शिरला. सापाला पाहून दरबारात गोंधळ उडून गेला. काही लोक आपापली तलवार उपसून सांपाला मारायला सरसावले. परंतु महाराजांच्या बाजूलाच युवराज बसलेले होते. त्यांनी इतर लोकांना अडविले आणि स्वतः पुढे होऊन नागावर आपल्या तलवारीचा वार केला.

सापाचे मुंडके त्याच्या अंगाला लोंबत होते. तो निसटून निघून गेला आणि आपल्या बिळात शिरला. नागीण आपल्या साथीदाराची दयनीय स्थिती पाहून विलाप करू लागली. तेव्हां साप त्याच्यावर गुजरलेला प्रसंग थोडक्यात वर्णन करून सांगून म्हणाला–"तुला या राज्यातले न्यायाचे सूत्र माहीतच आहे. त्या सूत्राप्रमाणे राजा निवाडा देईल व आपल्या मुलाला योग्य तो दंड करील. त्या न्यायसूत्राप्रमाणे तू आरोपी युवराजाला चावून त्याचा वध कर. परंतु त्यापूर्वी राजाकडे फिर्याद



करून न्याय माग! घाईत तू युवराजाला चावायला जाऊ नकोस." असे नागिणीला समजावून सांगून नागाने श्वास सोडला.

नागीण त्या दिवशी रात्री किल्लचात शिरली आणि गुपचुप युवराजांच्या निजायच्या खोलीत पोचली. युवराज झोपलेला होता. तिने त्याच्या गळ्याला विळखा घातला. युवराज घाबरून जाऊन ओरडू लागला. युवराजाचा आवाज ऐकून नोकर पाहारेकरी धावत आले. परंतु त्या नागिणीला कसे ठार करावे कोणालाही सुचेना. नागिणीला मारण्यासाठी वार करावा तर युवराजांच्या गळ्यावरच वार पडणार. म्हणून काय करावे, कोणालाही सुचेना. ते किंकर्तव्य विमूढ स्थितीत 'आ' वासून नुसते पहात राहिले.

इतक्यात नागीण बोलू लागली–"तुम्ही कोणी घाबरण्याचं कारण नाही. तुम्ही महाराजांना बोलावून आणा. मी त्यांच्या जवळ न्याय मागणार आहे. तुम्ही मला ठार करण्याचा विचार केलात व त्यासाठी प्रयत्न केलात तर मी युवराजांना चावून त्यांना तत्क्षण ठार करीन." या शब्दात नागिणीने त्यांना धमकावलेही!

मध्यंतरी महाराज स्वतःच तेथे आले. नागिणीने आपल्या साथीदाराचा जसा वध झाला होता त्याची आठवण करून दिली व म्हणाली–"महाराज, माझ्या पतीने कोणाचं काहीही नुकसान केले नसतां, ते आपल्या वाटेने निमूटपणे निघून जात असतां युवराजांनी अन्यायाने त्यांचा वध करून मला विधवा केले आहे. या राज्याच्या न्यायाच्या सूत्राप्रमाणे मी युवराजांचा वध करून त्यांच्या बायकोला विधवा केले तर ती चूक होईल का? आपण धर्मात्मा आहांत. नेहमी न्यायाची बाजू घेत आलां आहां. म्हणून माझ्या बाबतीतही योग्य तो न्याय करावा. माझी एवढीच विनंती आहे!"

नागीण म्हणाली ते ऐकून राजा निरुत्तर झाला. राज्याच्या न्यायसूत्राप्रमाणे अन्यायाने नागाला ठार करून त्याच्या बायकोला विधवा करण्याचा आरोप नागिणीने युवराजांवर लावला होता. युवराज राजाचा एकुलता एक मुलगा होता. या संकटातून सुटका कशी मिळणार? राजा स्वतः काहीच न्याय निवाडा करू शकला नाही.

राजाने नाइलाजाने न्यायाधिशाला बोलावून घेऊन त्याच्यासमोर नागिणीकडून तिची जबानी घेवविली. राजाने व न्यायाधिशाने दोघांनी नागिणीचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले. नंतर न्यायाधीश म्हणाला–"महाराज, आपल्या राज्याच्या न्यायसूत्राप्रमाणे 'जशास तसे' हाच नियम आहे. त्या नियमाप्रमाणे युवराजांच्या हातून घडलेल्या चुकीमुळे नागाची पत्नी विधवा झाली आहे तेव्हां युवराजांची पत्नीला विधवा करण्याचा अधिकार नागाला पोचतो!"

तो निवाडा ऐकून नागीण चकित होऊन म्हणाली–"हा निवाडा कोणत्या न्यायशास्त्राप्रमाणे झाला? फक्त शब्दच्छल करून युवराजांना वाचविण्यासाठी हा प्रयत्न आहे. माझे मृत पती कसा सूड घेणार व त्यामुळे युवराजांची पत्नी विधवा कशी होणार? ही शुद्ध फसवाफसवी आहे!"

नागिणीने लावलेल्या आरोपाचे उत्तर न्यायाधिशांनी या शब्दात दिले–"नागाची बायको म्हणाली ते बरोबर आहे. त्यात गैर असे काहीच नाही. नियमाप्रमाणे तिचे



म्हणणे नाकारतां येणार नाही. परंतु येथे एक धर्मसंदेह उत्पन्न झालेला आहे." असे सांगून न्यायाधीश पुढे म्हणाला–"नागीण बाई, तुम्हांला किती मुलं आहेत ?"

नागीण म्हणाली–"मला पांच मुलं आहेत." त्यावेळी तिच्या डोळ्यातून अश्रू वहात होते.

"अस्सं ! तरमग तू मी म्हणतो ते लक्षपूर्वक ऐक. तुला विचारल्याला पांच मुलांची आई असतां युवराजांनी विधवा केले आहे. म्हणून तूसुद्धां युवराजांच्या पत्नीला पांच मुलं असलेली विधवा आई कर. म्हणजे न्यायसूत्राप्रमाणे न्याय झाल्यासारखं होईल. मी म्हणतो ते बरोबर आहे की नाही ?"

तेव्हां नागीण संकोच करीत म्हणाली– "तुम्ही म्हणतां ते अगदी बरोबर आहे !"

तेव्हां न्यायाधिशाने आपला शेवटचा निवाडा दिला. म्हणाला–"तरमग तुला काही दिवस थांबावं लागणार आहे. कारण युवराजांच्या बायकोला फक्त दोनच [illegible] म्हणजे तू कोणाच्याही आडकाठीशिवाय युवराजांवर आपला सूड उगव !"

नागिणीला ते मान्य करावे लागले, कारण तो निकाल न्यायसूत्राप्रमाणे होता. तेव्हां नागिणीने राजाजवळ निवेदन केले की युवराजांच्या बायकोला पांचवा मुलगा झाला की ती बातमी नागिणीला राजाने कळवावी.

न्यायशील राजाने नागीण म्हणाली ते मान्य केले. परंतु त्यानंतर युवराजांच्या बायकोला मूलच झालं नाही. युवराज बायकोबरोबर उद्यानात फिरायला येई, तेव्हां नागीण आपल्या बिळातून बाहेर तोंड काढून त्यांच्याकडे पाही.

कित्येक वर्षे लोटली पण युवराजाला दोनवर मुलेच झाली नाहीत. म्हणून आपल्याला सूड उगवायला केव्हां मिळणार हा एकच विचार तिच्या मनात वारंवार येई. परंतु काही दिवसांनी त्याच काळजीत ती स्वतःच मरण पावली.





# निर्लोभी राजकुमार

प्राचीन काळी काशी येथे ब्रह्मदत्त नावाचा राजा राज्य करीत होता. त्याला शंभर मुलगे होते. सर्वात लहान मुलाचे नाव संवर होते. राजाने आपल्या सर्व मुलांना निरनिराळ्या गुरुगृही विद्याभ्यासासाठी पाठविले होते. सर्वात धाकटा मुलगा संवर याला बोधिसत्वांकडे पाठविले होते.

बोधिसत्वांकडे कित्येक वर्षे राहून संवरने उत्तम ज्ञान संपादन केले आणि सर्व विद्यांत पारंगत झाला. इतर मुलांचा विद्याभ्यास संपल्यावर त्यांचे गुरू आपल्या शिष्यांना घेऊन राजाकडे आले व म्हणाले– "महाराज, आपल्या चिरंजीवांचा विद्याभ्यास संपलेला आहे व ते सर्व विद्यांत निष्णात झाले आहेत." राजाने गुरुदक्षिणा देववून सर्व गुरूंना आदरपूर्वक निरोप दिला.

त्यानंतर राजाने आपल्या राज्यातल्या निरनिराळ्या प्रांताचे शासक म्हणून आपल्या सर्व मुलांना नेमले व त्यांना त्या त्या प्रांतात पाठवून दिले. परंतु धाकट्या संवरने आपले गुरु बोधिसत्व यांचा सल्ला विचारला. म्हणाला–"गुरुवर्य, माझ्या वडिलांनी मला माझ्या इतर भावांप्रमाणे कोणत्यातरी प्रांताचा अधिकारी नेमावयाचे ठरविले तर मी काय करणे योग्य होईल ?" तेव्हां बोधिसत्व म्हणाले–"बाळा, जर तुझ्या वडिलांनी तुला एखाद्या प्रांताचा शासक नेमायचे ठरविले तर तू नम्रपणे ती जबाबदारी स्वीकारू नकोस. कारण इतर सर्व भाऊ तुझ्या वृद्ध वडिलांना सोडून निरनिराळ्या जागी गेले आहेत, तेव्हां तुझ्या वडिलांच्या सेवेला कोणीतरी राहिले पाहिजे. तू श्रद्धाभक्तीपूर्वक त्यांची सेवा कर, ते तुझे प्रथम कर्तव्य आहे."



राजा ब्रह्मदत्त एकदां बोधिसत्वांच्या आश्रमात गेला. संवरने वडिलांना वाकून नमस्कार केला आणि बोधिसत्वांच्या शेजारी येऊन उभा राहिला. राजा त्याला म्हणाला—"बाबा, तुझा विद्याभ्यास आतां संपला आहे ना?"

संवर म्हणाला—"बाबा, गुरुवर्यांच्या कृपेने मी सर्व विद्या संपादन केल्या आहेत.

"तरमग तू आपल्या राज्यातल्या कोणत्यातरी प्रांताची निवड करून त्या प्रांताच्या शासनाची जबाबदारी स्वतःवर घे!" राजा म्हणाला.

संवर म्हणाला—"बाबा! मी आपल्या मुलांत सर्वात लहान आहे. जर मी आपणाला सोडून दूर कोठे शासनाची जबाबदारी घेऊन राहू लागलो तर आपल्या सेवेला मी अंतरेन. मला राज्य नको व कोणताही अधिकार नको. आपली सेवा करावी फक्त एवढीच इच्छा आहे!"

ते उत्तर ऐकून राजाला आनंद झाला. त्या दिवसापासून संवर आपल्या वडिलांबरोबर राहू लागला. मधून मधून आवश्यक वाटे तेव्हां तो बोधिसत्वांचा सल्ला विचारी.

एकदां संवरने बोधिसत्वांच्या सल्लचाप्रमाणे राजधानीच्या परिसरात एक ओसाड जमिनीचा पट्टा निवडला. तो समतल करून त्यात फुलांफळांची झाडे लावली. ते एक सुंदर उद्यान झाले. त्यात राजधानीतली प्रमुख मंडळी येऊ लागली. संवरची त्यांच्याशी ओळख झाली.

एकदा संवरने वडिलांच्या अनुज्ञेने राजधानीतल्या सर्व वर्णीयांस एक मेजवानी दिली. त्यानंतर राज्याच्या अधिकाऱ्यांना घोडेस्वार व पायदळ सैन्याला मेजवानी दिली. परदेशातून येणाऱ्या राजदूतांना आणि व्यापारी वर्गाला उतरायला सोयीची होईल अशा महालात व्यवस्था केली. अशा तऱ्हेने संवरची कीर्ती राज्यभरच नव्हे तर परदेशातही पसरली.

अशा तऱ्हेने कित्येक वर्षे लोटली. राजाला वार्धक्य आले आणि राजाने



अंथरुण धरले. त्याने मंत्र्यांना बोलावून विचारले—"माझ्यानंतर राज्याची जबाबदारी कोणावर टाकावयाची. माझ्या शंभर मुलांपैकी प्रत्येकालाच गादीवर बसण्याचा अधिकार आहे. म्हणून तुम्ही विचार करून माझ्या मागे योग्य राजकुमाराला गादीवर बसविण्याची व्यवस्था करा."

राजा वारल्यावर सर्व मंत्र्यांनी आपसात विचार करून ठरविले की संवरही सर्व प्रकारे गादीला योग्य आहे. त्यानंतर त्यांनी थाटामाटाने त्याचा राज्याभिषेक केला. त्या दिवसापासून संवर बोधिसत्वांच्या सल्ल्याप्रमाणे व न्यायाने राज्यकारभार पाहू लागला.



राजा वारल्यावर संवर गादीवर बसलेला पाहून इतर नव्व्याण्णव राजकुमारांना राग आला. त्या सर्वांनी मिळून संवरला कळविले की त्याने मुकाट्याने सिंहासन सोडावे. त्यानंतर त्यांनी आपापली सैन्ये जमवून राजधानीला वेढा दिला.

संवरने ते सर्व आपले गुरुवर्य बोधिसत्व यांच्या कानावर घातले व त्यांचा सल्ला विचारला. बोधिसत्व संवरला म्हणाले—"आपल्या भावांशी भांडण करणे हे महापाप आहे. शिवाय भाऊबंदकीमुळे राज्य नष्ट होईल व प्रजेला त्रास सोसावा लागेल. म्हणून तू आपल्या राज्याचे शंभर तुकडे करून ते सर्व भावांना वाटून टाक!"

संवरने त्याप्रमाणे करायचे ठरवून आपल्या सर्व भावांना कळविले. सर्वात मोठा भाऊ सद्प्रवर्तन याला ते ऐकून आश्चर्यच वाटले. तो आपल्या इतर भावांना म्हणाला—"आपण सर्वांनी मिळून राजधानीला वेढा दिला तो असे समजून की संवरने गादी बळकावली आहे आणि तो आपला शत्रू झाला आहे. परंतु त्याने स्वतःच आपणा सर्वांना वाटा द्यायचे औदार्य दाखवून प्रजेचे प्रेम संपादन केले आहे. तेव्हां आपण त्याच्यावर स्वारी करणे गैर होईल."

एका धाकट्या भावाने विचारले—"तर-मग आपण काय करणे योग्य होईल?

"आपल्या धाकट्या भावाशी सलोख्याने बोलणे योग्य होईल. बाबांच्या सिंहासनावर आपला सर्वांचाच अधिकार आहे. तरी आपणां सर्वांना एकदम सिंहासनावर बसणे शक्य नाही. म्हणून आपण त्यालाच आपला राजा मान्य करून आपापल्या वाटयाच्या बाबांनी दिलेल्या प्रदेशाची व्यवस्था पहात रहावी." सद्प्रवर्तन म्हणाला.

सर्वांना तो सल्ला योग्य वाटला. त्यानंतर सर्वांनी संवरचा जयजयकार करीत राजधानीत प्रवेश केला. संवरने गादीवरून उतरून आपल्या सर्व भावांचा यथोचित सत्कार करून त्यांना बसायला योग्य आसन दिले.

त्यानंतर उपोसतने संवरला विचारले—तू मनाचे हे औदार्य दर्शवून आमची मने जिंकली आहेस. परंतु तुला ही धर्मबुद्धी आली कशी?"

"दादा! मी मानवमात्रावर प्रेम करतो व गुरूच्या सल्ल्याप्रमाणे वागतो. मी नियमितपणे कुटुंबातील सर्व सभासदांना योग्य रकमा ठरवून देत आहे आणि राज्याच्या व सैन्यातल्या सर्व अधिकाऱ्यांना व लहानसहान नोकरांना वेळेवर पगार देण्याची व्यवस्था केली आहे. प्रजेचे हितच सर्वोपरी आहे असे मी मानतो!" संवर म्हणाला.

त्यानंतर थोरल्या भावाने आपल्या सर्व भावंडांच्या वतीने संवरला आशीर्वाद दिला. म्हणाला—"तू अशाच प्रकारे धर्ममार्गावर चालून प्रजेला सुखी कर. आम्ही सर्व नित्य तुझ्या पाठीमागे आहो व तुला शत्रुभय राहू नये याची काळजी बाळगू. तू या लोकातच इंद्रपदासारखा सुखी रहा."

बोधिसत्वांचा शिष्य संवर अशा तऱ्हेने आपल्या सर्व भावांचे व प्रजेचे प्रेम संपादन करून कित्येक वर्षे राज्य करीत राहिला व एक थोर शासक म्हणून त्याची कीर्ती दिग्दिगंत पसरली.





## धाडसी खलाशी

कित्येक शतके होऊन गेली. कौंडिण्य नावाचा एक ब्राह्मण तरुण युवक होता. तो पिढ्यान् पिढ्या चालू आलेला आपला भिक्षुकीचा किंवा पुराण प्रवचनाचा धंदा करीत नसे. त्याला तो आवडत नसे. त्याचे वडील वेदपाठ करण्यात मग्न झाले की तो संधी पाहून गुपचुप पसार होत असे.

कौंडिण्य समुद्रकिनाऱ्यावर जाऊन बसे. समुद्राच्या पलीकडे कोणता बरे देश असेल तो आपल्याला पहायला मिळेल का? त्याच्या मनात तेच विचार दररोज समुद्रकिनाऱ्यावर बसल्यावर येत. कोणते तरी धाडसाचं काम करावं असंही त्याला वाटे.





एकदा तो झोपला असता त्याला एक दाट जंगल दिसलं. त्यात त्याला एक दिव्य पुरुष दिसला. तो महाभारतातल्या धनुर्धारी शूरवीरासारखा वाटला. त्याला तो एका गुहेत एक धनुष्य ठेवीत असतांना दिसला.



उजाडल्यावर कौंडिण्य त्या जंगलात गेला. स्वप्नात पाहिलेली गुहा त्याला दिसली. तो गुपचुप गुहेत शिरला. तेथे खरोखरच एक धनुष्य दिसले. त्याला आश्चर्य वाटले.

धनुष्य घेऊन कौंडिण्य आपल्या घरी परतला. त्याने आपल्या मित्रांसमोर आपल्या 'धनुर्विद्येचे प्रदर्शन करून त्यांना थक्क केले. त्याच्या मनात एक तऱ्हेचा आत्मविश्वास उत्पन्न झाला की ते धनुष्य त्याच्या हातात असेपर्यंत कोणतेही काम अशक्य असाध्य नाही.





त्यानंतर कौंडिण्यने आपल्या काही साथीमित्रांना जमविले आणि समुद्र किनाऱ्यावर पडलेली एक मोडकी नाव होती. ती दुरुस्त करून तीत बसून एका अनिश्चित दिशेकडे निघाला. कित्येक दिवस लोटले.

काही दिवसांनी त्यांना नारळाची असंख्य झाडे असलेला एक प्रदेश व किनाऱ्यावर प्रयाण करायला सुसज्ज असलेली नौका दिसली. कौंडिण्यने आपल्या दिव्य धनुष्यावर बाण चढवून त्या नौकेवर फडफडत असलेल्या झेंड्याचा नेम धरून सोडला. झेंडा तुटून खाली पडला.





त्या नौकेत अर्थातच गोंधळ उडून गेला. कित्येक तरुण स्त्रिया उठून उभ्या राहिल्या. त्यांत राजकन्येसारखी एक रुपवती तरुण स्त्री होती. ती कौंडि-ण्यकडे हाताने खूण करून त्याला बोलवीत होती. तिच्या नौकेपाठीमागून आपली नाव आणायला ती सांगत होती.

ती राजकन्या तिचे वडील वारल्यावर कांभोज राज्याच्या गादीवर बसली होती. कौंडिण्यला पाहताच तिला वाटले की तोच तिच्या योग्य पती आहे. कौंडिण्यशी तिचे लग्न झाले व तो कांभोज देशाचा राजा झाला.





त्या काळातील कांभोज राज्य पुढे कंबोडिया नावाने ओळखले जाऊ लागले. आज ते राज्य कांपूचिया नावाने प्रसिद्ध आहे. कौंडिण्यच्या कारकीर्दीत त्या देशात भारतीय संस्कृति वाढू लागली आणि भारत व कांभोज देशात व्यापार जास्त वाढला.

कांभोज देशात सापडलेल्या एका शिलालेखावरून कौंडिण्यवंशी राजे 'वर्मा' ही उपाधी धारण करीत. त्यांच्या कारकीर्दीत कित्येक देवळे बांधण्यात आली.





त्या देवळांत अंगकारनाथाचे देऊळ जास्त प्रसिद्ध आहे. ते प्राचीन काळी यशोधरापुर नामे ओळखले जाई. वास्तविकपणे ते देऊळ अंगकार थोम नामक नगरी बांधले गेले होते. त्या देवळाचे शिल्प जगात अद्वितीय आहे, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही.



# शंका समाधान

एकदां विदर्भ देशाचा राजा प्रसेनजित दरबारात बसला असतां एक दूत प्रवेश करून म्हणाला—"महाराज, आपली शेजारी राज्ये अवंती व मणिपुर यांमध्ये जे युद्ध झाले त्यांत असंख्य वीर प्राणास मुकले आणि अनेक गावे नेस्तनाबूद झाली.

त्यावेळी विदूषक दरबाऱ्यांचे मनोरंजन करीत होता. परंतु ती बातमी ऐकून सर्व काळजीत पडले. थोडया वेळाने विदूषक किंचाळला. त्याने आपले पागोटे काढून जमिनीवर फेकले. त्याच्या पागोटयात एक विंचू शिरला होता तो त्याला चावला होता. ते कळल्यावर सर्व दरबारी मंडळी त्याला काही मदत करण्याऐवजी खदखदां हसू लागली.

ते पाहून राजा आपल्या मंत्र्याला म्हणाला—"प्रधान, कोठेतरी शेजारच्या राज्यात कित्येक लोक मरणोन्मुख पडल्याचे ऐकून आपले दरबारी इतके घाबरून गेलेले दिसत आहेत आणि तेच समोर विदूषक तडफडत असतां हंसत आहेत. हे पाहून माझ्या मनात एक प्रश्न उभा राहिला आहे की माणसाला सर्वात अधिक दुःखी करणारी गोष्ट कोणती व आनंद देणारी गोष्ट कोणती?"

प्रधान म्हणाला—"माणसाच्या शारीरिक कष्टापेक्षा त्याला होणारे मानसिक कष्ट जास्त दुःखदायी व असह्य असतात! आपल्या दरबाऱ्यांसारखे अपरिचित लोक-सुद्धा, युद्धात मृत्युमुखी पडणाऱ्यांची संख्या शेंकडोंवर जाण्याची गोष्ट कळतांच घाबरून गेले. त्यांच्या सर्वांच्या हृदयाचा थरकांप उडाला. म्हणून ते सर्व गप्प झाले. परंतु दररोज दरबारात हंसविण्याचा धंदा करणारा विदूषक जेव्हां स्वतःला होणाऱ्या कष्टामुळे तळमळू लागला तेव्हां

त्याचे ओरडणे सुद्धां दरबाऱ्यांना हास्यास्पदच वाटले."

"तुमच्या बोलण्यावरून हे कळते की शारीरिक व मानसिक कष्टांतले अंतर वास्तविक फारच कमी असते. मानसिक कष्ट जास्त असह्य असतो हे तुम्ही सिद्ध करू शकाल का?" राजाने विचारले.

प्रधान म्हणाला—"मी हे सिद्ध करून दाखवू शकतो, परंतु त्यासाठी महाराजांच्या सहकाराची गरज आहे." राजाने होकार दिला. त्यानंतर प्रधान एका म्हाताऱ्याचे सोंग करून राजधानी बाहेरच्या कालीच्या देवळात गेला. अनेक भक्त देवीला साष्टांग नमस्कार करून देवी जवळ आपलं दुःख निवेदन करीत व मागणे मागून निघून जात होते. त्यांत विकटाक्ष नावाचा एक तरुण संन्यासी सुद्धा होता. प्रधानाने त्याची परीक्षा घ्यायचे ठरविले.

विकटाक्ष कमालीचा आळशी होता. काही एक कामधंदा केल्याशिवाय पोट भरावे या हेतूने संन्यासी झाला होता. तो नदीत स्नान वगैरे करून मठात परत जात होता. वाटेत वाळूत डोळ्यांना दिपवून टाकणारी एक अंगठी त्याला दिसली. विकटाक्षाने लगेच अंगठी उचलून घेतली. थोडे अंतर चालून गेल्यावर काही वेळाने एक म्हातारा काही तरी शोधत त्याच जागी आला. तो मोठमोठ्याने रडत होता—"माझ्या मुलांचं भाग्यच फुटकं, आतां मी जिवंत राहून तरी काय उपयोग?"

विकटाक्षने ओळखलं की तो ब्राह्मण तीच अंगठी शोधत आहे. ती अंगठी तर विकटाक्षच्या हातात होती. विकटाक्ष म्हाताऱ्या जवळ गेला. त्याच्या अंगावरची मूल्यवान वस्त्राभूषणे पाहून तो थक्कच झाला. त्याने त्या म्हाताऱ्याला विचारले—"काय हो, काय शोधतां आहां?"

"येथेच कोठे तरी माझी हिऱ्याची अंगठी पडली आहे. तू शोधून दिलीस तर मी माझ्या गळ्यातला हा हिऱ्यांचा हार तुला देईन." म्हातारा म्हणाला.

विकटाक्षने अंगठी शोधण्याचे सोंग केले. हातातली अंगठी खाली टाकून ती सांपडल्याचे दर्शविले. ती म्हाताऱ्याला दिली. म्हातारा खूष झाला व त्याने वचन दिल्याप्रमाणे गळ्यातला हिऱ्यांचा हार काढून विकटाक्षला देऊन निघून गेला.

म्हातारा थोडेच अंतर चालून गेला असेल, विकटाक्षच्या मनात शंका आली. तो धावत जाऊन म्हाताऱ्याला भेटला व त्याला विचारले—"काय हो, मी तुम्हाला जी अंगठी हुडकून दिली तिच्यापेक्षा या हिऱ्यांच्या हाराची किंमत जास्त आहे ना?"

"होय, जास्त आहे, परंतु ही अंगठी कालीमातेने आपला प्रसाद म्हणून मला दिली होती. जो कोणी ही अंगठी बोटात घालील तो राजाचा जांवई होईल. म्हणून मी ही अंगठी आपल्या मुलाला देणार आहे!" म्हातारा म्हणाला. म्हाताऱ्याच्या तोंडून ते वाक्य निघण्याची





खोटी होती की विकटाक्षने म्हाताऱ्याच्या हातातली अंगठी हिसकावून काढून घेतली आणि म्हणाला–"मी अंगठी हातात घालून घेऊन प्रसेनजित राजाचा जावई होईन व नंतर त्यांच्या गादीला वारस." असे सांगून विकटाक्ष राजधानीकडे निघाला.

म्हाताऱ्याचं सोंग करून हे सर्व पहात असलेला प्रधान विकटाक्षच्या पाठोपाठ त्याच्या मागून निघाला. दोघे राजधानीत पोचले तेव्हां दरबार भरलेला होता. विकटाक्ष दरबारात जाऊन ज्या बोटात त्याने अंगठी घातली होती ते बोट राजाला दाखवीत म्हणाला–"महाराज, माझं नाव विकटाक्ष आहे. माझ्या या बोटात चमकत असलेली अंगठी कालीमातेचा प्रसाद आहे."

"अस्सं!" राजा हे म्हणाला तेव्हां त्याला आश्चर्य वाटत नसल्याचे आढळले.

"ही अंगठी त्याच्या बोटात असेल तो आपला जांवई होईल व आपल्या पश्चात आपल्या गादीचा वारस होईल! या अंगठीचा असा प्रताप आहे!" विकटांक्ष म्हणाला.

"तो प्रताप कळला असता तर मी स्वतःच नाही का आदरपूर्वक बोलावून घेतले असते?" राजा म्हणाला.

राजा म्हणाला ते ऐकून विकटाक्ष स्वतःच चकित झाला आणि राजाच्या तोंडाकडे पहात राहिला. तेव्हां प्रधान राजाजवळ जाऊन आपली नकली दाढी काढून फेकीत म्हणाला–"महाराज, हे सर्व नाटक मीच रचलेले आहे. बिचारा हा संन्यासी मनांत फार मोठी महत्वाकांक्षा घेऊन आला आहे!" दुसऱ्या क्षणाला त्रिकटाक्ष मोठ्याने किंकाळी फोडून जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला.

प्रधानाने शिपायांना बोलावून विकटाक्षला वैद्याकडे पाठविले व नंतर राजाला म्हणाला–"महाराज, पाहिलेत? आपणयाला थोडा तरी शारीरिक कष्ट दिला होता का? परंतु आशाभंग झाल्याने याला मानसिक धक्का लागून हा बेशुद्ध झाला आहे."

शंका समाधान झाल्याचे राजाने होकार्थी मान हलवून मान्य केले.



# अंधविश्वास

एके वर्षी एका प्रदेशात पाऊस मुळीच पडला नाही व दुष्काळ पडला. प्रजेत हाहाःकार उडून गेला. अशा परिस्थितीत त्या प्रदेशातल्या एका गावी एक संन्यासी आला व त्या गावातच राहू लागला. गावकऱ्यांनी येऊन त्यांच्यावर जो प्रसंग आला होता त्याचे वर्णन करून सांगितले.

तो साधू त्यांना म्हणाला–"आज गुरुवार आहे ना? येत्या गुरुवारी मी असा पाऊस पाडून दाखवीन की तो थांबता थांबणार नाही. परंतु त्यासाठी यज्ञहोम, जपतप करणे आवश्यक आहे. बरेच पैसे खर्च होणार. माझ्यावर पूर्ण विश्वास असेल त्यांनी या कार्यासाठी पैसे द्यावेत."

पैसे पुष्कळच वसूल झाले. संन्याशाने जपतप होमादी सुरू केले. पुन्हा गुरुवार आला. पाऊस तर पडलाच नाही, खूप ऊन पडले व उन्हाळी वारे सुरू झाले. लोकांनी संन्याशाला विचारले व तोंडाला आले ते त्याला बोलले.

तेव्हां संन्यासी स्मित करून त्यांना म्हणाला–"हे पहा, मी पाऊस पाडू शकेन असा विश्वास कोणाच्याही मनात नव्हता. तसा विश्वास तुमचा माझ्यावर असता तर आतापर्यंत तुम्ही शेते नांगरून ठेवली असतील व पाऊस पडू लागताच रोपे लावण्याची तयारी करून ठेवली असतीत. आतां मी येथे आपला वेळ व्यर्थ घालविणार नाही." असे सांगून तो संन्यासी दुसऱ्या गावी निघून गेला.





# पैंज मारणारा भीमू

कसलीही पैज असो, ती जिंकणारा म्हणून भीमूची ख्याती होती. एकदां तो गणोबा नावाच्या माणसाशी बोलत असतां त्या गावाच्या पाटलांचा थोरपणा गणोबा सांगू लागला.

गणोबा म्हणाले—"आमचे गावपाटील म्हणजे देवमाणूस!"

"तो कसला रे देवमाणूस? सर्वांकडून लांच घेतो आणि नुसता माजला आहे. म्हणून मी त्याला पाहिला की खूप शिव्या हासडतो आणि तो माझ्यासमोर तोंड उघडेल तर शपथ." भीमू म्हणाला.

पाटील फार रागीट माणूस होता. गणोबांना ते चांगलं माहीत होते. म्हणून भीमू म्हणाला ते मान्य करायला गणोबा तयार नव्हते.

म्हणून भीमू म्हणाला—"तर मग पैज लाव!"

"ठीक, मी समोर ऐकत असतां तू पाटलांना शिव्या द्यायच्या. पाटलांनी तुझ्या शिव्या व शाप ऐकून एक चकार शब्द काढायचा नाही. तसं झालं तर मी शंभर रुपये देईन!" गणोबांनी पैज लावली.

"ठीक तर मी आंघोळ करून येतो, थांब!" असे सांगून भीमू घरात गेला आणि काही वेळाने बाहेर आला व म्हणाला—"एक अट बरं का, मी पाटलाला शिव्या देत असतां मध्ये तू एक अक्षरही बोलतां कामा नये!"

गणोबांनी होकार दिला.

दोघे मिळून बरोबर काही अंतर चालून गेल्यावर भीमू गणोबाला म्हणाला—"पैज जिंकायची म्हणजे माझी एक पद्धत आहे. मी पुढे पहिल्याने जातो, नंतर काही वेळाने तू ये. तू येशील तेव्हां मी पाटलांना शिव्या देत असेन. ते गप्प राहून शांतपणे सर्व ऐकत राहतील."

गणोबांनी होकार दिला आणि मागे राहिले. पाटलांना पैशाचा मोह नाही, किती पैसे दिले तरी ते शिव्या मुळीच ऐकणार नाहीत, गणोबांना खात्री होती.

काही वेळ थांबून गणोबा पाटलांच्या घरी गेले, तेव्हां भीमू पाटलांना तोंडाला येईल ते बोलत असलेला दिसला—"तू लुच्चा लांचखाऊ आहेस! तू गावात जो अत्याचार अन्याय चालविला आहेस त्याला काही अंत? तू गेल्याशिवाय या गावाचा उद्धार नाही!"

पाटील शांतपणे भीमू म्हणाला ते ऐकून म्हणाले—"तू व्यर्थ डोक्यात राख घालून बोलू नकोस भीमू! तू इकडे ये जवळ, दोन मिनिटे शांतपणे बसशील का? ताक देतो ते पी आणि मग जा बरं का?"

भीमू ते ऐकायला तयार नव्हता, जास्तच पिसाळल्यासारखा पाटलाकडे पाहूं लागला. गणोबा ते दृश्य पाहून थक्क झाले. भयंकर तापट म्हणून प्रसिद्ध असलेले पाटील असे अगदी नांगी टाकून काय बसले आहेत! गणोबांना कळेचना. तर मग पाटील खरोखरच लांचखाऊ आहेत म्हणावयाचे की काय, अशी एक शंका गणोबांच्या मनाला चाटून गेली. परंतु त्यामुळे त्यांना फार वाईट वाटले; कारण त्यांच्या मनात पाटील म्हणजे एक देवपुरुषच होते.

शिव्या देत देत शेवटी भीमू दमून गेला. पाटलांनी घरातून ताक पाठवून द्यायला बायकोकडे निरोप पाठविला.



ती बिचारी स्वतःच ताक घेऊन आली व भीमूला ते देत त्याला तिने शंभर रुपये दिले.

"हे पैसे कसले?" पाटलांनी विचारले.

"गणोबांना तुम्ही म्हणजे फार मोठा आदर नाही का? तुम्हांला कोणी शिव्या दिल्या तर तुम्हांला ते सहन होणेच शक्य नाही. असे गणोबांनी म्हटल्याबरोबर भीमू काय म्हणाला, तुम्हांला कोणी शिव्या देऊ लागला की तुम्ही गप्प राहून सर्व शांतपणे ऐकून घ्याल म्हणे. पण मी सुद्धां शंभर रुपयांची पैज लावून हारले." पाटलांची बायको म्हणाली.

पाटील गणोबाकडे वळून म्हणाले– "कायरे गणोबा! भीमूला वेड लागल्याचं तुला माहीत होतं वाटतं?"

गणोबाने आश्चर्यचकित होऊन विचारले–"भीमूला वेड, हे काय म्हणतां?"

"तुला माहीत नाही वाटतं, याला मधूनमधून वेडाचे वारे येतात आणि त्या वेळी तो समोर दिसेल त्याला तोंडाला येईल ते बोलतो, कोणी त्याला उत्तर देऊ लागला तर त्याचं पिसं जास्तच वाढतं, त्याला शांतपणे बोलून गुंजारून थोडं ताक प्यायला दिलं की वेडाचं वारं उतरतं व पुन्हां सामान्यपणे बोलू लागतो, ही गोष्ट थोड्याच वेळापूर्वी एकजण येऊन सांगून गेला!" पाटील म्हणाला.

"हे गेले चार दिवस चालू आहे, म्हणे!" पाटलांची बायको म्हणाली.

भीमू आंघोळीचं सोंग करून आत गेला, तेव्हां त्याने हे खोटं पाटलांना कळविलं असणार, हे गणोबांनी ओळखलं. गणोबा तोंड उघडणार त्याच्या आधीच भीमू गणोबाजवळ जाऊन शंभर रुपये घेऊन तेथून पसार झाला होता.

नंतर पाटलांनी गणोबांकडून सर्व वृतांत विचारून घेतला. ती गोष्ट मला न कळवितां स्वतः होऊन सर्व शांतपणे ऐकत राहल्याबद्दल पाटील गणोबांवर खूप कावले.





# दोन वस्ताद

[ ४ ]

बगदाद शहरात येणाऱ्या नव्या माणसाने बगदादहून बाहेर जाणाऱ्या जुन्या माणसाला विचारले–"काय हो, बगदाद शहरात सर्वात रुचकर असा खाण्याचा पदार्थ काय आहे?"

"साय लावलेली मधाची डबलरोटी! मी या गावात तीन दिवस राहालो. ही रोटी कितीही खाल्ली तरी पुरेशी वाटत नाही. आणखी हवीहवीशी वाटते." बाहेर जाणारा म्हणाला.

"किती वाटेल तो खर्च झाला तरी चालेल मी या गावात राहीन तितके दिवस साय लावलेल्या मधाच्या रोटीशिवाय दुसरे काही खाणार नाही." गावात येणारा म्हणाला. बाहेर जाणारा निघून गेला. गावात येणारा दिलेलाला बांधून ठेवले होते त्या बाजूला आला.

हे संभाषण दिलेला ऐकत होती व तिने लगेच आपल्या सुटकेची युक्ती योजली. तो बाहेरून येणारा माणूस कोणी परदेशी होता. त्याला ती कोण व तेथे तिला कां बांधून ठेवले होते, वगैरे काहीच माहीत नव्हते. म्हणून तो सहजी फसण्यासारखा होता. तसा विचार करून दिलेला म्हणू लागली. "मला नको! मी नाही खाणार!" तो तिच्याजवळ आला व तिला विचारू लागला–"काय ग, बाई, कोण तू? तुला येथे कां कोणी बांधून ठेवले आहे? आणि तू 'नको' 'नको' कां म्हणते आहेस?"

"काय सांगू बाबा? माझ्या नवऱ्याने साय लावून मधाच्या रोटया तयार करून विकल्या व लक्षावधीची संपत्ती संपादन केली. मला त्या रोटया सुरवातीला फार आवडत. परंतु हळूहळू माझं मनच विटलं.



परवां आमच्या दुकानात कोणी मोठे लोक आले. तेव्हां माझ्या नवऱ्याने त्यांच्याबरोबर त्या रोटचा खायला मलासुद्धा फार आग्रह केला. मी रोटी तोंडात घातली असेल नसेल व मला ओकारी आली. त्या मोठ्या गिऱ्हाइकाला संशय आला व त्याने त्या रोटचा खाल्या नाहीत व तशाच टाकून निघून गेला. माझ्या नवऱ्याला त्यामुळे मोठे नुकसान सहन करावे लागले. ही गोष्ट खरी आहे, मी मानते. परंतु मला त्या मधाच्या रोटचा खायला लावणे माझ्या नवऱ्याचीच चूक नाही का हो? मी त्याचा व्यापार नष्ट केला म्हणून त्याने माझ्यावर फिर्याद केली. न्यायाधिशाने मला त्या रोटचा खायचीच शिक्षा केली आणि मला येथे बांधून ठेवले आहे. उजाडतांच राजाचे शिपाई मधाच्या रोटचा आणतील. त्या मी सर्वांसमक्ष खाल्याशिवाय ते मला येथे बांधून ठेवणार. दोन दिवसांपासून माझा जीव कासावीस झाला आहे. मला काय झालं विचारतो आहेस, बाबा!" दिलैला म्हणाली.

"बाप रे बाप! आजी, तुझ्याऐवजी हा त्रास मला कां नाही ते लोक देत?" तो नवा माणूस म्हणाला.

"ते कां नाही होणार बाबा? तू मला सोडविलंस तर मी आपल्या जागी तुला बांधून ठेवीन. तू माझ्यासारखाच तोंडावर बुरखा घालून रहा. मीच आहे असे समजून ते तुला त्या रोटचा खायला आणून देतील." दिलैला म्हणाली.

ते ऐकून तो नवा माणूस फसला. त्याने दिलैलाला सोडविले. तिने त्याला खांबाला बांधून त्याच्या तोंडावर बुरखा टाकला आणि तेथे एक घोडा होता त्यावर बसून बगदादला निघून गेली.

उजाडल्यावर पांचही फिर्यादी उठून दिलैलाला बांधून ठेवले होते तेथे आले व पुन्हां शिव्याशाप देऊ लागले. परंतु खांबाला बांधून ठेवलेल्या माणसाने विचारले—"काय हो, अजून मधाच्या रोटचा आल्या नाहीत की?" चकित होऊन त्यांनी बुरखा काढून त्या नव्या माणसाला पाहिले व म्हातारीने पुन्हां आपल्या डोळ्यात धूळ फेकल्याचे ओळखले.

काही वेळाने खलीद स्वतःच तिकडे आला आणि घडलेला वृत्तांत त्याने ऐकला. या बाईला धरणं आपल्याला शक्य नाही, हे त्याने ओळखले. त्याने सर्वांना बरोबर चलायला सांगितले आणि सरळ खलीफांकडे निघाला.

खलीफा हारून अल रशीदने सर्वांचे म्हणणे ऐकले आणि कोणाकोणाला किती नुकसान झाले ते विचारून घेऊन सर्व नुकसानभरपाई करून देण्याचे वचन दिले.

त्या म्हातारीला धरून आणण्याची जबाबदारी खलीफांनी खलीदवर व मुस्तफावर टाकली. खलीदने त्याला ते शक्य होणार नसल्याचे सांगून टाकले. "मग ते काम कोण करणार?" खलीफांनी त्यालाच विचारले.

"नवा कोतवाल अहमद असतां आणखी कोणाला विचारण्याची गरजच काय? तो त्या पदावर नियुक्त झाल्यापासून त्याने कोणाला पकडून दिल्याचे कोणी ऐकले नाही. तेव्हां त्या म्हातारीला त्यानेच पकडावे. नाही तर त्याची हुशारी ती काय राहली?" खलीद म्हणाला.



खलीफांनी अहमदला बोलावून त्याला म्हातारीला पकडून हजर करायला हुकूम सोडला. अहमद लगेच आपल्या चाळीस शिपायांबरोबर निघाला. या शिपायांचा नायक एक कुबड असलेला अली नावाचा होता. तो आपला अधिकारी अहमद याला सुचवीत म्हणाला—"मला वाटतं या म्हातारीला पकडण्याच्या कामी आपण हसनसाहेबांचीसुद्धा मदत घेतली तर बरं होईल!"

"अरे कुबड्या! आपल्याला आणखी कोणी मदत करायला हवी का रे? हे काम करतां न येणारे आपणच आहो का रे? पुन्हां जर का तू ही गोष्ट तोंडावाटे काढलीस तर तुझ्या तंगड्या मोडल्याच

"समज!" हसनला ते ऐकू जाईल इतक्या मोठ्या स्वरात अहमद म्हणाला.

म्हातारीला पकडण्याचे काम खलीफांनी आपल्याला न देता हसनला दिले, याबद्दल जळफळत असलेला अहमद हसनच्या बढाया ऐकून जास्तच चिडला. तो मनात म्हणाला–"अस्सं होय! माझ्या मदतीशिवाय या अहमदला ती म्हातारी कशी मिळते ते पाहुया तरी!"

आपल्या चाळीस शिपायांना खलीफांच्या महालाबाहेरच्या पटांगणात एकत्र करून अहमद त्यांना म्हणाला–"शूरवीर हो! मी तुमचे चार दल करतो. तुम्ही चार दिशांना जाऊन राजधानी चाळून काढा. उद्या दुपारपर्यंत काम आटपून मुस्तफा गल्लीतल्या धर्मशाळेत या. मी तेथे येऊन तुम्हांला जे काही कळले ते ऐकेन."

चारही दल चार दिशांना निघून गेल्यावर स्वतः अहमद एकटा शोधार्थ निघाला.

आपल्याला पकडण्यासाठी खलीफांनी अहमदला नेमले असल्याचे ऐकून दिलेला थोडीसुद्धा भ्याली नाही. ती आपल्या मुलीला म्हणाली–"मला पकडू शकेल असा एकटा हसनच आहे. खलीफांनी त्याला नेमलं नाही हे आपलं नशीब! अहमदला रडवायला तूसुद्धा पुरे आहेस!"

"तरमग त्याच्या हातावर तुरी देऊन येऊ म्हणतेस का?" जीनावने विचारले.

"हो जाऊन ये!" दिलेला म्हणाली.

जीनाब नटूनफटून पातळ रेशमी ओढणी डोक्यावर घेऊन मुस्तफा गल्लीतल्या धर्मशाळेत गेली. हजकरीम ती धर्मशाळा चालवीत असे. त्याला भेटून दोनदा सलाम करून म्हणाली–"आमचे काही आप्तमित्र येणार आहेत. ते सामान्य लोकांशी काही संबंध ठेवणार नाहीत. एक मोठे दालन त्यांच्यासाठी हवं आहे, भाड्याने. मी पाच दीनार देते." हजकरीमने जीनाबच्या सौंदर्याकडे पाहिले व भाड्याची गरज नसल्याचे सांगितले. येणाऱ्या पाहुण्यांनी आपापला खर्च स्वतः केला की झालं!" तो म्हणाला. (क्रमशः)





# गणेश पुराण

पार्वती पुत्रगणपतीची किंकाळी ऐकून घाबरून पळत आली. डोकं कापलेल्या स्थितीत मुलाला पाहून ती शंकराकडे डोळे वटारून पहात म्हणाली–"काय केलेत हे? आपल्या मुलाचं डोकं उडविलंत? पुत्रवध केलांत!" असे म्हणत जमिनीवर पडलेल्या व मुलाच्या देहाला कवटाळून शोक करू लागली.

तोपर्यंत चकित होऊन सर्व पहात असलेल्या गर्दीतून एकदम समुद्राचा गंभीर घोष व्हावा तसा कलकलाट ऐकू येऊ लागला. मोठा अपराध केलेल्या सारख्या शंकराकडे सर्व पाहू लागले. शंकराला तर काय बोलावे व काय करावे सुचेच ना. भीतभीत शंकराने विचारले–"मला काहीच माहीत नसतां माझा मुलगा म्हणतेस? कसा झाला हा?"

पार्वतीने तिच्या अंगाचा मळ उबटनाबरोबर निघाला त्याची गोळी करून बाहुला कसा केला व त्याचा पुत्रगणपती कसा झाला, सांगितले. तेव्हां शंकर म्हणाला–"म्हणूनच तो 'आई', 'आई' असे बडबडत होता खरा. तू तो आपला दोघांचा मुलगा म्हणालीस, तो माझा मुलगा कसा काय झाला?"

तो प्रश्न ऐकून पार्वतीच्या तोंडावाटे शब्द उमटत नसलेला पाहून विष्णूने ब्रह्मदेवाला खूण केली. ब्रह्मदेव पुढे येऊन म्हणाला–"शंकराने पार्वतीचा हात धरला तेव्हांच शंकराचे तेज पार्वतीच्या देहात सर्वत्र



व्याप्त झालं. तेव्हांपासून शंकर पार्वतीच्या देहात अंतर्लीन होऊन तिचं अर्धांग झाला म्हणून पुत्रगणपती हा शंकराचासुद्धा मुलगा आहे!" चतुर्मुख ब्रह्मदेवाने आपल्या चारही तोंडांनी सर्व स्पष्ट सांगितले.

शंकर किंकर्तव्य विमूढ होऊन उभा असतां पार्वती आपल्या बाळाच्या देहावर पडून रडत होती. त्याच वेळी आकाशवाणी झाली–"उत्तर दिशेला डोके करून झोपत असलेल्याचे डोके कापून माझ्या धडाला चिकटवा. मी पुनर्जीवित होऊन उठेन." तो पुत्रगणपतीचा आवाज होता.

सर्व देवांनी व शंकराच्या प्रमथगणांनी सारी पृथ्वी चाळून काढली तरी उत्तरेकडे डोके करून झोपलेली एकही व्यक्ती दिसली नाही. आणखी हुडकत शोधत जात असतां सह्याद्री पर्वतातल्या बिल्ववनात हत्तीचं एक पांढरेशुभ्र पिल्लू उत्तरेकडे डोके करून शंकराला शरण गेल्यासारखं उपडं पडलेलं दिसलं.

ते हत्तीचं पिल्लू म्हणजे देवलोकांतील इंद्राचा हत्ती ऐरावत याचंच पिल्लू होते. एकदां इंद्र आपले वाहन ऐरावत हत्तीवर बसून येत असतां ऐरावताचा मुलगा गजेंद्र हत्ती इंद्राला पाहूनही आपल्या ध्यासांत दुर्लक्ष करून पुढे जाऊ लागला. इंद्राला त्याचा राग आला व म्हणाला–"माझ्या वाहनाचा हा पोरगा आणि याला इतका गर्व चढला आहे का?"

तेव्हां गजेंद्र शांतपणे म्हणाला–"माझे बाबा आपले कर्तव्य पालन करीत आहेत. म्हणून तू मला कमी लेखण्याचं काहीच कारण नाही!"

"अरे, हत्तीच्या कारट्या! मी देवेंद्र आहे!" इंद्र गर्वोक्तीने म्हणाला.

"होय तर मी गजेंद्र आहे! आणखी कोणी नागेन्द्र आहे व खगेन्द्रही आहे! असे कित्येक इंद्र आहेत! शंभर यज्ञ केले की इंद्र पदवी प्राप्त होते. म्हणून कोणी तपश्चर्या करू लागला की तुला भीती वाटते. तरी इंद्रापद फार मोठं आहे हे तू मोठ्या अभिमानाने कां सांगत फिरतो आहेस?" गजेंद्राने इंद्राला विचारले.

इंद्र संतापून शाप देत म्हणाला–"तुझं डोकं तुटून पडो!"

गजेंद्र हंसत म्हणाला–"शंकराच्या आज्ञेशिवाय मला मुंगीसुद्धा चावणार नाही! त्या तुटून पडलेल्या माझ्या डोक्यासमोर तुला मान वांकवावी लागेल!"

गजेंद्र कसा त्रिकालज्ञानी आहे हे माहीत नसल्यामुळे इंद्राने गर्वांध होऊन म्हटले–"तरमग तू त्या शिवशंकरावरच विश्वास करून जमिनीवर पडून रहा!" असा गजेंद्राला शाप देऊन इंद्राने त्याला स्वर्गातून पृथ्वीवर ढकलले. गजेंद्र सह्याद्री पर्वतावर पडून नित्य शंकराचं स्मरण करीत, शंकराचं निवासस्थान कैलासपर्वत उत्तर दिशेला आहे तिकडे डोके करून झोपे.

देव गजेंद्राचे डोके कापून घेऊन गेले. ते डोके शंकराने मुलाच्या धडाला चिकटवून ठेवताच पुत्रगणपती 'गजानन' होऊन हसतमुखाने उठून उभा राहिला.

"माझ्या लाडक्याला हत्तीचे तोंड? मला नाही बघवत!" म्हणत पार्वतीने डोळे मिटून घेतले.

तेव्हां गजमुख कर्णमधुर स्वरात म्हणाला–"आई! तूं इतकं मनाला कां लावून घेतेस? जे व्हायचं होतं ते सर्व



निर्विघ्नपणे पार पडलं नाही का? त्या दिवशी तुम्ही दोघांनी भिंतीवर हत्तीचं चित्र पहात असतां मला पाहिलंत ते आठवत नाही का? तोच मी विघ्नेश्वर!"

पार्वतीला स्वप्न पडल्यासारखं ते दृश्य डोळ्यासमोर उभं राहिलं. शंकरालासुद्धा तो विघ्ननाश आठवला.

"विघ्ननाशा! तू आमचा मुलगा म्हणून अवतार धारण केला आहेस का? म्हणून का तू माझ्याशी वाद घालून युद्ध करण्यासाठी दंड ठोकून उभा राहिला होतास आणि मला राग यावा म्हणून प्रयत्न केलास? आतां मला तुझी सर्व अद्भुत लीला कळली." शंकर म्हणाला.



"नाहीतर तू गजासुराला दिलेले वचन पुरे होईल हे कसे वाटले तुला?" या शब्दात गजाननाने शंकराला आठवण करून दिली.

शंकर म्हणाला–"चांगली आठवण करून दिलीस. मी गजचर्मसुद्धा कमरेला बांधून घ्यायचे आहे. गजमुख माझ्या मुलालाच तर आहे!" त्यानंतर शंकराने गजचर्म आणून कंबरेला बांधून घेतले.

शंकर नम्रपणे म्हणाला–"विघ्नेश्वरा! तू आपले विश्वरूप दाखव!"

तेव्हां विघ्ननाश गजानन आकाशा–एवढा वाढला व त्याला पांचमुखे दिसू लागली. पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांचे हिरवा, श्यामल, लाल, शुभ्र व निळा रंग अनुक्रमे त्या पांचही मुखांना होते. त्या डोक्यांवर नक्षत्रे फुलां-सारखी शोभत होती. गजाननाचे गोल व विशाल पोट चकचकीत लखलखीत होते व आकाशाची बरोबरी करीत होते. त्याच्या अनेक हातात अंकुश, परशू, पाश व कलशाबरोबर ब्रह्मा विष्णू व महेश या त्रिमूर्तींची शंख, चक्र, गदा, पद्म, डमरू, त्रिशूल, वज्रायुध, जपमाला, कमंडल, वीणा, तलवार, शक्तीचा भाला वगैरेसुद्धा आयुधे व वस्तू होत्या. त्याचे रूप पाहण्या-साठी माना वर करून पाहणाऱ्यांचे डोळे त्याच्या तेजासमोर दिपून गेले व ते मान वांकवून उभे राहिले. सर्वांना एक अनि-र्वचनीय आनंद वाटला. सरस्वती वीणा हातात घेऊन गणपतीला आवडणारा भूप राग वाजवू लागली. त्यानंतर नारदाने भैरव राग मधून मधून म्हणत सर्व वातावरण निनादित केले. त्या आनंदात शंकराने आनंदतांडव नृत्य सुरू केले.

इंद्रासह कोटिकोटि देवांनी माना वांक-वून गजाननाचे वंदन केले. तेव्हां इंद्राच्या कानावर "त्या डोक्यासमोर तुला आपली मान वांकवावी लागेल!" हे गजेंद्राने म्हटलेले वाक्य वारंवार आदळल्यासारखे झाले. पुत्रगणपतीच्या घडावर बसविलेले



डोके गजेंद्राचेच आहे हे इंद्राला माहीत होते. इंद्र कान धरून तीन वेळ उठाबशा काढून त्रिवार आपल्या थोबाडीत मारून घेऊन मनांत म्हणाला—"गजेंद्रा! तूच खरा त्रिकालज्ञानी, मी अज्ञानी माझ्या गर्वोक्तीबद्दल मला माफ कर!" सर्व देवांनी इंद्राचे अनुकरण करून गजाननाला नमस्कार केला.

विश्वरूप धारण केलेल्या अवस्थेत असलेल्या गजाननाला शंकर म्हणाला—"विघ्नेश्वरा! तुझे हे रूप पाहून यात अनेक विशेष अर्थ आहेत, असे आम्हां सर्वांना वाटत आहे. ते सर्व कळावेत असे कुतूहल आम्हांला होत आहे!"

विघ्ननाश म्हणाला—"शिवभक्तांचा मेळावा म्हणजेच हे विश्व होय. सर्व विश्वाचे मातापिता असे हे जे पार्वती परमेश्वर आहेत त्यांचा मी मुलगा आहे त्यांना मी पुष्पांजली वाहातो!" असे म्हणत गजानन हात जोडून गप्प झाला.

तेव्हां ब्रह्मदेव पुढे येऊन म्हणाला—"मत्स्यावतार धारण करून विष्णूने सोमकासुराचा वध केला आणि वेदांचे रक्षण केले. पूर्णचंद्रासारखी मृदुशांत कांती धारण करून विघ्नेश्वराने साक्षात् दर्शन देऊन ते वेद मला दिले. मला ज्ञान व सिद्धी प्राप्त झाली. त्यावेळी विघ्नेश्वराविषयी अनेक गोष्टी मला कळल्या. संकल्प सिद्धीला मूल कारण विघ्नेश्वर आहे हे ओळखून मी विघ्नेश्वराचे स्मरण करून प्रथम पासून पुन्हां सृष्टीची रचना करू शकलो.

"विघ्नेश्वर हा विराट स्वरूप आहे. तो व्याप्त होतो म्हणूनच तो 'विष्णु' म्हणवितो. आकाश, वायु, तेज, आप व पृथ्वी या पंच महाभूत गणांचा तो अधिपती असल्या कारणानेच विघ्ननाश हा महा गणाधिपती झाला! लक्ष्मी व सरस्वतीचे निवासस्थान अशी तुझ्या पंचमुखांतील दोन मधली मुखे आहेत. त्या पंचमुखांना पंच महाभूतांचे प्रतीक पांच रंग आहेत.



"हत्तीचे डोके हे मेधा व शक्ती दोन्हींचे प्रतीक आहे. पोट मोठे आहे एवढ्यावरच भागत नाही. आवश्यक मेधा सुद्धा असली पाहिजे, हा त्याचा अर्थ होय! नव नवीन पक्वान्ने पडत असतात व जुनी पचून जात असतात. त्यांचा असा अर्थ घ्यावयाचा असतो की अनंत आकाशात नक्षत्रमंडले ग्रह, उपग्रह, गोल, लोक जसे भरलेले असतात तसे हे लंबोदर होय. हा लवकरच एका छोट्याशा उंदरावर बसून फिरणार आहे. म्हणजे सूर्यचंद्रादी ग्रह महामंडले शून्य आकाशात आपली गती न सोडतां नियमितपणे फिरत राहणार व झूल व अलंकार घालून हत्तीची अपूर्व अशी स्वारी निघते तसे संपूर्ण ज्ञान विज्ञान सजून निघाले आहे असे म्हणावयाचे. विश्वविज्ञानाचे प्रतीक म्हणजेच विघ्नेश्वर तो विज्ञानेश्वर नामेच ओळखला जातो.

"अखिल विश्वाचा अधिनेता व नियंता आहे तो. म्हणून अंकुश धारण करतो. बौद्धिक शक्तीचा विघ्नेश्वर गुरू आहे. बुद्धिभ्रम होऊ नये यासाठी माहूर हत्तीला काबूत ठेवतो तसा हा अंकुश हा मनोनिग्रहाचे प्रतीक आहे. प्रत्येक प्राणी व पदार्थ आपापल्या पायरीवर जागेवर नैसर्गिक नियमाने बांधलेला आहे याचे चिह्न म्हणून विघ्नेश्वराच्या हातात पाश आहे. परिपूर्णता ही कधी कमीजास्त होत नसते याचे चिह्नस्वरूप त्याने हातात कलश धारण केला आहे. परशूने तो विघ्नांना छिन्नभिन्न करून टाकतो. सर्व विश्व हे नादात्मक आहे. चराचर सृष्टीतील कोट्यावधी आवाज ऐकू पडावेत यासाठीच त्याने आपले एवढे मोठे कान ठेवले आहेत. हत्तीचे डोळे जसे बारीकसारीक वस्तू देखील पाहतात तसे विघ्नेश्वराचे डोळे बारीक असले तरी सूक्ष्मदर्शी आहेत. त्या डोळ्यांना परमाणुपासून तो ब्रह्मांडापर्यंत सर्वनित्य दिसत असते. त्याचे वक्रतुंड हे सर्व वांकड्यांना तुकडे तुकडे करून सरळ करणारे आहे. कोणतीही वस्तू कोठेही

असो सोंड सरळ किंवा वांकडी होऊन त्या वस्तूपर्यंत पोचते.

"अन्नधान्याच्या समृद्धीला विघ्ननायकच अधिनायक आहे. तो भोजनप्रिय आहे, शरीर स्वास्थ्य चांगले म्हणून बौद्धिक बल संपूर्ण आहे. फळफळावळ, पक्कान्ने, पाले-भाज्या वगैरेंना कधी नकार न देता तो स्वीकारतो. भाद्रपद महिन्यात हत्तीसारखे ढग येतात व त्याच्या सोंडेसारखी मुसळाधार वृष्टी होते. मेघगणाचा नायक गण-नायक होय! विघ्नेश्वराने अवतार धारण केला तो याच भाद्रपद महिन्यात. भाद्रपद शुक्ल चवथीला जे विघ्ननाश गणाधिपाची पूजा करतात त्यांना संकल्पसिद्धी लाभते व विघ्नांना तोंड देण्यास समयस्फूर्ती व प्रसंगावधान लाभते.

"आपल्या दाताची लेखणी करून ती उचलल्या शिवाय विघ्नेश्वराने आपल्या हातात पंचमवेद म्हणविण्यालायक महा-भारताचे लेखनकार्य केले ते चिरस्थायी होणार. विघ्नेश्वराचा महिमा वर्णन करून सांगणे माझ्या सारख्याला साध्य नाही. कोणतेही कार्य प्रारंभ करण्यापूर्वी विघ्नेश्वराचे स्मरण करून व त्याची पूजा करून सुरू केले पाहिजे. 'शुभमस्तु!' अशी अभयमुद्रा धारण करूनच तो बसला आहे. महागणपति हा सर्वांचे प्रथम आराध्य दैवत आहे!" असे सांगून ब्रह्मदेव मौन झाला.

तेव्हां शंकराने सर्वांकडे एकदां पाहिले व म्हणाला—"ब्रह्मदेव म्हणाला ते सर्वांनी ऐकलंत ना? विघ्नेश्वराची सर्वात आधी पूजा केली पाहिजे!"

सर्वांनी होकारार्थी त्रिवार माना हलविल्या. नारदाने पुन्हां आपल्या वीणेवर भूप राग वाजवायला सुरवात केली तर सरस्वतीने तदनुरूप रागिणी गायला सुरवात केली. त्या वातावरणात पार्वती विघ्न नायकाला नमस्कार करू लागताच विराट रूप धारण केलेला विघ्ननायक म्हणाला—"आई! आई! नको!" आणि लगेचविराट स्वरूप सोडून बालगणेश होऊन आईच्या पायांना मिठी मारून उभा राहिला.





# दिव्य दृष्टी

चंद्रपूर येथे चंद्रकांत नावाचा एक लहान वाणी रहात असे. तो भयंकर चिक्कू व लोभी होता. तो दुकानात असो की घरी त्याच्या डोक्यात एकच एक विचार घोळत असे, आपण कोटयाधीश व्हायला युक्ती काय? एकदां चंद्राकांतच्या दुकानात एक गिऱ्हाईक आलं. त्यानं बोलतांना म्हटलं की शेजारच्या रानात एक योगी येऊन राहतो आहे. त्याला अनेक दिव्य शक्ती प्राप्त आहेत.

दुसऱ्याच दिवशी चंद्रकांत त्या योग्याच्या भेटीला निघाला. नमस्कार करून तो योग्याला म्हणाला—"महात्मन्, लवकर कोटयाधीश व्हायचा काही मार्ग असेल तर सांगण्याची कृपा करावी. एखादा मंत्र असेल तर तो शिकवावा."

तो योगी हंसून म्हणाला—"बेटा, माणसाला आयुष्यात खरे यश हे अंग मेहनतीनेच मिळते तेच टिकाऊ असते. सहजी व मेहनतीशिवायचे वैभव क्षणभंगुर असते. हाच तो मूलमंत्र आहे!"

परंतु त्या उत्तराने चंद्रकांतच्या मनाचे समाधान झाले नाही. तो हट्ट धरूनच बसला तेव्हां योगी थोडा चिडल्यासारखा होऊन म्हणाला—"तुझी इच्छा व महत्वाकांक्षा असाध्य दिसते आहे. म्हणून तू आणखी दुसरं काही तरी मागून घे!"

चंद्रकांतने थोडावेळ विचार केला व म्हणाला—"योगिराज, मला दिव्य दृष्टी देण्याची कृपा करावी." योगी शांत स्वरात म्हणाला—"हे तू मागतो आहेस हे सुद्धा योग्य नाही. मोठ्या तपश्चर्येनंतरच दिव्य दृष्टी माणसाला लाभते तरी मी दुसऱ्या तऱ्हेने तुला दिव्य दृष्टी येईल असे करतो." असे सांगून योग्याने एक डबी चंद्रकांतला



दिली व म्हणाला—"या डबीत काजळ आहे. हे डोळ्यात घातलं तर दिव्य दृष्टी प्राप्त होते. परंतु एकदां काजळ घातलं की दिव्य दृष्टी एकदांच मिळते."

चंद्रकांत ती डबी घेऊन आनंदाने निघाला. वाटेत तो एकच एक विचार करीत होता की या काजळाने दिव्य दृष्टी मिळवून कोट्याधीश कसे होतां येईल? त्या विचारात तो मग्न असतां एक काळा-कभिन्न चोर तलवार उपसून समोर आला आणि त्यानं चंद्रकांतला दरडावून विचारलं— मी कोण आहे हे कळलं का तुला? मी शिव्या बेरड आहे. माझं नांव ऐकून राजाचे शिपाई सुद्धा थर थर कापतात. तुझ्या जवळ असेल ते मुकाट्यान काढून माझ्यासमोर ठेव!"

शिव्या बेरडाचे नाव चंद्रकांतलाही माहीत होते. चंद्रपूरच्या राजाने त्याला कैद करून देण्यास मदत करणाऱ्याला मोठे बक्षीस जाहीर केले होते.

चंद्रकांत चोराला म्हणाला—"माझ्या जवळ काही नाही." परंतु चोराला ते खरे वाटले नाही. त्याने चंद्रकांतची झडती घेतली व त्याच्या कंबरेला काजळाची डबी होती ती हिसकावून घेतली. त्याने चंद्रकांतला ती डबी कसली म्हणून दरडावून विचारले.

चंद्रकांतची बोबडीच वळली होती. त्याने त्या डबीतल्या काजळाचा महिमा सांगून टाकला. तेव्हां चोर म्हणाला—"छान, कित्येक दिवसांपासून मी राजाच्या खजिन्यात जायला चोरवाट कोठे आहे का विचार करीत होतो. या काजळाने मला ती चोरवाट सापडेल. ठीक, तर मग मी सोडतो, चालता हो! तू जर का हे गुपित राजाला किंवा राजाच्या कोणत्याही नोकराला कळविलेस तर मी कैद होईन. परंतु माझा मुलगा बाहेर राहील तो तुझा मुडदा पाडल्याशिवाय राहणार नाही." असे सांगून चोराने त्या डबीतले अर्धे अधिक काजळ काढून घेतले आणि नाहीसा झाला.

चंद्रकांत घरी आला, कोट्याधीश व्हायची इच्छा त्याच्या डोक्यातून नाहीशी झालेली नव्हतीच. तो काजळाची डबी कोनाड्यात ठेवून दुकानात निघून गेला.

चंद्रकांतच्या शेजाऱ्याची मुलगी कमलाचा साखरपुडा त्याच दिवशी होता. ती नटून तयार झाली. परंतु काजळ घालायला कोनाड्यात हात घातला तर काजळाची डबी दिसली नाही. म्हणून ती शेजारच्या घरी काजळ मागून आणायला म्हणून चंद्रकांतच्या बायकोकडे आली.

चंद्रकांतच्या बायकोने कोनाड्यात तिची नेहमीची डबी पाहिली, पण ती नव्हती. तिच्या जागी तिला दुसरीच एक डबी दिसली. ती डबी चंद्रकांत ठेवून दुकानात गेला होता. ते सामान्य काजळच असेल असे समजून चंद्रकांतच्या बायकोने त्या डबीतले काजळ घालून कमलाला पाठविले.

लक्ष्मी काजळ घालून घरी आली तेव्हां तिचे वडील डोळ्यात पाणी आणून तिला म्हणाले—"मुली! मी तुझं लग्न एका श्रीमंत मुलाशी करून द्यावं अशी मी स्वप्ने पहात होतो. परंतु माझी ती स्वप्ने विरून गेली. आतां लग्नाच्या वेळी किती लोकांना बोलवायला जमेल देवच जाणे!"

वडिलांचं दुःख दूर करण्याच्या हेतूने कमला म्हणाली—"बाबा, माझे आजोबा



सांगत ना की आपल्या घराच्या आवारात त्यांच्या वाडवडिलांनी पुरून ठेवलेला ठेवा कोठेतरी आहे, तो आपल्याला मिळाला तर आपण एकाएकी श्रीमंत नाही का होणार?"

दुसऱ्या क्षणाला वीज चमकावी तशी लक्ष्मीला घराच्या ईशान्य कोपऱ्यात जमिनीत पुरलेले हंडे दिसले. ते सोन्याच्या नाण्यांनी भरलेले होते. ते तिने आपल्या वडिलांना सांगितले. तिच्या वडिलांनी त्या जागी खणून पाहिले तर खरोखरच तीन कलश सोन्याच्या नाण्यांनी भरलेले सापडले.

कमला ही दिव्य दृष्टी कशामुळे मिळाली याचा विचार करीत असतां तिला ते

काजळ आठवले. ते सांगण्यासाठी ती लगेच चंद्रकांतच्या घरी धावली.

त्यावेळी कमलाला गल्लीत एक दवंडी होत असलेली ऐकायला मिळाली–"रात्री राजाचा खजिना कोणी तरी लुटला आहे. चोराचा पत्ता सांगणाराला दहा हजार सोन्याची नाणी दिली जातील :

नंतर ती चंद्रकांतच्या बायकोला घडलेली गोष्ट सांगून म्हणाली–"हे काजळ काही तरी महिमा असल्यासारखं दिसतं आहे. याच्या मदतीने चोराचा पत्ता काढून राजाला कळविता येईल व दहा हजार सोन्याची नाणी संपादन करतां येतील."

कमला चंद्रकांतच्या बायकोला हे सांगत असतां पलीकडची शेजारीण सखूबाई ते ऐकत होती. ती काही एक बोलल्याशिवाय चंद्रकांतच्या घरावर पाळत ठेवून बसली.

रात्री चंद्रकांत घरी आला व कमलाला काजळाचा जो फायदा झाला तो ऐकून तो आपल्या बायकोवर खूप रागावला. म्हणाला–"चोराला धरून दिलं तर दहा हजार कां एक लाख मिळाले तरच चोरांचा पत्ता सांगेन."

ते सखुबाईने ऐकले. तिने उजाडल्यावर नवऱ्याला सर्व सांगून राजाकडे पाठविले. राजाला चंद्रकांतच्या घरातल्या काजळाची गोष्ट कळली. त्याने चंद्रकांतला बोलवून फांशीची धमकी दिली व काजळाच्या डबीचे गुपित काढून घेतले.

राजाने चंद्रकांत जवळची डबी घेऊन चंद्रकांतवर आरोप लावला की त्याला चोराचा हेतू माहीत असूनही त्याने राजदरबारात वर्दी दिली नाही. तो राजद्रोह झाला! तरी चंद्रकांतला माफ करून राजाने सोडून दिले.

नंतर राजाने काजळाच्या मदतीने चोराला त्याच्या गुप्तस्थानी जाऊन पकडले आणि खजिन्यातली सर्व संपत्ती परत मिळविली. चोराला पकडण्याच्या कामी सखुबाईने केलेल्या मदतीबद्दल तिला दहा हजार सोन्याची नाणी इनाम म्हणून दिली.



# सुमुहूर्त

रामशास्त्र्यांनी पंचांग पाहून मुलीला शेजारच्या गावी चांगले स्थळ आले होते ते पाहून येण्यासाठी मुहूर्त ठरविला. त्यांची बायको त्यांना म्हणाली–"हे स्थळ फार चांगलं दिसतं आहे. तुम्ही उशिरा मुहूर्त धरला आहे. त्या आधी कोणी दुसऱ्याने त्या मुलाला पाहून साखरपुडा करून टाकला तर तुम्हांला या सुमुहूर्ताचा काय उपयोग होणार हो ? म्हणून उद्या परवांचाच मुहूर्त कां नाही पहात ?"

रामशास्त्री बायकोला डोळे वटारून सांगू लागले–"चांगल्या मुहूर्तावर कार्यारंभ केला की कार्य निर्विघ्न पार पडते. तुला काय ग, समजतं की बरावाईट मुहूर्त कोणता ते ?"

शेवटी ठरल्या मुहूर्तावर रामशास्त्री स्थळ पहायला निघाले. रात्री घरी परतल्यावर म्हणाले–"मुहूर्त पाहून निघालो होतो, म्हणून जिवंत परत आलो."

"म्हणजे ?" बायकोने विचारले.

"आम्ही ज्या बैलगाडीतून जात होतो, ती वाटेत उलटली. माझ्याशिवाय प्रत्येकाला बरंच काही लागलं." रामशास्त्री म्हणाला.

म्हणजे तुम्ही सीतापूर गेला नाहीत वाटतं ?" बायकोने विचारले.

"कां नाही, गेलो होतो. तेथे गेल्यावर कळलं की कालच त्या मुलाचं लग्न ठरलं !" रामशास्त्री म्हणाले.





# शत्रू मित्र झाले

सुदर्भ देशाची राजकन्या चंपावती त्रिलोकसुंदरी म्हणून प्रसिद्ध होती. तिच्या सौंदर्याविषयी ऐकून व तिला पाहिल्यावर तिला मागणी घालणाऱ्या अनेक राजपुरुषांत सुनाग देशाचा राजा जयचंद्र हा एक होता. सुदर्भ देशाच्या राजाने चंपावतीचे स्वयंवर रचले. ते कळल्यावर अनेकांबरोबर जयचंद्रही मोठ्या उत्साहाने स्वयंवराला आला. परंतु स्वयंवर प्रसंगी चंपावतीने पुन्नाग देशाचा राजा उदयन याच्या गळ्यात वरमाळा घातली.

सुनाग व पुन्नाग देश शेजारीशेजारीच होते. कित्येक वर्षांपासून दोन्ही राज्यांत सलोख्याचे संबंध नव्हते. या कारणामुळे जयचंद्राच्या अंगाचा भडका उडाला. तसा उदयन हा एक योग्य राजाच होता.

स्वयंवराचा सोहोळा संपताच जयचंद्र मोठमोठ्याने ओरडून म्हणू लागला—"या असमर्थ मूर्खाला चंपावतीने वरमाळा कां घातली, मला कळत नाही. हे स्वयंवर म्हणजे नुसतं नाटकच आहे! फसवेगिरी आहे! इतर राजांनी मुकाट्यानं हे नाटक पाहून गप्प राहतां कामा नये!"

ते ऐकून उदयनच्याबरोबर आलेले त्याचे सरदार वगैरे चिडले व त्यांनी जयचंद्राची खोड मोडण्याचे ठरविले? स्वयंवराला आलेल्या इतर राजकुमारांनासुद्धा जयचंद्राची ती वागणूक मुळीच आवडली नाही. परंतु उदयन एकटा शांत होता व म्हणाला—"जयचंद्रा! तू एका राज्याचा राजा आहेस. तू हे सर्व बोलणे तुला शोभत नाही. समर्थ पुरुष वायफळ गप्पा करीत नाहीत, कांय तो आपला प्रताप दाखवितात, तुला हे माहीत नाही का?"

"ते ऐकून तेथे हजर असलेले सर्व लोक हसू लागले. द्वंद्वयुद्धात उदयन अजिंक्य आहे ही त्याची ख्याती होती. म्हणून जयचंद्र त्यावेळी काहीएक बोलला नाही. तो आपल्या राजधानीत परतला आणि त्याने युद्धासाठी तयारी सुरू केली.

उदयनला ही बातमी हेरांकडून कळली. त्याला युद्ध करणे योग्य वाटलं नाही. तरी त्याने राज्याच्या रक्षणासाठी आवश्यक ती सर्व तयारी सुरू केली व त्याच बरोबर युद्ध टाळण्यासाठी आवश्यक ते सर्व प्रयत्नही चालू ठेवले. त्याने जयचंद्राकडे राजदूताला पाठविणे योग्य होईल असे ठरवून त्याप्रमाणे एकाला पाठविलेही, त्याने पत्रात लिहिले होते—"जयचंद्रा! तुझं आणि माझं वैर वाढलं तर आपल्या दोघांच्या प्रजेचे फार नुकसान होईल. ते मला योग्य वाटत नाही. म्हणून तुला माझी एवढीच विनंती आहे की आपण सलोख्याने राहणेच श्रेयस्कर होईल, तू युद्धाचा विचार सोडून दे!"

उदयनचे ते पत्र वाचून जयचंद्र मोठ्याने हसला व त्याने, उदयनने पाठविलेल्या दूताचा अपमान केला. परंतु जयचंद्राचा मंत्री त्याला म्हणाला—"प्रभो! उदयन भितरा किंवा कापुरुष नाही. आपण या गोष्टीचा विचार करावा. शिवाय आपल्या प्रजेच्या मनात उदयनच्या विषयी राग असेल तरच आपण पुन्नाग देशावर स्वारीचा विचार करावा!"

पुढे काही दिवसांनी जयचंद्राला, चंपावतीकडून गुप्तपणे एक पत्र आले. त्यातला मजकूर असा होता—"स्वयंवरसमयीं मी





उदयनला वरमाळा घातली ती माझी चूक झाली, हे मला आतां कळले आहे. परंतु त्यात काही विशेष बिघडले नाही. मी पुन्नाग देशाची राणी असल्या कारणाने मला किल्लयातल्या सर्व गुप्त गोष्टींची चांगली माहिती आहे. तू मला राणी म्हणून मान्य करणार असशील तर मी तुला पुन्नाग देशाचा राजा करीन. पुन्नाग देशाच्या सीमेवर मी तुझी वाट पाहाते आहे, मला निराश करू नकोस!"

मूर्ख जयचंद्राने ते पत्र आपल्या मंत्र्याला सुद्धा दाखविलं नाही आणि मोजक्या लोकांना बरोबर घेऊन दोन्ही राज्यांच्या सीमेवर गेला आणि उदयनच्या सैनिकांच्या हाती कैद झाला. उदयन त्याला आदर-पूर्वक आपल्या राजवाड्यात बोलावून घेऊन गेला आणि त्याच्या उतरण्याची उत्तम व्यवस्था करून दिली.

त्यानंतर उदयनने सुनाग देशाच्या मंत्र्याला खालील पत्र लिहिले: "तुमचा राजा जयचंद्र माझ्या कैदेत आहे. ही बातमी आपण तूर्त गुप्तच राहू द्यावी. आपल्या राजाच्या जिवाला कोणत्याही प्रकारे अपाय होणार नाही, याची हमी मी देतो. तो काही दिवस आमचा एक पाहुणा म्हणून राहून परत स्वदेशी येईल. मध्यंतरी आपण, युद्धाची तयारी चालू असल्यास ती बंद करावी आणि प्रजेच्या हिताची कामे करावीत. जयचंद्राने प्रजेच्या मनात विषबीजे पेरली असल्यास ती समूळ उपटून काढावी आणि शेजारच्या राजांशी स्नेहसंबंध वाढतील असे प्रयत्न चालू ठेवावेत. आपले परस्परांशी युद्ध झाले तर त्यात कोट्यावधी रुपये नष्ट होतील व प्राणहानी होईल ती निराळीच. आपण आपल्या प्रजेच्या हिताची कामे करावीत यासाठी मी आपल्यातर्फे दहा कोटी वराह (सोन्याची नाणी) देऊ शकेन. आपण युद्ध थांबविण्यासाठी केलेल्या प्रयत्नाचे प्रत्यक्ष फळ म्हणून मी ही रक्कम पाठवीन."



ते पत्र वाचून जयचंद्राचा मंत्री चकित झाला. उदयनचा थोरपणा त्याला कळला. त्याने आपले महाराज राजधानीत नाहीत असे कळू न देता राज्यकारभार चालू ठेवला. नंतर त्याने उदयनने पाठविलेल्या पैशाचा उपयोग करून उदयनच्या नावे प्रजेच्या हिताची अनेक कामे चालू केली.

उदयनने जयचंद्राला सहा महिने आपला बंदी म्हणून ठेवले. त्या अवधीत त्याने जयचंद्राला त्याच्या हिताच्या कित्येक गोष्टी सांगितल्या. शेवटी त्याला बंदीमुक्त करते वेळी मंत्र्याच्या नावी त्याने जे पत्र लिहिले होते त्या विषयी सविस्तर सांगून म्हणाला–"जयचंद्रा! तू माझ्या नजरकैदेत आहेस ही गोष्ट मी किंवा तुझ्या मंत्र्याने या कानाची त्या कानाला कळू दिलेली नाही. तू आपल्या राज्यात वेष पालटून जा. तुझी प्रजा माझ्याविषयी काय म्हणते आहे, तू स्वतः पहा. तिचा माझ्यावर राग असेल तर तू माझ्याशी युद्धाला ये. तुला ते नको असेल तर आपण दोघे द्वंद्वयुद्ध करू या."

जयचंद्र वेष पालटून स्वदेशी गेला. तो जेथे जेथे गेला तेथे तेथे त्याला उदयनची प्रशंसाच ऐकायला मिळाली. उदयनच्या नावे देशात अनेक जागी विहिरी, सरोवरे, धर्मशाळा व दवाखाने त्याला दिसले. सुनाग देशाच्या प्रजेच्या मनात पुन्नाग देशाविषयी प्रेमादरच जयचंद्राला पहायला व ऐकायला मिळाला.



जयचंद्र राजधानीत गेला व त्याने मंत्र्याला भेटून विचारले–"हे सर्व काय व कसे झाले?"

आपले महाराज स्वदेशी सुखरूप पोचले याचा मंत्र्याला परमानंद झाला व म्हणाला–"म्हणजे उदयनने दिलेले वचन पाळले म्हणावयाचे!"

तेव्हां जयचंद्र रागाने म्हणाला–"तू माझ्या शत्रूची प्रशंसा करतो आहेस? तू राजद्रोही आहेस!"

मंत्री म्हणाला–"महाराज! प्रजा सुखी असेल तरच ना राजाला कीर्तिलाभ होतो! युद्धामुळे प्रजेचे नुकसानच होते. गेले सहा महिने मी प्रजेच्या हिताची अनेक कामे करू शकलो. युद्धाची तयारी करण्याचे सोडले म्हणून पैसा वांचला. शिवाय उदयनने सुद्धा पैशाचे सहाय्य केले. म्हणून प्रजेच्या हिताची अनेक कामे मला सहजी करतां आली. प्रजा आतां सुखी आहे. आपल्याला बंदी केले असूनही उदयनने कधी आपला अपमान केला नाही किंवा आपल्या राज्यावर चालून आला नाही. उलट त्याने स्वखर्चाने आपल्या प्रजेच्या हिताची अनेक कामे केली. तेव्हां आपण त्याच्या या थोरपणाकडे पहावे, एवढीच माझी विनंती आहे."

आपला देश सुखी असल्याचे जयचंद्राने प्रत्यक्ष पाहिले होते. मंत्री म्हणाला ते ऐकून त्याला ज्ञानबोधही झाला. त्याने लगेच हे पत्र उदयनच्या नावी लिहून पाठविले–"मित्रवर्या! माझ्या प्रजेचे प्रेम तूच माझ्याहून जास्त संपादन केले आहेस. प्रजेच्या मनात पालट आणणे हे राजाच्या हातात असते, हे तू प्रत्यक्ष दाखविले आहेस. मी यापुढे तुझ्याशी युद्ध किंवा द्वंद्वयुद्ध करण्याचा विचार मनातून काढून टाकला आहे. तू एकदां माझ्या राज्यात येऊन माझे आतिथ्य स्वीकारावेंस, अशी मी या पत्राद्वारे तुला विनंती करीत आहे!"

ते पत्र वाचून उदयनला परमानंद झाला. सुनाग व पुन्नाग देशांमधली मैत्री चिरकाल वाढतच राहिली.






[१३]

[गुहेत लपलेल्या समरसेनला व्याघ्रदत्ताच्या अनुयायांनी अकस्मात बंदी बनविले. व्याघ्रदत्ताने त्याला शाक्तेयाबद्दल व त्याच्या त्रिशूळाबद्दल प्रश्न विचारले. 'आपल्याला कांहीच माहीत नाही' असे समरसेनने सांगितल्यावर व्याघ्रदत्ताने त्याला मारावयाचे ठरविले. परंतु त्याराञी दोघां अनोळख्या सैनिकांनी त्याला बंधमुक्त केले. त्यानंतर–]

समरसेन व त्याला सोडविणारे ते दोन सैनिक त्या खेड्यांत आले, तो तेथील परिस्थिती अतिशय गडबडगोंधळ असलेली दिसली. विषारी तलवारी घेतलेले व्याघ्रदत्ताचे अनुयायी त्या गांवातील घरन्‌घर धुंडाळीत होते. बरेचसे गांवकरी भिऊन जाऊन वाट फुटेल तिकडे पळून जाऊं लागले.

"शिवदत्त कुठेय? सांगा!" असे मोठ्याने ओरडत ते सेवक सापडेल त्याला विचारीत होते. "आम्हाला माहीत नाही" असे म्हणणाऱ्यांवर नाना अत्याचार करीत होते.

आणि थोडेसे पुढे आल्यानंतर समरसेनला व त्याच्या बरोबर असलेल्या दोघां सैनिकांना हे भयंकर दृश्य दिसले. म्हणून सरळ गांवात न जातां ते तिथेंही जरा आडबाजूस असलेल्या एका झाडाआड लपून त्या गडबडीचे निरीक्षण करू लागले.




'शिवदत्त कोण बरे असावा?' अशी शंका समरसेनच्या मनांत आली. "हा शिवदत्त कोण हे तुम्हाला माहीत आहे का? तसेच त्याच्या करिता या गावकऱ्यांना त्रास देणारे हे अनुयायी व्याघ्रदत्ताच्या गटातीलच ना?" असे त्याने बाजूस असलेल्या दोघां सैनिकांना विचारले.

"ते शोधीत असलेला शिवदत्त आमचा नायक असून त्याच्या आज्ञेमुळेच आम्ही तुम्हाला तुरुंगांतून सोडवून आणले आहे. गांवाला विभत्स स्वरूप देणारे हे लोक व्याघ्रदत्ताचे अनुयायी आहेत", असे त्या सैनिकांपैकी एकाने उत्तर दिले.

हे उत्तर ऐकून समरसेनचे समाधान तर झाले नाहीच उलट अतिशय आश्चर्य मात्र वाटले. शिवदत्ताने त्याच्याकडून कसल्या तऱ्हेच्या सहाय्याच्या अपेक्षेने त्याला बंदीगृहातून सोडविले असावे हे त्याला समजले नाही. एवढेच नव्हे तर शिवदत्त व व्याघ्रदत्त यांच्यांतील वैमनस्याचे कारण काय असावे हे देखील त्याला समजले नाही.

बाजूसच असलेल्या दोघां सैनिकांना समरसेनने विचारले–"तरमग, आता आपण काय करावयास हवे आहे?" दोन्ही सैनिक मूकपणे एकमेकांची तोंडे बघू लागले. त्यांचे या पुढील कर्तव्य कोणते हे न कळल्यामुळे ते दोघेही गोंधळलेले होते.

थोडावेळ काहीतरी विचार केल्यानंतर त्यांच्यापैकी एकजण म्हणाला–"अहो! शिवदत्ताने तुम्हाला इथेच घेवून येण्यास सांगितले होते. तुमच्याशी मैत्री करण्याच्या विचारानेच त्याने आम्हाला या कामगिरीवर पाठविले. परंतु तो रहात असलेल्या या गांवाचे रहस्य व्याघ्रदत्ताला माहीत झाल्याचे दिसते. म्हणूनच त्याचे अनुयायी संपूर्ण गांवाची खडसून तपासणी करीत आहेत. शिवदत्ताला या संकटाची आगामी सूचना मिळाल्यामुळे तो इथून दूसरीकडे कुठेतरी पळून गेला असावा असे दिसते."

शिवदत्त इथून पळून जाऊन दूसरीकडे कुठे लपून बसला आहे हे कळले नाही तर आपण या संकटांत आयतेच सांपडू असे सैनिकांना व समरसेनला कळून चुकले. 'आतां पुढे काय?' अशा विचारात ते गढले असतां पाठीमागून एक बारीकशी शीळ त्यांच्या कानीं पडली, त्या सरशी तिघांनीही त्या बाजूस दृष्टी वळविली. दूरवर एका उंच झाडाच्या शेंड्यावर लपून बसलेली एक व्यक्ती त्यांच्या दिशेने हात हलवीत शीळ घालीत होती.

झाडावरून शीळ घालीत खुणा करणारी ती व्यक्ती आपला मित्र का शत्रू अशी शंका समरसेनच्या मनांत आली. परंतु या प्रांतात तो अगदी नवखा असल्यामुळे त्याच्या बरोबर असलेले दोघे जसं करावयास सांगतील तसं करण्याशिवाय दुसरा मार्ग नाही असे त्यास कळून चुकले.

त्याच्याबरोबर असलेल्या सैनिकांपैकी एकाने मोठ्याने शीळ घातली. त्याला प्रत्युत्तर म्हणून झाडावर लपून बसलेल्या व्यक्तीने दोनदां शीळ घातली.

"तो आपला मित्रच आहे. रहस्य संकेत त्याने ओळखला. तो शिवदत्ताच्या सेवकांपैकीच दिसतोय. त्याच्या सेवकांशिवाय हा संकेत इतर कुणालाही माहीत नाही. आतां चला. विलंब लावू नका." असे एक सैनिक म्हणाला. झांना पहाताच





तो माणूस झाडाच्या शेंड्यावरून खाली उतरून आला.

नवीन सैनिक, गांवाच्या दिशेला एकदा बघून म्हणाला–"तुमच्यासाठीच शिवदत्ताने मला राखण ठेवले होते. आज पहाटेच व्याघ्रदत्ताच्या सेवकांनी गांवावर हल्ला चढविला. ही बातमी शिवदत्ताला त्याच्या गुप्तचरांकडून आधीच समजल्यामुळे शिवदत्त आपल्या अनुयायांबरोबर पळून गेला."

त्याचे भाषण ऐकल्यानंतर सर्वांच्या जीवांत जीव आला. परंतु शिवदत्त सध्या कुठे आहे? त्याला कसे भेटायचे असे विचार त्यांच्या मनांत येऊं लागले.

"हा समरसेन आहे. व्याघ्रदत्ताच्या तावडीतून याला सोडवून आणीत आहोत. शक्य तेवढे लवकर याला घेवून शिवदत्ताला भेटावयाचे आहे. तो कुठे आहे, हे तुला माहीत आहे काय?" असे एका सैनिकाने त्याला विचारले.

यावर–"तो कुठे आहे हे त्याने मला कळविले नाही. परंतु नकाशा असलेला हा कागद त्याने माझ्या हाती दिला. यामध्ये 'तो असलेल्या ठिकाणाची खूण केलेली आहे' असे तो म्हणाला होता. तो नकाशा तुम्ही पारखणे चांगले. मला तो काही समजला नाही." असे म्हणत कापडामध्ये गुंडाळी करून ठेवलेला एक कागद काढून त्याने तो समरसेनला दिला.

समरसेनने तो कागद उलगडला व नीट पारखून पाहिला. त्यांत डोंगरांमध्ये दडून बसलेली कांही घरे, विहिरी, तळी यांची चित्रे होती. प्रत्येक चित्राखाली त्यांची नांवेसुद्धा लिहिलेली होती. परंतु शिवदत्त कोणत्या ठिकाणी लपलेला आहे हे समजण्यासाठी त्यांत कुठल्याही प्रकारची खूण केलेली नव्हती.

"शिवदत्त डोंगरांमध्ये लपलेल्या या गुहांच्या दिशेने पळाला आहे. परंतु संकटांत सापडलेला तो अशा ठिकाणी कां दडला आहे हे मात्र मला समजले नाही.



तेव्हा आतां आपण तिकडे जाण्याखेरीज दुसरा पर्याय नाही." असे समरसेन म्हणाला.

त्यावर सर्वांनी सम्मती दर्शक डोके हलविले. आता त्या नकाशाप्रमाणे, त्या ठिकाणी पोचण्याचा मार्ग काढण्याचे काम समरसेनवर पडले. त्याने एकदा त्या गांवाकडे पाहिले. सगळे गांव आगीच्या आहारी जात होते. व्याघ्रदत्ताचे अनुयायी आरडत-ओरडत, विनोद करीत असल्यासारखे उड्या मारीत होते.

ते पाहून समरसेनला अतिशय राग आला. परंतु त्याच्याजवळ असलेल्या अगदी मोजक्या सैनिकांच्या भरोशावर व्याघ्रदत्ताच्या अनुयायांचा सामना करणे किती धोक्याचे होते हे त्याला माहीत होते. म्हणून लगेच निघून शिवदत्ताला तावडतोब भेटावयास हवे होते. त्याच्याकडून त्याला ज्याची माहिती करून घेता येईल असे कांहीतरी मुख्य रहस्य असायलाच हवे...

असा विचार करून समरसेनने एकदा परत नीट बघून घेतले व सैनिकांच्या पुढे जाऊन वाट काढूं लागला. नकाशांत दाखविलेल्या दिशेस अनुसरून जागरुकतेने जायला हवे होते. एवढेच नव्हे तर वाटेत व्याघ्रदत्ताच्या अनुयायांच्या नजरेत येणार नाही याचीही खबरदारी घ्यावयास हवी होती.



थोडे दूरवर रानांतून चालत जाऊन सर्वजण एका डोंगराळ प्रदेशांत पोचले. तो प्रदेश लहान-मोठ्या डोंगर-रांगांमुळे उंच सखल होता. कुठेही लोकवस्तीचा मागमूस नव्हता की पायवाटेची खूण देखील नव्हती.

समरसेन पठारासारख्या एका उंच व सपाटजागी चढून चारी बाजूस पाहूं लागला. डोंगर उताराला लहान लहान डोंगरांचे सुळे मात्र दिसले. एका ठिकाणी थोडी सपाट जागाही दिसली. जर आधी त्या जागी पोचता आले तर कदाचित त्यानंतर पुढे जाण्याचा मार्ग सापडणे शक्य होईल अशी आशा समरसेनला वाटू








लागली. परंतु काही झाले तरी नकाशावरील खुणांवरून शिवदत्तापर्यंत पोचूं शकणे फार अवघड आहे असे त्याला वाटले.

सर्वजण डोंगरावरून डोंगर उतारावर आले. तो सर्व प्रदेश लहान-मोठ्या खडकांमुळे खडबडीत तर होताच पण कांटेरी झुडुपांमुळे फारच भीषण वाटूं लागला होता. नकाशांत शिवदत्ताने दाखविलेली घरे म्हणा किंवा तिथे जाण्याचा मार्ग दाखविणाऱ्या खुणा म्हणा, कुठेही नव्हत्या.

समरसेन व त्याचे सोबती आणखी थोडे पुढे गेले असतां त्यांना आश्चर्याबरोबर भीती वाटायला लावील असे एक दृश्य दिसले.

उंच असलेल्या एका डोंगराच्या कडेने एक मोठ्ठी जलधारा एका राक्षसाच्या तोंडातून मोठा ध्वनी करीत खाली पडत होती. डोंगराच्या खडकातून राक्षसाकाराचे ते डोके सुंदर रीतीने घडविलेले होते. बघणाऱ्यांना ती जलधारा एका भयंकर अशा राक्षसाच्या तोंडातून उडी घेत आहे की काय असे वाटत होते.

आश्चर्यचकित झालेला समरसेन "हे तर फारच अचंभा वाटावा असे आहे! सभोवताली कुठेही मानववस्तीचा मागमूस नसला, तरी देखील डोंगरावरील खडकांत हे राक्षसाचे डोके कोरणारा कोणीतरी



माणुसच असावा याबद्दल यत्किंचित ही शंका घेण्याचे कारण नाही." असे म्हणाला.

ते भयंकर दृश्य पाहून सैनिक तर मौन धारण करून स्तब्ध झाले. नीट पाहिल्यानंतर त्या जलपातामागे एक भुयार असल्याचे समरसेनच्या लक्षांत आले. बहुतेक त्या मार्गानेच शिवदत्त पळून गेला असावा अशी शंका समरसेनास आली. जलपातामागील प्रदेश अतिशय सुरक्षित असा होता. कुणालाही शंका येण्याचे कारण नव्हते.

समरसेनने परत एकदा तो नकाशा काढून पाहिला. त्यात एके ठिकाणी धबधब्याची खूण त्याला दिसली. 'आपणास

आलेली शंका खरी ठरली तर!' असे त्याला वाटले. सैनिक मागाहून येत होते. तो गुडघ्या एवढ्या पाण्यातून चालत जाऊन जलपाताच्या मागे असलेल्या भुयारांत शिरला. भुयारात काळाकुट्ट अंधार होता. भिऊन माघारी न फिरतां समरसेन अजून थोडा पुढे गेला तेव्हा बारीकसा उजड दिसू लागला. यानंतर डोळे दिपवील अशा सूर्यप्रकाशामध्ये एक समतल प्रदेश दिसला. त्याच्या सभोवती उंच असे डोंगर उभे होते!

समरसेन व सैनिक भुयारांतून बाहेर आले. 'तिथे मोरांचे थवेच्या थवे त्यांच्या दृष्टीस पडले. कांही मोर, पिसारा पसरवून नाचत होते, तर काही हवेमध्ये उडत केका करीत होते.

"इतक्या मोरांना एकाच ठिकाणी मी कुठेही पाहिले नाही!" समरसेन आश्चर्याने म्हणाला—"असा जलप्रपात किंवा असे मोरांचे थवे तर आम्ही कधीच पाहिले नव्हते!" त्याच्याबरोबर असलेले सैनिक म्हणाले.

थोडा वेळ त्या मोरांचा नाच बघत त्यांनी आनंदात घालविला. नंतर पुढे निघाले. थोड्याच वेळांत ते एका डोंगर गुहेच्याजवळ पोचले, इतक्यात त्यांना हत्तीचा भयंकर असा चित्कार ऐकूं आला. सर्वजण आतां कुणीकडे बरे जावे, असा विचार करीत आहेत तोच गुहेतून एक हत्ती वेगाने बाहेर आला.

हत्तीला चित्कार करीत येत असलेला पाहूनच समरसेन व सैनिक सैरावैरा पळू लागले. पळत जाऊन समरसेन एका मोठ्या खडकाआड लपला. हत्तीचे असे आकस्मिक रीतीने भुयारांतून बाहेर उडी घेणे याचा अर्थ असा की त्याला तिथे कुठल्या तरी प्रबल अशा शत्रूकडून संकटाची शंका वाटली असावी, असे समरसेनला वाटले.

हत्तीलाच भ्यायला लावणारा कोणता प्राणी भुयारात असावा बरे? शिवदत्ताने नकाशांत केलेल्या खुणांचा आपण बरोबर अर्थ घेतला नाही की काय? अशी शंका समरसेनच्या मनांत डोकावली. (क्रमशः)



# डोळे उघडले

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला—"राजा, तू कोणासाठी एवढे कष्ट सहन करीत आहेस मला माहीत नाही. तसा मनाचा निश्चयच करून कोणी कोणासाठी एवढा त्याग करायचा म्हटला तरी तो होत नाही. त्याचं उदाहरण म्हणून मी तुला श्रीपुरचा राजकुमार कामपाल याची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

श्रीपुरचा राजा गुणवर्धन याला कामपाल नावाचा मुलगा होता. तो आजारी पडला आणि त्याने अंथरूणच धरले. राजवैद्यांनी प्रयत्नांची पराकाष्ठा केली.















परंतु मुलगा दिवसेदिवस अशक्तच होत गेला. अशा परिस्थितीत एक बौद्धभिक्षू राजाच्या दरबारात आला. राजाने त्याचे यथाप्रकारे आदरातिथ्य केले आणि नम्रपणे म्हणाला—"महात्मन्! साक्षात् गौतमबुद्धच स्वत: आल्यासारखे आपण आलां आहां. आपण आमच्या या मुलाला मृत्यूच्या दाढेतून वांचवावे!"

बौद्धभिक्षू म्हणाला—"राजा, तुझा मुलगा मृत्युशय्येवर असल्याचे ऐकून त्या काळजीत तुझी राज्यव्यवस्था बंद पडल्याचे मला कळले. तुझा मुलगा जिवंत रहावा असे मनापासून कोणाला वाटत असेल तर तो नक्कीच वांचेल. त्यात मला तरी शंका नाही."

"असं काय म्हणतां भिक्षू? माझा मुलगा वांचावा, असं न इच्छिणारा माझ्या राज्यात कोणीच नसेल. सर्व, तो दीर्घायू व्हावा हेच इच्छित आहेत!" राजा म्हणाला.

"फक्त इच्छा असून काय उपयोग? राजकुमार जिवंत रहावा असे खरंच वाटत असेल तर आपलं आयुष्य त्याला देऊन स्वत:चा जीव गेला तरी मरणाला तयार असलं पाहिजे!" भिक्षू म्हणाला.

भिक्षू म्हणाला ते ऐकून राजाच्या मनात हे विचार चालू झाले : "हे होणे शक्य असेल तर मी आपले आयुष्य आपल्या मुलाला देईन. परंतु मी डोळे मिटतांच हा एवढासा मुलगा मोठा होऊन राज्यकारभार केव्हां पाहणार? तोंपर्यंत त्याचा सांभाळ कोण करणार? मी मरतांच त्याच्या चारी बाजूला कित्येक कट होतील. म्हणून मी आपल्या मुलासाठी मरणं खात्रीनेच निरर्थकच होणार!"

राणीच्या मनात हे विचार चालू होते : "माझ्या लाडक्याला मी आपलं आयुष्य दिल्यावर तो जगला तर मला आनंदच होईल! परंतु मी मरतांच राजा लगेच दुसरं लग्न करून घेणार. माझ्या मुलाला सावत्र आई छळणार. राजा नव्यातरण्या बायकोच्या फंदात पडून माझ्या मुलाला मारहाण करायला मागेपुढे पाहणार नाही. त्याला सावत्र भाऊ होणार. मग राज्यात जी भाऊबंदकी होईल तिचे दुष्परिणाम कोणाला माहीत नाहीत? तेव्हां मी मरून आपल्या मुलाला आपले आयुष्य दिल्याचा काय फायदा? मी जिवंत राहिले तर मला आणखी मुलं नाही का होणार? मी काही अजून म्हातारी झाले नाही!"

प्रधानाच्या डोक्यात हे विचार चालू होते :

"मी या राजाच्या व राज्याच्या रक्षणार्थ हजार डोळ्यांनी पहारा देतो आहे, म्हणून दोघांचं रक्षण होतं आहे. जवळपास माझ्या शौर्यपराक्रमाची व चातुर्याची माहिती असल्यामुळेच तर कोणी राज्यावर वांकडी नजर टाकीत नाही! महाराजांचे सामर्थ्य किंवा दक्षता यांची भीती कोणाला नाही! माझी कीर्तिचंद्रिका वाढत असतां या एवढ्याशा जिवासाठी मी आपलं आयुष्य देणं शुद्ध अविवेकच होईल! माझं भवितव्य उज्वल आहे! या मुलाचं प्रारब्धच संशयास्पद आहे!"

सेनापतीच्या डोक्यात हे विचार चालू होते :

"मी या राज्याच्या रक्षणार्थ आपलं सर्वस्व अर्पण करायला सिद्धच आहे! मला फक्त वीरगतीचीच कामना आहे! हे प्राणदान म्हणजे खुळेपणाच झाला! राजकुमाराचे सर्व नातेवाईक गप्प असतां मी चोंबडेपणा करणे योग्य नाही!"



दरबारातील सर्वांना राजकुमार जगला काय आणि मेला काय सारखंच होतं. ते सर्व वरकरणी प्रेमादराचं नाटकच तर करीत होते. बौद्धभिक्षू बराच वेळ कोणी काय बोलतो का, त्यांच्या तोंडाकडे पहात राहिला. नंतर म्हणाला—"राजा, पाहिलंस ना! तुझी समजूत चुकीची ठरली. तुझा मुलगा जगावा म्हणून मनापासून इच्छिणारा तुमच्या पैकी एकही दिसत नाही!" असे सांगून तो निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला—"राजा, आतां तूच सांग, तो असहाय्य

मुलगा मरणाला ठेपला असतां तो वांचावा असं वाटणाऱ्यापैकी एकही जण आपलं आयुष्य त्याला द्यायला तयार नव्हते. याचं कारण काय? इतर सर्व प्रेमसहानुभूतीचं सोंग करीत होते असं म्हटलं तरी त्याचे आईबाप स्वत: आपलं आयुष्य त्याला द्यायला कां 'कांकूं' करीत होते? माणसाच्या इच्छा, अपेक्षा व अंत:करण ही एक नसतात का? त्यात खोटेपणाच असतो का? सर्वांचं जिणं हे लबाडीचंच म्हणावयाचं का? ह्या शंकांचं समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिलं नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकलं होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"माणसाच्या इच्छा व अपेक्षा आणि अंत:करणातील गोष्ट ह्यात सर्व खोटेपणाच असतो असे नाही. जगात एकासाठी दुसऱ्याला दु:ख होते, एकाच्या आनंदाचा वांटेकरी दुसरा होतो, मुलांवर आईवडिलांचं वात्सल्य प्रेम आणि मुलांच्या मनात आईवडिलांविषयी प्रेमादर, हे सव मानव जीवनातले अनमोल असे गुण आहेत; या गुणांमुळेच मानवजीवनाला सौंदर्य लाभते. परंतु माणसामाणसातील ही प्रेमबंधने, खरं पाहिलं तर, आयुष्यभर राहणारीच नाहीत का? आईवडील आपल्या मुलांना आपल्या जीवनांतील एक भागच म्हणून त्यांच्या योगक्षेमाची काळजी वहात नाहीत का? कोणासाठी कोणी आपलं आयुष्य देणं ही केवळ भावुकपणाची 'अती'च किंवा अविचारच होईल. शांतपणे बौद्धिक दृष्ट्या विचार केल्यास त्यात मानव जीवनाचं थोर मूल्य असं काहीच नाही! उदाहरणार्थ राजा व राणीने भावूकपणे काही न करतां आपल्या बुद्धीचा उपयोग केला असं नाही का म्हणतां येणार? त्यात स्वार्थ किंवा कुतर्क म्हणण्यालायक काहीच नाही!"

अशा तऱ्हेने राजाचं मौन भंग होतांच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# लक्षात आलेली चूक

गावात कधी हे काम कर तर कधी ते काम कर, अशी काही काळ आकाशवृत्ती करीत राहिल्यावर रंगाने गाढवं विकत घेऊन ती विकायचा धंदा सुरु केला. त्या धंद्यात त्याला चार पैसे मिळू लागले. एकदां गावातल्या सोमु नावाच्या थोडया बऱ्या स्थितीत असलेल्या शेतकऱ्याने रंगाला बोलाविले आणि म्हणाला—"काय रे रंगा! गणपतशेट सावकाराच्या समोर माझं एक खोपटं आहे ना, ते गाढवं बांधायला हवं तर घे! भाडंबिडं द्यायची गरज नाही बरं का! आणि चालू दे तुझा व्यापार!"

रंगा आपली गाढवं तेथे घेऊन गेला. गाढवं दिवसभर गप्प राहायची. रात्र झाली की रेकू लागायची आणि गणपतशेटच्या घरच्या लोकांना झोंप लागू द्यायची नाहीत. गणपतशेटने रंगाला बोलवून गाढवं आणखी कोठेतरी नेऊन ठेवायला सांगितलं. पण रंगा उद्धटपणे म्हणाला—"फुकटात मिळालेली जागा सोडून देऊ म्हणतां?"

पुढे काही दिवसांनी मोठं वादळ आलं आणि ते खोपटं पडलं आणि चार गाढवं त्यात मेली. ती गावाबाहेर ओढून न्यायला पैसे नव्हते म्हणून रंगा गांवभर पैसे मागत फिरला. गणपतशेटकडे सुद्धा आला.

गणपतशेटने सहानुभूति दाखवीत रंगाला चाळीस रुपये दिले. रंगा चकित होऊन म्हणाला—"मालक या चार गाढवांना गावाबाहेर ओढून न्यायला चार रुपये पुरतील की! चाळीस रुपये कशाला हो?" "काही हरकत नाही रे, राहू दे! पुन्हा नवी विकत घेणार नाहीस का? आणि पुन्हां वादळ येणार नाही का?"

थोरामोठ्यांच्या भांडणात डोकं खुपसल्याबद्दल थोबाडीत मारून घेऊन रंगा उरलेली जिवंत गाढवं घेऊन आणखी एका जागी गेला आणि तेथे व्यापार करू लागला.





# गर्विष्ठ जमिनदार

रामपूरच्या जमिनदाराला त्याच्या श्रीमंतीच्या गर्वाबरोबर चार चौघांमध्ये मोठा दानशूर म्हणवून घेण्याची आकांक्षासुद्धा फार होती. या कारणामुळे चार चौघे लोक असतांना कोणी त्याच्या समोर येऊन हात पसरला, तर म्हणे–"घरी ये की रे! तुला जे पाहिजे ते मागून घेऊन जा!

सर्व गावकरी म्हणत–"जमिनदार साहेब म्हणजे आमच्या गावचे कर्ण आहेत." परंतु खरं गुपित त्या जमिनदाराकडे जाऊन प्रत्यक्ष मागत त्यांना कळे. त्यांना काही मिळायचं तर दूर, माना खाली घालून घरी परतावे लागे.

"काय रे, वेळ अवेळ काही आहे की नाही? मी चार चौघांबरोबर बोलत असतां तोंड वेंगाडायला यायला तुला लाज नाही वाटली. आणखी हे पहा, मी तुला रिकाम्या हातांनी परत पाठविलं असं कोठे बोललास तर चामडी लोळवीन! खबरदार!" या शब्दात बजावून परतवी.

येणारे गरीब लोक एक चकार शब्द न बोलतां निघून जात, एवढेच नव्हे तर जमिनदाराविरुद्ध एक शब्दही कोणासमोर बोलत नसत. या गोष्टी ज्यांना माहीत नसत ते लोक मात्र जमिनदाराला दानवीरच समजत आणि जमिनदाराला गावातल्या रथोत्सवाच्या वेळी व इतर समयी बोलवून त्याला मोठा मान देत. एवढेच नव्हे तर त्याची कामं स्वतःवर ओढून घेऊन त्यामुळे होणारं नुकसान सुद्धा सहन करीत. अशा तऱ्हेने जमिनदाराला कीर्ती मिळे आणि त्याची कामे फुकटात निघत.

एके दिवशी लखुजी नावाचा एक गरीब शेतकरी दारिद्र्याच्या ओझ्याखाली वाकून गेल्यामुळं व बायकापोरांना दोन वेळ खायला मिळत नसल्यामुळ नडलेल्या स्थितीत मदत मागण्यासाठी जमिनदाराकडे गेला. तेव्हां जमिनदार गावच्या पारावर चार लोक जमले होते तेथे बसलेला होता. चारी बाजूला लोक दूर उभे राहून जमिनदाराचे कृपाकटाक्ष त्यांच्यावर पडतील म्हणून वाट पहात हात बांधून उभे होते.

लखुजीने हात जोडून जमिनदाराजवळ त्याची दारिद्र्यदशा वर्णन करून सांगितली व दयेची भीक मागितली.

जमिनदार अगदी कीव आल्यासारखा त्याच्याकडे पहात सहानुभूति दाखवीत म्हणाला–"काय रे, इतकी अवस्था होईपर्यंत तू वाट पहात राहिलास? माझ्याकडे कां नाही आलास? अजून काही बिघडलं नाही. संध्याकाळी घरी ये आणि मी एक दुभती गाय देतो ती घेऊन जा."

जमिनदाराच्या औदार्याची लखुजीने मनोमन स्तुती केली.

त्या दिवशी संध्याकाळी तो जमिनदाराच्या घरी गेला तेव्हां जमिनदार साहेब दारातच होते. म्हणाले–"काय रे, तुला आपलं दारिद्र्य चवाठ्यावर दाखवायला गावचा पारच सांपडला वाटतं? घरी येऊन तू मागितलं असतंस तर मी काय मदत केली नसती? तुला दुभती गाय दान करायला तू कोणी दशग्रंथी ब्राह्मण आहेस वाटतं? चालू लाग, पुन्हां या बाजूला आलास तर पहा आणि ही गोष्ट जर का कोठे बोललास तर जीभ उपटून काढीन!"



हे सर्व बोलणारा दानशूर जमिनदारच ना? असा विचार करीत अवाक् होऊन लखुजी जमिनदाराकडे क्षणभर पहात राहिला. नंतर मान खाली घालून त्याने घराची वाट धरली. किती गरीब असला तरी लखुजी स्वाभिमानी होता. देतों, म्हणून सांगून द्यायचं तर दूरच, इतक्या कठोर शब्दात जमिनदाराने अपमान करावा, हे लखुजीला फार झोंबलं.

लखुजी बराच वेळ विचार करीत राहिल्यावर शेवटी त्याला काहीतरी चांगली युक्ती सुचल्यासारखी मान हलवीत बायकोला म्हणाला—"जमिनदार आपल्याला दुभती गाय देईल तिच्यामुळे आपलं जन्म-दारिद्र्य जाईल असे मला कधी स्वप्नातही वाटले नव्हते. परंतु त्याने दान तर दिलेच नाही आणि माझा असा अपमान कां करावा? त्याला याचा चांगला धडा द्यायचा मी ठरविला आहे!"

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी योजल्या-प्रमाणे लखुजी जमिनदाराची गुरं चरत त्या हिरव्यागार कुरणाकडे गेला आणि दोन चांगल्या दुभत्या गाई घेऊन पारावर मंडळी जमतात तिकडे निघाला. ते पाहून जमिनदाराचा गुराखी जमिनदाराच्या कानावर ती गोष्ट घालण्यासाठी तेथे धावत गेला.

त्यावेळी पारावर जमिनदार मधोमध बसला होता आणि पुष्कळशी गावकरी प्रमुख मंडळी त्याच्या चारी बाजूला उभी होती. जमिनदार साहेब काहीतरी बोलत होते. तेथे थोडा आधी लखुजी व त्याच्या पाठोपाठ गुराखी आला.

लखुजी जमिनदाराला नमस्कार करून म्हणाला—"मालक, तुम्ही एवढी कृपा करून एक नाही या दोन दुभत्या गाई दिल्यात आणि तुमचा हा गुराखी मी चोरून आणल्या म्हणतो आहे! आपल्या कानावर ही गोष्ट घालावी म्हणून आलो आहे, मालक!"

जमिनदाराला तोंड दाबून बुक्कयांचा मार बसल्यासारखे झाले.





# सुखसमाधान

इटलीतील एका खेडेगावात दोघे शेतकरी रहात असत. दोघांना मुलं झाली. त्यांनी दोघांनी मिळून आपापल्या मुलांची नावे ठेवायची ठरवून बारशाची सर्व तयारी केली. एकाने आपल्या मुलाचे नाव फँको ठेवले तर दुसऱ्याने जिराल्डो ठेवले. मुलांची ही नावे ठेवली तेव्हां बारशाच्या वेळी त्या नावाचे देव हजर असतात असा एक विश्वास त्या काळच्या लोकात होता. म्हणून दोघां शेतकऱ्यांनी जेवायच्या टेबलाजवळ दोन खुर्च्या जेवायला येणाऱ्या देवांसाठी रिकाम्या ठेवल्या.

बारशाची जेवणं आनंदाने चालू होती. अगदी शेवटी शेवटी दोघी देवी आल्या. दोघां देवींतली एक म्हातारी देवी होती. ती हसतमुखाने येऊन फँकोच्या आईच्या शेजारी येऊन बसली. दुसरी जिराल्डोच्या आईच्या शेजारी बसली.

म्हातारी देवी फँकोला कुरवाळीत म्हणाली—"मी हा मुलगा दीर्घ आयुरा-रोग्य असलेला होवो असा आशीर्वाद देते आणि याला ही एक 'विचित्र बांसुरी' बारशाची भेट म्हणून देते. ही याने कधी वाजविली तर याची काळजी चिंता दूर होईल व हा सुखासमाधानाने राहील."

दुसरी देवी जिराल्डोच्या डोक्यावर हात ठेवीत म्हणाली—"मी या जिराल्डोला एक अत्यद्भुत भेट देते आहे. ही भेट असली म्हणजे हा नित्य ऐश्वर्यवान राहील. याला पैशाची गरज भासली की याने हे कागदाचे पाकीट उघडून 'तांबे, चांदी व सोने' असे म्हणावे, पाकिटात तिन्ही धातूंची नाणी येतील. परंतु एक गोष्ट लक्षात असू द्या, हे दर दिवशी फक्त एकदांच होईल बरं का!"

इटलीतील लोककथा

बारशाच्या भेटी देणाऱ्या दोघी देवी भेटी देऊन अंतर्धान पावल्या.

जिराल्डोच्या आईवडिलांना देवीने दिलेली भेट पाहून परमानंद झाला. फँकोच्या आईवडिलांना मात्र आनंद वाटला नाही. दोघांची फार निराशा झाली. नित्य सुखासमाधानाने राहिलं तर त्यात विशेष फायदा असा काय? त्यात सुखासमाधानाने पोट भरणार आहे का, की खर्चाला काही मिळणार आहे? असं त्यांना वाटलं.

मुलं हळूहळू वाढू लागली. दोघे त्यांना मिळालेल्या भेटीचा उपयोग करून आनंदाने रहात होते, परंतु जिराल्डोला दररोज तीन धातूंची तीनतीन नाणी मिळत, ती पाहून फँकोच्या आईवडिलांना हेवा वाटे. जिराल्डोच्या आईवडिलांना वाटे की ती फार मोठी मंडळी होऊ लागली आहेत आणि ती फँकोच्या आईवडिलांकडे थोड्या उपेक्षेने पाहू लागली.

काही काळ लोटल्यावर दोघां मुलांना एका राजाच्या पदरी सैनिकांची नोकरी लागली. त्या राजाशी युद्ध करून शत्रूने त्याचा पराभव केला व त्याच्या दोघां सैनिकांना–फँको व जिराल्डोला धरून आपल्या बागेत कामाला लावले.

कैदी झाला असूनही फँको आपल्या जवळच्या बासुरीमुळे कधी दुःखी किंवा उदास झाला नाही. तो नेहमी सुखासमाधानानेच राही. जिराल्डो मात्र दररोज पैसे मिळत असूनही कधी सुखी दिसला नाही. एकदा तो राजाकडे गेला व त्याने त्याला 'कैदेतून सोडायला किती पैसे द्यावे लागतील' असे विचारले. ते ऐकून त्या राजाला हंसू आले. एका सामान्य शेतकऱ्याचा मुलगा पैशाच्या गोष्टी काय बोलतो आहे? तो, पाहुया तरी, असा विचार करून म्हणाला–"मला साठ सोन्याची नाणी दिली पाहिजेस!"

"मी वीस दिवसात ती नाणी तुमच्याकडे पोचती करतो." जिराल्डो म्हणाला, ते ऐकून राजाला आश्चर्यच वाटले. तो कसा देतो हे पाहू या तरी, असा विचार करून राजाने जिराल्डोवर बारीक नजर ठेवण्यासाठी काही हेरांना नेमले. जिराल्डो दररोज कातड्याच्या पाकिटांतून नाणी काढी, ते त्या हेरांनी पाहिले आणि राजाला कळविले. ते विचित्र पाकिट आपल्याजवळ असले तर आपल्याला पुष्कळ पैसे मिळविता येतील असे राजाला वाटले.

"तू साठ नाणी वीस दिवसात दिलीस तरी मी तुला सोडणार नाही!" राजा म्हणाला. तो पुढे म्हणाला–"तू ती नाणी दररोज तीनतीन देत राहिलं पाहिजेस. नाही तर तुला आणखी जास्त कठोर शिक्षा करीन."

नाइलाज झाल्याने जिराल्डो दररोज तीनतीन नाणी पाकिटातून काढून राजाला देऊ लागला. मध्यंतरी त्या राजाच्या मुलीला कोणतातरी आजार झाला. तो आजार कमी व्हायच्या ऐवजी





वाढतच गेला. त्यामुळे ती दिवसेंदिवस खंगत गेली. हातापायांच्या काड्या झाल्या. ती काही खातच नसे. कित्येक वैद्यांचे किती औषधपाणी करूनही तिला आराम पडेना. शेवटी एका मंत्र्याने राजाला एक सल्ला दिला. म्हणाला–"आपल्या कैद्यांत फँको नावाचा एक कैदी आहे. तो नेहमी आनंदात असतो. त्याला विचारून पहावे, कदाचित तो काही युक्ती सुचवील!"

राजाने लगेच फँकोला बोलावून त्याला राजकन्येच्या आजाराविषयी सविस्तर सांगून त्याचा सल्ला विचारला. फँकोने आपली बांसुरी काढली व राजकन्येजवळ बसून गोड स्वर काढू लागला. राजकन्येच्या डोळ्यात आनंदाची एक लहर डोकावू लागली. तिने काहीतरी खायला द्यायला खुणेने सांगितले.

राजाने खूष होऊन फँकोला त्याच्या उपकाराबद्दल तुरुंगातून सोडले. फँको म्हणाला–"माझ्याबरोबर तुम्ही सर्व कैद्यांना बंदीमुक्त केलेत तर मला बरे वाटेल."

राजाला ते मान्य नव्हते. ते त्याने मान्य केले असते तर त्याला जिराल्डोकडून दररोज तीन नाणी मिळत ती बंद होतील ही भीती होती. परंतु फँकोने आग्रह धरला. काय वाटेल ते करून सर्वांना सुटका द्यावी अशी त्याने विनंती केली. म्हणून शेवटी फँकोमुळेच आपली मुलगी बरी झाली एवढ्यावर संतोष मानून त्याने सर्व कैद्यांना सोडून दिले.

फँको व जिराल्डो आपल्या गावी निघाले एका नदीकाठी येतांच जिराल्डोने आपले चामड्याचे पाकीट नदीच्या पाण्यात टाकून दिले. फँको चकित होऊन जिराल्डोकडे पाहू लागला.

"ते पाकीट मला नको, त्याच्यामुळे मला आयुष्यभर कष्टच कष्ट सहन करावे लागले, आनंद कधीच मिळाला नाही. देवीने तुला दिलेली भेटच जास्त चांगली आहे. माणसाला पैशापेक्षा सुखसमाधानच जास्त आवश्यक असतं!" जिराल्डो म्हणाला.





# कुबेराचे सरोवर

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी त्याचा मुलगा म्हणून अवतार धारण केला. राजाने त्यांचे नाव महाशासन असे ठेवले. आणखी काही काळ लोटल्यावर राणीला आणखी एक मुलगा झाला. त्या मुलाचं नाव सोमदत्त असं ठेवण्यात आलं.

दोन मुलं झाल्यानंतर दोन वर्षांनी राणी स्वर्गलोकी निघून गेली. राजानं आणखी एक लग्न केलं. दुसऱ्या राणीला एक मुलगा झाला. ती शुभवार्ता ऐकून राजाला परमानंद झाला. राणीला भेटून राजा म्हणाला–"राणी, काय वाटेल तो वर मागून घे!"

राणी म्हणाली–"हा वर मी पुढे कधी आवश्यक वाटेल तेव्हां मागून घेईन!"

धाकट्या राणीच्या मुलाचं नाव आदित्य होते. त्याने वयाप्रमाणे राजोचित सर्व विद्या शिकून घेतल्या व यथासमयी एक सुंदर तरुण युवक झाला. राणी एकदां राजाला म्हणाली–"आपण तेव्हां एक वर देतो, म्हणाला होतां; तो वर मी आतां मागते आहे. आदित्याला युवराज म्हणून अभिषेक करावा!"

राणीची ती इच्छा ऐकून राजा अवाक् झाला. म्हणाला–"थोरल्या राणीची दोन मुलं असतां धाकट्या मुलाला युवराजपद कसं देता येईल? तू मागितलेला वर न्याय्य नाही!" राजाने सांगून टाकलं.

एके दिवशी राजाने आपल्या दोघां थोरल्या मुलांना बोलावून सर्व गोष्टी समजावून सांगितल्या व म्हणाला–"तुम्ही राजधानी बाहेर दूर कोठेतरी काही काळ जाऊन रहा कसे! माझ्यानंतर राज्य तुम्हांलाच मिळणार आहे. म्हणून तेव्हां परत येऊन राज्यभार हाती घेता येईल."



असा राजाने त्यांना सल्ला दिला. पित्याने सुचविल्याप्रमाणे महाशासन व सोमदत्त राजधानी सोडून निघाले. ते राजधानीच्या वेशीपर्यंत पोचले असतील नसतील, तेवढ्यात आदित्य त्यांच्या पाठोपाठ आलाच. तिघे मिळून प्रवास करीत हिमालय पर्वतात काही दिवस भ्रमण करीत फिरल्यावर तेथील अरण्य प्रांतात येऊन पोचले.

एके दिवशी तिघे दमून भागून एका झाडाखाली विश्रांतीसाठी येऊन बसले. महाशासन धाकटा भाऊ आदित्य याला म्हणाला–"आदित्या! ती झाडं दिसत आहेत ना. त्यांच्या जवळपास एक सरोवर दिसतं आहे. तू स्वतः पाणी पिऊन घे आणि आम्हां दोघांसाठी कमळाचे दोन द्रोण करून त्यात प्यायला पाणी घेऊन ये."

आदित्य त्या सरोवरावर गेला आणि पाणी प्यायला म्हणून त्याने सरोवरात पाय टाकला मात्र, एका यक्षाने त्याला धरलं आणि त्याला घेऊन तो सरोवराच्या बुडाशी त्याचं घर होते तेथे घेऊन गेला. बराच वेळ झाला तरी आदित्य न आलेला पाहून महाशासनाने सोमदत्ताला चवकशी करायला व स्वतः पाणी पिऊन एक द्रोण भरून पाणी आणायला पाठविले, त्याने पाण्यात पाऊल टाकल्याबरोबर यक्षाने त्यालासुद्धा धरून नेले.

काही वेळ वाट पाहून महाशासन स्वतः दोघां धाकट्या भावांच्या शोधार्थ निघाला. दोघांना काही अपाय तर नाही झाला, ही शंका त्याच्या मनात होती. म्हणून तो तलवार उपसूनच सरोवराच्या काठी आला. परंतु तो सरोवरात उतरला नाही व सरोवराकडे बराच वेळ निरखून पहात उभा राहिला. ते पाहून यक्षाने ओळखलं की हा धाकट्या भावांसारखा घाईघाईने पाण्यात उतरणार नाही.

यक्ष एका कोळ्याचं सोंग करून महाशासनजवळ येऊन म्हणाला–"तुम्ही असे पहात उभे कां आहांत? तहान लागली असेल



तर पाण्यात उतरून पाणी पिऊन घ्या की!" महाशासनाने ते ऐकून यात काहीतरी लबाडी असली पाहिजे, हे ओळखले व म्हणाला–"तुझ्या बोलण्या वागण्यावरून तू माझ्या दोघां धाकट्या भावांना काहीतरी केले असावेस अशी मला शंका येते आहे."

"तू थोडा विवेकवान दिसतो आहेस खरा. तरमग खरं ते ऐक. एका ज्ञानसंपन्न विवेकी व्यक्तीला सोडून बाकी सरोवराजवळ जो कोणी येईल त्याला मी धरतो. अशी आमचे प्रभू कुबेर यांची मला आज्ञा आहे." यक्ष म्हणाला.

"म्हणजे ज्ञानसंपन्न व्यक्तीकडून तुला उपदेश हवा आहे, असंच ना? मी तुला ज्ञानबोध करतो. परंतु मी वाटेने चालून दमून भागून गेलो आहे." महाशासन म्हणाला.

लगेच यक्ष त्याला आदरपूर्वक आपल्या घरी सरोवराच्या तळाला घेऊन गेला व त्याचा सर्व प्रकारे अतिथिसत्कार वगैरे करून त्याला बसायला त्याने योग्य आसन दिले व स्वतः त्याच्या पायांजवळ बसला.

महाशासनाने त्याला गुरुकडून जो ज्ञानबोध झाला होता त्याबरोबर स्वानुभवाने त्याला मिळालेले ज्ञान सर्वांचा समग्रबोध यक्षाला करून दिला.

लगेच यक्षाने कोळ्याचं सोंग टाकून दिलं व स्वस्वरूपात प्रगट होऊन म्हणाला–"देवपुरुषा, तू फार मोठा ज्ञानी पुरुषही



आहेस. मी तुझ्या दोघां भावांपैकी तुला जो हवा तो परत द्यावा म्हणतो आहे. तू कोणाला तो मागून घे!"

"तरमग आदित्याला दे!" महाशासन म्हणाला.

"आपल्या सख्ख्या पाठच्या भावाला मागायचं सोडून तू आपल्या धाकट्या सावत्र भावाला मागून घेतो आहेस, हा न्याय झाला का?" यक्षानं विचारले.

"यात न्याय्य नाही असं काय आहे? मी माझ्या आईचा आहेच आहे. मग माझ्या सावत्र आईला एकजण नको का? माझ्या सावत्र आईने आपल्या एकुलत्या एका मुलासाठीच राज्य नव्हते का मागितले? आम्ही दोघे वडिलांच्या आज्ञे-प्रमाणे राज्य सोडून निघालो असतां भ्रातृभावाने तो भोळा भाऊ नाही का आमच्याबरोबर आला? आम्ही दोघे जर राजधानीत परतलो तर आमची सावत्र आई विचारणार नाही का की आदित्य कोठे आहे? प्रजेने विचारलं तर, यक्षाने त्याला खाल्लं असं सांगून मी मोकळा होऊ म्हणतोस का?" महाशासनाने यक्षाला उलट प्रश्न विचारले.

तेव्हां यक्ष महाशासनाचे पाय धरून म्हणाला—"मी तुझ्यासारखा ज्ञानसागर आजपर्यंत पाहिला नाही. मी तुझ्या दोघां धाकट्या भावांना सोडीत आहे. तुम्ही या अरण्यात रहाल तितके दिवस माझे अतिथी म्हणून रहा!"

महाशासन आपल्या दोघां भावांसह यक्षाचे पाहुणे म्हणून राहू लागले. काही दिवसांनी त्यांचे वडील ब्रह्मदत्त महाराज वारल्याचे कळले तेव्हां महाशासन आपल्या दोघां भावांना बरोबर घेऊन यक्षासह काशीला गेला.

महाशासनाचा राज्याभिषेक झाला. त्याने सोमदत्ताला आपला प्रधान व आदित्याला आपला सेनापती नेमले. त्याला मदत करणाऱ्या यक्षाला त्याने चांगलेसे घर बांधून दिले व त्याच्या सुखसोयीसाठी दासदासी नेमले.





## हर्षवर्धन

सुमारे चवदा शतकांपूर्वी प्रभाकरवर्धन नावाचा राजा स्थानेश्वर नावाच्या राजधानीच्या गादीवर राज्य करीत असे. त्याला राज्यवर्धन व हर्षवर्धन नावाचे दोन मुलगे व राज्यश्री नावाची एक मुलगी होती. कनोज देशाचा राजा गृहवर्मा याच्याशी राज्यश्रीचं लग्न झालं

गृहवर्मा आपल्या बायकोबरोबर कनो-जला परतल्यानंतर काही दिवसांनीच मालवा देशाच्या राजाने कनोजवर स्वारी केली. त्या युद्धात गृहवर्मा धरातीर्थी पडला.





विजयी मालव देशाच्या राजाने राज्य-श्रीला कैद केले व तिला बेड्या घालून आपल्या राजधानीला घेऊन गेला. ते ऐकून प्रभाकरवर्धन राजाला व त्याच्या दोघां मुलांना फार वाईट वाटले.

स्थानेश्वरच्या युवराजाने, म्हणजे राज्यवर्धनाने मोठ्या सैन्यानिशी मालव देशावर स्वारी केली आणि शत्रूचा पराभव केला. राज्यश्री कैदेतून सुटली. थोरला भाऊ व बहीण परस्परांकडे पाहून ओक्साबोक्शी रडू लागली. राज्यवर्धन स्थानेश्वरला निघाला.





गौडवाना राज्याचा राजा शशांक याची नजर कनोज व मालव देशावर फार दिवसांपासून होती. त्याने राज्यवर्धनच्या सैन्यावर गनिमी काव्याने हल्ला करून राज्यवर्धनाला युद्धात ठार केले. परंतु सुदैवाने राज्यश्री स्वतःचा बचाव करून पळून गेली.

परंतु या दोन्ही अशुभवार्ता ऐकून प्रभाकरवर्धनाच्या मनावर फार परिणाम झाला व तो मरण पावला. मंत्र्यांनी व सामंतांनी हर्षवर्धनाला गादीवर बसविले. व त्याच्या सोळाव्या वर्षी हर्षवर्धन स्थानेश्वराचा राजा झाला.







गादीवर बसतांच हर्षवर्धनाने आपली बहीण राज्यश्रीचा शोध केला. तो एका अरण्यात फिरत असतां एका जागी क्रूर व निरुपद्रवी जनावरे एकत्र रहात असलेली पाहून चकित झाला.

ही विचित्र गोष्ट होण्यास कारण त्या भागात राहणारा कोणी थोर पुरुष असावा असे त्याला वाटले. तो काही अंतर चालून गेला असेल, त्याला काही साधू येत असलेले दिसले. ते हर्षवर्धनला आपल्या गुरूकडे बोलावून घेऊन गेले. तितक्यात तेथे एका साधूने येऊन एका जागी एक स्त्री अग्निप्रवेश करण्यास सिद्ध असल्याचे सांगितले.





हर्षवर्धन व तो गुरु त्या बाजूला घाईघाईने गेले. ती स्त्री दुसरी तिसरी कोणी नसून हर्षवर्धनाची बहीण राज्यश्रीच होती. तिला हर्षवर्धनाने ऐन वेळी तेथे पोचून वाचविले.

हर्षवर्धन तिला स्थानेश्वरला घेऊन गेला व त्याने, एक वडील म्हणून तिने त्याच्याकडे रहावे असा आग्रह केला. "नंतर केव्हां तरी आपण दोघं राज्यलोभ सोडून वनवास घेऊ या!" असेही तो म्हणाला.





नंतर हर्षवर्धनाने त्याच्या वडील भावाचा वध करणाऱ्या शशांक राजावर स्वारी करून त्याचा पराभव केला. नंतर त्याने अनेक राज्ये जिंकून एक साम्राज्य स्थापन केले. राज्यात सर्वत्र सर्व धर्मानुयायांना आपापल्या मताप्रमाणे धर्माचरण करण्यास पूर्ण स्वातंत्र्य दिले.

त्याने अनेक वेळी आपली सर्व संपत्ती विद्वानांना व गरिबांना वाटली होती. अशाच एका प्रसंगी त्याने आपले सर्वस्व दान करून त्याच्या बहिणी-कडून अंगावरची वस्त्रे भिक्षा मागून घेतली.





# सुईमुळे लाभलेले भाग्य

फार पूर्वी कोशल देशात तिघे मित्र रहात होते. त्यातले दोघे नंद व सुनंद श्रीमंत होते. तिसरा आनंद फार गरीब होता. तो दोऱ्या विणून आपला उदरनिर्वाह चालवीत असे. आपला हा मित्र आपल्यासारखाच श्रीमंत व्हावा, व त्यासाठी वाटेल तो प्रयत्न करावा लागला तरी करायचे नंद व सुनंद दोघांनी ठरविले.

नंद म्हणाला–"चार पैसे हातात असले म्हणजे पुष्कळ पैसे मिळविता येतील. म्हणून आपण आपल्या मित्राला थोडं भांड-वल पुरवू या."

सुनंद म्हणाला–"अरे, मोठमोठे श्रीमंत-सुद्धा हातात चौपडी घेऊन हिंडतात हे आपण पाहिले नाही का? नशिबात असेल तर तसं मोठं भांडवल असण्याचीसुद्धा गरज नाही."

आपली गोष्ट खरी असल्याचे सिद्ध करून दाखविण्यासाठी नंदने आनंदला दोनशे रुपये दिले व ते भांडवल म्हणून वापरायला सांगितले. त्या भांडवलावर काहीतरी व्यापार करायला त्याने आनंदला सुचविले. आनंदला फार आनंद झाला. त्याने त्या दोनशे रुपयातील दहा रुपये स्वखर्चासाठी काढून ठेवून बाकी एकशे नव्वद रुपये आपल्या पागोट्यात पुरचुंडी करून सुरक्षितपणे खोचून ठेवले आणि बाजारात सामान विकत घ्यायला निघाला. परंतु त्याच्या दुर्दैवाने कोणतातरी एक पक्षी उडत आला आणि आनंदच्या पागो-ट्यातली पुरचुंडी पाहून व तीत काही-तरी खाद्यपदार्थ असावा असे समजून ती उचलून उडून गेला. ते एकशे नव्वद रुपये पंख फुटल्यासारखे अशा तऱ्हेने गेल्याबद्दल आनंदाला फार वाईट वाटले.

पुढे काही दिवसांनी नंद व सुनंद आनंदला भेटायला आले व त्याच्या

स्थितीत काही एक बदल न झालेला पाहून त्यांनी त्याचे कारण विचारले.

आनंद अत्यंत दुःखी स्वरात म्हणाला—"माझं नशीबच फुटकं. मी सर्व पैसे पागोट्यात ठेवले होते, परंतु ते सर्व पैसे एका पक्षाने उडवून नेले."

नंदला ते खरे वाटले, परंतु सुनंदला खरे वाटले नाही. तरी नंदने आनंदला पुन्हां दोनशे रुपये दिले व म्हणाला—"ह्या खेपेस जरा जास्त सावधगिरी बाळग आणि यांचा उपयोग करून जास्त पैसे मिळव."

या खेपेस आनंदने त्याला हवे होते तेवढे पैसे काढून घेऊन बाकी पैसे कोंड्याच्या टोपल्यात खाली बुडाला ठेवून दिले आणि सामान आणायला बाजारात निघून गेला. परत येऊन पाहतो तर कोंड्याचे टोपलेच नाहीसं झालेलं होते. त्याने बायकोला विचारलं. ती म्हणाली—"मीठ दारावर आलं. जवळ पैसे नव्हते. म्हणून मी तो कोंडा देऊन दोन शेर मीठ विकत घेतले.

आनंदला या वेळी मात्र आपलं भाग्य फुटकं असल्याची खात्री झाली.

आणखी काही दिवसांनी नंदसुनंद दोघे चवकशीला आले व आनंदला पूर्वीपेक्षा जास्त गरीब पाहून त्यांना आश्चर्य वाटले. त्याचे कपडे जुने व फाटके होते. "काय रे, तुझे कपडे असे फाटके का?" त्यांनी विचारतां तो म्हणाला—"कपडे शिवायला घरात सुईतरी कोठे आहे?"



सुनंद एक सुई आनंदला देत म्हणाला—"शवून घे!" नंतर नंद व सुनंद दोघे निघून गेले.

त्या दिवशी रात्रीच शेजारी राहणाऱ्या कोळ्याची बायको आनंदच्या बायकोकडे येऊन म्हणाली—"ताई, तुमच्या घरात सुई असली तर जरा देतेस का? उद्या पहाटे हे मासे धरायला जाणार आहेत. जाळं शिवून काढायचं आहे. जाळ्यात मासे सापडतील ते मी तुला देईन."

आनंदच्या बायकोने तिला घरातली सुई आणून दिली.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी घरी परतल्यावर कोळ्याने आपल्या मुलीच्या हाती त्याच्या जाळ्यात पडलेला एक मोठा मासा देऊन तो आनंदच्या बायकोला नेऊन यायला पाठविले. आनंदच्या बायकोने तो मासा कापला तर त्यांतून काचेच्या गोटी सारखं काही तरी निघालं. ती गोटी घेऊन आनंदची मुलं रस्त्यावर खेळत असतां एका जव्हेऱ्याने ती पाहिली व ती घेऊन तो आनंदकडे येऊन म्हणाला—"ही काचेची गोटी मला विकतोस का रे? तुला शंभर रुपये देतो!" ती गोटी फार किमतीची असावी असं आनंदला वाटलं व त्याने ती विकायला नकार दिला. त्याच दिवशी तो ती गोटी घेऊन बाजारपेठेत गेला व त्याने एका जव्हेऱ्याला ती दाखविली. तो एक मूल्यवान हिरा होता. जव्हेऱ्याने वीस हजार रुपये देऊन आनंद जवळून तो विकत




Restore







घेतला. त्या पैशांनी आनंदने एक घर व मोठे आवार विकत घेतले. दोऱ्या वळायचे त्याने एक यंत्र तयार करून घेतले आणि दोऱ्या वळायचा एक कारखानदार झाला.

आनंदला एकाएकी श्रीमंत झाल्याचं कळतांच त्याचे मित्र नंद व सुनंद त्याला भेटायला आले.

"मी दिलेल्या पैशाच्या भांडवलावर तू एवढे पैसे मिळविलेस ना काय रे?" नंदने विचारले.

आनंदने घडलेला वृत्तांत जशाचा तसा सांगितला. "नशिबांत होते म्हणून मी दिलेल्या सुईने त्याचं नशीब उजाडलं, पाहिलंस?" सुनंद म्हणाला.

परंतु ते सर्व नंदला खरे वाटलं नाही. याने मी दिलेल्या पैशांवरच नशीब काढले, परंतु सर्व खोटं बोलतो आहे, असे त्याला वाटलं.

तिघे मित्र आनंदचं नवे घर व त्याच्या पाठीमागचं आवार पहायला निघाले. ते आवारात पोंचले त्यावेळी आनंदची मुलं झाडावर चढून पक्ष्यांच्या घरट्यात अंडी आहेत की पक्षी पहात होती. ते घरटंच तेव्हां जमिनीवर पडलं. त्यांत आनंदचं पागोटं दिसलं. त्यात खुपसलेली पैशांची पुरचुंडी तशीच होती. ती सोडून पाहिली तर तीत एकशे नव्वद रुपये तसेच ठेवलेले होते.

नंतर तिघे मित्र तिकडून गुरांच्या गोठ्यात गेले. त्याच वेळी एक नोकर कोंड्याचं एक टोपलं बाजारातून विकत घेऊन आला. त्यांतला कोंडा काढून तो आंबोणात टाकू लागला तेव्हां सोन्याची काही नाणी त्याच्या हातांत आली. टोपलं उपडं करून जमिनीवर आपटलं तर आनंदने दिलेली व त्यांत ठेवलेली एकूण एकशे नव्वद नाणी निघाली.

ती पाहतांच नंद आनंदवर संशय केल्याबद्दल मनातल्या मनात विचार करू लागला. सुनंद म्हणाला तसं नशिबांत असलं तर सुईनेसुद्धा माणसांचं भाग्य उदयास येते, ही गोष्ट त्याला पटली.



# फुकट गेलेले दोन वर

एक माणूस गरीबीच्या ओझ्याखाली चिरडून गेला होता. त्याच्या घरी एकदां एक साधू आला. त्या गरीब माणसाने त्या साधूला पोटभर जेवायला वाढले. त्या साधूने जातांना त्या गरीबाला दोन वर देऊन दोन मंत्र दिले. म्हणाला—"तुला गरज पडेल तेव्हां या मंत्रांचा जप कर तुला इच्छिलेली वस्तू मिळेल."

त्या गरीबाने खूप श्रीमंत व्हावे अशी इच्छा करून एका मंत्राचा जप केला, घरभर सोने असावे असे मागितले. त्या प्रमाणे त्याला सोने मिळालेही. परंतु त्याला भीती वाटू लागली की ही गोष्ट राजाला कळली तर तो आपल्याला चोर ठरवून तुरुंगात टाकील आणि सर्व सोने उचलून घेऊन जाईल.

तो विचार मनात येतांच त्याने दुसऱ्या मंत्राचा जप करून ते सोने त्याच्याशिवाय इतर कोणाला दिसू नये असा वर मागून घेतला. लगेच तसे झाले. त्याच्याशिवाय आणखी कोणाला न दिसणारे सोने निरुपयोगी झाले. तो गरीब गरीबच राहिला.





# चोर व विंचू

मध्य रात्र उलटून गेल्यावर सुजाता गाढ झोपेत असतां तिला कोणीतरी "आई, आई ग!" असं म्हटल्याचा आवाज ऐकू आला. ती उठून बसली. तिला उशाच्या बाजूला कोणी उभा असलेला माणूस दिसला. तो हात झाडीत होता. ती घाबरून उभी राहिली.

घरात ती एकटीच होती. तिचे बाबा तिच्यासाठी शेजारच्या गावी चांगलं स्थळ असल्याचं ऐकून चवकशीसाठी तिकडे गेले होते. कोणीतरी चोर सैंपाकघरावरच्या छपरावरची कौले काढून घरात शिरला होता. सुजाता घाबरून गेली होती व तिला काय करावे, कळेना.

चोर तिला म्हणाला–"लवकर बाजूला हो, तुझ्या उशीखाली विंचू आहे, विंचू!" असं म्हणत असतां तो हात झाडीतच होता. त्याने उशीखाली किल्लचा असतील म्हणून उशीखाली हात घातला होता आणि त्याला विंचू चावला होता.

सुजाताने दिव्याची वात थोडी मोठी केली व खाटेवरून उठून उभी राहिली. चोराने उशी चटदिशी बाजूला सारली व तेथे एक काळीनिळी इंगळी होती तिला जमिनीवर पाडून वहाणेने मारून टाकले.

सुजाताला विंचवाची फार भीती वाटे. चोर आला नसता तर तो विंचू आपल्यालाच चावला असता की! तिने मनातल्या मनात चोराचे आभार मानले.

चोर हात झाडीतच होता व त्याच्या बोटातून कळा येतच होत्या. विंचवाचं विष चांगलं चढलं होतं. तिने त्याच्या हाताला तुरटी चोळून जुनं एक फडकं जाळलं व त्याच्या चुरावर चोराला हात धरायला सांगितला. ती बोटावर फुंकर घालीत बसली.

चोर तिच्याकडे पहात म्हणाला–"काय ग, तू एवढ्या मोठ्या घरात एकटीच आहेस की काय? एकटं राहणं धोक्याचं नाही का?"

"मी तशी नेहमी रहात नाही. आज माझे बाबा शेजारच्या गावी गेले आहेत. काय रे, तू तर शिकला सवरलेला दिसतो आहेस! मग असा चोरी करायला कां निघालास?" सुजाताने विचारले.



कळा येत असल्यामुळे व सुजाताच्या त्या प्रश्नामुळे लाजल्यासारखा तोंड कसंसंच करून चोर म्हणाला–"मी सर्व सांगतो. माझं नाव मुरली. मला माझ्या आजीने लाडात वाढविलं. आजीच्या लाडांत वाढल्यामुळे व वाईट संगतीत पडल्यामुळे आजीच्या पेटीतले पैसे मी तिची नजर चुकवून चोरू लागलो. पुढे काही दिवसांनी आजी वारली. आपलं गाव सोडून या शहरात आलो. मी किती प्रयत्न करून पाहिला मला काम मिळाले नाही. तीन दिवस उपाशी राहिल्यावर शेवटी हीचोरी करायला निघालो."

सुजाताला त्याची कींव आली. घरात चार केळी होती, ती तिने त्याला खायला दिली. मुरली दिसायला बरा होता. परंतु त्याच्या मनात ही चोरी करण्याची बुद्धी शिरली त्या गोष्टीचा तिला राग आला. तरी ती त्याला म्हणाली–"सकाळी माझे बाबा येतील. तू माझ्या मैत्रिणीचा भाऊ म्हणून मी तुझी ओळख करून देऊन तुला काम मिळवून द्यायला सांगेन. तुला मिळेल ते काम करण्यास हरकत नसावी असं धरून चालते मी!"

मुरलीने आनंदाने होकार दिला आणि सुजाताचे वडील येण्यापूर्वीच त्याने सैंपाकघराच्या छपरावरची कौलं सारखी करून ठेवली. चांगलं ऊन पडल्यावर सुजाताचे बाबा आले. त्यांचं तोंड पाहूनच ते गेले होते ते स्थळ जमलं नसावं, हे सुजाताने ओळखलं. तिने मुरलीची ओळख तिच्या मैत्रिणीचा थोरला भाऊ म्हणून करून

दिली व म्हणाली–"नोकरीसाठी आपल्या गावी आला आहे."

सुजाताच्या वडिलांना मुरलीला पाहिल्यावर, स्थळ आपल्या घरीच चालून आल्यासारखं वाटलं. हा घरजांवई होऊन राहील, काय वाईट आहे!

सुजाताच्या वडिलांनी ती एकटी असतां तिला बोलावून विचारलं–"मुली, तू तुझ्या मैत्रिणीचा थोरला भाऊ म्हणालीस. मुलगा तर बरा दिसतो आहे. त्याच्या बोलण्यावागण्यावरून चांगल्या वळणाचा-सुद्धा दिसतो आहे. त्याला काम मिळवून देणं तेवढं कठीण नाही. मला तर आवडला हा मुलगा; तुला पसंत असेल तर तुमचं दोघांचं लग्न करून द्यावं, म्हणतो."

सुजाता आपलं मत कळू न देता एवढंच म्हणाली–"एवढी घाई कसली आहे, बाबा!" आणि गप्प झाली.

कारण तिला मुरलीचा पुरा विश्वास वाटत नव्हता. तो ज्या वातावरणात वाढला होता आणि ज्या तऱ्हेच्या संगतीत राहिला होता ती दोन्ही त्याला सहजी सोडतील असे तिला वाटले नाही. त्या दिवशी संध्याकाळी तिने आपली बाग मुरलीला दाखविली. काळोख पडल्यावर तिने आपली पेटी उघडून सर्व दागिने त्याला दाखविले व म्हणाली–"हे सर्व दागिने माझ्या आईचे आहेत. याशिवाय आमच्या घरात याहून जास्त असं काही नाही."



त्या दिवशी रात्री मुरलीला झोप लागली नाही. त्याच्या डोळ्यांसमोर सुजाताने तिच्या आईचे म्हणून दाखविलेले दागिने नाचत होते. ते दागिने चोरून नेले तर आयुष्यभर सुखाने राहाता येईल असे त्याला वाटले. शिवाय, आपण आणखी कोणाच्या हाताखाली नोकरी करण्यात कोणतं शहाणपण आहे, असंही त्याला वाटलं.

अशा तऱ्हेने मनाचा निश्चय करून मुरली एके दिवशी रात्री दागिन्यांची पेटी घेऊन मागच्या दाराने पसार झाला. दागिने काढून घेण्यासाठी पेटी उघडली व त्यात एक इंगळी पाहून तो दचकून मागे सरकला.

इंगळी पुन्हां हाताला कोठे चावते की काय असे समजून त्याने दागिन्याची पेटी जमिनीवर टाकली. दागिन्यांबरोबर जमिनीवर पडलेली इंगळी जागची हलली-डुलली नाही. ती नकली इंगळी असल्याचे ओळखून त्याने ती बाजूला सारली व दागिने उचलू लागणार तेवढ्यात त्याला दागिन्यांमध्ये एक चिट्ठी दिसली. ती सुजाताने लिहिलेली चिट्ठी होती. चिट्ठीतील मजकूर असा होता:

"नकली इंगळी आहे म्हणून तुला फार आनंद वाटला असेल! विंचू असा दिसूनही चावला नाही तर हरकत नाही; परंतु पाणसापासारखा दिसून विषाचा फूत्कार सोडणारा साप असेल तर धोकाच! काल



तू चोरासारखा दिसलास त्यात काही नुकसान झालं नाही. परंतु आज तू या घरचा जांवई होणार होतास नि तू या घरचे दागिने चोरून पळून जातो आहेस. माझ्या वडिलांनी तुला पसंत केला होता, परंतु तुझ्यासारखा माणूस आपला नवरा न झाल्याबद्दल मला मात्र फार फार आनंद होत आहे."

पत्र वाचून मुरली मनातल्या मनात खूप शरमला. सुजाताशी आपलं लग्न झालं असतं व चांगलीशी नोकरीही मिळाली असती. संसार कसा सुखाचा झाला असता. आपण पुढं चोरासारखं सर्व आयुष्य घालविणं ही फार मोठी शरमेची व नामुष्कीची गोष्ट होईल. सुजाताला तिचे दागिने देऊन टाकून आपण आपल्या वाटेने निघून जायचं त्याने ठरविलं.

सुजाताचा बाप पाणी प्यायला म्हणून घरात गेला होता. परत येत असतां मुरलीला मागच्या दाराने आत येत असतांना पाहून व त्याच्या हातात दागिन्यांची पेटी पाहून संशयित मुद्रेने विचारू लागला—"एवढ्या रात्री दागिन्यांची पेटी घेऊन कोठे गेला होतास रे?"

मुरलीच्या तोंडी उत्तर न येत असलेले पाहून सुजाता पुढे येऊन म्हणाली—"माझ्या हातातल्या बांगड्या मला बोचत होत्या म्हणून मी पेटीत ठेवायला गेले, बाबा! परंतु त्या पेटीत कसा गेला कोणास ठाऊक एक विंचू शिरला होता, बाबा! तो मारायला दागिन्यांची पेटी घेऊन मुरली बाहेर गेला होता!"

बाबा ते ऐकून थोडे बाजूला होताच सुजाता मुरलीला म्हणाली—"असा वेड्यासारखा पाहतो आहेस काय? आत ये. विंचू ठेचून चांगला मारलास ना? कोणालाही मारायचं झालं तर अर्धवट मारणं चांगलं नाही!"

सुजाता आपल्या डोक्यातली चोरीची बुद्धी पूर्णपणे मेली का, हे विचारीत असल्याचं व तिने आपल्याला क्षमा केली असल्याचे ओळखून मुरलीला हायसं वाटलं!





# नवऱ्याची कानउघाडणी

कामधंदा काही नाही आणि मित्रांबरोबर दिवसभर गप्पाष्टक करीत राहणाऱ्या जग्गूच्या मनात एके दिवशी एकाएकी व्यापार करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याची सासू चार पैसे राखून होती. जग्गू बायकोला म्हणाला—"आतां याच्यापुढे नुसतं भटकणं बरं नाही वाटत मला. काहीतरी व्यापार करावा म्हणतो मी! तू माहेरी जाऊन आईकडून भांडवलासाठी एक हजार रुपये मागून घेऊन ये!"

लक्ष्मी माहेरी गेली. दोन महिने लोटले. बायकोला परत न आलेली पाहून जगन्नाथराव स्वतःच सासुरवाडीस निघाले.

सासुरवाडीस पोचतांच त्याने बायकोला फैलावर घेतलं. म्हणाला—"काय गं, तुला काय कामाकरितां पाठविलं होतं आणि तू माहेरी मजा करीत बसली होतीस, म्हणावयाची!"

लक्ष्मी त्याबद्दल जरासुद्धा राग न दाखवितां शांतस्वरात म्हणाली—"जरा हळू बोला की! तुम्ही हजार रुपये मागून आण, म्हणून पाठविलंत! मी आल्यावर आईला तेच सांगितलं. आई तेवढे रुपये मला देते म्हणून सांगून तिच्या माहेरून दोन हजार रुपये मागून आणायला गेली आहे! ती गोष्ट तिने आपल्या आईला सांगतांच तिची आई म्हणाली की तिच्या माहेरून ती निदान तीन हजार मिळाल्याशिवाय दोन हजार कशी देणार? म्हणून ती तिच्या माहेरी गेली आहे, म्हणे. माझी आजी अद्याप आपल्या माहेरून आली नाही, म्हणून आणखी चार दिवसांनी परत येईन म्हणून सांगून माझी आई कालच परतली आहे. ती जाऊन पैसे घेऊन आली की तिच्या जवळून हजार रुपये घेऊन यावे, असा विचार करून मी आजपर्यंत









थांबले आहे.!" जगन्नाथरावांना काय बोलावे सुचेना, म्हणून डोके खाजवीत म्हणाले—"ते सर्व ठीक आहे ग! पण तू इकडे अशी बसून राहिलीस तर मला तिकडे सैंपाक करून कोण वाढणार वाटलं तुला?"

लक्ष्मी आणखी जास्त शांतपणे म्हणाली—"मिळवून आणणारं असलं की सैंपाक करून वाढणारंसुद्धां मिळतं. पण मिळवायचं मीच व सैंपाक करायचा मीच, तरमग कसं जमणार? तुम्हीच सांगा!"

ते ऐकून जगन्नाथरावांना आपली चूक लक्षात आली, डोळ्यात अंजन पडावं तशी! तो थोडासा गप्प राहून म्हणाला—"ठीक आहे, तर चल मग!" तो बायकोला घेऊन तसाच घरी निघाला. निघते वेळी सासूला नमस्कार करायला गेला.

सासू त्याच्या उतरलेल्या चेहऱ्याकडे पाहून म्हणाली—"जगन्नाथराव, गैर मानू नका! माहेरून मला पैसे मिळाल्याबरोबर पाठवीन बरं का! तुमच्या सासऱ्यांनी मागे काही ठेवलं नव्हतं. म्हणून माहेरी जाऊन पैसे भीक मागून आणायचे माझ्या नशिबीं आलं. बायकोच्या पैशांवर जगणाऱ्यांना हेच भोगावं लागतं. माझ्या मुलीला मात्र चांगलं संभाळा हो!"

सासू म्हणाली ते किती मृदुमर्यादापूर्ण होतं पण त्याच्या मागे जे कटुसत्य होतं ते न कळण्याइतका जग्गू मूर्ख नव्हता. म्हणाला—"आत्याबाई, तुम्ही पैशासाठी काही कष्ट करण्याची गरज नाही. पैशात काय आहे हो? माणसात चांगुलपणा व कर्तबगारी असेल तर कोणीही कर्ज देईल. तुम्ही आपली तब्येत संभाळून रहा म्हणजे झालं." असं सांगून बायकोला घेऊन जग्गू गाडीत बसला.

त्यानंतर जगन्नाथरावांनी बायकोला माहेरून पैसे आणायला कधी पाठविलं नाही. मित्रांबरोबरच्या फुकटच्या गप्पा बंद केल्या आणि लहान प्रमाणात व्यापार सुरू करून काही दिवसांनी मोठा व्यापारी म्हणून नावलौकिक मिळविला.





# गणेश पुराण

पार्वती अती कष्टाने आपले सगळे दुःख विसरली व मुलास कडेवर उचलून घेवून तिने त्याची दृष्ट काढली. शिवाने हात पसरवून त्याला जवळ बोलाविले. 'शंकर आपल्याला परत काहीतरी करील' या कल्पनेने घाबरून अडखळत पावले टाकणाऱ्या गणेशाच्या बालचेष्टांचे सर्वांनाच कौतुक वाटले.

"बाबा, गणेशा! तू पुत्र रूपाने आम्हाला लाभलास म्हणून आम्ही धन्य झालो! चिरंजीव हो! असे म्हणून शंकर त्याला कडेवर घेवून लाड करु लागले तो गणेशाने खाली उडी मारली व "बाबा! काय हे बोलणे? मी तुमचा मुलगा, म्हणून मीच धन्य होय!" असे म्हणत आपल्या लांब सोंडेने पार्वती-परमेश्वराच्या पायांना विळखा घातला व आपल्या डोळ्यांना स्पर्श करुन नमस्कार केला. नंतर विष्णूला नमस्कार केला.

विष्णुने "ये हो लाडक्या भाच्या! असे म्हणत जवळ घेतले व 'कल्याणमस्तु!' असा आशीर्वाद दिला. तेंव्हा विष्णूच्या कांती मुळे गणपतीचा रंग नीलाकाशासारखा भासला. विष्णु व गणेश यांच्यांत काही तरी साम्य निश्चितच आहे असे सर्वांना वाटले. "हा मामाच्या वळणावर आहे बरं का!" असे सर्वजण म्हणू लागले. गणेशाने ब्रह्मदेवाला नमस्कार केला. "प्रथम पूजेचा मानकरी होशील हो लंबोदरा!" असे म्हणत ब्रह्माने त्याचा गालगुच्चा घेतला.

      



त्यानंतर गणेशाने लक्ष्मी व सरस्वतीला नमस्कार केला. त्या दोघींनी त्याला एकदम कडेवर घेवून एकेका गालाचा मुका घेतला, व म्हणाल्या–"आम्ही सास्वासुनांचा दुस्वास सोडून सौख्याने अशाच याच्या दोहों बाजूस उभ्या राहातो!"

नंतर पार्वतीकडे बघून म्हणाल्या–"आपण तिघी ज्या त्रिमाता म्हणवितो, त्यांची मूळ जन्मदात्री एकच असून ती आदिशक्ति होय, असे पुत्र विनायकाने सांगितले आहे. त्यानंतर आपण परत वेगवेगळया रूपाने जन्मलो. क्षीरसमुद्रांतून लक्ष्मी; ब्रह्मदेवाच्या वाचेतून वाणी रूपाने सरस्वती व पूर्वी दक्षकन्या सती व आतां हिमालयाची कन्या पार्वतीच्या रूपाने उमा अशा रीतीने अवतरलो आहोत. जयलक्ष्मीच्या रूपाने सिद्धी व विद्यावतीच्या रूपाने बुद्धी या दोघीही विनायकास अनुरूप अशा वधू आहेत. मग गणेशाचा थाट काय विचारतां?" असे म्हणाल्या.

लक्ष्मी म्हणाली–"लक्ष्मीदायक अशा गणेशावर विश्वास ठेवणाऱ्यांकडे मी स्थिर व अचल रूपाने राहीन! सिद्धीस्वरूपिणी जयलक्ष्मी माझाच अंश आहे. ती विनायकाची भावी पत्नी होईल.

सरस्वती म्हणाली–"गणेश हा ज्ञानदाता व सकल शास्त्रांचा स्वामी आहे. मुलांच्या अक्षराभ्यासाच्या आधी मुलांकडून हळदीचा गोळा करवून त्या गणपतीची आधी पूजा करवून नंतर गणेशाच्या परिपूर्ण स्वरूपाचे द्योतक म्हणून त्या गोळ्या भोवती एक वर्तुळ काढून नंतर मुलांकडून श्रीगणेशाचा कित्ता गिरवावा. माझा अंश असलेली विद्यावती, बुद्धी स्वरूपिणी ही विनायकाची नायिका म्हणून शोभेल!

तेंव्हा गणेश रडवेला चेहरा करून सगळ्यांना उद्देशून म्हणाला–"पाहिलीत मोठ्यांची रीत कशी असते ती! लग्न करून स्वतः सोसलेल्या यातना मुलांनी सुद्धा सोसाव्यात म्हणून घाईच करतात, पण सुखाने राहू देत नाहीत. त्यातल्या त्यात आयांना तर फारच घाई."

यावर विष्णु म्हणाले–"नाही रे बाबा! सुंदर चांदण्या पूर्णचंद्राची जशी सेवा करतात तशी आणिमादि अष्ट ऐश्वर्याचे मूळ असलेल्या अष्ट सिद्धी ज्या आठ जणी आहेत, त्या तुझी सेवा करीत असलेल्या बघण्याची मला घाई झाली आहे."

"ओ हो! असे कां? तर मग तूं जेंव्हा कृष्णावतार घेशील ना? तेंव्हा अष्ट महिषींसमवेत आनंदाचा उपभोग घेशील बरे!" असे गणेश म्हणाला.

त्यावर विष्णु मंदस्मित करीत म्हणाला–"तुझा शब्द अटळ असला तरी तुला मात्र दहा वधूंशी लग्न करावेच लागेल. ते टाळता यायचे नाही."

"तसे असेल तर 'विघ्नेश्वराच्या लग्नाला सतराशे विघ्ने' या म्हणीप्रमाणे मलाच विघ्ने उपस्थित करणे भाग पडेल." असे गणपती म्हणाला.

"सतराशेच काय, पण कोटी विघ्नं आडवी आली तरी विघ्नेश्वराचे लग्न कांही थांबविता येणार नाही!" असे ब्रह्मदेवाच्या स्वरात स्वर मिळवून सर्वजण म्हणाले.

तेंव्हा नारद पुढे येऊन म्हणाला–"विज्ञानेश्वरा! वाचाळतेमध्ये मला ही तू मागे सारलेस, परंतु विवाह टाळणे कुणाला



बरे जमले आहे? मला हा भवसागर तरणे जमले नाही म्हणूनच ना, मी असा मुनी होऊन भटकतोय! ज्ञानेश्वरा! विवाह व उद्योग हे पुरुषाचे लक्षण होय. म्हणूनच ना पुरुषोत्तम म्हणविणारे हे प्रमुख आदिदेव विवाह करून सृष्टि, स्थिती व लयादी उद्योग करीत आहेत. त्यांच्या पुढे तूं व मी ते काय?"

"ओहो! तुला लग्नाचे वेड लागलेले दिसते! तूं तर स्वयंवराच्या तयारीला लागलेला दिसतोयस!" असे गणपती म्हणाला.

"त्रिकालज्ञानी तो मीच म्हटले तर अनंतकालज्ञानी तूं. तुझ्याशी विवाद



मला शक्य आहे काय? वाक्पटुतेत तुझ्या नंतरच माझा नंबर लागेल. सर्वांचे नशीबच तुझ्या हाती आहे. तुला विसरून कुठलेही ज्योतिष-पांडित्य फळाला येत नाही. आपण दोघेही उत्तम बोलभांड आहोत. बोलूं लागलो तर अनंतकाळ ही पुरणार नाही. तूं पूर्णज्ञानी आहेस. माझ्या सारखे कमलाच्या पानावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणे अलिप्त रहातात. तूं मायेलाही अतीत आहेस. म्हणून सिद्धी, बुद्धी व अष्टसिद्धी तुला वरतील; तेंव्हा 'श्रीरस्तु,' 'शुभमस्तु,' 'शीघ्र कल्याण सिद्धिरस्तु!' असे मला सुद्धा म्हणून घेऊं दे." असे म्हणत नारदाने वीणेवर कल्याण राग छेडला व सामराग आळवून सौराष्ट्र रागांत मंगलगीते गाइली.

सर्व देव आपापल्या स्थानी परतले. गणपती व पार्वतीला बरोबर घेवून शंकर सुद्धा आपले निवासस्थान असलेल्या कैलासास गेला. नारद मात्र हळू हळू वज्रदंताकडे जाण्यास निघाला.

पूर्वी बाल-गणपतीने शेपटी धरून गरगर फिरवून फेकून दिल्यामुळे दुखावलेल्या वज्रदन्तीच्या अंगाचा ठणका अजून कमी झाला नव्हता. धवला पतीची सेवा करीत होती. नारदास आलेला बघून "आणि कसली भानगड उभी करतो की काय हा!" असे म्हणत ती आत निघून गेली.

मूषकासुरास उद्देशून "तुझा ज्याने पराभव केला तो गणपती आतां विघ्नेश्वर रूपाने वाढतो आहे. आणि..." असे म्हणत नारद थांबला.

पराभवाग्नी चेतविला जाऊन खिजलेल्यास्वराने "मग काय करूं म्हणतोयस नारदा?" असे वज्रदन्त म्हणाला.

"वरदाता ब्रह्मा असतांना काळजी कसली? वज्राला वज्रानेंच कटविले पाहिजे. पराभवाचा सूड घे. गणपतीने विघ्नेश्वर नाम धारण केले आहे. तो गजानन आहे हे ही लक्षात घे म्हणजे झाले!" असे म्हणून शांतपणे नारद निघून गेला.





महाश्वेता असे नामान्तर झालेल्या धवलेने कितीही सांगितले तरी न ऐकता वज्रदन्त तिला म्हणाला–"महाश्वेता! तुझ्या पातिव्रत्याची पुण्याई म्हणून मला मनःशांती तरी लाभूं दे." असे म्हणून वज्रदन्त निघून गेला व घोर तपश्चर्या करून त्याने ब्रह्मदेवाला प्रसन्न करून घेतले.

"काय हवे आहे?" ब्रह्मदेवाने विचारले.

"विघ्नाला आकार देऊन त्याला माझ्या आज्ञेत राहण्यास सांगा!" असा वर मूषकासुराने मागून घेतला. ब्रह्माने विघ्नाला बोलाविले व मूषकासुरा पुढे उभे केले. त्याला कांहीही दिसले नाही. ब्रह्मदेवाने त्याला सूक्ष्म दृष्टी दिली. साध्या दृष्टीस दिसणार नाही, इतके बारीक व सूक्ष्म कृमी सारखे काळेकुट्ट विघ्न त्याला दिसले.

मूषकासुराने आश्चर्याने "हे काय! या काळ्या ठिपक्याचे मी काय करूं?" असे ब्रह्मदेवाला विचारले.

त्यावर हसून ब्रह्मा म्हणाला–"विघ्न प्रचण्ड भूतासारखे असते असे तुला वाटले, परंतु विघ्नबीज हा डोळ्यांना न दिसणारा असा सूक्ष्म अणु असतो. सूक्ष्म जंतुमुळे जशा भयंकर व्याधी पसरतात तसेच हे असते. अनर्थ ओढविणारे हे विघ्न कारण कितीही लहान असले तरी कुठलीही भयंकर आकृति धारण करून सर्वनाश करूं शकते. हे इच्छारूपी असते. कुठलेही रूप घेवून अनर्थ करणे हेच ह्याचे काम! काय करायचे असेल ते कर!" असे म्हणत ब्रह्मा अदृश्य झाला.

"महागजासुराचे रूप घेवून विघ्नेश्वराचा नाश कर!" अशी आज्ञा मूषकासुराने त्या विघ्नास दिली.

विघ्नाने हत्तीचे शरीर, हत्तीचे पाय, भयंकर असे छोटे डोके, मोठे दातांचे सुळे, निखाऱ्यासारखे लाल डोळे असे गजासुर शरीर धारण करून महापर्वतासारखी तलवार तळपवीत आकाशाकडे उड्डाण केले.

इकडे कैलासात गणपती मोठ्या कोडकौतुकात मोठा झाला. आई-वडिलांची



परवानगी घेवून विश्वकर्म्याने त्याच्यासाठी निर्माण केलेल्या भवनाकडे जाण्यास निघाला. वाटेत सशरीर असा मदन त्याला सामोरा आला. त्याला बघून विनायकाने आश्चर्याने विचारले–"कधी न दिसणारा तू मला दिसतो आहेस, काय बरं नवल विशेष! तुझ्या सम्मोहिनीचा प्रयोग मजवर करूं नकोस बरं! मी अजून अजाण आहे."

नम्रतेने डोके वाकवीत मन्मथ म्हणाला–"गजेन्द्रानना! तूं माझ्या बाणांना सुद्धा अतीत आहेस. मला 'ज्या वेळी दिसावे असे वाटेल त्या वेळी शरीर धारण करून दिसता येईल' असा वर शिवाने दिलेलाच आहे. आपणा दोघांमध्ये साम्य आहे. जवळीक ही आहे. म्हणून दिसलो झाले! तूं नंदीवाहन अशा शिवाचा मुलगा आहेस, तर मी गरुडवाहन विष्णूचा मुलगा आहे. मला शिवाने भस्म करून पुन्हा जगविले तर तुझा शिरच्छेद करून तुला परत जगविले. माझे वाहन पोपट तर तुझे वाहन उंदीर मनाला चंचल व्हायला लावणारे पुष्पांकुश हे माझे आयुध तर मनो निग्रह देणारे पाशांकुश तुझे आयुध, तुझा धाकटा भाऊ कुमारस्वामी याचा जन्म व्हावयास हवा आहे. पार्वती-परमेश्वरांच्या परस्पर अनुरागाचे तेजच कार्तिकस्वामीचा अवतार घेवून जन्मावयास हवे आहे. तारकासुराचा नाश व्हायला हवा आहे. म्हणूनच ना देवतांनी मला भस्म करविले; कैलासावर जात आहे. आज्ञा असावी."

"मन्मथा! म्हणूनच मी कैलास सोडून जात आहे. तुझे काम तूं निर्विघ्नपणे पार पाड. तुला विजय प्राप्त होईल." असे गणपती म्हणाला.

मन्मथ अदृश्य होऊन शिव-पार्वती असलेल्या कैलास मंडपांत प्रविष्ट झाला.

गणपती आपल्या भवनाकडे गेला, सिंहद्वाराजवळील स्फटिकाच्या वेदीवर आरामात बसून परिसरातील सृष्टी-सौंदर्य आनंदाने न्याहळू लागला. हिमगिरीची रजत शिखरे घासून पुसून पैलू पाडल्या

प्रमाणे सांध्य प्रकाशाच्या तेजाने चकाकत होती. हिम-प्रपातांचे मंद-गंभीर सरगम ऐकू येत होते. अशा प्रशांत समयी "विघ्नेश्वर म्हणविणारा तो कुठे आहे?" अशी भयंकर गर्जना दिशा दुभंगीत प्रतिध्वनित झाली.

महागजासुराचे रूप धारण केलेले ते विघ्न गजाननापुढे उभे ठाकले, तेंव्हा धरणी सुद्धा कंपित झाली. "मी महा-गजासुर आहे. तूं गजवदन असशील तर मी गजकाय आहे. तुला मारण्याकरिता आलोय!" असे म्हणत गजासुराने चित्कार केला.

विघ्नेश्वराने बहिऱ्यासारखे भोळेपणाने त्याच्याकडे पाहिले व म्हणाला—"उसाचे कांडे तुकडे करून खावेसे वाटतेय. जरा हा परशू पाजळून देतोस कां? तुला मी मोदक देईन." असे म्हणत परशू त्याच्या दिशेने फेकला. गजासुर पाय तुटल्या-मुळे पर्वतासारखा कोसळला. वर चढून विघ्नेश्वर तांडव करीत त्याचे मर्दन करीत असता—"महाप्रभो! मी विघ्न आहे. ब्रह्म-देवाने दिलेल्या वरामुळे महागजासुराचे रूप घेऊन आलो. चांगली अद्दल घडली! मला क्षमा करा." असे विघ्न ओरडले.

"मी विघ्नविनाशक आहे, हे तूं विसर-लास वाटते! ते कांही असले तरी तूं आता मायारूपी गजासुर आहेस. तुझी शकले करणे भागच आहे. तुझे हे तुकडे तुझे व माझे विस्मरण झालेल्यांना त्रास देतील. तूं कालिया नाग होऊन कालिंदीच्या डोहात लपून बैस. बालकृष्ण तुझे मर्दन करील. त्याचे पाय तुझ्या डोक्यावर पडून तुझा उद्धार होईल. जातीवंत सर्पांच्या-फडेवरील विष्णुपादुकेचे चिह्न तुमचा प्रथम अलंकार म्हणून शोभून दिसेल!" असे म्हणून गणपतीने परशू हाती घेवून त्या विघ्नाचे तुकडे-तुकडे केले. ते रेणु दश-दिशांत व्याप्त होऊन अदृश्य झाले. विघ्न परत अणुरूपांतच राहिले.

देवतांनी विघ्नेश्वरावर पुष्पवृष्टी केली.

(क्रमशः)





# दोन वस्ताद

[ ५ ]

जीनाब स्मित करून म्हणाली—"तसं काही वाटून घेण्याचं कारणच नाही. आमची मित्रमंडळी आनंदाने येथे राहतील."

तिने आपल्या घरून गालिचे, सतरंज्या, टेबले, भांडी वगैरे आणविली व त्या मोठ्या दालनात पाहुण्यांना उतरण्याची उत्तम व्यवस्था केली. खायला प्यायला सर्व पदार्थ आणून ठेवून धर्मशाळेच्या दारात वाट पहात बसली.

थोड्या वेळाने कुबडा अली आणि त्याच्या बरोबरचे आणखी नऊ जण ऐटीत तेथे येऊन पोचले. जीनाबने त्याला विचा-रले—"आपणच का अहमद?"

"नाही, मला कुबडा अली म्हणतात." अली हसत म्हणाला.

"तरमग तुम्ही सर्व माझं आतिथ्य स्वीकारा!" असे म्हणत ती सर्वांना हॉल मध्ये बोलावून घेऊन गेली. ते सर्व शिदीच्या पिपाच्या चारीबाजूला उभे राहून शिदी पिऊ लागले. जीनाबने शिदीत भांग वाटून लावून ठेवली होती. म्हणून सर्वजण पितापिता झिंगून पडले. त्यांना त्यांचं देहभानही राहिलं नाही. तिने त्या सर्वांना एकेकाला त्यांचे पाय धरून ओढून नेऊन मागच्या आवारात एकावर एकाला रचून ठेवले व त्यांच्यावर एक कापड टाकून ठेवले. नंतर हाल पुन्हा साफसूफ करून ठेवून दारात जाऊन बसली.

काही वेळाने अहमदचे आणखी दहा शिपाई तेथे आले. जीनाबने त्यांना असंच प्रेमाने बोलावून शिदी प्यायला दिली झिंगल्यावर त्यांना तसेच एकावर एकाला ठेवून त्यांच्यावर एक कापड टाकून ठेवलं. थोड्याच वेळाने चाळीस जणांना तीच








गती मिळाली. अगदी सरतेशेवटी अहमद स्वत: घोड्यावर बसून आला. जीनाबला दारात पाहून म्हणाला–"ए पोरी, माझे शिपाई इकडे आलेले दिसले का तुला?"

"आपणच नाही का, कोतवाल अहमद साहेब? तर हे पहा, या गल्लीच्या टोकाला त्यांना कोणती तरी म्हातारी दिसली म्हणे. तिला धरून आणायला गेलो आहो, असे आपल्याला सांगायला सांगून गेले आहेत." जीनाबने एक थाप मारली.

अहमदला खूप आनंद झाला व तो मनसोक्त शिंदी प्यायला पुढे सरसावला. भांग पोटात गेल्यामुळे झिंगून तो बेशुद्ध होऊन पडला. जीनाबने त्याच्या अंगातली बनियन व चड्डी शिवाय त्याचे सर्व कपडे व कोतवालाची पदके वगैरे काढून घेतली. बाकी चाळीस शिपायांनासुद्धा नागवले आणि सर्वांचे कपडे वगैरे घोड्याच्या पाठीवर टाकून सरळ घरी निघून गेली.

अहमद व त्याचे चाळीस शिपाई दोन दिवस व दोन रात्री बेशुद्धावस्थेत पडून राहिल्यावर शुद्धीवर आले. फक्त चड्डी व बनियानीवर रस्त्यावरून कसं जायचं, हेच अहमदला कळेना. परंतु जाणे भागच होते. पुढेपुढे अहमद व त्याच्या पाठीमागून त्याचे चाळीस शिपाई खाली माना घालून चालू लागले.

अहमदचं नशीबच फुटकं होते. नेमका त्याच वेळेला समोर त्याला हसन भेटला. त्याने त्याला चकित होऊन विचारले–"हे काय रे, अहमद? या थंड हवेत असे सर्व निघाला आहां?"

"नशिबात असेल ते भोगावेच लागते, नाही का हसन! मला एका पोरीने फसविले आहे, बघ! ती कोण कोठे राहाते, तुला माहीत आहे का?" अगदी दीन मुद्रा करून अहमदने हसनला विचारले.

"हो, मी ओळखातो, त्या पोरीला व तिच्या आईला सुद्धा! तिला कैद करून घेऊन येऊ का?" हसनने विचारले.

"ते कसं काय रे?" अहमदने चकित होऊन त्याला विचारले.

"त्यात मोठंसं काय? तू खलीफांकडे जा व तुला हे काम जमले नाही म्हणून सांगून या कामाची जबाबदारी माझ्यावर टाकायला विनंती कर!" हसन म्हणाला.

अहमदने त्याप्रमाणे केले. खलीफाने हसनला बोलाविले आणि विचारले–"ती म्हातारी माहीत आहे का रे, तुला? तू तिला धरून आणशील का?"

"ती म्हातारी माझ्या चांगली माहितीची आहे. ती धनलोभाने हे सर्व करीत असेल असं नाही मला वाटत. ती आपला प्रताप खलीफांच्या नजरेस यावा, यासाठी हे सर्व करीत असावी. आपण अभयदान देणार असल्याची अट मान्य केल्यास मी तिला बोलावून आणून आपल्यासमोर हजर करतो."







खलीफांनी अभयदान दिले. हसन सरळ दिलैलाच्या घरी गेला. जीनाबने दार उघडलं—"तुझ्या आईला खलीफांनी बोलाविलं आहे. त्यांनी अभयदानाचं वचन दिलं आहे. तुझ्या आईने उचलून आणलेलं सर्व सामान घोड्याच्या पाठीवर टाकून घेऊन चलायला तिला सांग!" हसन जीनाबला म्हणाला.

दिलैला माडीवरून खाली उतरून आली. तिच्या जवळ होता त्यापैकी चांगलासा पोशाख करून ती खलीफांच्या दर्शनाला जायला तयार झाली

"तुझ्याजवळ चोरीचा माल होता, तो सर्व बरोबर घेतलास ना?" हसनने विचारले.

"अहमद व त्याचे चाळीस शिपाई घालून गेले होते त्या कपड्यांशिवाय बाकी सर्व सामान घेतले आहे, त्या चोरीशी माझा काही संबंध नाही." दिलैला म्हणाली·

"होय, ते काम कोणाचं आहे, ते मला माहीत आहे!" हसन हसत म्हणाला. दोघे निघाले व खलीफांच्या दरबारात हजर झाले.

म्हातारीला पाहताच खलीफांनी रागाने म्हातारीचं डोके उडवायला हुकूम सोडला. परंतु हसनने विनयपूर्वक दिलैलाला दिलेल्या अभयदानाची आठवण करून दिली. तेव्हां खलीफांनी ते मान्य करून दिलैलाला विचारले—"तुझे नाव काय?"

"माझं नाव दिलैला आहे, मी कबूतरांकरवी टपाल खातं चालविणाऱ्या मयत अधिकाऱ्याची बायको आहे!" म्हणाली.

"तू मोठी वस्ताद दिसते आहेस! तू या सर्वांना कां फंसविलंस?" खलीफांनी विचारलं.

दिलैलाने गुडघे टेकून खलीफांना सलाम केला व म्हणाली—"खलीफांनी मला माफ करावं, मी धनलोभाने ह्या चोऱ्या केल्या नाहीत. चोरी करण्यात पटाईत असलेले अहमद, हसन वगैरेंना खलीफांनी मोठमोठ्या पदांवर नेमल्याचे ऐकून, आपलं कसब मी त्यांच्याहून जास्त दाखविल्यास माझे यजमान ज्या पदावर काम करीत असत ते पद कदाचित आपल्याला खलीफा बहाल करतील असे मला वाटलं!"

दिलैला म्हणाली ते खरं असावं असं खलीफांना वाटले. त्यांनी फिर्यादींना त्यांचा माल देऊन टाकला व दिलैलाला म्हणाले—"आतां तुला काय हवं आहे ते सांग!"

"खलीफांनी माझे यजमान ज्या पदावर काम करीत होते ते पद व तो पगार बहाल करण्याची मेहेरबानी करावी. मला ते काम चांगले करतां येते. मी व माझी मुलगी कबूतरांचं पालन व त्यांचं शिक्षण करीत होतो. त्यांच्या गळ्यात पत्रे बांधून ठेवीत होतो. कबूतरांद्वारे टपालाची व्यवस्था करण्याच्या हेतूने खलीफांनी मोठा वाडा बांधला व त्याच्यावर नित्य पाहारा ठेवण्यासाठी चाळीस निग्रो गुलाम व चाळीस शिकारी कुत्री नेमली. त्या टपाल वाड्याची सर्व व्यवस्था मीच पहात होते, माझे पती पहात नव्हते!" दिलैलाने निवेदन केले.

खलीफांनी लगेच हुकूम काढला व दिलैलाला कबूतरांकरवी टपाल खाते चालविणारा प्रमुख अधिकारी म्हणून नेमले. नीग्रो व शिकारी कुत्री तिच्या हाताखाली कामे करू लागली.

दिलैला आपल्या घरातले सर्व सामान घेऊन कबूतरांद्वारे टपाल खातं चालत असलेल्या वाड्यात आली. त्या दिवशी ती पुरुषी वेष धारण करून व डोक्याला चांदीचे कबूतराचं चिन्ह असलेली सोन्याची टोपी घालून टपालाने पाठवायची पत्रे वगैरे आणायला खलीफांच्या महालात गेली. चाळीस नीग्रोंना तांबड्या रंगाचा जरीदार पोशाख घालायला दिला. आपल्या नवीन महालात शोभेसाठी एक्केचाळीस खुंट्या लावून त्यांना अहमदचा पोशाख, कुबड्या अलीचा पोशाख आणि उरलेल्या एकोणचाळीस शिपायांचे पोशाख टांगून ठेवले. अशा तऱ्हेने दिलैला आपला हेतू साध्य झाल्यावर आपली मुलगी जीनाबसह सुखाने त्या महालात राहू लागली. (क्रमशः)





# महापूरपीडित

चंद्रपूर येथे प्रताप नावाचा राजा राज्य करीत होता. एकदां कोणीतरी त्याचे कान भरल्यामुळे त्याने एका भोळ्या-भावड्या माणसाला अन्यायाने फाशीची शिक्षा फर्मावली. नंतर खरा प्रकार उघडकीस आला. परंतु तोंवर त्या निरपराध्याला फांशीची शिक्षा झाली होती.

या घटनेने राजाचे हृदय हेलावले. तेव्हापासून राजाने चहाड्या ऐकायचे तर सोडूनच दिले, त्या उलट जो कुणी फिर्याद घेऊन त्याच्याकडे येई त्याला घोर शिक्षा देण्याचे धोरण त्याने स्वीकारले. कुणी कुणाची निंदा-नालस्ती करायची नाही असा त्याचा कायदा होता.

याविषयी मंत्र्याने राजाला एकदा सल्ला दिला–

"महाप्रभू! तक्रारी ऐकणे ही काही चूक नव्हे, ऐकून विश्वास ठेवणे चुकीचे ठरू शकते. आपण फिर्यादी ऐकत नाही त्यामुळे देशांत अनीती मात्र बळावत आहे."

"अनीतीला सरावलेला, राजशासनाकडे दुर्लक्ष करणारा असतो! माझ्या सेवेतील सर्व अधिकारी विश्वासपात्र आहेत. त्यांच्यावर मला पूर्ण भरोसा आहे." प्रताप म्हणाला.

पुढे काही दिवसांनी देशातील एका भागांत अतिवृष्टी होऊन नद्यांना महापूर आले. नदीकांठी असलेल्या वीरपूर, धीरपूर, शूरपूर या नगरांची फार नासधूस झाली. कित्येक लोक बेघर झाले, कैंक लोकांची मालमत्ता बुडाली.

प्रतापने त्या तीन गांवांची स्थिती स्वत: डोळ्याखालून घातली. तेथील अपार हानी पाहून त्याचे हृदय द्रवले. त्या तीन गावांसाठी तीन वेग-वेगळे अधिकारी नेमून त्याने त्यांना प्रत्येकी एक लाख वराह देऊन महापूर पीडितांचे साह्य करण्यास सांगितले. याप्रमाणे वीरपुरास वीरसेन, धीरपुरास धीरसेन आणि शूरपुरास शूरसेन यांना पाठविले.

वीरपूरची प्रजा भोळी होती. वीरसेनने तेथे जाऊन स्वत:करिता एक मोठा वाडा बांधला आणि गावात सुपीक म्हणून जेवढी जमीन होती ती सगळी कमी दरात विकत घेतली. आपल्या सर्व नातेवाइकांना वीरपुरास आणले. वीरपूरची प्रजा फक्त कामगार बनून राहिली, राजाने दिलेल्या मदतीबद्दल अवाक्षरही त्यांना कळले नव्हते.



धीरपुरातील प्रजेला त्रास देऊन जगणाऱ्या एका दुष्टबुद्धीबरोबर धीरसेनने हातमिळवणी केली व दोघांनी अर्धे-अर्धे गांव वाटून घेतले. राजाने दिलेल्या धनाचा भोग-विलासात व्यय होऊ लागला. इथल्या प्रजेलाही राजाने केलेल्या मदतीची मुळीच कल्पना नव्हती.

शूरपूरमध्ये कुबुद्धी व दुर्बुद्धी नांवाचे दोघे दुर्मार्गी गांवकऱ्यांना त्रास देत असत. शूरसेनने त्यांच्याशी संधान बांधले व गांवाचे तीन वांटे करून तो सुखाने कालक्रमण करूं लागला. बिचाऱ्या गांवकऱ्यांना राजाने आपत्काली केलेल्या साह्याचा सुगावा सुद्धा लागला नाही.

या तिन्ही पूरग्रस्त गांवांकडील वृत्तांत मंत्र्याला दूतांकडून वेळोवेळी समजत असे व त्यामुळे त्याचे मन बेचैन होत होते.

कांही महिने उलटल्यानंतर मंत्री राजाला म्हणाला–"प्रभू! आपण ज्या पूरग्रस्त गांवांना मदत म्हणून तीन लाख वराह दिले होते त्यांचा विनियोग कसा काय झाला आहे, हे बघून घेतल्यास बरे होईल, नाही कां?"

"ठीक आहे, कुणालातरी पाठवून बघून येण्यास सांगा. परंतु अधिकाऱ्यांवर विनाकारण कांही ठपका ठेवण्याचा प्रयत्न झाल्यास कठीण शिक्षा होईल हे मात्र लक्षांत ठेवा." प्रतापने या शब्दात

बजावून सांगायला सांगितले. मंत्र्याने पाठविलेला चमत्कृति नांवाचा हेर त्या ग्रामीण भागांत जाऊन आला व तिथे पाहिलेल्या बिकट स्थितीचे विवरण त्याने मंत्र्यास दिले. ते ऐकून मंत्री म्हणाला– "तिथली परिस्थिति इतकी दारुण असेल असे मला वाटले नव्हते! फिर्यादी बंद झाल्यामुळे अधिकाऱ्यांना कांही धरबंध उरलेला नाही. असेच जर चालत राहिले तर राजद्रोह किंवा बंड व्हायला फार काळ लागणार नाही. परंतु ही माहिती राजापुढे कशी मांडावी हेच कळेनासे झाले आहे!" "खरा प्रकार मीच युक्तीने राजापुढे निवेदन करण्याचा प्रयत्न करून पाहातो." असे चमत्कृती म्हणाला.

"राजाला राग आल्यास तो तुला कडक शिक्षा करील एवढे लक्षात ठेव. याऊपर तुझी मर्जी, सावध रहा!" अशी सूचना मंत्र्याने दिली.

"देशाचे क्षेम इच्छिणाऱ्याला अशा संकटांना तोंड देणे चुकले आहे का?" असे म्हणून चमत्कृती राजाकडे गेला.

"ती तीन गांवं कशी आहेत?" असे राजाने विचारले.

"आपल्या कृपेमुळे सर्व ठीकच आहे, प्रभू! परंतु आपण रागावणार नसाल तर एक लहानशी विनंती करणार आहे मी आपल्याला!" चमत्कृती म्हणाला. "कुणावर आरोप करणार असलास, तर कठीण शिक्षेस पात्र ठरशील." प्रताप म्हणाला.

"आरोप नव्हे, परंतु मला एक छोटीशी उणीव भासली. प्रभू! ती आपल्यामुळेच झाली असावी असे मला वाटते." चमत्कृति धैर्याने म्हणाला.

"माझ्यातील उणीव भरून काढून ती दुरुस्त करण्यासाठी मी सदैव तत्पर असतो. कोणती ते सांग." राजा म्हणाला.

"वीरपुरशी तुलना केली असता धीरपूरवर व या दोन्हींशी तुलना केली असता शूरपूरवर फार अन्याय झाला आहे, असे माझ्या मंदबुद्धीस वाटते!" चमत्कृती म्हणाला. "जे कांही सांगायचे असेल ते स्पष्टपणे सांग!" प्रताप चिडून म्हणाला.

"वीरपूरमध्ये एकच मनुष्य पूरग्रस्त आहे. त्याला आपण एक लाख वराह दिलेत. त्यामुळे तिथली प्रजा आपल्या औदार्याची स्तुती करीत आहे. धीरपूरमध्ये पूरग्रस्त दोघे आहेत. त्यामुळे त्यांना दोन लाख वराह द्यायला हवे होते, परंतु त्यांना फक्त एक लाख वराहच दिले गेले. तसेच शूरपूरमध्ये पूरपीडितांची संख्या तीन आहे. त्यांनासुद्धा एक लाख वराहच दिले गेलेत. तसे पाहिले तर एकेका पूरग्रस्ताला शंभर वराह दिले तरी ते स्तुत्य ठरेल. तेव्हा आपण एकेकाला जे तीस हजार दिलेत ते कांही कमी स्तुत्य नव्हे. परंतु सर्वांना एकसारखेच एकेक लाख दिले असतेत तर ते अधिक बरे झाले असते असे मला वाटते." चमत्कृती म्हणाला.





"मूर्खा! त्या प्रत्येक गांवात शेकडो पूरग्रस्त आहेत, हे मी स्वत: डोळ्यांनी पाहिले असतां, तिन्ही गांवात मिळून एकूण फक्त सहाच पूरग्रस्तांबद्दल बोलतो आहेस! तुझे डोके तर टिकाणावर आहे ना?" राजा म्हणाला.

"प्रभू!" एका महात्म्याच्या सत्कारासाठी एक पुष्पमाला करवून घेतलीत व ती एका व्यक्तीच्या गळयांत स्वत:च्या हातांनी घातलीत तर ती व्यक्तीच तो महात्मा, असेच आम्ही समजावे ना?" चमत्कृती म्हणाला.

"होय" राजा म्हणाला.

"आपण पूरग्रस्तांसाठी म्हणून कांही साह्य केले. ते धन ज्यांना मिळाले, त्यांनाच ना मी पूरग्रस्त म्हणून ओळखणार?" चमत्कृती म्हणाला.

"म्हणजे काय? तुझे म्हणणे आहे तरी काय?" राजाने विचारले.

"प्रभू, आपण कुणाची फिर्याद ऐकून घेत नाही. आपले अधिकारी विश्वासपात्र! मी तीन्ही गांवी गेलो. आपण पूरग्रस्तांना म्हणून दिलेले धन–वीरपूरमधील एकाला, धैर्यपूरमधील दोघांना व शूरपूरमधील तिघांना प्राप्त झाले आहे. म्हणून ते सहाजणच पूरग्रस्त असावेत असे मला वाटले." चमत्कृती नम्रपणे म्हणाला.

या मागे कांही तरी रहस्य असावे असा राजा प्रताप यास संशय आला. कुणालाही न सांगता तो स्वत: त्या तीन गांवी गेला. अधिकाऱ्यांनी केलेल्या अन्यायांची माहिती काढून घेतली. स्वार्थी व अकर्मण्य अशा अधिकाऱ्यांच्या या वर्तनाने त्याला अतिशय दु:ख झाले. त्या तिन्ही गांवांच्या सहाय्यार्थ नवीन योजना कार्यरूपात आणल्या व त्या दुर्मार्गी अधिकाऱ्यांना योग्य ती शिक्षा केली. त्यानंतर परत फिर्यादी ऐकण्यास त्याने सुरुवात केली.

मंत्र्याने चमत्कृतीचा विशेष सम्मान केला. तेव्हापासून कुणी जर सरकारचा पैसा खाल्ला तर त्यांना "पूरग्रस्त" म्हणण्याचा प्रघात पडला.






[ १४ ]

[समरसेन शिवदत्ताच्या सैनिकांबरोबर निघाला. तो गांवाजवळ आला असता व्याघ्रदत्ताचे अनुयायी गांवात जाळपोळ करीत असलेले दिसले. तिथे शिवदत्ताचा एक अनुयायी त्यांना भेटला. आपला नायक पळून गेल्याचे त्याने त्या लोकांना सांगितले. त्याच्यासाठी निघालेला शिवदत्त डोंगरावरच्या अरण्यात अडकून पडला. त्यानंतर–]

एका मोठ्या खडकाआड लपून समरसेन हत्तीकडे बघत होता. त्याच्या सोबत असलेले सैनिक आपले प्राण तळहातावर घेऊन थरथर कांपत होते. हत्तींचा एक मोठा कळप त्या भुयारातून बाहेर पडला, तो आपल्याला पायाखाली तुडवून चेंदामेंदा करील अशी त्यांना भीती वाटत होती. ते एका छोटयाशा प्रदेशात अडकून पडले असून तिथून पळून जाणे सोपे नव्हते.

अशा तऱ्हेने भ्यालेल्या समरसेनाला व सैनिकांना एकाच वेळी दोघां-तिघांची किंकाळी ऐकू आली. त्यामागून एक आर्तनाद ऐकू आला. तो आवाज गुहेच्या बाहेरील बाजूकडून ऐकू येत होता. पण त्यांना ते असलेल्या जागेहून बाहेर निघायला भीती वाटत होती.

आता काय करावें अशा विवंचनेमध्ये पडले असतांना हत्तीने डोके उंचावून चारी



दिशांना पाहिले. मोठ्याने चित्कार केला व पूर्वी समरसेन व सैनिक ज्या गुहेतून बाहेर पडले होते त्या गुहेत शिरला. थोड्या वेळानंतर तो गुहेबाहेरील जल-प्रपाताच्या पाण्यांतून जात असल्याचा आवाज स्पष्टपणे ऐकू येऊ लागला.

आधी समरसेन लपलेल्या जागेतून बाहेर पडला. त्यानंतर त्याचे सैनिकही बाहेर आले. मधून मधून गुहेपलीकडून आर्तनाद ऐकू येत होता.

"कुणीतरी संकटात सांपडल्यासारखे दिसतेय!" एक सैनिक म्हणाला.

"ह्यांत कांही शंका घेण्याचे कारण नाही. परंतु हत्ती अचानक या गुहेतून घाबरून जाऊन कां आला असावा? शत्रूंनी आपल्याला अडकविण्यासाठी जाळे तर पसरले नाही ना? तो खरोखर आर्तनादच आहे, की…" समरसेन म्हणत होता तोच गुहेबाहेर मोठा कोलाहल माजल्यासारखा आरडा-ओरडा ऐकू येऊ लागला.

आतां विचार करीत बसण्यात कांही अर्थ नाही असा विचार समरसेनने केला. गुहेबाहेर असलेले ते लोक शत्रू असोत किंवा मित्र असोत कुठल्यातरी संकटांत सांपडलेले दिसताहेत. तेव्हां धैर्य राखून पुढे जाऊन ते समजून घेणे आवश्यक आहे असे त्याला वाटले.

समरसेनने सैनिकांना सावध केले व तो पुढे निघाला. चिंचोळ्या गुहेतून थोडे पुढे गेले असता त्याला पलिकडे गुहेचे द्वार व त्याला लागूनच एक तळे दिसले. त्या तळ्यातील पाण्यांत कांही मोठ्या झाडांच्या फांद्या उतरलेल्या व पाण्यातील लव्हाळी फारच उंच वाढलेली दिसली.

समरसेन आणखी थोडा पुढे गेला असता गुडघ्याएवढ्या पाण्यांत तीन जण खांबांना बांधलेल्या स्थितीत त्याच्या दृष्टीस पडले. समरसेनाला पाहताच ते अधिक आक्रोश करू लागले.

खरी परिस्थिती काय असावी याचे आकलन समरसेनला किंवा सैनिकांना झाले नाही. खांबांना बांधलेल्या व्यक्तींना बंधमुक्त केल्याने कांही प्रमाद तर घडण्याची संभावना दिसत नाही. कारण आजूबाजूला कुणी असल्याचे समरसेनला दिसले नाही. परंतु त्याला पहाता क्षणीच ते मोठ-मोठ्याने आक्रोश का करीत आहेत? याचे समरसेनला नवल वाटले.

स्तंभांना बांधलेल्याना सोडवायचे म्हणजे त्या तळ्यातील पाण्यात उतरून समरसेनला थोडे पुढे जावे लागणार होते. तळे फार खोल नसावे, असा अंदाज, तळ्यात उगवलेले लव्हाळे पाहून सहज करता येत होता. समरसेनने तलवार सरसावली व बाणांचा भाता सावरून पाण्यात शिरला.

सैनिक त्याचे अनुकरण करीत होते. ते थोडे पुढे सरसावले तोच त्या तिघा बंदींनी कानाचे पडदे दुखतील अशी कर्ण-कटू किंकाळी फोडली. क्षणातच तळ्यातील पाणी खळबळू लागले.

समरसेन स्तिमित झाला. समोरून एक मोठी मगर जबडा वासून त्याच्या दिशेने येऊ लागली. तत्क्षणी ती स्तंभबद्ध माणसं आक्रोश कां करीत होती, हे त्याच्या लक्षात आले.

मगरीच्या मोठ्या व काळ्या भयंकर शेपटीने तळ्याचे पाणी घुसळल्यासारखे झाले. त्यामुळे पाणी फेसाळले होते. एवढ्या मोठ्या व भयंकर मगरीला पाण्यात शिरून मारणे कांही सामान्य बाब नव्हे!





तलवार बाजूला टाकून समरसेनने धनुष्य सरसावले व भात्यातून बाण काढून नेम साधला. मगर शेपटी हलवीत, आ वासून आपले तीक्ष्ण सुळे दाखवीत झपझप पुढे येऊ लागली. समरसेनने तिला आपल्या आवाक्यात येऊ दिले व तिच्या जबड्यात त्याने बाण सोडला. बाणाघाताने मगर क्षणभर पाण्यात गिरगिर फिरली व परत पुढे येऊ लागली. रागामुळे चकाकणारे तिचे डोळे पाहून भीती वाटत होती.

यावेळी समरसेनने तलवार उगारली व मगरीच्या पाठीच्या कण्यावर दोनदां पूर्णशक्तीनिशी वार केले. त्या मरणाघातांनी मगर पाण्यावर तरंगू लागली. आता पावेतो भयकंपित होऊन हे दृश्य पहात असलेल्या त्या तिघां बंदीजनांच्या जिवात-जीव आला. जवळ जाऊन त्यांना पाहून समरसेनला वर्णनातीत आश्चर्य वाटले.

ते तिघे, तो व्याघ्रदत्ताच्या अनुचरांकडून गुहेत बंदी होण्यापूर्वीचे त्याच्या बरोबरचे त्याचे साथीदार होते. पण त्या चौथ्या सैनिकाचे काय झाले? समरसेनला ओळखताच त्या तिघांच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. त्यांचा आनंद गगनांत मावेनासा झाला त्यांच्या प्राणांचे रक्षणच नव्हे तर त्यांचा नायकसुद्धा त्यांना भेटला.

"सेनापती! परत या जन्मी तुम्हांला पाहूं शकू असे वाटले नव्हते!" एक सैनिक म्हणाला.

"तो चौथा साथीदार कुठे आहे?" समरसेनने पृच्छा केली.

"तो तुम्ही मारलेल्या मगरीच्या पोटात गेला. वेळेवर येऊन तुम्ही आमची सुटका केली नसती तर आम्हीही तिथेच पोचलो असतो!" सैनिक म्हणाले.

सैनिकांनी घडलेले सारे थोडक्यात सांगितले. ते त्यांच्या नायकाला शोधीत गुहेच्या तोंडाशी आले व बाहेर पडून या प्रांतात आले. इथे त्यांना व्याघ्रदत्ताच्या सैनिकांनी पकडून व्याघ्रदत्ताकडे नेले. त्याच्या आज्ञेनुसार त्यांनी ह्यांना तळ्यांत बांधून या मगरीचे भक्ष्य होण्यासाठी सोडून दिले.

"ते सैनिक इथून निघालेल्याला फार वेळ झालेला नांही. त्या झाडामागे जाऊन पाहिले तर, ज्या वाटेने ते गेले ती पायवाट दिसते," सैनिक म्हणाले.

सगळ्यांनी त्या झाडामागे जाऊन पाहिले. व्याघ्रदत्त आपल्या सैनिकांबरोबर पुढे-पुढे जात असलेला त्यांना आढळला. व्याघ्रदत्ताकडे पाहून समरसेनने जोरांत दांत-ओठ चावले. परंतु त्याच्या जवळ असलेल्या अपुऱ्या सैनिकांना घेऊन, त्याला करता येण्याजोगे कांहीच नव्हते. सगळ्यांत आधी शिवदत्त कुठे आहे ते शोधून काढणे अत्यावश्यक आहे, असे समरसेनला वाटले.

समरसेन असा विचार करीत आहे तोच एका सैनिकाने हळूच शीळ घातली व झाडाच्या शेंड्याकडे खूण करीत तो म्हणाला—"सरदार! ते बघा, काय आहे?"

झाडाच्या एका फांदीवरून एक कागद लोंबकळत होता. नवल वाटून समरसेनने तो कागद हस्तगत केला व उलगडून बघितला. त्यांत असे लिहिले होते:

"हा प्रदेश अतिशय भयंकर आहे. लवकरात लवकर इथून निघून जा."



ही शिवदत्ताचीच सूचना आहे, हे समरसेनने ओळखले. हे फार घाई-घाईने लिहिले आहे असे त्या चिठ्ठीतील अस्पष्ट अक्षरांवरून समजत होते. 'ताबडतोब इथून निघण्यातच क्षेम आहे', असा समरसेनने निर्णय घेतला.

आल्या वाटेने माघारी फिरण्याचे त्याने ठरविले. परंतु आडोशास असलेल्या त्या गुहेकडे निर्देश करीत एक सैनिक म्हणाला—"ती बघा! त्या गुहेपुढे बरीच माणसं चालत गेल्यासारखी, पावलांच्या खुणांनी झालेली अस्पष्ट वाट दिसत आहे."

समरसेनने त्या बाजूचे गवत व जमिनीवरील दगडगोट्यांकडे न्याहाळून पाहिले

सैनिकाच्या म्हणण्यात तथ्य असल्याचे त्याच्या लक्षात आले. शिवदत्त कदाचित याच वाटेनें गेला असेल, असा त्याच्या मनाने कौल दिला.

समरसेनने पुढे सरसावून गुहेच्या आंत डोकावून पाहिले. सर्वत्र अंधारच अंधार होता. एका सैनिकाने मशाल पेटविल्या-नंतर सर्वजण पुढे जाऊ लागले.

थोडे पुढे गेल्यानंतर त्यांना जे दृश्य दिसले, त्यामुळे त्यांना भीतियुक्त आश्चर्य वाटले. एके ठिकाणी दगडात कोरलेले एक सिहासन होते. त्याच्या भोवती मान-वाकारातील पुतळे होते. त्यांचा पेहराव व धारण केलेली आयुधे पाहतां, ते रानटी लोक असावेतसे वाटले.

"ही एखाद्या रानटी लोकांच्या सर-दाराची समाधी असावीसे दिसते! कांही असले तरी, इतका भयंकर प्रदेश मी कधीही पाहिलेला नाही. या रानटी लोकांचे हे भयंकर पुतळे पाहत असतां, मला 'एकाक्षी' मांत्रिकाला पाहिले त्या-हूनही अधिक भीती वाटतेय!" समरसेन म्हणाला.

ज्यांचा नायकच असे म्हणतो त्या सैनिकांना वाटत असलेल्या भीतीची सांगून सोय नाही. ते एकमेकाची तोंड बघू लागले. भीतीमुळे ज्याची बोबडी वळली



होती. तो सैनिक तर, मागच्या पावली पळायला लागला.

अविचाराने केलेल्या भाषणाचा समर-सेनला फार पश्चात्ताप झाला.

नायक असणाऱ्या व्यक्तीने, कुठल्याही परिस्थितीत घाबरल्यासारखे कधीही प्रद-शित करू नये.

समरसेनने बाकीच्या सैनिकांना धीर दिला व पुढे जाऊ लागला. हा प्रदेश शक्य तेवढ्या लवकर सोडून निघून जाणेच त्याला व त्याच्या सैनिकांना कुशलतेचे आहे, असा विचार त्याने केला. शिवदत्त, कुठे आहे हे शोधून काढणे त्याला कष्ट-साध्य वाटू लागले. त्यामुळे त्याच्या नादी

न लागता आल्या वाटेने बाहेर पडलेले बरे असे त्याला वाटले. परंतु तिकडची परिस्थिती सुद्धा फारशी अनुकूल नव्हती. एका बाजूला एकाक्षी मांत्रिकाच्या कचाट्यात सांपडण्याची भीती होती तर दुसरीकडे द्रोही कुंभांड होता!

वाटेल तो त्रास सहन करून शिवदत्ताला भेटणेंच योग्य होईल असे त्याला वाटले. देवीने प्रसाद म्हणून दिलेले त्रिशूळ कुठे आहे, ते त्याला ठाऊक होते. एकाक्षी व चतुराक्ष यांच्या गुरूचे होते ते त्रिशूळ! म्हणून त्या त्रिशूळाला 'मागे फिरणे' माहितच नसणार, ते अद्वितीय असेच असणार!

विचार करता, शिवदत्ताची नीतीदेखील शंका घेता येण्यासारखी समरसेनास वाटली. तो त्याचा खरा मित्रच असू शकेल कां? की तसे नाटक करतो आहे?

नौकेतील धनाच्या राशी व त्यांचे रक्षण करणारी नागकन्या यांची माहिती या सर्वांनाच आहे, हे तर खरेच आहे. एकाक्षी मांत्रिक व चतुराक्ष नव्हेत तर व्याघ्रदत्त व शिवदत्त सुद्धा, ती हस्तगत करण्याच्या प्रयत्नात आहेत. या सर्वांच्या भांडणात तो अडकला असून कष्टाचा वाटेकरी झाले आहे...

असा विचार करीत समरसेन गुहेतून बाहेर पडला. 'कुणीकडे जावे' या निर्णयावर यायच्या आंतच, मोठमोठ्या आरोळ्या ऐकू येऊ लागल्या त्या मागोमाग भाले व बाण त्यांच्या दिशेने फेकलेले दिसू लागले.

"शत्रू! दगडांमागे लपा!" त्याने सैनिकांना सावध केले व तो स्वतः बाजूला असलेल्या खडकांच्या टेकड्यांच्या दिशेने पळू लागला.

दूरवर डोंगरांच्या खडकावरून कांही सैनिक त्यांच्यावर बाणांचा वर्षाव करीत असलेले समरसेनास दिसले. "ते कोण असावेत? व्याघ्रदत्ताचे अनुयायी, की कुंभांडाचे रानटी लोक?" असा प्रश्न त्याच्या पुढे उभा राहिला.

(क्रमशः)



# पराजित गंधर्व

आपला हेका न सोडता विक्रमादित्य झाडाकडे परत वळला व झाडावरील शव खांद्यावर घेऊन नेहमीप्रमाणे मौन राहून स्मशानाच्या दिशेने जाऊ लागला, तेव्हा शवातील वेताळ—"राजा, तुझे अशा तऱ्हेने कष्ट ओढवून घेणं पाहतांना मला तुझी दया येत आहे. शरीरबलामध्ये मनुष्यांची देवांशी तुलना करता येत नाही, परंतु बुद्धीबलामध्ये देवांनाही मागे हटविणारे कांही लोक तुमच्यात आहेत. अशाच एका माणसाची गोष्ट मी तुला सांगतो. श्रमपरिहार म्हणून ऐक." असे म्हणून तो पुढे सांगू लागला :—

प्रगल्भ नांवाचा एक गंधर्व भूलोकावरील नवल बघत आकाशात हिंडत असतां, एका अरण्यात एक मनुष्य त्याच्या दृष्टीस पडला. तो मनुष्य फाटके कपडे घातलेला व अतिशय रोड होता. एका फळाच्या



झाडाखाली, गळून पडलेली फळं वेचून खात होता.

त्या गर्भदरिद्री मनुष्याला बघून गंधर्वाला त्याची कीव आली. तसेच त्याला आपल्या गंधर्व लोकांतील ऐश्वर्याच्या गोष्टी सांगून, स्वतः जवळील अपूर्व शक्तीचे प्रदर्शन करावे अशी त्याला बुद्धी झाली.

लगेच तो गंधर्व आकाशातून खाली उतरला व त्या दरिद्री माणसापुढे उभा राहिला. त्याला पाहून तो मनुष्य घाबरला व म्हणाला–"तुझे रूप पाहिले असतां, तू मनुष्य नसावास अशी शंका येत आहे. तू कोण आहेस?"

गंधर्वाने तो गंधर्वलोकाचा रहिवासी असल्याचे सांगून तेथील ऐश्वर्याचे रसभरीत वर्णन केले. नंतर त्या मनुष्यास म्हणाला–"तुझे नांव काहीही असले तरी आजन्म दरिद्री आहेस, हे दिसतेच आहे! माझे नांव प्रगल्भ असून मी अपूर्व शक्तिशाली आहे."

त्याचे भाषण ऐकून तो दरिद्री हळूच हसला. म्हणाला–"अपूर्व शक्तीशाली आहेस असे सांगण्यात प्रयोजन काय? मी कधी पाहिले तरी आहे काय? त्या शक्तीमुळे तुला करणे शक्य असलेली घनकार्ये कोणती ती करून तरी दाखव." म्हणाला.

"तर मग, काय करून दाखव म्हणतोस सांग! तूं सांगशील ते जर मला करता आले नाही, तर आपला पराजय मानून माझ्या जवळील सर्व सम्पदा तुला देऊन जाईन. व समजा तूं हारलास तर तुझे कुत्र्यांत रूपान्तर करीन." रागाने गंधर्व म्हणाला.

"ठीक आहे." असे म्हणून, बाजूचे एक झाड दाखवीत दरिद्री म्हणाला–"तुझ्या अपूर्व शक्तींच्या प्रयोगाने त्या झाडाला हत्तीचे रूप देऊ शकशील कां?"

गंधर्वाने ताबडतोब त्या झाडाच्या दिशेने हात उंचावला व तो कांही तरी पुटपुटला. तत्क्षणी ते झाड हत्ती बनले व चित्कार करीत समोरून पळत गेले.

"अहाहा! अद्‌भुत!" असे म्हणत दरिद्र्याने टाळ्या वाजविल्या. गर्वाने त्याच्याकडे पहात गंधर्व म्हणाला–"आणखी काय करू सांग."

दरिद्री गंधर्वाला आपल्या घरी घेऊन गेला. ते एक लहानसं खोपटं होतं. ते दाखवीत म्हणाला–"याचे सुंदर अशा महालात रूपान्तर कर." गंधर्वाने त्या झोपडीच्या ठिकाणी, क्षणांत सुंदर भवन निर्माण केले.

दरिद्र्याने आपल्या पंगू भावाला गंधर्वाला दाखविले व त्याला चांगले करण्यास सांगितले. गंधर्वाच्या शक्तीमुळे त्याच्या भावाचे पांगळेपण दूर झाले व त्याचे पाय सशक्त बनले. ते पाहून दरिद्र्याने भावाच्या पाठीवर थोपटले व समाधानाने हंसला.

ते पाहून गंधर्वाला राग आला. "आतापर्यंत तू सांगितलेले सर्व कांही मी केले. तुझी वागणूक पाहता, तूं लबाडी करून मला फसविण्याच्या प्रयत्नात दिसतो आहेस, मी काही भोळाभाबडा नव्हे!" असे म्हणत गंधर्वाने चुटकी सरशी ते भव्य भवन नाहिसे केले व दरिद्र्याच्या भावाला परत अपंग बनविले.

दरिद्र्याचा चेहरा रडवेला झाला. गंधर्व महदानन्दांत म्हणाला–"माझ्या अपूर्व शक्तींचा प्रयोग करून तू सांगशील ते सर्व मी केलेले आहे. तेव्हां तुझी हार झाली, नाही कां? आता तुझे कुत्र्यात रूपांतर करून मी माझ्या लोकात निघून जातो."



ते ऐकताच दरिद्रयाने स्वतःला सावरले.

"एवढ्यानेच काय झाले? हे एक काम तू करू शकलास तरच जिंकल्यासारखे होईल." तो म्हणाला.

"ठीक आहे. ते काम कोणते ते सांग बघू लवकर!" गंधर्व म्हणाला.

"तसं विशेष काही नाही, परंतु तुझ्या अपूर्व शक्तींच्या साह्याने मी तुझ्यासारखा व तू मजसारखा होशील असे कर." दरिद्री म्हणाला.

गंधर्वाने क्षणभर विचार केला व कांपऱ्या आवाजात "मीच पराजित झालो!" असे म्हणून त्या दरिद्रयाचे घर, विशाल सुंदर भवन करून देऊन त्याच्या अपंग भावाचे पंगुत्व घालवून तिथून निघून गेला.

वेताळाने इथवर गोष्ट सांगितली व म्हणाला—"राजा, मला एक शंका येत आहे, एवढा अपूर्व शक्तीशाली गंधर्व, त्या दरिद्रयाची शेवटची इच्छा ऐकताच असा कां घाबरला? त्याने आपला पराभव कां स्वीकारला? या प्रश्नाचे उत्तर माहिती असूनसुद्धा गप्प राहिलास तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होतील"

त्यावर विक्रमार्क असे म्हणाला—"एवढा अपूर्व शक्तीशाली गंधर्व त्या दरिद्रयाकडून पराजित होण्याचे कारण त्याच्या आकलन-शक्तीची कमतरता नसून त्याची बुद्धी-मत्ताच होय. आपल्यासारखा बुद्धिमान कुणीही नाही असा अहंकार त्याच्या पराभवास कारणीभूत झाला. त्या दरि-द्रयाची अखेरची इच्छाच गंधर्वाचा अहंकार घालवून त्याला विचार करण्यास प्रवृत्त करूं शकली. दरिद्रयाची शेवटची इच्छा पुरवायची म्हणजे त्याच्या अपूर्व शक्तींना त्याला मुकावे लागले असते व त्या दरिद्री माणसाने त्याला कुत्रा बनविण्यास मागे-पुढे पाहिले नसते! असे होण्याची शक्यता दिसताच त्याने त्या दरिद्रयाला सर्व ऐश्वर्य दिले व तिथून निघून गेला."

राजाचा अशा तऱ्हेने मौनभंग झाला असता वेताळ शवासहित परत त्या झाडावर पूर्वीसारखाच लोंबकळू लागला. (कल्पित)



# सांभाळ

रामराव अमरावती येथे छोटासा व्यापार करीत असत. त्यांच्या घरी त्यांची पत्नी, मुलगी व त्यांच्या धाकट्या भावाची मुलगी रहात असत. भावाची बायको वारल्यामुळे रामराव तिला आपल्याकडे घेऊन आले होते. रामरावांची बायकोसुद्धा कुठलाही भेदभाव न बाळगता आपल्या मुलीबरोबर पुतणीचाही सांभाळ करीत असे.

सणावारासाठी मुलींसाठी कपडे खरेदी करण्यास रामराव कापड-दुकानांत गेले की स्वतःच्या मुलीसाठी महाग व चांगले कापड घेत असत व पुतणीसाठी स्वस्त दराचे कापड निवडीत असत. रामरावांची बायको ते कपडे परत करून दोघींनाही सारखेच विकत घेत असे. चार वर्षे लोटली. रामरावांनी पुतणीसाठी स्वस्त कापड घेतले तरी त्यांच्या बायकोने काही हरकत घेणे सोडून दिले. तसेच स्वतःच्या मुलीला चांगले अन्न वाढू लागली व पुतणीला उरले सुरले देऊ लागली.

एके दिवशी रामाराव आपल्या पुतणीला बरोबर घेऊन शेजारी असलेल्या खेड्यामध्ये आपल्या भावाच्या घरी गेले. "तुझी भावजय चार-पांच महिन्यापूर्वीपर्यंत तुझ्या मुलीचा प्रेमाने सांभाळ करीत असे. मी तिचे मन पाहण्यासाठी म्हणून सणावाराकरिता या मुलीसाठी स्वस्त कपडे घेतले तर माझ्याशी वाद घालून तिला चांगले कपडे देववीत असे. परंतु आता ती स्वतःच हिच्यासाठी स्वस्त कपडे विकत घेते आणि काही दिवस गेल्यावर ती हिचा जाचही करण्यास मागे पुढे बघणार नाही. तेव्हां या पुढे तुझ्या मुलीचा सांभाळ करण्याची जबाबदारी तुलाच घ्यायला हवी!" रामराव म्हणाले.





# अपवाद

श्यामापूर हे आजूबाजूच्या खेडयांतून तालुक्याला जायला मोक्याचे गांव होते. काशीला जाऊन वैद्यकविद्या शिकून आलेल्या माधवने श्यामापूरला आपले बिऱ्हाड मांडले व वैद्य म्हणून चिकित्सेला प्रारंभ केला.

एके दिवशी कांही लोक झाडावरून पडलेल्या एका मुलाला उचलून माधवकडे घेऊन आले. त्या मुलाला बराच मार लागल्यामुळे तोवर बरेच रक्त जखमांतून वाहून गेले होते. माधवने जिवापाड काळजी घेतली, परंतु त्या मुलाचे प्राण कांही वाचले नाहीत.

चार दिवसानंतर एका म्हाताऱ्याला पक्षाघाताचा झटका आला व त्याचे हात-पाय काम करीनासे झाले. नातेवाईक त्याला माधवकडे घेऊन आले. माधवने कितीही औषधं वापरली तरी काही लाभ झाला नाही. दोन दिवसानंतर वृद्ध दिवंगत झाला.

दुसऱ्या एका तरुणाच्या बाबतीतसुद्धा असेच घडल. माधवने चिकित्सेला सुरुवात करून एक महिनाही लोटला नाही तों त्याच्याकडे चिकित्सेसाठी आलेल्यांपैकी तिघेजण अशा तऱ्हेने दगावल्यामुळे त्या गांवातील लोक–"माधवच्या हातचे औषध घेणे-म्हणजे वैकुंठाला जाणे" असे म्हणू लागले.

आता यापुढे आपल्याकडे कुणी औषधाला येणार नाही हे माधवला पुरते समजून चुकले, म्हणून तो दुसऱ्या गांवी जाऊन स्थिर व्हायच्या विचारात होता. त्याच्या शेजारी बिऱ्हाडी असलेल्या कमलाबाईंच्या पोटात एकाएकी खूप दुखू लागले.

माधवच्या औषधावर विश्वास नसणारा तिचा नवरा पंढरी, त्याच्या ओळखीच्या वामनराव नांवाच्या कुडमुड्या वैद्याला घेऊन आला, परंतु त्याच्या औषधाने कांही उतार पडला नाही.

कमलाबाई मोठ्याने कण्हू लागली. "अयाई ग! हे दुखणं सहन करवत नाही गं! त्या शेजारच्या माधववैद्याला तरी कुणी बोलवा हो! कुठली वेळ कशी, सांगता येत नाही. अयाई ग!"

पंढरीला तिची अवस्था बघवेना. म्हणून तो माधवलाच बोलवून घेऊन आला. माधवने आल्या आल्या कमलाबाईंना कसलीतरी एक पुडी पाजली. त्या बरोबर जादू झाल्याप्रमाणे कमलाबाईंचे दुखणे कमी झाले.

पंढरीचा आनंद सांगून सोय नाही.

दुसऱ्या दिवशी गांवच्या पाटलाचा मुलगा रंगा एकाएकी खाली पडला व हात-पाय झटकू लागला. वामनरावांच्या औषधाचा कांही उपयोग झाला नाही. मारोतराव पाटील हवालदील झाले. रंगाच्या सांगण्यावरून त्यांनी माधवला बोलावणे धाडले.

माधवने आल्याबरोबर रंगाची नाडी पाहिली व त्याला कसलीशी गोळी दिली. नंतर कसलासा लेप त्याच्या हाता-पायाला चोळला. एक-दोन तासानंतर रंगाचे हात-पाय झटकणे कमी झाले. तीन दिवसानंतर तो पूर्ण बरा झाला. मारोतराव पाटलांना अतोनात आनंद झाला. त्यांनी माधवच्या घरी एक पोतंभर गहू व थोडे रुपये गड्याकडून पाठवून दिले.



अशा रीतीने गांवातील प्रतिष्ठित माणसांचा विश्वास माधवला मिळाला त्या बरोबर वैद्यक शास्त्राच्या त्याच्या ज्ञानाची दहा लोकांमध्ये चर्चा झाली.

· तेव्हांपासून माधवकडे रोग्यांची नियमितपणे ये-जा सुरू झाली. त्यांना नीट तपासून माधव औषधं देऊं लागला. आजारी बरे होऊं लागले. थोडया कालावधीतच माधवला गांवात चांगली प्रतिष्ठा लाभली व आजूबाजूच्या गांवांमध्ये 'चांगला वैद्य' म्हणून त्याचा नांव-लौकिक झाला.

'माधवच्या हातीं औषध घ्यायचे म्हणजे मुलाचा जीव दुःखात गुतवायचा' असा जो लोकांचा समज होता तो घालविण्यासाठी पंढरीची बायको कमलाबाई व रंगा यांनी जे नाटक रचले ते त्या दोघांशिवाय कुणालाही कळले नाही.

सुरुवातीला मेलेले तिघेही परिस्थिती बिकट झाल्यानंतर माधवकडे आले होते. ह्याची जाणीव नसलेले अडाणी गांवकरी विनाकारणच माधवची निंदा करूं लागले.

कमलाबाई व रंगा मावस भावंडं होती. लहानपणी दोघं एकत्र खेळली होती. दोघांनी एकाच गुरुकडे 'उज्याण बंधाचा' सराव केला होता. 'उज्याण बंध' म्हणजे तोंडात घेतलेली वस्तु न गिळता घशात ठेवायची व कांही वेळानंतर बाहेर काढायची विद्या.

या विद्येचा उपयोग करून कमलाबाईंनी पोट दुखीचे नाटक रचले व बामनगाव वैद्यांचे औषध पिऊन; न गिळता घशात धरून ठेवले. रंगाचे खाली पडून हात-पाय झटकणेही याच नाटकाचा पुढचा अंक होता!

अंधविश्वास नसलेल्या व थोडेबहुत शिकलेल्या रंगाने आपली मावस बहीण कमलाबाई हिची मदत घेतली. अशा तऱ्हेने त्याने गांवाला कुडमुड्या वैद्यापासून वांचविले व वैद्यशास्त्राचा खरा अभ्यास केलेल्या वैद्याला गांवातून जाऊं दिले नाही. त्याच्या या नाटकाची कल्पना माधवलाही नव्हती!





# भक्त गंगाराम

एका खेडेगांवात गंगाराम नांवाचा एक डोंबारी रहात असे. तो आजूबाजूच्या गांवांत जाऊन, चावडीसमोर उभा राहून मोठ्याने चमत्कारीक आवाज काढीत असे. तो ऐकून गांवातील मुले व तरुण त्याच्या भोवती गोळा होत असत.

गंगाराम आपल्या गुरूकडून शिकलेल्या सर्व कलांचे व विद्यांचे न चुकता प्रदर्शन करीत असे. तऱ्हे तऱ्हेच्या कोलांट्या उड्या मारून, चेंडूचे निरनिराळे खेळ दाखवीत असे व शेवटी प्रेक्षकांनी स्वखुशीने दिलेले घेऊन आपल्या गांवी परत जात असे.

'डोंबऱ्याचा खेळ दाखविण्यात कुणी गंगारामचा हात धरूं शकत नाही,' असे सर्वजण म्हणत असत. परंतु त्याची कमाई त्याचे दोन वेळचे पोट भरायला सुद्धा पुरत नसे. तो अतिशय गरीब स्थितीतच होता.

"हे आयुष्य असेच सरले तरी, इहलोकांत सुख मिळाले नाही तरी त्याची खंत वाटत नाही, परंतु मेल्यानंतर मात्र देवीच्या अनुग्रहामुळे परलोकांत तरी सुख मिळाले तरी पुरे आहे!" गंगारामच्या मनांत येई.

गंगारामच्या जन्मगांवी देवीचे एक देऊळ होते. 'ती देवी फार जागरूक आहे' असा आजूबाजूच्या अनेक गांवातील सर्व लोकांचा विश्वास होता. नवरात्र आले म्हणजे सभोवतालच्या सर्व गांवातील लोक त्या देवालयात येऊन मोठा उत्सव साजरा करीत असत व पाण्यासारखा पैसा खर्च करून उत्सव मोठ्या वैभवात पार पाडून आपला भाव प्रगट करीत असत.

हातावर पोट घेऊन ते भरण्यासाठी गंगाराम गांवोगांवी वणवण भटकत असला तरी या नवरात्रांत मात्र न चुकता आपल्या गांवी पोचत असे.

होता होता गंगाराम मोठा झाला. डोंबाऱ्याच्या खेळातील त्याचे कसब कमी झाले नसले तरी त्याची कमाई मात्र कमी कमी होत गेली. याचे कारण असे की आजू बाजूच्या गांवातील लोकांनी त्याची कला शेकडो वेळा पाहिल्यामुळे त्यांना त्याचे कांही नाविन्य वाटेनासे झाले होते. वया-बरोबर त्याची गरीबीही वाढू लागली.

इहलोकांतील सुखं जसजशी दुर्मिळ होऊं लागली तसतशी परलोकांतील सुखां-बद्दल गंगारामची आशा वाढू लागली व त्याचा त्याबद्दल विश्वासही बळाऊ लागला. त्याने गांवोगांव भटकणे कमी केले व देवालयातच अधिक कालक्षेप करूं लागला. एकदा नवरात्र आले. सर्व जण उत्सवा-च्या कामांत मग्न असलेले आढळले. देवालयाच्या सभोवती मंडप घातले जात आहेत. तोरणं बांधली जात आहेत.

सगळ्यांना उत्सवाच्या कामात गर्क असलेलं पाहून गंगाराम तन्मय झाला. "भाग्यवान आहेत! त्या जगन्मातेला सर्वांवर प्रेमळ दृष्टीचा वर्षाव करण्या खेरीज गत्यंतर आहे का? ब्राह्मणांच्या पुण्याईचे तर वर्णनच करता येणार नाही. ते मंत्र म्हणतात, अनंत पुण्याचे स्वामी होतात." त्याच्या मनांत विचार सुरू झाले.

शेवटी त्याच्या मनांत एक मोठा विचार आला. "या उत्सवांत पंचांग बघणारे, कुंडली मांडणारे, वाजंत्रीवाले, भजन कर-णारे, हरिकीर्तन करणारे हरिदास, शेवटी नैवेद्य शिजविणारे स्वयंपाकी व वाढपी सुद्धा आपापल्या शक्तीप्रमाणे देवीची सेवा करतात, व पुण्य मिळवतात. पण मीमात्र-कांहीच करीत नाही. मी त्या आईची कांहीच सेवा करूं शकत नाही! असे वाटून त्याचे हृदय गहिवरून आले.

देवीच्या नवरात्रास प्रारंभ झाला. देवालयाचा परिसर नऊ दिवस भूलोकीच्या वैकुंठाप्रमाणे दिसत होता. हे सर्व बघत असतां गंगारामचे मन आनंदाने उचंबळू लागले. त्याच बरोबर गंगारामचे मन सांगता न येणाऱ्या दुःखाखाली दबू लागले. "एवढ्या लोकांनी देवीची नाना तऱ्हेने सेवा केली. परंतु मी काय केले?" अशा विचाराने त्याला भंडावून सोडले. नवव्या दिवशी त्याच्या मनांत एक चांगला विचार डोकावला. त्यामुळे त्याची सगळी काळजी मिटली.

त्या रात्री पूजा संपल्यानंतर सर्व लोक निघून गेले. प्रसाद वगैरे कांही नासला तर नाही ना, हे बघण्यासाठी पुजारी गाभाऱ्यात जातो, तो एक अद्भुत दृश्य त्याच्या दृष्टीस पडले.

कुंकू व फुलांमध्ये झाकल्या गेलेल्या देवीच्या मूर्तीपुढे गंगाराम कोलांटयाउड्या मारीत सुरे फिरवीत होता! आपले कसब दाखवीत होता!

पुजारी मागच्या पावली पळत जाऊन धर्माधिकाऱ्याच्या दारापुढे उभा राहिला. त्याला जागे करून "महाराज गंगाराम





देवाच्या गाभाऱ्यांत शिरून काय करीत आहे बघा तरी!"

"काय करतोय?" गोंधळून धर्माधिकाऱ्याने विचारले.

"काय हा अधर्म! गाभाऱ्यात शिरून डोंबाऱ्याचे कसब दाखवतो आहे! त्याचे डोके ठिकाणावर दिसत नाही!" पुजारी पुटपुटला.

"तू जाऊन, शासनाधिकारी व न्यायाधिकाऱ्याला बोलवून आण." असे सांगून धर्माधिकारी तडक देवळात गेला.

तो आवाज न करता देवळाच्या मंडपांत गेला व हळूच दाराच्या फटीतून गाभाऱ्यांत काय दिसते ते पाहूं लागला. त्याच्या शरीरावर कांटा उभा राहिला.

गाभाऱ्यात गंगाराम आरामात झोपला होता. देवीने आपल्या मांडीवर त्याचे डोके ठेवले होते. एका हातांत पंखा घेऊन ती त्याला वारा घालीत होती व दुसऱ्या हाताने, साडीच्या पदराने त्याच्या कपाळावरील घाम पुशीत होती! मूर्तीच्या ठिकाणी असायला हवी, तिथे नव्हती! ते पाहताच धर्माधिकाऱ्याने गाभाऱ्या पुढे साष्टांग नमस्कार घातला व खणखणीत स्वरांत देवीस्तोत्र गाऊ लागला.

तोंच कांही ब्राह्मणांना बरोबर घेऊन पुजारी देवळात आला व "हे काय? काय चालले आहे?" म्हणून विचारले.

धर्माधिकारी उठून उभा राहिला. सर्व जण देवळाच्या गाभाऱ्याचे दार उघडून आंत गेले. देवीची मूर्ती जागच्या जागीच होती. गंगाराम शांतपणे झोपी गेला होता. धर्माधिकाऱ्याने स्वत: पाहिले त्या दृश्याचे वर्णन करून सर्वांना सांगितले.

ब्राह्मणांचा त्यावर विश्वास बसला नाही. परंतु कुंकवाच्या ढिगावर देवीची पावलं स्पष्टपणे उमटलेली होती. मूर्तीला नेसविलेल्या साडीचा पदर घामाने ओला चिंब झालेला तसाच होता.

"आपण सगळे ढोंगी भक्तजन आहोत. हा गंगाराम मात्र खरा भक्त आहे, देवीचा लाडका आहे!" धर्माधिकारी म्हणाला.





# महासाध्वी

ब्रह्मदत्त काशीचा प्रजापालक राजा असतांना राजधानीजवळील एका गांवातील संपन्न गृहस्थाच्या घरात बोधिसत्वाचा जन्म झाला.

लहान वयातच तो सर्व विद्यांमध्ये पारंगत झाला. योग्य वयात आल्यानंतर आई-वडिलांनी त्याच्यासाठी काशी नगरीतील एका ठिकाणी लग्नाची बोलणी केली. सुजाता नांवाच्या एका मुलीबरोबर त्याचा विवाह करून दिला. सुजाता सौंदर्यवतीच नव्हे, तर गुणवती ही, होती. ती पतीची व सासु-सासऱ्यांची सेवा करी.

बोधिसत्व सुद्धा तिच्यावर खूप प्रेम करीत असे. अशा रीतीने त्या दोघांची एक वाचा, एक विचार होऊन गुण्यागोविंदाने रहात असत.

कांही काळ लोटल्यानंतर एके दिवशी सुजाता बोधिसत्वाला म्हणाली—"मला माझ्या माता-पित्यांना भेटून यावे असे वाटते आहे. ते वृद्ध झालेले आहेत. तुम्ही सोबत आलात तर दोघे जाऊन त्यांना भेटून येऊ या."

ते ऐकून बोधिसत्वाला आनंद झाला. "ठीक आहे. अवश्य जाऊन येऊ या. माझ्या मनांत सुद्धा बरेच दिवसापासून सासु-सासऱ्यांना भेटून येण्याची इच्छा आहे. घरांत महत्वाची कामं असल्यामुळे गप्प बसलो. नाही तर मीच आधी 'चल जाऊं या' म्हणून निघालो असतो." तो म्हणाला.

दुसरे दिवशी सकाळी निघायची सर्व तयारी झाली. आवश्यक असलेल्या सर्व वस्तु गाडीत घालून प्रवासास निघाले. सुजाता गाडीत बसली. बोधिसत्व गाडीवाल्याच्या जागी बसून गाडी हांकू लागला. काशीनगराच्या वेशीजवळ आल्यानंतर एका झाडाखाली गाडी सोडली. तेथील

तळचात हात-पाय धुतले. सोबत आणलेली शिदोरी खाल्ली. थोडा वेळ विश्रांती झाल्यावर परत गाडी जुंपली व काशी-नगराच्या दिशेने जाऊ लागले.

बोधिसत्वाची गाडी नगरांत प्रवेश करणार तोच काशीराज ब्रह्मदत्ताची हत्तीच्या अंबारीवर बसून मिरवणूक निघाली होती. तो उत्सव बघण्याची इच्छा होऊन सुजाताने पतीची परवानगी घेतली व गाडीतून उतरून पुढे पायी चालू लागली. बोधिसत्व गाडी हांकीत मागाहून येऊ लागला.

अंबारीवर बसलेल्या काशीराजाने अतिशय रूपवती व सौंदर्यवती अशा सुजाताला पाहिले. तिच्याशी विवाह करण्याची राजाला बुद्धी झाली. तिच्याबद्दल चौकशी केली असता ती 'अमूक-अमूक' माणसाची मुलगी असून, गाडीत बसलेली व्यक्ती तिचा पती असल्याचे समजले.

राजाच्या मनांत एक दुष्ट विचार आला. आधी या सुजाताच्या नवऱ्याची विल्हेवाट लावून मग हिच्याशी लग्न करून हिला राणी करूया असे त्याला वाटले. यासाठी त्याने एक बेमालूम योजना आखली.

राजाने आपल्या विश्वासातील एका सैनिकाला जवळ बोलाविले व आपला मुकुट काढून त्याच्या हाती देत, "हा मुकुट, कुणाच्याही दृष्टीस पडणार नाही अशा रीतीने त्या समोर दिसणाऱ्या बैलगाडीत लपवून ये." म्हटले.

सैनिकाने बोधिसत्वाला दिसणार नाही अशी खबरदारी घेऊन 'किरीट' त्याच्या गाडीत ठेवला व येऊन राजाला सांगितले. पंधरा-वीस मिनिटांनंतर लोकांमध्ये एकच गोंधळ उडून गेला-"राजाचा मुकुट कुणी-तरी चोरला" अशी बातमी सर्वत्र पसरली.

राजाने आपल्या सैनिकांना "मुकुट चोरणाऱ्याला शोधून धरून आणा," अशी आज्ञा फर्मावली. एका सैनिकाला बोधिसत्वाच्या गाडीत राज-मुकुट सापडला. त्याला चोर म्हणून धरून ओढत नेऊन राजापुढे उभे केले.

"माझ्या मुकुटाचे अपहरण करणारा हाच का तो?" उग्र होऊन राजा ने विचारले. "याचा शिरच्छेद करा." राजाने आज्ञा दिली.

अशा तऱ्हेने राजाची दुष्ट योजना सफल झाली. सैनिकांनी बोधिसत्वाला कोडगे मारत-मारत रस्त्यावरून त्याची धिंड काढली व शहराबाहेर असलेल्या बलिपीठाकडे शिरच्छेद करण्यासाठी त्याला घेऊन गेले.

ही बातमी समजताच सुजाता दुःखी झाली, व पतीच्या मागेमागे जाऊ लागली. "तुमच्यावर हे संकट येण्यास मीच कारणीभूत झाले." असा ती विलाप करू लागली. बलिपीठाजवळ जाऊन अतिशय वेदनेने "निरपराधी भोळ्या जिवांचे रक्षण करणारा देव उरला नाही का? दुष्टांचा त्रास असाच वाढत राहू देणार का?" असा आक्रोश करू लागली. महासाध्वी अस-





लेल्या सुजाताचा असा विलाप चालला असता, स्वर्गलोकात देवेन्द्राचे सिंहासन डळमळू लागले.

"काय कारण झाले?" आश्चर्य वाटून देवेन्द्राने दिव्यदृष्टीने पाहिले. घडत असलेला घोर अन्याय त्याला दिसला.

इन्द्राने एक चमत्कार घडविला. राजा असलेल्या ठिकाणी बोधिसत्व व बोधिसत्व असलेल्या ठिकाणी राजा, असा अदलाबदल आपल्या महिमेने घडवून आणला.

हत्तीच्या अंबारीत बसलेला राजाच आहे असे प्रजेला वाटत होते. परंतु राजाच्या पोशाखांत असलेला बोधिसत्व तिथे होता. तसेच बलिपीठावर बोधिसत्वाचे कपडे घातलेला राजा आपल्या सैनिकांच्या ताब्यात होता!

हे रहस्य माहीत नसलेल्या सैनिकांनी आपल्या हातात बंदी असलेल्या माणसाचा राजाज्ञेप्रमाणे शिरच्छेद केला. प्राण जाताच बलिपीठावरील दुष्ट राजाला आपले स्वरूप प्राप्त झाले. तेव्हां तेथ गतप्राण होऊन पडलेला मनुष्य दुसरा-तिसरा कुणी नसून आपला राजाच आहे हे प्रजेच्या लक्षात आले. त्याबरोबर मोठा हल-कल्लोळ माजला. या विचित्र चमत्काराचे कारण काय म्हणून एकमेकांकडे पाहू लागले.

तेव्हां इन्द्र प्रत्यक्ष झाला. त्याने बोधिसत्वाला व प्रजेला दर्शन देऊन घडलेला वृत्तांत सांगितला.

"आजपासून बोधिसत्व तुमचा राजा असून सुजाता पट्टराणी आहे!" असे सांगून अंतर्धान पावला.

दुर्मार्गी राजाच्या पापाचा घडा भरल्यामुळे बलिपीठावर त्याची आहुती पडलेली पाहून प्रजेला अत्यानंद झाला. इन्द्राच्या आज्ञेप्रमाणे बोधिसत्वाचा राजा म्हणून व सुजाताचा महाराणी म्हणून अंगिकार केला.

त्या दिवसापासून काशीराज्यात धर्मचारी ठाव नांदू लागला. नियमितपणे पाऊस पडून देश धनधान्याने बहरला.





## दोन्ही नगरांचा नाश

प्रसेनजितच्या कारकिर्दीत कोसल एक प्रबल राज्य होते. त्याची राजधानी श्रावस्ती होती. कपिलवस्तूचे शासक असलेल्या शाक्यांना; प्रसेनजितच्या वंशापेक्षा आपला वंश श्रेष्ठ असल्याचा गर्व असल्याचे एका दूताकडून प्रसेनजितला समजले.

आपले मांडलीक असलेल्या शाक्यांची त्याच्याबद्दल असलेली क्षुद्रतेची भावना समजल्यामुळे त्याला वाईट वाटले. तो कपिलवस्तुला गेला. शाक्यांनी त्याचे जोरदार स्वागत केले. प्रसेनजितने आपली शाक्यराजकुमारीशी विवाहबद्ध होण्याची इच्छा व्यक्त केली. या संबंधामागे 'आपल्या प्रतिष्ठेचा एक दर्जा उंचावण्याचा' त्याचा हेतू होता.





शाक्यांपुढे यक्षप्रश्न उभा राहिला. प्रसेनजितच्या इच्छेचा तिरस्कार केल्यास मोठा प्रमाद घडेल हे त्यांना कळून चुकले. गुप्तपणे आपापसात विचार-विनिमय करून एका शाक्य-कन्येशी त्यांनी प्रसेनजितचा विवाह समारंभ करून दिला.





प्रसेनजित मोठ्या समाधानाने श्रावस्तीला परत आला. त्या रात्री त्याच्या विवाहित नववधूबरोबर आलेला नजराणा पहात असता एक पत्र त्याच्या नजरेस पडले. त्या नववधूचा द्वेष करणाऱ्या एका मुलीने ते लिहिले होते. प्रसेनजितने जिचे पाणिग्रहण केले आहे, ती एका शाक्य-नायकाच्या दासीची मुलगी असल्याचा वृत्तांत त्यात लिहिलेला होता.





प्रसेनजितने रागाच्या आवेशात राजप्रासादावरील युद्ध-घोषणेचा नगारा वाजवून सैनिकांना सावध करण्याची आज्ञा दिली. त्याबरोबर शेकडो सैनिक व योद्धे पळत-पळत प्रासादापुढे जमा झाले व राजाज्ञा ऐकण्यासाठी उभे राहिले.

कपिलवस्तुवर स्वारी जाहीर करण्यापूर्वी एकदा आपल्या नववधूस बघून जावे म्हणून प्रसेनजित तिच्या महालात गेला. ती भोळी-भाबडी मुलगी दुःखातिशयाने रडत असलेली पाहून त्याचे मन विरघळले. लगेच त्याने सैनिकांना परत पाठवून दिले व ती शाक्यकुमारी त्याची पट्टराणी असल्याचे जाहीर केले.





काही काळ लोटल्यानंतर राणीने एका सुंदर मुलाला जन्म दिला. तो मुलगा विरोधक या नावाने वाढू लागला. क्षत्रियोचित सर्व विद्यांमध्ये त्याने प्राविण्य मिळविले. एकदा आपल्या आजोबांच्या भेटीसाठी म्हणून तो कपिलवस्तूला गेला. तिथे त्याच्या पंक्तीला भोजनास कुणीही शाक्य बसला नाही हे पाहून त्याला नवल वाटले.

"शाक्यांच्या या विचित्र वर्तणुकीचे कारण काय?" श्रावस्तीला परत आल्यावर त्याने आईला विचारले व तिथे घडलेला सर्व वृत्तांत त्याने आईला सांगितला. कांहीही आडपडदा न ठेवता तिने सर्व वस्तुस्थिती त्याला समजावून सांगितली. विरोधकाला अतिशय संताप आला.





तो वडिलांजवळ गेला, "शाक्यांनी केलेला घोर अपमान तुम्ही कसा सहन केलात? गप्प कां बसलात?" असे त्याने तीव्र स्वरांत पित्याला विचारले. वृद्धापकाळी युवराज असे दरडावीत असलेला पाहून प्रसेनजित, मगध देशाची राणी असलेल्या आपल्या मुलीकडे गेला व तिथे तो अंथरुणाला खिळला. लवकरच त्याचे देहावसान झाले. विरोधक आतां श्रावस्तीचा राजा झाला.

विरोधकाने कपिलवस्तूवर आक्रमण घोषित केले. सेनाधिपतीने युद्धास ही वेळ अनुकूल नसल्याचे सांगितले. मंत्र्यांनी देखील "प्रसेनजित महाराजांचा अपमान ज्यांनी केला, त्यांपैकी कुणीही आता राहिलेले नाही," असा सल्ला दिला. तरीसुद्धा विरोधक कपिलवस्तूवर चालून गेला.





या अचानक आक्रमणासाठी शाक्य सिद्ध नव्हते. म्हणून विरोधकाच्या सैन्यापुढे त्यांचा निभाव लागला नाही. विरोधकाने राजवाड्यात प्रवेश केला व तिथल्या मूल्यवान वस्तू लुटून राजवाड्याला आग लावली. अगणित शाक्यांना मृत्युमुखी लोटले. कपिलवस्तु नगराचा विध्वंस झाला. विरोधकाने आपली राजधानी श्रावस्ती कडे वाटचाल केली.

तो परत येईपर्यंत, राजप्रासाद भुई-सपाट झालेला होता. मगधचा राजा आपले सासरे प्रसेनजित यांना विरोध-काने यातना दिल्याने अतिशय क्रुद्ध झाला होता. त्याने श्रावस्तीवर आक्रमण केले व श्रावस्तीला मगध राज्यात मिळवून घेतले.





# नोकरीचे महत्त्व

श्रीरंगचे आईवडील लहानपणीच देवाघरी गेले. एकुलता एक छोटा भाऊ मुकुंद होता. त्याला कसलीही कमतरता भासू न देता श्रीरंगने मोठ्या प्रेमाने वाढविले. अतिशय कष्टानेच त्याने आपले शिक्षण पूर्ण केले व भावालाही शिकविले. लवकरच श्रीरंगला सरकारदरबारी चांगलीशी नोकरीही लागली. अद्याप मुकुंदाचे शिक्षण संपले नव्हते. सरकारी नोकरीतील एका गृहस्थाने श्रीरंगशी आपल्या कन्येचा विवाह करून दिला.

पुढे मुकुंदाचे शिक्षण पूर्ण झाले. श्रीरंगने आपल्या ओळखीच्या लोकांच्या मदतीने मुकुंदाला एक छोटीशी नोकरी लावून दिली. तिसऱ्याच दिवशी मुकुंदा ती नोकरी सोडून निघून आला.

"नोकरी का सोडलीस?" श्रीरंगने भावाला विचारले.

"त्या मालकाला मान-मर्यादेचा कांही पोच दिसत नाही. दिलेली नोकरी वेगळी, आणि निराळीच कामे करवून घेतो! मी असली फालतू नोकरी मुळीच करणार नाही." मुकुंदा म्हणाला.

"बरं बाबा! ठीक आहे." असं म्हणून श्रीरंगने त्याला दुसरी नोकरी लावून दिली. त्या नोकरीलासुद्धा तीन दिवसानंतर मुकुंदाने राम-राम ठोकला.

यावेळी श्रीरंग त्याला रागावला असतां— "माझ्यावरचा अधिकारी विनाकारणच कांहीतरी चुका काढून मला रागवीत होता व माझ्यावर अधिकार गाजवून 'कामावरून काढून टाकीन' असा वरचेवर धाक घालीत होता. म्हणून 'तू मला काय काढशील कामावरून? मीच निघून जातो बघ!' असे म्हणून मीच निघून आलो." मुकुंद म्हणाला.



"प्रत्येक वेळेस काहीतरी नवीन सबब सांगून अशी नोकरी सोडत बसलास, तर नवीन नोकरी मी आणू तरी कुठून? ह्या खेपेस जी नोकरी लागेल ती मात्र कितीही त्रास झाला तरी सोडून देऊं नकोस. कांही अडचण असल्यास मी कांहीतरी मार्ग काढीन." श्रीरंगने कानउघाडणी केली. भावाचे बोलणे मुकुंदने शांतपणे ऐकून घेतले.

आणखी एक आठवडा लोटला. श्रीरंग भावाला बरोबर घेऊन दरबारांत गेला. त्याच्यासाठी पाहिलेल्या नोकरीवर स्वतः त्याच्याबरोबर जाऊन त्याला कामाची सुरवात करून दिली व घ्यावयाची दक्षता कोणती व कशी, ते सर्व समजाऊन सांगितले व निघून आला.

चार दिवसांनी मुकुंदा भावाजवळ आला व "मला ही नोकरी जमणार नाही. अधिकारी मला लहान पोर समजतात. मी केलेले कुठलेही काम त्यांना तिळमात्र रूचत नाही." मुकुंद म्हणाला.

श्रीरंगने राग आवरून विचारले–"नोकरी सोडून आलास का?"

"अजून नाही! सोडण्यापूर्वी तुला सांगायला सांगितले होतेस ना?" मुकुंद म्हणाला.

"मग शेवटी काय करायचे ठरविले आहेस?" श्रीरंग म्हणाला.

"नोकरी करीत राहून आपल्या स्वाभिमानाला मारून जगणे माझ्याच्याने होणारे काम नव्हे!" मुकुंदने स्पष्टपणे सांगितले.

"वाट्टेल ते कर, तर मग! तुझ्या मनाला वाट्टेल ते कर!" असे म्हणून श्रीरंग बाहेर निघून गेला.

ही घटना घडल्यानंतर चार दिवसांनी श्रीरंग चिंताग्रस्त स्थितीत घरी आला.

"काय झालंय? असे कां दिसताय?" बायकोने व भावाने घाई-घाईने विचारले.

"माझी नोकरी गेली." गळल्यासारखं श्रीरंग म्हणाला.

"हे काय? इतक्या दिवसांपासून करीत आहेस ना?" आश्चर्य वाटून मुकुंदने विचारले.

"म्हणूनच तर काळजी वाटते आहे. दुसरी एखादी नोकरी शोधावी म्हटले तर ती सुद्धा मिळण्याची लक्षणं दिसत नाहीत." श्रीरंग म्हणाला.

दिवसेदिवस घरात आर्थिक टंचाई वाढू लागली. दिवस कंठणे कठीण होऊ लागले. अन्नासाठी इतरांची तोंडे बघण्याची वेळ आली. आतापर्यन्त श्रीरंगने मुकुंदाला कसलीही अडचण भासू दिली नव्हती. कुठलीही जबाबदारी नव्हती.

आपल्याला मिळालेल्या नोकऱ्या आपण स्वतःच्या हातानी घालवल्या याची मुकुंदाला खंत वाटू लागली. आज त्याची नोकरी असती तर कुटुंबाला अशा स्थितीला तोंड द्यावे लागले नसते. आतां कुठली तरी नोकरी करूंया, म्हटले तरी ती देणारा कुणी दिसेना. इतके दिवस घरांतले सर्व हवे नको भावानेच पाहिले होते. त्याने लावून दिलेल्या नोकऱ्या आपण हीन लेखल्या. परंतु आतां मजुरी का होईना, करून कुटुंबाचे उदर-भरण करायला हवे, काहीतरी करून जमेल तेवढे कमवायला हवे. असे त्याला वाटू लागले.

आपला विचार त्याने भावाला सांगितला. धाकट्या भावामध्ये घडून आलला बदल पाहून श्रीरंगाच्या मनाचे समाधान झाले. "तू मार्ग सोडून आल्यास, तो जागा



अजून रिकामीच असावी. एकदा जाऊन चौकशी केलेली बरी." श्रीरंग म्हणाला.

मुकुंदाचे डोळे पाणावले. "त्यावेळी अधिकाऱ्यांशी भांडून, सुचेल तो बोललो, आतापर्यंत माझ्यासाठी ते जागा तशीच राखून ठेवणार आहेत का? कुणातरी भाग्यवंताला ती मिळाली असेल. तो मजेत ती नोकरी करीत असेल" तो म्हणाला.

"चौकशी करण्यास तर कांही नुकसान नाही ना?" श्रीरंगने त्याला धीर देऊन पाठविले.

ती जागा अद्याप रिकामीच होती. वरचे अधिकारी आधी रागावले तरी देखील मुकुंद त्यांच्या हातांपायां पडून विनवणी करूं लागला. अधिकाऱ्यांनी परत त्याला कामावर घ्यायची तयारी दाखविली. मुकुंदाला वर्णनातीत आनंद झाला. जीवनांत पहिल्यांदा नोकरी मिळाल्याची अपूर्वाई त्याला वाटली. आपल्याला नोकरी लागल्याची बातमी त्याने मोठ्या समाधानाने भावाला सांगितली.

दुसऱ्या दिवशी श्रीरंग चांगले कपडे घालून कामावर जायच्या तयारीला लागला. "तुला सुद्धा परत नोकरीवर बोलवून घेतले की काय?" नवल वाटून मुकुंदने विचारले.

"माझी नोकरी मुळी गेलेलीच नव्हती! मी करीत असलेल्या नोकरीबद्दल मला श्रद्धा, आसक्ती बरोबर गौरव सुद्धा वाटतो. असे असतांना मला कां बरं काढून टाकतील? तुला तू करीत असलेले काम कमीपणाचे वाटले. म्हणूनच तूं मिळालेले प्रत्येक काम, हीन समजून त्याकडे दुर्लक्ष केलेस. म्हणूनच मिळालेल्या प्रत्येक कामाला कांहीतरी नांव ठेवून तू ते सोडून देत आलास. कालपर्यंत घरांत ज्या स्थितीला आपण तोंड देत होतो, ती स्थिती मीच निर्माण केली होती. तुझ्या वरच्या अधिकाऱ्याला भेटून त्याला सर्व सांगून ती जागा मीच रिकामी ठेवण्यास सांगितले होते." श्रीरंग म्हणाला.

आजवर अविचाराने केलेल्या सर्व कामांबद्दल मुकुंदाला खेद वाटला.



# स्वामिभक्ती

अवंतीचे महामंत्री अमरपाल म्हणजे साक्षात न्याय-नीतीचेच दुसरे नांव होते. शेजारच्या राज्यांत रहाणारा त्यांचा भाचा भूपाल एकदा त्यांच्याकडे आला असता बोलण्याच्या संदर्भात भूपालने विचारले–"मामा! तुमच्या अवंती राज्यातील सैन्यातील सैनिकांची संख्या किती आहे?"

हा प्रश्न फार महत्त्वाचा असल्यामुळे तावडतोब उत्तर न देता अमरपालांनी क्षणभर विचार केला, मग म्हणाले–"अरे बाबा! हा एक प्रमुख असा विषय असून, तू माझ्याकडून ऐकल्यानंतर अन्यत्र कुठेही बोलणार नाहीस अशी प्रतिज्ञा तुला करावी लागेल."

हे ऐकल्यावर, मामा आपल्या सचोटीबद्दल सशंकित आहेत असे वाटून भूपालाला राग आला. "मामा! वेदशास्त्रांचा अभ्यास करून, यज्ञ-यागादी करणाऱ्या अग्निहोत्र्यांच्या वंशात जन्मलेल्या माझ्या हातून प्रतिज्ञाभंग होऊन रहस्योद्घाटन झाले तर या लोकात व परलोकात अधोगतीला प्राप्त होईन!" भूपाल म्हणाला.

ते ऐकताच अमरपाल म्हणाले–"प्रतिज्ञेचा विषय काढताक्षणीच आपल्या पितृकुळाच्या श्रेष्ठतेबद्दल, त्याचा वारसा घेतलेल्या तुझ्या सचोटीबद्दल बोललास ते चांगलेच आहे! मीदेखील महाराजांची रहस्यं जाणून घेण्यापूर्वी माझ्या सचोटीवर आंच येऊं नये म्हणून अशीच प्रतिज्ञा केलेली आहे." तत्क्षणी आपली चूक भूपालाच्या लक्षात आली.





# कोपिष्ट नवरा

मुलगी व जावई प्रवासास निघाले असता लक्ष्मीबाई परत एकदा जावई बापू विनायकरावांना म्हणाल्या–"तुमच्या वाटेतच पंढरपूर पडते. देव-दर्शन घ्यायला विसरूं नका, बरं कां!"

यजमान वारल्यावर लक्ष्मीबाई स्वग्रामी येऊन राहिल्या व शेती-वाडी बघूं लागल्या. वासंती त्यांची एकुलती एक मुलगी. शहर गांवी नोकरी करीत असलेल्या विनायकरावांशी तिचे लग्न होऊन चारच दिवस झाले होते. वासंतीच्या लग्नापूर्वी लक्ष्मीबाई, 'मुलीला व जावयाला जोडीने दर्शनास पाठवीन' असे बोलल्या होत्या.

वासंती व विनायकराव पंढरपूरला पोचेपर्यंत अंधार पडला होता. महत्प्रयासाने त्यांना धर्मशाळेत एक खोली मिळाली होती.

"म्हातारीला गप्प बसवेना म्हणून नवस बोलली. खोली मिळाली नसती तर आपले कसे हाल झाले असते याची कल्पनाच करवत नाही!" विनायकराव रागाने पुटपुटले.

वासंतीचा चेहरा फिक्का पडला. आईला उद्देशून नवऱ्याचे असे अपमानजनक बोलणे ऐकून तिला वाईट वाटले. झोप येईस्तोवर विनायकराव सासूबाईंवर तोंड सुख घेतच राहिले. वासंतीनें बोलायला तोंड उघडताच–

"तूं तोंड मिटून पडून रहा!" विनायकराव तिच्या अंगावर खेंकसले.

दुसऱ्या दिवशी सकाळी दर्शनाला जाण्यापूर्वी विनायकरावांनी न्याहरीसाठी कांही तरी मागविले.

"दर्शन घेतल्यानंतर खाऊं या!" वासंती म्हणाली.

"तूं माझ्यासमोर बोललेलं मला चालणार नाही. मी जे सांगीन ते करणं एवढंच तुझं काम आहे. समजलं कां?" विनायकराव म्हणाले.

डोळ्याचे पाणी पदराने टिपून, इच्छा नसतांनादेखील वासंतीने न्याहरी उरकली. आपला नवरा, जमदग्नी आहे हे तिला कळून चुकले.

दोघे देवळात जाऊन दर्शन घेऊन आले. सामान आवरत वासंती म्हणाली–"देऊळ खूप छान आहे! मूर्तीच्या चेहऱ्यावर किती तेज आहे, नाही?"

"माझ्यापुढे बोलायचे नाही म्हणून आधीच बजावले होते ना? मी सांगीन ते ऐकणे व तोंड मिटून पडून राहणे; एवढेच तुझे काम, कळलं कां?" रागाने विनायकराव म्हणाले.

वासंतीचे मन भेदरले. त्या संध्याकाळी ते शहरात पोचले. वासंतीला नवीन संसार नरकासारखा वाटू लागला. दिवसभर घरातली कामं उरकायची. नवऱ्याला काय हवे नको ते बघायचे, तोंड मात्र उघडायचे नाही. पंधरा दिवस असेच निघून गेले.

त्या दिवशी संध्याकाळी कुणी तरी दार वाजवले. वासंतीने दार उघडले. दारांत एक पन्नाशीचा म्हातारा उभा होता.

"आमच्या विनायकाचे घर हेच ना?" असे म्हणत म्हातारा घरांत जाऊन बसला.



वासंती संकोचाने बघत राहिली. "मी तुझा चुलत सासरा आहे. कांही हरकत नाही, त्या खूर्चीत बैस." म्हातारा म्हणाला.

ती बसल्यावर "तुझे सासु-सासरे सध्या कुठे आहेत?" म्हाताऱ्याने विचारले.

"त्यांना जाऊन दहा वर्षं झालीत नव्हे कां?" म्हाताऱ्याकडे साशंक दृष्टीने बघत वासंती म्हणाली.

"हो, नव्हे कां, विसरूनच गेलो की! ते खरंच गेलेत, यावर विश्वासच बसत नाही. दोघेही नांवाला साजेसेच लक्ष्मी-नारायणासारखे असायचे." उपरण्याने डोळे पुसत म्हातारा म्हणाला.



"त्यांच नांव पार्वती-शंकरराव होते ना!" वासंती संशय घेत म्हणाली.

"ते झालं ग! सगळी त्या भगवंताचीच नांवं! शंकररावांचे भाऊ कुठे असतात हल्ली?" असे म्हणत त्यांची नांवं, गांव सगळं विचारून घेतलं म्हाताऱ्यानं हे सगळं सांगतांना तिची शंका बळावत होती.

अंधार पडला, विनायकराव घरी आले.

"हे तुमचे लांबचे काका आहेत म्हणे!" असे म्हणत वासंती पुढे आणखी कांही सांगणार होती. तिला अडवीत–

"मला तोंड आहे, विचारून माहिती करून घेईन! तूं तोंड बंद करून आंत जा बघूं." चिडून विनायकराव म्हणाले.

वासंती अवाक्षर न काढता आंत निघून गेली.

"काय रे विनायक! मी आठवतोय कां?" खूपच आपलेपणाने म्हातारा बोलूं लागला.

त्या म्हाताऱ्याची ओळख पटली नाही तरी तो आपल्या आई-वडिलांबद्दल, काका, मामांविषयी सर्व माहिती सांगू लागल्या-मुळे तो म्हातारा आपला आप्तच असला पाहिजे याची खात्री पटली विनायक-रावांना.

आत जाऊन विनायकरावांनी–"आमच्या काकांची कांही विचारपूस केलीस की नाही? तुझ्या सासऱ्यांचा त्यांच्यावर भारी लोभ होता. कळलं का?" तंबी दिली.

त्या सर्वांची नांवं व माहिती म्हाताऱ्याला आपल्याकडूनच समजल्याचे विनायकरावांच्या कानांवर घालण्याचा वासंतीचा प्रयत्न निष्फळ ठरला. "तोंडाला आधी कुलूप घाल व जेवायला वाढायच्या तयारीला लाग!" विनायकरावांनी दर-डावले.

बाहेर दोघांच्या गप्पा रंगल्या असतां वासंतीने सैंपाक केला व दोघांना वाढले. नंतर बाहेरच्या खोलीत दोघांचे अंथरूण घालून देऊन ती स्वयंपाक घरात चटईवर निजली.

पहाटे नवऱ्याचा आरडा-ओरडा ऐकून तिची झोप मोडली. झटकन उठून नवऱ्याच्या खोलीत गेली. म्हाताऱ्याचे अंथरूण रिकामे होते. बाजूलाच असलेली पेटी उघडी होती. खोलीभर कपडे अस्ताव्यस्त पसरले होते.

"तो कालचा म्हातारा अट्टल चोर होता! रात्री नातं जोडून, मला विश्वासात घेतलं, घरात शिरला आणि काल झालेल्या पगाराचे सर्व पैसे घेवून फरार झाला." विनायकराव दुःखाने म्हणाले.

वासंतीला सुरूवातीपासूनच म्हाताऱ्याचा संशय येत होता. "त्याने तुमच्या नाते-वाईकांची माहिती माझ्याकडून काढून घेतली व ते सर्व नातलग जणूं कांही त्याचेच असल्यासारखे तुम्हाला सांगून फसविले" वासंती म्हणाली.

"ही सगळी हकीगत मला आधीच कां नाही सांगितलीस?" विनायकरावांनी डोळे वटारले.

"ह्या असल्या अनाठाई रागामुळेच! कधी तरी मला तुमच्या पुढे तोंड उघडू दिलेत कां? तुमचा असला अनाठाई रागच या अनर्थाला कारणीभूत झाला." मोठे धैर्य आणून वासंती म्हणाली.

विनायकरावांची चूक त्यांच्या लक्षांत आली. आपला क्रोधच आपला रिपू ठरला!



"पैसे गेले तर गेले. या अनुभवामुळे अक्कल तरी ठिकाणावर आली." विना-यकरावांनी मनाला समजाविले.

त्या दिवसापासून नवऱ्याचा झालेला कायापालट बघून वासंतीला समाधान वाटले. चार दिवसानंतर हातात एक पिशवी घेऊन एक मुलगा आला व ती पिशवी विनायकरावांच्या हाती देत–

"कुणीतरी एका म्हाताऱ्याने ही पिशवी तुमच्या स्वाधीन करण्यास सांगितले आहे" असे म्हणून पिशवी देऊन निघून गेला.

विनायकरावांनी ती पिशवी उघडून पाहिली तों त्यांच्या आश्चर्याला पारावार

राहिला नाही. पिशवीत त्याच्या पगाराचे पैसे जसेच्या तसे होते व त्यांत एक चिठ्ठी होती.

चि. विनायक!

तुम्ही नवरा-बायको मला चोर समजून शिव्या देत असाल. परंतु या अनुभवामुळे तुझ्यात काही बदल झाला असावा अशी आशा आहे.

कोपिष्टी नवऱ्याबरोबर संसार करणे अवघड असते! एके काळी मीदेखील जमदग्नीच होतो! माझ्या बायकोला तोंड उघडायला अवधी न देता बारीक सारीक कारणावरून धारेवर धरीत दिवस घालवीत असे.

माझी बायको सोशीक म्हणून माझा राग सोसून संसाराचा गाडा ढकलू शकली.

जीवन फार मर्यादित असते. रागामुळे जीवनाला दुःखमय होऊ देऊ नये! बायको गेल्यानंतर माझी दुरावस्था ओढवली. माझ्या रागाला घाबरून माझ्या दोन मुलांनी व सुनांनी मला जवळ फटकू दिले नाही.

त्या दिवशी धर्मशाळेत तुमच्या शेजारच्या खोलीत उतरलो असतां, तुमचे सर्व संभाषण माझ्या कानी पडले. तुझ्यांत खरोखरच बदल झाला असला तर सौ. वासंतीला घेऊन माझ्या घरी ये. मुलांना पारखा झालेल्या मला तूं मुलासारखाच आहेस!

तुझा काका. माझा पत्ता :–"       ".

पत्र वाचून विनायकरावांनी मोठ्या उत्साहाने वासंतीला हांक मारली, "वासंती, लवकर बाहेर नीघ बघूं!"

वासंतीने डोके हलवून संमती दाखविली व गप्प राहिली.

"तूं तोंड उघडताच 'गप्प बैस!' म्हणायची माझी खोड कधीच मोडली. आज कुणीकडे दौरा, म्हणून विचारीत कां नाहीस? तुझ्या सासरीच, चल, लवकर नीघ!" म्हणत विनायकराव घाई करूं लागले.





# समयस्फूर्ती

वज्रगिरी राज्यात एक अट्टल चोर रहात असे. त्याचे म्हादबा व शिवबा नांवाचे दोन शिष्य त्याच्याकडेच रहात असत. वृद्धावस्थेमुळे मरणशय्येवर पडले असता त्याने आपल्या शिष्यांना जवळ बोलाविले. "तुम्ही दोघेही मिळून एकीने चौर्यवृत्ती करीत सुखाने रहा. व अशा तऱ्हेने जगांत माझे नांव अमर करणारे व्हा." म्हणून शेवटचा उपदेश केला.

गुरु गेल्यानंतर म्हादबा व शिवबा थोडे दिवस एकीनेच राहिले. परंतु त्यानंतर चोरीचा वाटा घेण्याबाबत दोघांची भांडणे होऊन दोघे वेगळे झाले.

या दोघांमध्ये शिवबा जास्त चलाख होता. तो कधीही चोरी करतांना पकडला गेला नाही. म्हादबा मात्र अनेकदा चोरी करीत असतां धरला जाऊन तुरुंगात जाऊन शिक्षा भोगून आला होता.

एके दिवशी तुरुंगांतून बाहेर पडतांच म्हादबा शिवबाकडे जाऊन त्याला भेटला. "भाऊ! इतके दिवस चोरी करीत राहूनसुद्धा तुला एकदाही राजाचे सैनिक धरूं शकले नाहीत. या मागे गुपित काय आहे? आपण दोघेही एकाच नामांकित गुरूचे शिष्य आहोत ना? तसे पाहतां मी चार वर्षे शिष्यत्व केल्यानंतरच तूं गुरुगृही आलास." म्हादबा म्हणाला.

ते बोलणे ऐकून शिवबा हसला. "यामध्ये फार मोठे गुपित असे काही नाही, तर समयस्फूर्ती होय! एवढेच." तो म्हणाला.

"समयस्फूर्ती म्हणजे काय? जरा समजावून सांगतोस कां?" म्हादबाने विचारले.

"गुरूची सेवा करीत आपण दोघेही, त्यांनी शिकविलेली कला एक सारखीच शिकलो. परंतु तुझा या विद्येत हातखंडा न होण्याचे कारण तुझ्यात असलेला समय-

स्फूर्तीचा अभावच होय. काल मी एका शेतकऱ्याच्या घरी चोरी करायला गेलो होतो. अंधारात पाय लागून कुठलीतरी वस्तू खाली पडली व आवाज झाला. त्या सरशी शेतकऱ्याची बायको जागी होऊन "कोण आहे तो?" असे मोठ्याने ओरडली. तावडतोब मी "म्यॉऊँ" असा मांजरासारखा आवाज काढला. झोपमोड झाल्यामुळे "मांजर आहे ते? झोप आता." शेतकरी बायकोला रागावला व निजला. नंतर मी सावकाश जेवढ्या हाती लागल्या त्या सर्व वस्तू गोळा केल्या व बाहेर पडलो." शिवबा म्हणाला.

"समयस्फूर्ती म्हणजे हीच काय?" या क्षुल्लक गोष्टीविषयी मी इतका काळ विचारच कसा केला नाही याचे आश्चर्यच आहे! सवड झाल्यानंतर परत येऊन भेटेनच. बरय, येतो!" म्हणत म्हादबा निघाला.

त्या रात्री एका घराला भगदाड पाडून म्हादबा आत शिरला व कुठे कोणत्या मूल्यवान वस्तू आहेत याचा मागोसा घेऊ लागला असता डब्यासारखी कांहीतरी वस्तू त्याच्या पायाला लागून खाली पडली व मोठ्ठा आवाज झाला.

त्या आवाजाने घरची मालकीण जागी झाली व मालकाला उठवीत "कोण ते?" म्हणाली.

म्हादबा होता त्या जागीच दबकून बसत "मांजर आहे" म्हणाला.

त्या सरशी "चोर! चोर! पकडा!" म्हणत दोघेही मोठ्याने ओरडू लागले.

शिववाने सांगितलेली समयस्फूर्तीची युक्ती अशी कशी अंगलट आली, ते न कळलेला म्हादबा घाईघाईने, त्याने केलेल्या भगदाडातून बाहेर रस्त्यावर आला. परंतु तोवर घरच्या लोकांचा आरडा-ओरडा ऐकून शेजारी-पाजारी जागे झाले व काठ्या घेऊन बाहेर आले. रस्त्यावरून पळून जात असलेल्या म्हादबाला त्यांनी धरले व राज-सैनिकांच्या ताब्यात दिले!





# गणेश पुराण

"विघ्नेश्वरा! तूं गजासुराचा जो विनाश केलास, त्याची आठवण म्हणून आतापासून, चिरकालापर्यंत गणपती-नवरात्राचा उत्सव, लोक मोठ्या समारंभाने करतील. स्वेच्छेप्रमाणे यशप्राप्त करण्यासाठी करण्यात येणाऱ्या गणेशोत्सवांनी, आपल्या उद्योगात विजय मिळवून दिला, असे मानतील. सर्व उत्सवांमध्ये गणपती-नवरात्राचा उत्सव श्रेष्ठ उत्सव मानला जाईल!" अशी आकाशवाणी झाली.

"पार्वतीनंदना! भाचा आहेस म्हणून, माझ्यासाठी आणि एक काम वाढवून ठेवलेस ना? चांगले आहे नाते!" विष्णू गणपतीला म्हणाला.

"मामाचे नाते सांगून, कंस म्हणून जन्मलेल्या कालनेमीचा, मृत्यु म्हणून तू जन्म घेऊन कृष्णावतारात कंसाचा वध करणार आहेसच! ही असली नाती सांगून आपले काम साधण्याची कला तूच शिकविली आहेस, कमलनयना!" गणेश म्हणाला.

"विघ्नेश्वरा! तुझ्या परशूपुढे माझे चक्र ते काय! तुझे परशु फिरविण्यातील कौशल्य पाहतांना डोळ्यांचे पारणे फिटल्याचा आनंद वाटला." विष्णु म्हणाला.

"परशुरामावतार घेतांना माझा परशु उसना घेऊन जा व गर्वोन्नत झालेल्या क्षत्रियांचा संहार करणारा हो बरे!" विघ्नेश्वर म्हणाला.



"गजासुर रूपांतील विघ्नावर चढून त्याला तुडवीत असतांना, बटु असलेल्या तुझी छोटी-छोटी पावले पुढे टाकण्याची ढब पाहून माझे भरपूर मनोरंजन झाले." विष्णु म्हणाला.

"तसं असेल तर, वामनावतार धारण केल्यावर बलीचक्रवर्तीला पाताळांत घुसेपर्यंत पावलांनी दाबशील बरे!" गणपती म्हणाला.

"तुझे बुद्धिसामर्थ्यदेखील मला आकर्षित करते आहे, काय करूं?" असे विष्णु म्हणाला असता, "धर्मसंस्थापनाचा खरा अर्थ 'समाज, हिंसेमुळे, अनाचारामुळे, अंधश्रद्धेमळे जिकीरीस आलेला असेल त्यावेळी बुद्धरूपाने मानवांना, सुव्यवस्थित समाजरचनेचा व निर्वाणमार्गाचा उपदेशक होशील बरे!' मायादेवीच्या स्वप्नामध्ये माझा पांढरा हत्ती प्रवेश करील, व बुद्धावतारातील सिद्धार्थ रूपाची नांदी गाईल." गणपती म्हणाला. विष्णूला फार आनंद झाला.

परमाणुरूपांत असलेले विघ्न म्हणाले– "विघ्नराजा, मी तुझा सेवक आहे. तुझी आज्ञा मला शिरोधार्य आहे. जातो आतां." असे म्हणून गणपतीची आज्ञा मानून कालींदीच्या डोहात कालिया बनून लपून बसले. मूषकासुर उंदराच्या रूपाने प्रच्छन्नपणे लपून बसला होता. विघ्नाची झालेली दुर्दशा पाहून त्याने रागाने दांत-ओठ चावले. नंतर आळस झटकून स्वतःचे रूप धारण केले व सिंहगर्जना करीत गणपती सुमोर उभा राहिला.

गणपतीला त्याचे बलिष्ठ शरीर बघून समाधान वाटले. मूषकासुर त्याच्याकडे दुर्लक्ष करीत विषारी हास्य हसत म्हणाला– "विघ्न तुझा सेवक असल्यामुळे, मनांत येईल ते केलेस, परंतु मी तुझा जन्मवैरी आहे. सिंहस्वप्नाचे नांव तुझ्या ऐकिवांत असेलच! सिंह बनून तुझे वक्षस्थल फाडतो!" असे म्हणून सिंहाचे रूप घेऊन भीषण गर्जना केली.

"सिंह, होय? तू तर जगन्जननीचे वाहन आहेस. तुला मी अभिवादन करीत आहे!" गणेश म्हणाला.

सिंहाने एक डरकाळी फोडली व गणपतीवर झडप घालणार तों, "शिवा, शरभा!" असे स्मरण गणपतीने केले.

सिंहासमोर, शिवाचा शरभावतार प्रत्यक्ष उभा ठाकला व मोठी गर्जना केली. शरभाला सिंहाचे शरीर, आयाळ व जबडा असून हत्तीची सोंड व दांत होते. महासर्पासारखी शेपटी असून त्याच्या टोकाला मगरीचे तोंड असून ते ज्वाळा ओकीत होते. शरभाची आयाळ अग्निशिखांप्रमाणे वर उठत होती. तोंडातून उष्ण धूर 'घप घप' बाहेर पडत होता. शरभाने आपल्या सोंडेने एक फटका मारताच सिंहाचे तोंड सुजले. सिंह शेपटी पायात घालून पळू लागला. शरभावतार अंतर्धान पावला.

विघ्नेश्वराने आपली सोंड एक योजन लांब केली व पळणाऱ्या सिंहाची कम्बर बांधून त्याला आपटले. सिंह गुरगुरत तडफडू लागला.

देवादिक आकाशांत गोळा होऊन हे दृश्य बघत होते. "विजय विघ्नेश्वरा! तूं धरलेला सिंह, मला पाळायची इच्छा होते आहे, जरा देशील कां?" विष्णु म्हणाला.



"पाळतो म्हणून घेऊन, ह्याचे डोके, नखं काढून घेऊन, नरसिंहावतारांत हिरण्यकश्यपुला फाडायचा विचार आहे कां? ते कांही जमायचे नाही बरे! या सिंहाची मला गरज आहे. तुझ्या नरसिंहावताराची तरतूद तुलाच करावी लागेल!" गणेशाने उत्तर दिले.

सोंडेत धरलेल्या सिंहाला हळूच नेऊन महाश्वेतेसमोर ठेऊन दिले. महाश्वेतेने हिताचे चार शब्द सांगितले ते न ऐकता मूषकासूर स्वतःच विघ्नेश्वराशी टक्कर घेण्यासाठी पळत सुटला होता. महाश्वेतेने देवीला आळविले. देवीने तिला दर्शन दिले. ती म्हणाली–"तुझा पती गणपतीचे



वाहन बनेल व चिरंजीवी होईल; असे विधिलिखित आहे. तुसुद्धा श्वेतछत्र बनून चिरकालपर्यंत गणेशाची सेवा तुझ्या पतीसमवेत करीत राहशील!" असे सांगून अंतर्धान पावली.

वज्रदन्ताला त्याच्या इच्छेप्रमाणे कोणतेही रूप घेता येत असे. म्हणून त्याने हत्तींनासुद्धा धरून उडता येईल अशा महागरुडाचे रूप धारण केले, व दोन हत्तींना आपल्या पायांच्या नखांनी धरून उडू लागला. त्यामुळे सर्वत्र हलकल्लोळ माजला. त्यावेळी एका झाडावर, गिधाडाचे लहान रूप घेऊन गरुड, विष्णूचे ध्यान करीत बसला होता. या कल्लोळामुळे त्याचे ध्यान मोडले. त्यामुळे संतापून त्याने त्या अजस्त्र गरुडाला चोचीने भोसकले, त्याबरोबर, महाकाय गरुडाकारातील मूषकासुर जमिनीवर कोलमडून पडला. ते पाहून "याहूनही अधिक स्वादिष्ट असा मार खाणार आहेस! जा, लवकर जा!" गरुड म्हणाला.

नंतर मूषकासुर विघ्नेश्वराजवळ गेला व त्याला चिडवीत म्हणाला–"तुझे दंत मोठे आहेत. कवठ दाबून खाण्यापलिकडे दुसऱ्या कशाच्याही कामाचे नाहीत. माझ्या दातांनी मी वज्रांचे देखील पीठ पाडतो, कैलासाला पोकळ करू शकतो, समजले का?"

गणेशाने इकडे-तिकडे बघत स्वतःशी पुटपुटल्यासारखे "निकामी असलेल्या दातांचा, असून तरी काय उपयोग?" असे म्हणत एक दांत मोडून फेकल्यासारखा भिरकाऊन दिला.

तो दांत इंद्रजाल केल्यासारखा हवेमध्ये गिरक्या घेत वज्रदंताला भोसकल्याप्रमाणे टोचू लागला. रक्ताच्या धारा वाहू लागल्या. ते न बघवून महाश्वेता मूर्च्छित होऊन पडली. वज्रदंताने छोट्या उंदराचे रूप घेतले व दगडाआड तुरुतुरु पळत जाऊन बीळ केले व त्यांत शिरला. एकच दांत उरल्यामुळे विघ्नेश्वराला एकदन्त असे नांव पडले.



तो दातसुद्धा बिळात शिरला व त्याला मारीत मारीत त्याचा पाठलाग करू लागला. उंदीरसुद्धा बीळ उकरीत उकरीत पाताळात शिरला व दुसरी वाट काढीत जमिनीवर आला. शेपटीच्या मागोमाग रक्ताची धार वहात होती. संपूर्ण भूलोकाला धापा टाकीत वळसा घालून शेवटी असहाय होऊन विनायकाजवळ आला, "मला मरणही येत नाही, तुझा दांत अंगात शिरून शिरून मरणप्राय यातना देत आहे. माझा त्रास वांचव देवा!" असे म्हणत शरण आलेल्या मूषकासुराला अभय देऊन दांताला मागे घेतले. तो तुटलेला दांत त्याच्या हातातील अलंकार म्हणून शोभत होता.

"मूषका! दिसायला पिटुकला उंदीर असलास तरी महाबलवान आहेस. अनुकूल वाहनाच्या अभावी माझ्या लंबोदरामुळे मला फार त्रास होतो आहे. तुझ्यासारखे......" संदेहामुळे अपुरे वाक्य गणपतीने सोडून दिले.

विघ्नेश्वराने केलेल्या स्तुतीमुळे चढून जाऊन "विघ्नेश्वरा, तुझ्या दाताने माझ्यातील अज्ञानाला पळवून लावले असून टोचून टोचून माझ्यांत ज्ञान भरले आहे. चांगला औषधोपचार घडला मला! तुझे वाहन होण्यायोग्य मी आहे असे तू मानतोस, हे माझे महद्भाग्य होय. कितीही मोठे वाहन म्हणून मला होता येते." असे म्हणत मूषकासुर हत्तीएवढ्या मोठ्या आकाराचा उंदीर बनला.

त्या महाकाय उंदराच्या पाठीवर गणपतीने पाय ठेवताच, किच-किच आवाज करीत उंदीर थरथर कांपू लागला.

"बाबा रे! तू पिटुकला उंदीर बनूनच माझा भार नीटपणे वाहू शकशील. माझ्या आकारास सर्व तऱ्हेने सोयीस्कर असे वाहन, पिटुकला उंदीरच ठरू शकेल." गणपतीने मूषकासुराला सांगितले.

मूषकासुराने नेहमीप्रमाणे उंदराचा साधा आकार धारण केला. विघ्नेश्वराला पाठीवर बसवून भरभर एक चक्कर फिरून












आला, "खरंच, स्वामी! आता आपला भार वाहतोय, असं वाटत नाहीये!" तो म्हणाला.

शुद्धीवर आलेली धवला विघ्नेश्वराला पाहून म्हणाली—"देवा! माझा पती उंदीर तुझे वाहन झालेला आहे. तेव्हां श्वेतछत्र बनून मलाही तुझी सेवा करू दे. माझ्यावर अनुग्रह कर!" ती म्हणाली.

"आई! तुझ्या श्वेतछत्राची गार सावली माझे रक्षण करील. माझे भाग्य थोर म्हणून मला लाभली!" असे म्हणत विघ्नेश्वराने उंदराकडे दृष्टी वळविली व "वज्रदंता, देवीचा अनुग्रह मिळविलेल्या साध्वी धवलेच्या शब्दाला माघार माहीत नाही. माझे वाहन बनून रहा. माझ्याबरोबर मला जे मिळेल ते खा. तुझे मनोरंजन म्हणून देवादिदेव, नाक घासून, उठा-बशा काढून, चुकले म्हणून गालांत मारून घेतील." विघ्नेश्वराने सांगितले.

"खरंच देवा! माझीही हीच इच्छा होती. मी वज्रदंत असतांना, देवांकडून माझ्यासमोर असेच करवून घेत असे. तुझे वाहन बनून मी कृतार्थ झालो." मूषकासुर म्हणाला.

धवला श्वेतछत्र बनून गणपतीच्या डोक्यावर छाया करू लागली. ती दंपती विनायकाची चिरकालपर्यंत अशीच सेवा करीत राहतील. विनायक मूषकवाहन बनला.

"एकदन्ता! मूषकोत्तम वाहना! तुझे वाहन पाहून मला तुझा हेवा वाटतो आहे! किती सुंदर वाहन मिळविलेस!" अशी विष्णूने स्तुती केली.

"तुझ्या कल्की अवतारात माझे वाहन, श्वेत-अश्व होऊन तुझे वाहन बनेल. तुला अंतरिक्ष ओलांडून ग्रहान्तरास घेऊन जाईल बरे! मानवांना नवीन वसाहती स्थापित करून दे." एकदन्त म्हणाला.

"अहाहा! तुझ्या वाचासिद्धीमुळे तसेच होऊ दे!" असे म्हणून विष्णूने आपला आनंद व्यक्त केला.

यावर नारद म्हणाला–"विघ्नेश्वरा! आतापर्यंत तुझ्याबरोबरच विष्णूच्या नऊ अवतारांची माहिती आम्हांला झाली. फक्त एकच उरली आहे!"

"लवकरच ती शुभमंगलाची वेळ आली म्हणजे कळेलच तेही! कसली घाई आहे?" विष्णू म्हणाला. "कुणाचे शुभमंगल देवा?" नारदाने विचारले. "आपल्याला कल्याण कारण अशा विघ्नेश्वराचेच!" विष्णु म्हणाला. विघ्नेश्वराने संतापाने पाहिले. "हजार विघ्ने घातल्याशिवाय गत्यंतर नाही" निश्चयी स्वरात तो म्हणाला.

"तेवढ्यावरच भागव, बाबा! हजार विघ्नांनंतर अर्धे विघ्नही उपस्थित करता येणार नाही बरे!" विष्णूने सावध करीत असा इशारा दिला.

"हजार विघ्ने ती किती असणार? त्यानंतर मात्र विघ्नेश्वराचा लग्न-सोहळा पाहण्याचे भाग्य आम्हांला लाभेल!" असे म्हणून तिन्ही लोकांमध्ये नारदाची स्वारी निघाली. शंकराचा पार्वतीवरील अनुराग, महातेजांत बदलला. अग्नीने ते महातेज शरवण सरोवरात पोचते करण्याची तत्परता दाखविली. सहा तोंडे असलेल्या शणमुखाचा जन्म झाला. सहा ऋषि-पत्नींनी त्याचा सांभाळ करून त्याला पार्वतीपरमेश्वराकडे पोचते केले. कुमारस्वामी हळू-हळू मोठा झाला. गरुडाने त्याला मयूर-वाहन दिले. इन्द्राने त्याला अनेक आयुधे दिली. पार्वतीने आपले अपूर्व शक्ती असलेले शूल दिले. कुमारस्वामी वाढू लागला असता तारकासुरास वाईट स्वप्नं पडू लागली व तो भीतीमुळे थरथर कापू लागला.

कुमारस्वामीने घोर तपस्या करून ब्रह्मज्ञानाचे रहस्य उलगडून घेतले. म्हणून त्याचें नांव सुब्रह्मण्यम झाले. ॐकाराचे गुपित, शिवासारख्या परमेश्वरालाच गुरू म्हणून उपदेश देतांना सांगितले. पार्वती-परमेश्वरांच्या डोळ्यांचे-पारणे फेडणारे ते दोघे भाऊ-गणपती व कुमारस्वामी खेळत खेळत मजेत कैलासावर विहार करूं लागले.

(क्रमश:)





# दोन वस्ताद

[ ६ ]

दिलैला व जीनाबने फसवेगिरी केल्याला कांही काळ लोटल्यावर कैरो नगराहून 'पारा' नांवाचा आपल्या नांवाला साजेल असा एक युवक बगदाद नगरीं पोचला. ह्याचे खरे नांव अली. दिसायला राजबिंडा परंतु अट्टल चोर होता. तो कैरोचा रहिवाशी होता. बगदादला कोतवाल म्हणून नियुक्ती झालेला अहमद हा कैरो नगरांतील नामांकित चोर म्हणून ख्याती पावत असता 'पारा'ने त्याच्याकडेच चौर्यविद्येचा गुरूमंत्र घेतला होता. अहमद बगदाद शहरी आला व तिथेसुद्धा चोर म्हणून विख्यात झाला व 'कोतवाल' ही पदवी मिळवीत असतां हा 'पारा' कैरोतील चोरांचा नायक झाला होता. कित्येकदा धरला जाऊन त्याला कैद केले असतां तो निसटून गेल्यामुळे कैरोतील प्रजा त्याला 'पारा' म्हणून ओळखू लागली.

'पारा' अलीला अहमदनेच बगदादला बोलाविले. दिलैलाच्या बाबतीत पराभव झाल्यापासून क्षणाक्षणाला अहमदला 'पारा'ची आठवण येऊं लागली. तो त्याच्या उजव्या हातासारखा होता. तो जर आपल्या हाताखाली असता तर पराभवाला तोंड द्यावे लागले नसते, असे अहमदला वाटत होते. याशिवाय अहमदला आतां स्वत: दिलैलाचा सूड उगविता येत नव्हता. कारण आतां तिचाही त्याच्या इतकाच लौकिक होता. म्हणून या कामाकरितां 'पारा'च योग्य होता.

'पारा' अली बगदादला पोचल्याबरोबर सरळ अहमदच्या घरी गेला. त्याला पाहाताच अहमदच्या जिवांत जीव



आला. "दोस्ता! माझ्या घरी कांही काळ गुप्तपणे रहाणार असलास तर तुझ्याशी थोडे काम आहे. ते झाल्यावर तुला जाहीर-रीत्या खलीफाजवळ नेऊन तुझी शिफारस करून चांगली नोकरी मिळवून देईन." असे अहमद म्हणाला.

'पारा'ने अहमदच्या घरी दोन दिवस घालविले. मग मात्र त्याला घर तुरुंगा-सारखे वाटले. अहमद दिवाणीत गेल्यानंतर 'पारा' घराबाहेर पडला. बगदाद शहर चारीबाजूंनी बघून घेण्याचा त्याचा उद्देश होता.

तो थोडा दूर गेला असता त्याला पुरुष-वेश धारण केलेली, डोक्यावर चांदीचे कबूतर असलेली सोन्याची टोपी घातलेली, व घोड्यावरून जात असलेली एक म्हातारी व तिच्या मागे लाल भरजरी वस्त्रं परि-धान केलेले चाळीस निग्रो दिसले. ते दुसरे-तिसरे कुणी नव्हेत, तर दिलैला व तिचे नोकर होते. दिलैला त्या सकाळी दिवाणांत गेली व तिच्या टपालात घेण्या-जोग्या बातम्या गोळा करून तिच्या घरी परत जात होती.

'पारा' अलीचा नवीन व सुंदर चेहरा बघून दिलैलाला आश्चर्य वाटले. परंतु तिचा शत्रू असलेल्या अहमदमध्ये व या नवल्या सुंदर तरुणामध्ये असलेले साम्य तिच्या नजरेने टिपले.

खरं तर अली, अहमदचे शिष्यत्व करीत असतां 'पारा' न कळतच त्याचे हावभाव, त्याची बघण्याची पद्धत यांचे अनुकरण करूं लागला होता. अली अहमदच्या घराकडू-नच येत असावा असा कयासही तिने बांधला.

घरी गेल्याबरोबर दिलैलाने आपली मुलगी जीनाब हिला, तिने पाहिलेल्या युवकाचे वर्णन करून सांगितले व "अह-मदने या युवकास बोलवून घेतलेले दिसतेय, असे मला वाटते. त्याचे रस्त्यांकडे अनोळखे-पणी पहाणे बघितले तर तो आज किंवा कालच इथे आला असावा असे वाटते. आपणास फार सावधगिरी बाळगावयास हवी!" असे म्हणाली.

जीनाबने आईने सांगितलेली सर्व हकी-कत ऐकून घेतली व म्हणाली—"मोठ-मोठ्या तीसमारखानांची डाळ शिजू न देणारी तू, या दाढी-मिशाही न फुटलेल्या कोवळ्या पोराला बघून घाबरलीस की काय?" लगेच चांगले चांगले कपडे घालून, डोळ्यांत काजळ घालून व डोळ्यांच्या कडा कोरून, बुरखा घातला व, हातांत पिशवी घेऊन जीनाब निघाली व लखलख-णाऱ्या विजेसारखी रस्त्यावर चालू लागली.

ती थोडे पुढे चालत गेली तो एका दुकानाजवळ तिला 'पारा' दिसला. आईने केलेल्या वर्णनावरून तिने त्याला ओळखले व त्याला धक्का मारून पुढे गेली व मागे वळून "आंधळा मेला!" रागाने म्हणाली.

'पारा' तिला बघून तिच्या सौंदर्यावर मंत्रमुग्ध झाला व "अहा! अद्भुत सौंदर्य! तू कोण आहेस?" म्हणाला.

"मी एका व्यापाऱ्याची मुलगी असून दुसऱ्या एका व्यापाऱ्याची बायको आहे. तुम्ही या गांवी नवखे असल्याचे दिसते. तुम्ही कुठे उतरलांत?" तिने विचारले.

"अद्याप कुठे ठिकाण नाही. कुठेतरी बघायला हवे." अहमदचा विषय गुप्त राखण्याच्या हेतूने 'पारा' म्हणाला.

"आमच्या घरी चला तरमग! आमचे घर मोठ्ठे आहे. माझे पती दुकानात





निघून गेल्यावर घरी मला कुणाची सोबतही नसते." जीनाब म्हणाली.

तिच्या बरोबर जाणे धोक्याचे असू शकते अशी शंका 'पारा'च्या मनांत आली. परंतु या नगरांत त्याला कुणीही ओळखत नसल्याने ती युवती त्याचा शत्रू असण्याचे कारण नव्हते. तिच्याविषयी माहिती करून घेण्याच्या कुतुहलामुळे तिच्या बरोबर जायचा निर्णय त्याने घेतला.

जीनाब त्याला बरेच रस्ते फिरवीत एका मोठ्या घरासमोर घेऊन आली व किल्लीसाठी पिशवी शोधू लागली. ते घर एका प्रसिद्ध व्यापाऱ्याचं होतं. त्यावेळी त्या घरांत कुणीच नव्हते. दुकानदार सकाळीच कुलूप घालून दुकानांत जाई तो रात्रीच परते, हे जीनाबला माहीत होते.

"अहो! किल्ली कुठेतरी हरवलेली दिसते. आतां काय करावे? तुम्हाला कांही-तरी करून कुलूप काढता येईल का?" जीनाबने 'पारा'ला विचारले.

"बघतो" असे म्हणत 'पारा'ने ते भले मोठे कुलूप सहजी काढले. तो अट्टल चोरच असला पाहिजे हे जीनाबने ओळखले.

दोघे आंत गेले. "तुम्ही दिवाणखान्यांत बसा. मी पाणी काढून स्वयंपाक करते." असे म्हणून जीनाब घागर घेऊन परसांत गेली.

थोड्या वेळानंतर विहिरीच्या बाजूने किंकाळी ऐकू आली. काय झाले असावे असा विचार करीत 'पारा' धावतच तिकडे गेला तो, जीनाब पाणी काढायला म्हणून विहिरीत वाकलेली दिसली.

"काय झाले?" 'पारा'ने विचारले.

"माझी हिऱ्याची अंगठी! पांचशे रुपये देऊन कालच माझ्या पतीने विकत घेतली. सैल होते आहे म्हणून तेव्हाच सांगितले होते. ती या विहिरीत पडली. माझ्या पतीला कळले तर गालफडात देईल!" असे म्हणत जीनाब ढसढसा रडू लागली.

"तुला भ्यायचे कारण नाही. मी काढून देतो." असे म्हणत 'पाराने' विहिरीत दोर सोडला व त्याच्या साह्याने आंत उतरला. विहिरीच्या बुडाशी जातांच जीनाबने भरभर दोर काढून घेतला व "तुला आतां अहमदच वर काढील! तोवर आंतच थांब!" असे म्हणून त्याचे कपडे गुंडाळून घेवून घरी निघून गेली.

त्या रात्री त्या घराचा मालक, व्यापारी आपल्या नोकरावरोबर बराच उशिरा घरी परतला. घराचे दार नुसतेच लोटलेले पाहून त्याला फार नवल वाटले. सगळे घर पाहून व कुठलीही वस्तु चोरीला गेलेली नाही हे पाहून त्याला समाधान वाटले.

व्यापाऱ्याच्या आंघोळीसाठी पाणी आणा-यला त्याचा नोकर विहिरीवर गेला. दोर बादली विहिरीत सोडली व पाणी ओढू लागला. परंतु अतिशय जड वाटून त्या-च्याच्याने पाणी ओढवेना. तेव्हा घाबरून जाऊन "अरे बापरे! भूत, भूत!" असे ओरडत घरात पळाला. त्या दोराला धरून 'पारा' वर येऊं लागला. वर चढताना त्याला बघून,

"बदमाश! तू कोण आहेस? माझ्या विहिरीत तुझे काम काय आहे? आधी सांग. नाही तर आताच्या आता तुला शिपायांच्या ताब्यांत देतो!" असे व्यापा-ऱ्याने दरडावून विचारले.

"बापरे! हा कोणता देश आहे? कोणते गांव आहे? मी इजिप्त देशाचा रहिवासी असून आमच्या इजिप्त नदीत आंघोळ करीत असतां एका भोवऱ्यांत सापडलो. मी किती खोल बुडालो हे मलाच माहीत नाही. परत पाण्यावर तरंगलो तो तुमच्या विहिरीत निघालो!" भोळा भाव चेहऱ्यावर आणून 'पारा' म्हणाला.

व्यापाऱ्याचा त्याच्या थापेवर विश्वास बसला.

"मुला! तुझा अनुभव आगळा आहे. हे बगदाद शहर आहे. फारच दुरून आलास. तुला कोरडे कपडे देतो ते घाल. आजची रात्र इथेच जेवून नीज. उद्या सकाळी तुझ्या गांवी जाण्यास नीघ म्हणजे झाले!" तो व्यापारी म्हणाला. (क्रमशः)





# हेका

रस्त्यावरील कुत्र्यांचे भुंकणे ऐकून रामजींची झोपमोड झाली. त्यावेळी मध्यरात्र उलटली असावी. जाग आलीच आहे तर उठून बघितलेलेच बरे, असा विचार करून दार उघडून ते बाहेर आले. अंधाऱ्या रस्त्यावर एका गाढवाला पाहून कुत्रीं भुंकत होती. बाहेरची थंडी अंगाला झोंबत होती. कुत्र्यांना हाकलून आंत येतांना, ओसरीवर कुणीतरी मुटकुळं करून झोपल्यासारखं त्यांना दिसलं.

"कोण आहे ते?" रामजी मोठ्याने म्हणाले. तिकडून उत्तर आले नाही. रामजीने त्या माणसाला हाताने हलविले. थंडीमुळे त्याला हुडहुडी भरली होती व अंग तव्यासारखे तापले होते.

"तुला बरे नाहीसे दिसतेय, बाहेर थंडीही कडाक्याची आहे. आंत येऊन नीज." रामजी म्हणाले.

महाप्रयासाने उठून बसत त्याने रामजीला हात जोडले. हाताचा आधार देऊन रामजीने त्याला उठविले व आत चटई अंथरून एक घोंगडी त्याला पांघरायला दिली.

क्षणभरात त्या माणसाला गाढ झोप लागली. त्याच्याबद्दल विचार करीत, बराच वेळ रामजीला झोप आली नाही.

कुणीतरी दार ठोठावीत असल्यासारखे वाटून रामजीला जाग आली. दिवस कासराभर वर चढला होता. दार वाजविणारी व्यक्ती, त्याची बायको सीताबाई होती. ती आदल्या दिवशी, नातलगांकडे लग्नाला गेली होती. सकाळ होताच घरी आली होती.

"दिवस वर येईस्तोवर निजलातसे?" असे म्हणत ती आंत आली. चटईवर घोंगडी पांघरून कुणीतरी निजलेले पाहून–"अय्या! कुणीतरी पाहुणे आलेले दिसताहेत! कोण आलंय?" तिने नवऱ्याला विचारले.

"कोण आहे कुणास ठाऊक!" असे म्हणत रामजीने घडलेला वृत्तांत सांगितला.

"बिचारा! थोडा कढत काढा करते, म्हणजे बरे वाटेल. तुम्ही त्याला उठवून तोंड धुवायला सांगा." सीताबाई म्हणाल्या व घाई घाईने स्वयंपाकघरांत गेल्या.

रामजीने त्या माणसाला उठवायला म्हणून हात लावला तो त्यांची बोबडीच वळली. रात्री भट्टी सारखे तापलेले त्याचे शरीर आतां थंडगार पडले होते!

"हा गेला की गं!" रामजी चमत्कारीकपणे ओरडले.

ते ऐकताच सीताबाई पटकन बाहेर आल्या व "खरंच की काय? अगो बाई! आता काय करावं? कोण? कुठला? कांही थांगपत्ता नाही!" म्हणत कपाळाला हात लाऊन बसल्या.

रामजीने त्याच्या कनवटीला चांचपून पाहिले. त्यांच्या हाताला एक पुरचुंडी लागली. ती त्यांनी बाहेर काढली. ती पैशांची पिशवी होती. रामजीने ती पिशवी रिकामी केली. पैशांबरोबर एक चिट्ठी ही त्यात दिसली. ते एक पत्र होते. आईने मुलाला लिहिले होते. मजकूर असा होता :



"चि. नारायण! हल्ली तूं तापाने आजारी असतोस असे आपल्या गांवाकडच्या एका माणसाकडून समजले. आतां तुझी प्रकृती कशी आहे?

इकडे तुझ्या धाकट्या भावाची परिस्थिती हालाखीचीच आहे. 'मुलीच्या लग्नासाठी तीन हजार रुपये कुठून उभे करुं' या विवंचनेत तो आहे. स्थळ चांगले मिळाले आहे. अशा वेळी तुम्ही आपला हेका सोडून, सारी किल्मिषं विसरायला हवीत. राधाच्या लग्नासाठी तू मदत

श्री कृ. अ. मेलकोटे



करायला हवीस. तू मोठा आहेस म्हणून धाकट्याची अडचण तुला सावरून घ्यायला हवी.

हे पत्र पोचताच प्रकृती बरी असल्यास, पैसे घेऊन बाहेर नीघ. आम्ही हल्ली घर बदलले आहे. नवीन पत्ता पुढील प्रमाणे आहे. हे पत्र सोबत आण म्हणजे घर सहज सांपडेल.''

ही चिट्ठी वाचून रामजीला सर्व उलगडा झाला. तो बायकोला म्हणाला—''बिचारा! पुतणीच्या लग्नासाठी पैसे घेऊन निघाला व वाटेतच गेला! ही चिट्ठी जवळ होती म्हणून बरे, आपल्याला त्याच्या भावाचा पत्ता तरी मिळाला!''

''तुम्ही लगेच बाहेर पडा बघू त्या गांवी जाऊन त्यांना हे पत्र व पैसे पोचते करून, घडलेली सर्व हकीगत त्यांच्या कानावर घाला व त्यांना घेऊन या. तुम्ही येई पर्यंत मी लग्नघरी राहते. घराला कुलूप घालूया.'' सीताबाई म्हणाल्या.

लगेच ते दोघे ही घराला कुलूप घालून बाहेर पडले. रामजी भाड्याचा टांगा घेऊन नारायणाच्या धाकट्या भावाच्या गांवी निघाले. तिथे पोचे पर्यंत दुपार झाली. घर सांपडायला विशेष त्रास झाला नाही. परंतु घराशी पोचतांच आंतील संवाद ऐकून रामजी बाहेरच थांबले.

''आई! पैशांची कुठेही सोय झाली नाही. हा संबंध जुळेलसे वाटत नाही. त्यांना 'दुसरीकडे बघा' म्हणून सांगून टाकतो.'' धाकटा भाऊ असावा.

''हे कायरे तुझे बोलणे! पैशाचं तोंड पाहून सोन्यासारखं हातचं स्थळ घालवितोस की काय? तुझ्या भावाला 'पैसे घेऊन ये' म्हणून पत्र लिहिलं आहे. नक्कीच घेऊन येईल तो!'' म्हातारीचा आवाज आला.

''मला न सांगता तू पत्र कसं लिहिलंस? दादाच्या पैशाला, मी मेलो तरी हात लावणार नाही! मुलीचं लग्न झालं नाही तरी चालेल!'' रागाने धाकटा भाऊ म्हणाला.

''विनाकारण डोक्यांत राख घालून घेऊं नकोस! तुमच्या हेक्यापायी पोरीच्या आयुष्याचं मातेरं करूं नकोस! माझं म्हातारीचं एवढं तरी ऐक.'' थोडा दम घेऊन ती पुढे म्हणाली—''क्षुल्लक कारणा-वरुन, गेली दहा वर्षं तुम्ही भावांनी एक-मेकांची तोंडं देखील पाहिली नाहीत. राधाच्या लग्नांत तरी भेटाल अशी मला आशा वाटली.'' म्हातारी म्हणाली.



रामजीने दार वाजविले व ''नारायणा-च्या भावाचे घर हेच कां?'' विचारले.

एका चाळशीच्या माणसाने दार उघडले. ''कोण तुम्ही? आंत या!'' आश्चर्यवाटून म्हणाला.

रामजी आत गेले व एका खुर्चीत बसले. पैशांची पिशवी टेबलावर ठेवली व चिट्ठी त्या गृहस्थाच्या, हाती दिली. ती वाचून तो म्हणाला—''हे माझ्या आईने, माझ्या मोठ्या भावाला लिहिलेले पत्र आहे. मला तोंड दाखवायची लाज वाटली म्हणून पैसे पाठवून दिलेले दिसताहेत! आधी ती पिशवी माझ्या समोरून उचला बघू!'' चिडक्या स्वरात तो म्हणाला.

''तुमचे भाऊ स्वतःच येणार होते. परंतु येऊं शकले नाहीत! तुम्हा दोघांची भेट या जन्मी तरी अशक्य आहे!'' असे म्हणून रामजीने घडलेले सर्व कांही सांगितले.

सगळे ऐकल्यानंतर धाकट्या भावाच्या तोंडून शब्द उमटला नाही. म्हातारी ओक्सा-बोक्शी रडूं लागली.

''दादा मला क्षमा कर!'' असे म्हणत तो गृहस्थ ही रडूं लागला.

ते पाहून रामजीला थोडी सुद्धा दया आली नाही.

''जिवंत माणसाची किंमत कळणे कठीण! तुझ्यावर तुझ्या भावाचे प्रेम असल्या शिवायच कां तो एवढे बरे नसतांही पैसे घेऊन निघाला? तू भ्रातृप्रेमाला इतके

दिवस मुकला होतास. परंतु आतां तर कायमचा पारखा झालास!" ते म्हणाले.

तो आरडा-ओरडा ऐकून शेजार-पाजारचे सर्वलोक गोळा झाले.

तेवढ्यात "काय झाले? झाले तरी काय?" असे म्हणत एक पन्नाशीचा गृहस्थ पुढे आला.

त्याला पहाताच धाकटाभाऊ त्याच्या जवळ जात–"दादा! तू जिवंत आहेस कां? मला मूर्खाला तुझा चांगुलपणा कळला नाही!" असे म्हणून त्याच्या पायावर पडला.

आता पर्यंत ज्याला आपण मेलेला समजत होतो, तो नारायण तो हाच, हे समजायला रामजीला वेळ लागला नाही.

घडलेला वृत्तांत ऐकून तो प्रौढ गृहस्थ हंसला. "मी पैसे घेऊन परवांच निघालो. राधासाठी एखादी बनारसी साडी घ्यावी म्हणून शहर गांवी गेलो. तिथे एक म्हातारा–'धर्म करा बाबा! मला कुणी नाही.' म्हणत मागे लागला. दया येऊन मी पैशांची पिशवी बाहेर काढून त्याला एक रुपया दिला. कापड खरेदीसाठी मी दुकानांत जाईस्तोवर तो माझ्या मागेच येत होता. शेवटी साडी खरेदी करून पैशांसाठी कनवटीला हात लाऊन पहातो तो पिशवी दिसेना! मला त्या म्हाताऱ्याची शंका आली. त्याच्यासाठी खूप शोधले. पण व्यर्थ! परत घरी गेलो व दुसरे पैसे घेऊन सरळ इकडेच येतो आहे. तुमच्या-घरी मेलेला तो माणूस चोरच असावा!" तो प्रौढ गृहस्थ रामजीला म्हणाला.

"त्या चोराने मरते वेळी पुण्य साधले! म्हणून तुम्हा भावांची भेट झाली!" म्हातारी समाधानाने म्हणाली.

"बरंय, मी येतो. घरी जाऊन पुढचे काम निस्तरायला हवे!" रामजी म्हणाले.

"पुढच्या महिन्यांत आमच्या मुलीचे लग्न आहे. तेव्हा न विसरतां सह परिवार लग्नाला या बरं कां!" दोघा भावांनी रामजींना आग्रहाने लग्नाचे निमंत्रण दिले.






[ १५ ]

[शिवदत्ताच्या शोधात निघालेल्या समरसेनने, एका मगरीच्या तावडीत सापडलेल्या, आपल्या सैनिकांना वांचविले. त्यांच्याकडून त्याला, व्याघ्रदत्त कुणीकडे गेला ते समजले. तसेच झाडावर अडकविलेले एक पत्रही त्याला मिळाले. तेवढ्यात, डोंगरावरून कांही सैनिक त्यांच्यावर एकाएकी बाणांचा वर्षाव करु लागले. पुढे–]

समरसेनला; त्यांच्यावर बाण सोडणारे सैनिक कोण आहेत, हे समजायला फार वेळ लागला नाही. "व्याघ्रदत्ताचा जय! व्याघ्रदत्ताचा विजय असो!" अशा आरोळ्यांनी डोंगर-दऱ्या दुमदुमून गेल्या.

"हे व्याघ्रदत्ताचे सैनिक असून, ह्यांना आपण असलेले ठिकाण माहीत झाले आहे. सावध व्हा! आपल्याला चारीबाजूंनी घेरून, बंदी बनवायचा ह्यांचा प्रयत्न दिसतो आहे!" असे म्हणून समरसेनने आपल्या सैनिकांना सावध केले.

व्याघ्रदत्ताचे सैनिक डोंगरातील खडकांमागे लपून समरसेनावर व त्याच्या सैनिकांवर बाण सोडत पुढे-पुढे सरकू लागले. अशा संकटातून प्राण वांचवायचे म्हणजे समरसेनला एकच मार्ग दिसला. तो म्हणजे खडकांच्या आड लपत-छपत



तो प्रदेश सोडून शक्य तेवढे लौकर निघून जाणे!

समरसेनच्या पाठोपाठ त्याचे सैनिकसुद्धा नि:शब्दपणे खडकांच्या आडून जवळच असलेल्या भुयाराच्या दिशेने रांगत-रांगत पुढे जाऊ लागले. 'या भुयाराच्या मार्गाने आपण कुठे पोचू? किंवा भुयाराबाहेर काय असेल?' अशा शंकेने त्यांना पीडले नाही. आधी व्याघ्रदत्ताच्या सैनिकांच्या कचाट्यातून बाहेर पडणेच त्यांना महत्त्वाचे वाटले!

शेवटी सर्वजण सुरक्षितपणे एका अंधाऱ्या गुहेत पोचले एकदाचे! व्याघ्रदत्ताच्या सैनिकांच्या आरोळ्यांचा आवाज हळूहळू कमी होऊ लागला. 'आपल्याला शोधत बहुतेक ते, दुसऱ्या दिशेला गेले असावेत'; असे समरसेनला वाटले.

. तोवर भर दुपार झाली होती. त्या अंधाऱ्या गुहेत अडखळत समरसेनने पुढे वाट काढली. थोडे पुढे गेल्यावर त्याला बारीकसा उन्हाचा कवडसा दिसला. आणखी थोडे पुढे गेल्यानंतर ते गुहेच्या पलिकडे पोचले.

तिथे दिसलेले दृश्य पाहून समरसेनला फार आश्चर्य वाटले. शिवदत्ताने दिलेल्या नकाशात दाखविलेले ते एक पडके नगर होते. कुठलेतरी महानगर भूकंपामुळे उध्वस्त झालेले दिसत होते. मोठमोठ्या भवनांच्या भिंती कोसळलेल्या होत्या. दगडात कोरलेले कांही स्तंभ अर्धवट मोडलेले व कुठल्याही क्षणी कोसळतील असे वाटत होते.

"हे, शिवदत्ताच्या नकाशांत दर्शविलेले 'शिथिल-नगर' असावे; याबद्दल कांही शंका नाही! शिवदत्त बहुतेक इथेच लपलेला असावा. म्हणून आपण पुढे जाणेच योग्य ठरेल!" समरसेन म्हणाला. त्याच्या साथीदारांना त्या शिथिलनगराकडे पाहून नवल वाटत होते.

त्या विशाल प्रासादांच्या भग्नावशेषांकडे जाण्याच्या विचारात समरसेन असता, एकाएकी शंखध्वनी व आरोळ्यांच्या आवाजांनी तो सगळाप्रदेश दुमदुमून गेला. थोड्याच क्षणांत पन्नास-साठ सैनिकांच्या समवेत व्याघ्रदत्त त्या शिथिलनगराकडेच येत असलेला, समरसेनला दिसला.

त्याने आपल्या सैनिकांना सावध केले व व्याघ्रदत्त आपल्या सैनिकांबरोबर कुणीकडे जात आहे; हे पाहू लागला. व्याघ्रदत्ताच्या हालचालींकडे पाहतां, तो समरसेनचा विषयच विसरून गेलेला दिसत होता.

साधावयाचा कार्यभाग साधल्यासारखा, व्याघ्रदत्त आपल्या सैनिकांच्या पुढे-पुढे मोठ्या दिमाखाने चालत येत होता. त्याच्या पाठोपाठ त्याचे अनुयायी, हास्य-विनोद करीत, मधूनच आपल्या नायकाचा जयजयकार करीत येत होते.

'व्याघ्रदत्ताने शिवदत्ताला तर बंदी बनविले नाही ना?' अशी शंका समरसेनच्या मनात येऊन गेली. परंतु सैनिकांबरोबर कुणीही बंदीवान त्याला दिसला नाही. "तरमग, अपूर्व शक्तिशाली असे शाक्तेयाचे त्रिशूल कोठे आहे, हे तर या व्याघ्रदत्ताला कळले नाही ना!" समरसेनच्या मनांत आले.

व्याघ्रदत्त आपल्या सैनिकांना त्या पडलेल्या भवनांकडे घेऊन गेला. 'कुठे जायचे आहे' हे आधीच माहीत असल्याप्रमाणे तो आपल्या अनुचरांबरोबर सरळ झपाझप चालू लागला.






अशाच संधीची वाट पहात असलेला समरसेन दगडांच्या आड लपत-छपत एका विशाल भवनाच्या प्रांगणाकडे आपल्या सैनिकांबरोबर पोचला. तिथे छिन्न-विच्छिन्न झालेल्या एका विशाल स्तंभाआड लपून व्याघ्रदत्ताच्या हालचालींकडे लक्ष देऊं लागला.

आपल्या अनुयायांपुढे चालत असलेला व्याघ्रदत्त एकाएकी थांबला व मागेवळून आपल्या सैनिकांना गंभीरपणे म्हणाला– "व्याघ्रदलातील योद्धयांनो! आपले श्रम फळाला येण्याची वेळ आतां येऊन ठेपली आहे. तुम्हापैकी प्रत्येकाला एकेका देशाचा अधिपती करण्याचे वचन मी दिलेलेच आहे. ते वाग्दान मी पूर्ण करावयास तत्पर आहे. परंतु त्या आधी तुम्ही एक साहस-पूर्ण असे काम करावयास हवे!"

"आम्ही कुठंलेही साहसकार्य करण्यास सिद्ध आहोत! ते कार्य कोणते हे सांगा!" त्याचे अनुयायी उत्साहाने म्हणाले.

मंदस्मित करीत व्याघ्रदत्त म्हणाला– "या शिथिलनगरात आपली मनोकामना-पूर्ण होणार आहे. ते बघा, त्या समोरच्या प्रासादाकडे बघा! त्याचे सिंहद्वार मोडून, दगडा-धोंडयांनी वाटच बंद झालेली आहे. तुम्ही ते मोडलेले स्तंभ व त्या सर्व शिळा बाजूला सरकवून त्या प्रासादाची वाट मोकळी करा. आपण जी अमूल्यवस्तू शोधून काढण्यासाठी आलो आहोत, ती त्या प्रासादातच आहे!"

व्याघ्रदत्ताचे बोलणे ऐकून त्याच्या अनु-यायांना कधी नव्हे तो उत्साह आला. एकमेकांना सूचना देत ते त्या भवनाच्या द्वाराकडे निघाले. कांही जणांनी हातांत पहार घेऊन दारापुढे असलेल्या मोठ-मोठ्या शिळा सरकवायला सुरुवात केली.

उत्साहातिरेकाने कामाला लागलेल्या त्या सैनिकांना पुढे सज्ज असलेल्या संकटाची कांही कल्पना नव्हती. त्या जीर्ण-प्रासा-दाच्या भिंती व खांब एकीकडे कललेले होते व अगदी पडण्याच्या तयारीतच होते.




दूर उभा असलेला समरसेन हे सर्व पहात होता. व्याघ्रदत्ताची आज्ञा पाळीत असलेल्या त्या सैनिकांवर कुठलीतरी भिंत किंवा स्तंभ कोसळून; त्या सर्वांवर भीषण अपघाताचे मरण ओढवणार असल्याचे तो उघड्या डोळ्यांनी पहात होता!

व्याघ्रदत्त मात्र दूर उभा राहून, खडक बाजूला सारणाऱ्या आपल्या सैनिकांना प्रोत्साहन देत होता. त्याचे मान वळवून त्या भिंतीकडे वारंवार पाहणे व नजर रोखून दाराकडे पाहणे, या वरून त्या दुष्टाला, येऊ घातलेल्या संकटाची पूर्ण कल्पना असावी, असे समरसेनला वाटले. 'व्याघ्रदत्त जाणून-बुजून, आपल्या साथीदारांना या आपत्तीच्या तोंडी देत आहे की काय?' अशी शंका समरसेनच्या मनांत येतेय तोच; गडगडत ते शिथिलभवन कोसळले व कानठळ्या बसविणारा आवाज आसमंतात भरून गेला. कोसळलेल्या भितींच्या व स्तंभांच्या खाली चिरडलेले व्याघ्रदत्ताचे अनेक सैनिक करुण किंकाळ्या फोडून मरण पावले, तर घायाळ व जखमी झालेले कांही जण हाहाःकार करीत कसे-बसे आपले प्राण वाचवून बाहेर पडले.

ही भयंकर घटना, डोळ्यांची पापणी लवेस्तोवर घडून गेली. जखमी झालेल्या व जीव वांचवून बाहेर पडलेल्या थोड्या सैनिकांना घेऊन, व्याघ्रदत्त थोडाबाजूला सरला.

'त्याच्यावर विश्वास ठेवून अनेक जणांनी मरण-समाधी घेतली' याचे त्याला तीळमात्र दुःख झालेले दिसत नव्हते. त्या दारुण अपघाताने समरसेनचे काळीज पिळवटून निघाले.

"कांहीतरी नकळत झालेल्या चुकीमुळे व्याघ्रेश्वरी कोपलेली असावी; म्हणूनच तिने या सिंहद्वाराजवळ अनेक जणांचा बळी घेतलेला दिसतो आहे. आतां यापुढे आपल्याला कुठल्याही संकटाला तोंड द्यावे लागणार नाही! अगदी निर्धास्त व्हा!" असे म्हणत व्याघ्रदत्ताने आपल्या हातात असलेला एक कागद त्यांना दाखविला व तो पुढे म्हणाला—"अद्भुतशक्ती असलेले शाक्तेयाचे त्रिशूल असलेले ठिकाण, तुम्हाला दाखवायचा माझा विचार आहे. त्या त्रिशूलाच्या प्रभावामुळेच आपण उरलेले सर्वजण या पृथ्वीवर राजाधिराज होणार आहोत. ते त्रिशूल असलेले स्थान, या नकाशात स्पष्टपणे दाखविलेले आहे. हत्तींच्या बनामध्ये, विषवृक्षापासून शंभर पावलं लांब, मृतवीरांच्या समाधी खाली, गुरुद्रोहीच्या अस्थि-पंजरात शाक्तेयाचे त्रिशूल लपविलेले आहे!"

आडोशास उभा राहून, हे सर्व ऐकत असलेल्या समरसेनच्या अंगावर, आश्चर्याने कांटा उभा राहिला व भीतीने त्याचे अंग थरथर कांपू लागले. ज्या अपूर्वशक्तीयुक्त त्रिशूला करितां, एवढी युद्धं व एवढ्या हत्या घडल्या; ते त्रिशूल अखेरीस या महा-दुष्ट अशा व्याघ्रदत्ताच्या हाती लागावे ना!

"आतां काय बरे करावे?" असा यक्षप्रश्न समरसेनच्या मनांत काहूर माजवू लागला. शिवदत्ताचे काय झाले? त्याला त्रिशूल कोठे आहे; हे ठाऊक आहे कां? त्याच्याबरोबर असलेल्या फक्त सहा सैनिकांबरोबर व्याघ्रदत्तावर चालून जाणे योग्य ठरेल कां? अशा प्रश्नांनी त्याला भंडावून सोडले.




समरसेनला काय करावे याचा निर्णय घेता आला नाही. व्याघ्रदत्ताच्या हाती एकदा कां, ते त्रिशूल गेले तर त्याच्यापुढे दुसऱ्या कुणाचाही टिकाव लागणे शक्य नाही. मंत्रतंत्र विद्यांमध्ये अद्वितीय असे एकाक्षी व चतुराक्ष यांनादेखील 'दासोऽहं' व्हावे लागेल, त्यांचे देखील कांही चाल-णार नाही! धनराशींनी भरलेल्या नौका व त्यांचे रक्षण करणाऱ्या नागकन्यासुद्धा व्याघ्रदत्ताला वशीभूत होतील, यात कांही शंका नाही.

अशा आपत्समयी आपल्याला सहाय्य करूं शकणारा एकटा चतुराक्षच होय! परंतु त्याला सद्यस्थिती कळविणार कशी?

तो यावेळी नागकन्यांना वशीभूत करण्याच्या प्रयत्नांत असेल. चतुराक्षाला, शाक्तेयाच्या या महासामर्थ्यशाली त्रिशूलाबद्दल, कांही कल्पना असेल कां? ते त्रिशूल जर आपल्या एकट्याच्या हाती लागले, तर हे द्विपच नव्हे, तर साऱ्या त्रिभुवनावर आपला अधिकार गाजविता येईल!

अशा अगणित विचारांमध्ये समरसेन गढला असता, व्याघ्रदत्ताच्या धीरगंभीर आवाजाने त्याची विचार मालिका तुटली. "उद्यां महापर्व-दिवस आहे. रविवार असून, अमावास्या आहे! तेव्हां आज रात्रीं आपण इथेच विसावा घेऊं या! उद्यां रात्रीं, बरोबर एक वाजतां, आपण गज-बनांत प्रवेश करणार आहोत!"

आपल्या अनुयायांना अशी सूचना देऊन व्याघ्रदत्त एका मोठ्या शीलाखण्डावर बसला. आपापली आयुधं खाली ठेवून, त्याचे अनुयायीसुद्धा त्याच्या भोवती कोंडाळे करून बसले. व्याघ्रदत्ताचे बोलणे ऐकल्या-नंतर समरसेनाच्या मनांत आशेचे किरण डोकावू लागले. अजून चोवीस तासांचा अवधी त्याला मिळाला होता. या काला-वधीत कांहीतरी करून–नच झाले तर–रात्रीं निजलेल्या व्याघ्रदत्ताचा गळा दाबून कां होईना–आपला मार्ग साफ करायला हवा होता. तोपर्यंत त्याला व त्याच्या सोबत्यांना विसावा घेता येईल...

असा विचार करीत समरसेनने मागे वळण्याकरिता एक गिरकी घेतली. ती गिरकी घेत असता, तो ज्या तुटलेल्या खांबाला टेकला होता, तो खांब धक्का लागून खाली कोसळला, त्याबरोबर मोठा आवाज झाला.

त्या आवाजासरशी घायाळ झालेल्या चित्यासारखा, व्याघ्रदत्त सचेत होऊन उभा राहिला. त्याच्या पाठोपाठ त्याचे सैनिकसुद्धा आपापली हत्यारं सरसावून सिद्ध झाले. व्याघ्रदत्ताची नजर, शिथिल-भवनांत दडून बसलेल्या समरसेनवर सरळ भिडली.

(क्रमशः)





# आदर्श राजा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले व नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा! जगात सत्कार्यं करून कांही लोक आदर्श व्यक्ती बनतात. परंतु पाप-कर्मं करून देखील आदर्श व्यक्ती बनलेले कांही लोक आहेत. ह्याचे उदाहरण म्हणून मी गुणसिंह नांवाच्या राजाची गोष्ट सांगतो, श्रमपरिहार म्हणून ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

पूर्वी विदर्भ देशाचा राजा जयसिंह याला दोन मुलगे होते. मोठा वीरसिंह व धाकटा गुणसिंह. लहानपणापासूनच गुणसिंहाची अभिरुची राज्यशासन व क्षत्रियोचित विद्यांकडे होती. महामात्य माणिकवर्माजवळ तो राजनीती शिकला



व सेनापती शूरसेन यांच्या जवळून शस्त्रास्त्रांचे व अन्य क्षात्रविद्यांचे त्याने अध्ययन केले. वीरसिंहाची आवड अगदी वेगळी होती.

जयसिंहाने वंशपरंपरेप्रमाणे मोठ्या मुलालाच, गादीवर बसवायचे ठरविले. हे लक्षात आल्यानंतर, गुणसिंहाने आपले गुरू असलेल्या मंत्री व सेनापतींशी संगनमत केले व वीरसिंहाच्या राज्याभिषेकाच्या आदल्या दिवशी रात्रीं पित्याला व भावाला बंदी बनवून तुरूंगात टाकले व दुसरे दिवशी स्वत:चा राज्याभिषेक करविण्याची तरतूद केली. गुणसिंहाचा राज्याभिषेक होत असतां, महामात्यांनी राजमुकुट उचलला व युवराजाच्या डोक्यावर ठेवणार तोच.

"हे काय करताय?" गुणसिंह म्हणाला.

"महाराज! हे राजमुकुट आहे." महामंत्री म्हणाले.

"राजमुकुट धारण केले नाही तर प्रजापालन करता येत नाही कां, महामात्य!" गुणसिंह म्हणाला. "आजपासून राजवाड्यांत भोग-विलासा करिता होणारा व्यय थांबवा! मीसुद्धा राजदरबारातला एक अधिकारीच आहे. म्हणून माझ्या करिता योग्य असे वेतन ठरवा!"

मंत्र्यासकट सर्व दरबारी व सभाजनांना आश्चर्य वाटले.

गुणसिंहाने शेवटपर्यंत आपल्या वेतनातच अगदी साधेपणाने निर्वाह केला. प्रजेच्या सोईसाठी व देशाच्या प्रगतीसाठी अनेक योजना आंखून त्या कार्यरूपाला आणल्या. थोड्याच काळांत त्याने देशाला प्रगतीशील व सम्पन्न बनविले.

विदर्भापासून शंभर कोसावर विरूप नांवाचे एक राज्य होते. चित्रसेन नांवाचा राजा तिथला प्रतिपालक होता. सर्व शास्त्रांमध्ये पारंगत व विद्यानिपुण अशा आपल्या युवराजावर राज्य-भार सोपवून आपण आतां विश्रांती घ्यावी, अशा विचारात तो होता. त्याने आपला सुयोग्य पुत्र विजयसेन याला जवळ बोलवून असे सांगितले.

"तुझा विद्याभ्यास तूं पूर्ण केलास हे खरे आहे. पण राजाला निव्वळ शास्त्रज्ञानावर अवलंबून चालत नाही, जोडीला थोडा अनुभव हवाच! म्हणून तू देशाटनाला जा. आजूबाजूची राज्यव्यवस्था पहा. कुणी आदर्श राजा दिसला तर कांही दिवस त्याच्या हाताखाली अनुभव घे व त्याच्या व्यवस्थेतील चांगले व ग्राह्य ते शिकून घे!"

वडिलांची आज्ञा शिरोधार्य मानून विजयसेन देशाटनासाठी बाहेर पडला. निरनिराळ्या राज्यांमध्ये जाऊन तेथील राजांचे गुण-अवगुण, शासन व्यवस्थेतील बारकावे व राज्याची स्थिती-गती पहात कांही काळ लोटल्यानंतर विदर्भ देशात पोचला. तिथल्या प्रजाजनांकडून गुणसिंहाबद्दल व त्याच्या प्रजापालनाबद्दल ऐकून गुणसिंहाची भेट घेतली व त्याच्याकडे कांही दिवस रहावे अशी आपली इच्छा व्यक्त केली.

विजयसेनाने कांही काळपर्यंत गुणसिंहाच्या दरबारी नोकरी केली. नंतर स्वदेशी परत गेल्यानंतर त्याच्या पित्याने त्याचा राज्याभिषेक केला.

इथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा! राज्याभिषेक करवून सिंहासनावर बसायच्या वेळेस पित्याची आज्ञा मानून, त्रास घेत देशाटन करीत विजयसेनने अखेरीस 'गुणसिंहाला आदर्श मानले'



ही त्याची चूक होती, असे मला वाटते. राज्याच्या लोभामुळे पित्याला व थोरल्या-भावाला अन्यायाने बंदीवान बनविणारा गुणसिंह 'आदर्श राजा' कसा ठरेल? या शंकेचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिलं नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकलं होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्यावर विक्रमादित्य म्हणाला—"गुणसिंहाने राज्य-लोभामुळे पित्याला व भावाला बंदी बनविले, असे म्हणायला कांही आधार नाही. व्यसनी राजापासून प्रजेचे रक्षण करून, तिचा उत्तमतऱ्हेने प्रतिपाळ करण्या करिता त्याला तसे करावे लागले. गुणसिंहाने जर राज्य-लोभामुळे तसे केले असते तर तो राज-वैभव सोडून असा साधेपणाने राहिला नसता. प्रजेच्या सुखा करिता इतका झटला नसता. इतकेच नव्हे तर, राजा म्हणून स्वतःला श्रेष्ठ न समजता आपणही राज्याचा एक सेवक आहोत असे मानले. व आपणही प्रजेतील एक नागरिक बनून राहिलो तर प्रजेच्या समस्या अधिक चांगल्या तऱ्हेने समजतील व त्यांचा परिष्कार करता येईल या भावनेने, राज्याच्या प्रगतीसाठी व प्रजेच्या सुख-शांतीसाठी त्याने जे नाना प्रयत्न केले ते जमेस धरतां, 'आदर्श राजा' ठरण्यास जी लक्षणं लागतात ती सर्व आपल्या ठायी आहेत हे दाखवून दिले होते. पित्याला व भावाला बंदी बनविणे ही त्याची वैयक्तिक बाब होती. व्यक्तिगत विषयांपेक्षा, राजा म्हणून गुणसिंहाने प्रजेची कशी सेवा केली हे महत्त्वाचे ठरते. यावरून तो कदाचित आदर्श-पुत्र किंवा आदर्श-भ्राता नसेलही; परंतु तो आदर्श राजा होता हे निर्विवाद सत्य आहे. विजयसेनने गुणसिंहाला आदर्श राजा मानले ही त्याची चूक नव्हती."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)





# ग्रहण-स्नान

नागोपंत हे गांवातील मोठ्या शेतकऱ्यांपैकी एक असून बोलण्यात अगदी पटाईत होते. "भूक नसलेला व कर्ज नसलेला या जगांत सापडायचा नाही!" असे ते नेहमी म्हणत असत. 'ते दिसायला श्रीमंत व शेती-वाडीवाले दिसले तरी त्यांच्या डोक्यावर भरपूर कर्जाचा बोजा आहे' असे इतरांना सांगत असत. परंतु कुणी अडचणीत सापडलेला त्यांच्याकडे आला तर भारी व्याजाने कर्जाऊ रकम देत असत.

एकदा त्यांच्या शेजारचा एक गरीब शेतकरी सोमनाथ त्यांच्याकडे कर्ज मागायला आला. त्याचे दोन एकरांचे शेत नागोपंतांच्या शेताला लागूनच होते. ते आपल्या हाती आले तर बरे, असे बरेच दिवसापासून नागोपंतांच्या मनांत होते.

"सोमाजी! प्रत्येकावरच कधी न कधी अडचण ही येतच असते!" असे म्हणून नागोपंतांनी सोमनाथाचे दोन एकर शेत गहाण ठेऊन घेतले व त्याच्या गरजेपेक्षा थोडी जास्तच रकम त्याच्या हातावर ठेवली.

त्यानंतर लागोपाठ दोन वर्षं पाऊस नीट पडला नाही व सोमनाथाच्या शेतांत पीक आले नाही. त्यामुळे आता हा कांही कर्जफेड करू शकणार नाही याची खात्री पटल्यानंतर नागोपंतांनी सोमनाथाच्या मागे कर्जफेडण्यासाठी लकडा लावला. 'आणखी एकवर्ष थांबा' म्हणून सोमनाथाने मनधरणी केली.

"येत्या सुगीला पाऊस चांगला होईल याची खात्री आहे वाटतं? मरण कधी येईल व पाऊस कधी पडेल हे जर खचित समजले तरमग आणखी काय हवं होतं! इकडे सावकार माझ्या उरावर बसला आहे. तुम्ही तर दोन एकरच जमीन आहे

पण माझी कर्जापायी दहा एकर जाणारसे दिसतेय!" नागोपंत म्हणाले.

'आपले दोन एकर शेत हा गिळंकृत करूं पाहतो आहे' हे सोमनाथाला कळून चुकले. परंतु गत्यंतर नसल्यामुळे त्याने ते नागोपंतांना कर्जफेड म्हणून देऊन टाकले.

त्यानंतर एका आठवड्यानी सूर्यग्रहण होते. नागोपंतांच्या मित्रांनी त्यांना ग्रहण-स्नानासाठी नदीवर चलण्याचा आग्रह केला. नदीवर आंघोळीला गेल्यानंतर तिथे येणाऱ्या याचकांना दान-धर्म करावा लागेल या भीतीने ते म्हणाले–"त्या नदीचेच पाणी एका छोट्या कालव्यातून बाजूच्या तळ्यांत येतेय नां? मग ग्रहणाची आंघोळ करायला ते चालत नाही कां?"

नागोपंतांचा चिक्कूपणा माहित असलेले मित्र हंसले व निघून गेले. जरावेळानंतर नागोपंत तळ्याकडे निघाले. तळ्याकांठी कांही भिकारी त्यांना दिसले व कांही म्हातारे तळ्यांत आंघोळ करीत असलेलेही त्यांनी पाहिले.

त्या भिकाऱ्यांच्या नजरेस पडू नये म्हणून नागोपंत दुरूनच तळ्याच्या दुसऱ्या-बाजूला जाऊ लागले. एका धोंड्यावरून पाय घसरून ते तळ्यांत पडले. पाणी खोल होते व नागोपंतांना पोहता येत नव्हते! "वांचवा हो" म्हणत ते ओरडत गटांगळ्या खाऊं लागले.

शेजारच्या गांवी गेलेला सोमनाथ सुदैवाने त्याच वाटेने पायी येत होता.



नागोपंतांचा आवाज त्याने ओळखला व मागचा पुढचा विचार न करता तळ्यांत उडी टाकली व त्याने नागोपंतांना काठा-वर आणले.

दगडावरून पाय घसरून पडतांना त्यांचा उजवा पाय चांगलाच मुरगळला होता. अंगाला चांगलेच खरचटले होते. नागो-पंतांना उठून उभे रहाता येईना. त्यांनी सोमनाथाकडे केविलवाणी दृष्टी टाकली. सोमनाथाला त्यांची कींव आली. त्यांनी नागोपंतांना पाठीवर उचलले व घरी पोचविले.

नागोपंतांना अंथरुणावरून हलता येईना. गांवातल्या वैद्याच्या चिकित्सेने कांही उतार पडेना. पाय दुखी तर कमी झालीच नाही, उलट जखमांतून जास्तच ठणका वाढूं लागला. ही बातमी समजल्यामुळे त्यांचे जवळचे व दूरचे नातलग त्यांना भेटायला येऊं लागले व घरांतच मुक्काम ठोकूं लागले.

शारीरिक दुखण्याबरोबर घरांत शिर-लेल्या या पाहुण्यांना कसे घालवावे या विवंचनेने त्यांची झोपच नाहिशी केली.

एके दिवशी त्यांची सून त्यांच्या मोठ्या-मुलापाशी गाऱ्हाणे गात असलेले त्यांनी ऐकले. "या थेरड्याचा एकदा निकाल लागला तर सुटेन एकदाची! घरांत भर-लेल्या या खंडीभर नातलगांची उठबस करता करतां व रांधून-वाढून-खरकटी काढता काढता जीव जातोय माझा!"



हे ऐकल्यापासून नागोपंतांच्या जिवाची घालमेल सुरू झाली. त्यांचे मन बेचैन झाले. जिवापाड कष्ट करून एवढं कमवलं ते मुलासाठी व नातवंडांसाठीच ना! सून म्हणाली ते मुलाने गप्प ऐकून घेतलं या गोष्टीनं त्यांचं मन दुखावलं.

दुसरे दिवशी नेहमीप्रमाणे सोमनाथ त्यांना भेटायला आला. त्याला पाहून नागोपंतांना गहिंवरून आलं. घडला प्रकार त्यांनी सोमनाथाला सांगितला. "सोमाजी! मला जाण आल्यापासून एकही धर्मकार्य माझ्या हातून घडलेलं नाही. केलेली पापं फळाला येत आहेत. वाकड्या वाटेने धन कमवण्यात हयात गेली. आतां भोगावे लागते आहे."

सोमनाथाने त्यांची समजूत काढली. "सर्व पापं धुवून काढायची क्षमता पश्चात्तापांत असते म्हणतात! तळ्यांत तुम्ही केलेल्या ग्रहण-स्नानामुळे तर सर्व पापांतून तुमची सुटका झालेलीच आहे. या गांवच्या वैद्याकडची चिकित्सा आतां पुरे झाली. शहरांत चांगले निष्णात वैद्य असतात आपण त्यांच्याकडे जाऊं या."

नागोपंत सोमनाथाबरोबर शहरांत आले. निष्णात वैद्यांची चिकित्सा सुरू झाली. महिन्या भरात धडधाकट होऊन गांवी परतले. अजूनही नातलग घरांत असलेले त्यांनी पाहिले. सर्वांचा चांगला पाहुणचार करून त्यांनी सर्वांनाप्रेमाने निरोप देऊन वाटेला लावले.

एके दिवशी सकाळी सोमनाथाला नागोपंतांनी हांक मारली व त्याच्या-बरोबर आपल्या शेताकडे गेले. दोघांच्या शेताच्या मधल्या बांधावर बसून बोलू लागले. सोमनाथाच्या शेताकडे बघत त्याला म्हणाले–"सोमाजी! त्या दिवशी तू म्हणालास की 'मी ग्रहण-स्नान करून पुण्यवान झालो आहे'; त्या बाबतीत मला कांही माहीत नाही, परंतु यापुढे पाप न करता जगायचे ठरविले आहे. कर्जापायी गिळंकृत केलेले तुझे हे शेत तुला मी आज परत देत आहे!"



# हुशार भिकारी

रंगापुरांत एक नवीन भिकारी आला व चार घरी भीक मागून पोट भरूं लागला. परंतु एका घरचा मालक "भाकर नाही, का तुकडा नाही! चल चालता हो!" असे म्हणत त्याला नेहमीच हुसकाऊन देत असे.

ते घर महालोभी रंगारावाचे होते.

एके दिवशी तो भिकारी त्यांच्या दारावर जाऊन "मातान्नपूर्णेश्वरी, भिक्षांदेही!" असे मोठ्याने ओरडला.

ते ऐकताच रंगाराव तावातावाने बाहेर आला व "तुला कितीदां सांगायचे? इथे भाकर नाही की अन्न नाही! चल नीघ इथून!" असे म्हणून दार लावून घेऊं लागला.

"क्षमा करा; आज मी अन्न मागायला आलेलो नाही!" लगेच भिकारी म्हणाला.

"मग कशाला आलास?" रंगाराव खेकसला.

"मी कधीही आलो तर 'अन्न नाही' म्हणता ना? म्हणून आज इकडून-तिकडून याचना करून आणलेल्या अन्नातलं थोडं अन्न आपल्याला देऊन जाण्यासाठी आलो आहे. भांडं आणा!" असे म्हणत भिकाऱ्याने झोळी उघडली.





# चंदामामाची कथा

एका गावांत सोमशास्त्री नांवाचा, सर्व विद्यांमध्ये पारंगत असा विद्वान रहात असे. त्यांनी सर्व धर्मांचा अभ्यास केला होता. त्यांच्या जवळील ज्ञानाचा सर्वांना उपयोग व्हावा म्हणून त्यांनी एका गुरुकुलाची स्थापना केली.

सोमशास्त्र्यांचा नांव-लौकिक ऐकून अनेक विद्यार्थी त्या गुरुकुलात येऊं लागले. परंतु दुर्दैव असे की त्यांनी शिकविलेले विद्यार्थ्यांना कांहीही समजत नसे. हळूहळू त्या गुरुकुलातील विद्यार्थ्यांची संख्या खूपच कमी झाली.

असे असतांना सुशांत नांवाचा, मध्यम वयाचा एक प्रौढगृहस्थ त्या गांवी आला. त्याला जवळचे असे कुणीच नव्हते. असलेली सर्व माल-मत्ता अग्नीने स्वाहा केल्यामुळे व 'फुलं विकलेल्या ठिकाणी काष्ठं कशी विकणार?' म्हणून या गांवी आला व एका श्रीमंत माणसाला आपली कर्म-कहाणी ऐकविली.

त्या धनिकाने सर्व ऐकून घेतले व म्हणाला—"तुला करण्याजोगे काम, मजजवळ नाही! या गांवात विद्या-दान करूं शकणारा कुणीही सुयोग्य गुरु नसल्यामुळे फार खोळंबा होतो आहे. तुला जर मुलांना शिकविणे जमत असेल तर, इथे तुला कांही कमी पडणार नाही."

सुशांत विद्यांमध्ये तज्ञ होता असे नव्हे! पण ही गोष्ट त्या धनिकाला न सांगता—"दहा दिवसांनंतर चांगला मुहूर्त आहे. त्या शुभमुहूर्तावर मी एका नव्या गुरुकुलाचा प्रारंभ करीन, पण त्यासाठी सोईस्कर अशा जागेची सोय आपल्यालाच करावी लागेल!" सुशांत म्हणाला.

धनिकाने ते आनंदाने मान्य केले. मुहूर्ताच्या आधी सुशांत सोमशास्त्र्यांजवळ गेला व त्यांना अभिवादन करून म्हणाला—"पंडितश्रेष्ठ! आपल्यासारखे महान्ज्ञानी या गांवांत असतांना येथील लोकांना गुरुची उणीव कां भासते आहे?"

"वडिलोपार्जित धन-संपदा मजजवळ भरपूर आहे. आपल्या जवळील ज्ञानाचा लाभ इतरांना करून द्यावा असे मला वाटते. धनार्जनाची माझी इच्छा नाही. तरीसुद्धा कां कोण जाणे, मी शिकविलेले विद्यार्थ्यांना आकलन होत नाही!" सोमशास्त्री गंभीर वाणीने म्हणाले.

"आपण खेद वाटून घेऊं नये! आपल्या ज्ञानाचा मी इतरांना बोध करवून देईन!" सुशांत म्हणाला.

"जे मला साधलं नाही, ते तुला जमेल असं वाटतंय कां तुला?" सोमशास्त्र्यांच्या स्वरांत शंका डोकावत होती.

"आपण मनांत किन्तु बाळगण्याचे कारण नाही!"

सोमशास्त्र्यांनी आडकाठी न घेता सुशांतला आपला शिष्य मानण्याचे कबूल केले. सुशांतने गुरुकुलाचा प्रारंभ केला.

सुशांतची आकलनशक्ती चांगली होती. सोमशास्त्र्यांनी शिकविलेला प्रत्येक विषय सर्व बारकाव्यांसकट त्याला समजत असे. तोच विषय साध्या व सोप्या भाषेत तो



आपल्या शिष्यांना सांगत असे. सुशांतची अध्यापन-पद्धती विद्यार्थ्यांना आवडत असे व विषय सहज समजत असे. क्लिष्ट व गहन असलेली शास्त्रं सुद्धा त्यांना समजायला त्रास होत नसे.

दरदिवशी सुशांत सोमशास्त्र्यांजवळ जाई व नवा धडा शिकून येई व स्वतः शिकलेला विषय गोष्टीरूपांत गुंफून विद्यार्थ्यांना सांगत असे. शिकविण्याच्या हातोटीमुळे त्याच्या शिष्यांची संख्या क्रमाक्रमाने वाढू लागली. एवढ्या मोठ्या शिष्य समुदायाला एकट्याने शिकविणे अशक्य असल्यामुळे, आपण रचलेल्या कथा त्याने पुस्तकरूपाने लिहिल्या. त्या पुस्त-








कांच्या आधाराने कसे शिकवावे, हे ही त्याने कांही नव्या लोकांना शिकविले. कालांतराने सुशांतचे गुरुकुल, विश्वविद्यालय बनले.

सुशांतच्या प्रतिभेची कीर्ती राजाच्या कानांवर गेली. त्याने सुशांतला बोलाऊन घेतले व 'कांही दिवस राजधानीत राहून, राजकुमारांना शिकवावे' अशी इच्छा प्रदर्शित केली.

सुशांतने नम्रपणे राजाला असे निवेदन केले–"प्रभू! या बाबतीत माझे मोठेपण असे कांहीच नाही! सोमशास्त्री नांवाच्या महान्‌ज्ञानी पुरुषाकडून मी स्वतः रोज थोडे थोडे ज्ञान मिळवितो व लहान मुलांना ते समजावे म्हणून साध्या-सोप्या भाषेत लिहीत असतो. तेव्हां आपण कृपाकरून राजकुमारांना कांही दिवस गुरुकुलात पाठविलेत तर आम्हां सर्वांवर कितीतरी उपकार करणारे ठराल!"

"तो सोमशास्त्री तुझ्याहून श्रेष्ठ म्हणतोस? हे जर खरे असेल तर, तो सोमशास्त्रीच हे गुरुकुल चालवू शकेल की!" राजा आश्चर्य वाटून म्हणाला.

"प्रभू! आपणाला माहीत नसलेले असे काय आहे? या सृष्टीला शक्ती देणाऱ्या त्या सूर्याकडे आपण डोळे उघडून बघू शकतो कां? आम्ही पाहू शकत नाही, म्हणून सूर्याची प्रखरशक्ती खोटी ठरेल कां? सोमशास्त्री, भगवान् सूर्याप्रमाणे महान् तेजस्वी आहेत. मला व माझ्या सहकाऱ्यांना त्यांच्या कडूनच शक्ती प्राप्त होत आहे." सुशांत म्हणाला.

हे ऐकून राजा म्हणाला–"सोमशास्त्री सूर्य असतील तर, डोळे दिपविणाऱ्या त्या प्रखर तेजाचे, शीतल चांदण्यात रूपांतर करणारे 'चंद्र' ते आपण आहात!" असे म्हणून त्याने आपल्या राजकुमारांना विद्याभ्यासासाठी गुरुकुलांत पाठविले.

तेव्हांपासून सुशांतला 'चंदामामा' असे टोपण नांव मिळाले. अवघड असलेला विषय मुलांना सोप्याशैलीत सांगणाऱ्या सर्वांनाच 'चंदामामा' म्हणण्याचा प्रघात पडला.





# तेथ पाहिजे जातीचे

पूर्वी एकदा विरूपसेन हा मगधाचा राजा असतांना बोधिसत्वाने एका हत्तीच्या रूपांत जन्म घेतला होता. तो पांढराशुभ्र हत्ती ऐरावतासारखा दिसायचा. म्हणून मगधराजाने त्याला आपला प्रमुख हत्ती मानले.

एका पर्वंदिनीं मगधाचे राज्य स्वर्गालाही लाजवील असे सजविले होते. राजधानीमध्ये एक वैभवसंपन्न मिरवणूक काढायचे आयोजन झाले होते. म्हणून त्या श्वेतहत्तीला चांगले नटविले होते. सुसज्ज सैनिक मागेपुढे असलेल्या, हत्तीच्या नटलेल्या अंबारीमध्ये बसलेल्या, राजाची मिरवणूक निघाली.

राजमार्गाच्या दुतर्फा उभे असलेले लोक मोठ्या उत्साहाने. "अहा हा! या गजराजाची चाल तर बघा! याच्या दमदार चालीचा डौल पाहता, एखाद्या सार्वभौम राजाचे वाहन होण्यास साजेसा आहे!" असे त्या हत्तीच्या गुणांचे कौतुक करूं लागले.

लोक हत्तीची स्तुती करीत असलेले पाहून राजाच्या मनांत आले–"राजा म्हणून माझा गौरव करण्याऐवजी हे लोक हत्तीचीच स्तुती करीत आहेत म्हणायचे! एकही माणूस अंबारीत विराजमान झालेल्या माझ्यांकडे पहायला तयार नाही! सर्वांची दृष्टी या हत्तीवरच खिळली आहे. याची शिक्षा म्हणून कांहीतरी उपाय योजून या हत्तीची विल्हेवाट लावली पाहिजे."

दुसऱ्या दिवशी सकाळी राजाने माहुताला बोलाविले. व "काय रे, तो पांढराहत्ती चांगला प्रशिक्षित आहे काय?" असे विचारले.

"त्याला योग्य प्रशिक्षण देऊन अंबारीचा हत्ती मीच बनविले, प्रभू!" माहूत म्हणाला.

"काय की! तुझ्या सांगण्यावर माझा विश्वास नाही. नुसता अहंकारी व मानी हत्ती असावा अशी मला शंका वाटते आहे." राजा म्हणाला.

"तसं काही नाही, प्रभू!" माहूत म्हणाला.

"बरं, तूं सांगितल्याप्रमाणे जर चांगल्या तालमीत वाढलेला तो हत्ती असेल तर तूं त्याला समोरच्या पर्वतशिखरावर चढवूं शकशील कां?" राजाने विचारले.

"चढवूं शकतो, महाप्रभू!" असे म्हणून माहुताने क्षणभरात त्या अंबारीच्या हत्तीला पर्वतशिखरावर चढविले.

राजा कांही दरबाऱ्यांनाबरोबर घेऊन मागाहून पर्वतावर चढला. शिखराचा थोडासा भाग सपाट होता व पुढे कुशाग्र सुळा होता. राजाने "हत्तीला तिथे थांबव," असे माहुतास सांगितले.

"तूं याला कसे प्रशिक्षित केले आहेस, बघूंया! हत्तीला तीन पायांवर उभे कर!" राजा म्हणाला.

लगेच माहुताने हत्तीच्या मस्तकावर अंकुश ठेवले व त्याला सावध करीत म्हणाला–"बाबा रे! महाराजांची आज्ञा आहे, तीन पायांवर उभा रहा बरे!"

हत्तीने तसेच केले.

राजा, "अहा! छान!" असे म्हणाला. व "आतां पुढच्या दोन पायावर उभा राहूं शकतो कां बघ." अशी आज्ञा दिली.

माहुताचा इशारा मिळताच हत्ती पुढच्या दोन पायांवर उभा राहिला.

"हेही छान आहे! आतां मागच्या दोन पायांवर उभे रहायची आज्ञा दे!" राजा म्हणाला. त्यासरशी हत्ती मागच्या दोन पायांवर उभा राहिला.

"एका पायावर उभा राहूं शकतो कां?" म्हणून राजाने माहुताला विचारले.

हत्ती एकापायावर सहज उभा राहिला. नाना तऱ्हेने त्रास दिला तरी हत्ती पर्वतशिखरावरून खाली पडला नाही हे पाहून राजाच्या मनाचा जळफळाट झाला. "एवढीशी तालीम दिली तर कोणताही हत्ती हे सारे करूं शकेल आणि एक परीक्षा घ्यावी म्हणतो!" राजा म्हणाला.

"जशी आपली आज्ञा! ती परीक्षा कोणती, महाप्रभू!" माहुताने विचारले.

"हत्ती जसा आपल्या पायांनी या पर्वतशिखरावर चढला तसाच अधांतरी हवेत चालेल असे कर. ही माझी आज्ञा आहे!" राजा म्हणाला.

ते ऐकतांच राजाचा दुष्टहेतू माहुताच्या लक्षांत आला. परंतु थोडेसुद्धा न डळमळता माहुताने हत्तीच्या कानांत हळूच असे सांगितले–"बाबा रे! तू या पर्वतशिखरावरून घसरून खाली पडावेस म्हणून राजाने हा कट रचला आहे. त्याला तुझे मूल्यांकन करता आले नाही. तुझ्यात जर अद्वितीयशक्ती असेल तर तूं असाच या कड्यावरून पुढे हवेत चालत जा."





अद्भुतशक्तींचा महिमा असलेला तो हत्ती पर्वतशिखरावरून तसाच पुढे गेला व अधांतरी तरंगत जाऊ लागला. तेव्हां माहुत असे म्हणाला—"हे राजा! हा हत्ती असामान्य अशा दैवीशक्तीचा अंश असून तुझ्यासारख्या गाजरपारख्याच्या अंबारीचा प्रमुख हत्ती होण्याच्या योग्यतेचा नाहीच नाही! किमत न जाणणारे तुझ्या सारखे मूर्ख, अशा हत्तीलाच नव्हे तर, अमूल्य अशा कोणत्याही गोष्टीला गमावून बसतात. मूर्ख स्वतःच्या अविवेकाची प्रौढी दहा लोकांमध्ये मिरवीत असतात.

हवेत चालत जात हत्ती काशी राजाच्या उद्यानात अधांतरी उभा राहिला. हे पाहून काशीचे पौरजन आनंदाने ते दृश्य पहाण्यासाठी उद्यानाभोवती गोळा झाले.

ही वार्ता राजाच्या कानीं आली. काशीराज त्वरेने राजोद्यानात आला व हत्तीकडे पहात हात जोडून म्हणाला— "गजराजा! तुझ्या येण्यामुळे माझे राज्य पावन झाले. खाली उतरून ये, अशी मी प्रार्थना करतोय!"

राजाने असे म्हणताच हत्तीच्या रूपांत असलेला बोधिसत्त्व खाली आला. राजाने विचारले असता माहुताने घडलेली हकिगत सांगितली. ती ऐकून काशी राजाला व तिथे जमलेल्या नागरिकांना अत्यानंद झाला.

राजाने हत्तीला शृंगारले व त्याच्यासाठी सुंदर गजशाला बनविली. व त्याची उत्तम व्यवस्था राखायची सोय केली. त्यानंतर राज्याचे तीन समान भाग केले. एक भाग हत्तीच्या रूपांत असणाऱ्या बोधिसत्त्वाच्या पोषणाकरिता नेमून दिला. दुसरा भाग माहुताला दिला व तिसरा स्वतःसाठी ठेवला.

बोधिसत्त्वाने काशीराज्यात पाऊल टाकताच काशी राजाचे ऐश्वर्य, धन-संपदा व वैभवाची दिवसेदिवस अभिवृद्धी होऊ लागली. त्याची कीर्ती दशदिशांमध्ये पसरली.





## गुणाढ्य

आंध्र प्रान्तातील प्रतिष्ठान नगर ही शातवाहन राजाची राजधानी होती. राजदरबारातील पंडितां पैकी गुणाढ्य व शर्ववर्मा नांवाचे दोन पंडित होते. एकदा शर्ववर्माने 'आपण राजाला सहा महिन्यांच्या अवधीत संस्कृत शिकवू शकतो' असे सांगितले.

या विषयी त्या दोघा पंडितांमध्ये वाद-विवाद झाला व त्यांनी पैज लावली. 'राजाला जर शर्ववर्मा सहा महिन्यात संस्कृत शिकवू शकला, तर आपण संस्कृतमध्ये काव्य-रचना करणार नाही' असे गुणाढ्य म्हणाला. परंतु राजा चिकाटीने सहा महिन्यात संस्कृत शिकला. गुणाढ्य हरला.





गुणाढ्याने नगराचा त्याग करून देशाटन केले. कन्याकुमारी पासून हिमालया पर्यंत पायी फिरून त्याने सामान्य जनांकडून तसेच विद्वानांकडून अनेक कथांचे संकलन केले. त्या सर्व कथा त्याने पैशाची भाषेत लिहून काढल्या












बऱ्याच वर्षानंतर तो प्रतिष्ठान नगरांत परत आला. त्याच्या मित्रांनी व पंडितांनी त्याचे मोठे स्वागत केले. त्याने 'बृहत्कथा' नांवाच्या महान ग्रंथाची रचना केली. कथांचे संकलन असलेला हा जगातील पहिला ग्रंथ होता.

गुणाढ्याने आपली बृहत्कथा राजाला ऐकवायचे ठरविले. दरबारांत तो आपली कथा ऐकवीत असता, राजा मंत्री वर्गाशी अन्य विषयावर चर्चा करीत राहिला. राजाचे दुर्लक्ष गुणाढ्याला अपमानजनक वाटले.





त्याने आपले ताडपत्रांचे पुस्तक आवरले व सभागृहातून सरळ निघून गेला. राजाच्या हे लक्षात सुद्धा आले नाही- सभासदांनी देखील गुणाढ्याला थांबवायचा प्रयत्न केला नाही.



गुणाढ्याला वर्णनातीत दुःख झाले. तो नगरा जवळील एका डोंगरावर गेला. तिथे त्याने अग्नी प्रज्वलीत केला. एक एक ताडपत्र घेऊन आगीत टाकू लागला. अशा रीतीने त्याने श्रमपूर्वक लिहिलेली ती उत्कृष्ट रचना अग्नीला शरण जाऊ लागली.

त्यावेळी तो करीत असलेले काम पाहून पशु-पक्षांनी सुद्धा अश्रू ढाळले म्हणे ! वृक्षांनीही दुःखातिशयाने डोके वाकविले म्हणे ! या गोष्टीकडे लक्ष न देता गुणाढ्य आपल्या रचनेची आहुती अग्नीला समर्पण करीतच राहिला.





त्या वाटेने जात असलेल्या राजदरबारातील एका सेवकाने, गुणाढ्याला पाहिले. तो पळत पळत राजाकडे गेला व त्याने पाहिलेला प्रकार राजाला सविस्तर सांगितला. आपल्या हातून घडलेली चूक राजाच्या लक्षात आली.



राजा आपल्या घोड्यावर बसून लाग-लीच गुणाढ्य असलेल्या ठिकाणी पोचला. मंत्रीगण व दरबारातील अन्य अधिकारीवर्गाने राजाचे अनुसरण केले.

राजा गुणाढ्याच्या जवळ गेला व "महापंडित असलेल्या आपण मला क्षमा करावी, व आपल्या अमूल्य ग्रंथाला मात्र अग्नि ज्वाळांच्या आहारी कृपा करून जाऊ देऊ नये!" त्याने गुणाढ्याला विनविले. परंतु तोपर्यंत ग्रंथाचा फक्त एकपंचमांशच शिल्लक उरला होता. उरलेली ताडपत्रं राजाने आपल्याकडे घेतली.





त्यानंतर गुणाढ्याचा कधी नव्हे तो राजसन्मान करण्यात आला. त्याची संपूर्ण रचना मात्र अप्राप्यच राहिली. पैशाची भाषा सुद्धा नाहिशी झाली. परंतु अग्नीच्या आहारी न जाता राहिलेल्या बृहत्कथेचा, कांही शतकानंतर सोमदेव नांवाच्या पंडिताने जीर्णोद्धार केला. 'कथा सरित् सागर'

# कर्ज मिळविण्याची युक्ती

सूर्यापूरचा जमिनदार एकदा बैठकीत बसला असता, जवळच्या एका खेड्यातला गोमाजी त्याच्याकडे आला. 'आपल्या मुलीच्या लग्नाकरितां तीन हजार रुपये कर्जाऊ द्यावेत' अशी त्याने जमिनदाराला विनंती केली.

"एवढेसे कर्ज तुझ्या गांवात मिळवायचीही तुझी ऐपत नाही म्हणायची?" जमीनदार म्हणाला.

"परमलोभी असणाऱ्या कडूनही कर्ज काढायची अक्कल मला आहे. परंतु आपल्या दयाळूपणाची ख्याती ऐकून मी आपणाकडे आलो!" गोमाजी म्हणाला.

"असं म्हणतोस.? बरं, तर मग आमच्या गांवातल्या मालोजीकडून तूं जर कर्ज मिळवूं शकलास तर हे माझं पांच हजार किमतीचं सलकडं मी तुला बक्षीस दिलं म्हणून समज!" जमीनदार म्हणाला.

"ते कडं आतांच द्या! म्हणजे मालोजीकडून कर्ज घेऊन मी तिकडल्या तिकडे जाईन. मजवर विश्वास नसल्यास आपल्या माणसांना सोबत पाठवा!" गोमाजी म्हणाला.

जमिनदाराने थोडा विचार केला व आपलं सलकडं गोमाजीला दिलं व त्याच्याबरोबर चौघांना पाठविलं.

गोमाजीने ते कडं मालोजीकडे गहाण ठेवलं. तीन हजार रुपये कर्जाऊ घेतले व आपल्याबरोबर आलेल्या माणसांना परत पाठविले व आपल्या वाटेने निघून गेला.




Restore

127








# सावकारीचा व्यापार

विजयनगरांत रामजी नांवाचा एक सावकार रहात असे. तो आपल्या व्यापारांत निपूण होता. एकदा त्याने आपला मुलगा व्यंकटी यालाजवळ बोलाविले व म्हणाला–"मला आतां वार्धक्य आलेले आहे. एकदा तीर्थयात्रा करून यावी म्हणतो. यापुढे तुलाच हा व्यापार चालवावा लागेल."

पित्याने सांगितलेले 'ठीक आहे' म्हणून व्यंकटीने मान्य केले. रामजीने प्रवासाला लागणारी सर्व तयारी केली व निघण्यापूर्वी मुलाला जवळ बोलाविले व त्याला व्यापारातील कांही रहस्यं सांगितली. "अनुभवाने तुला बाकीचीही गुपितं उमजतील. कधी कांही शंका आल्यास जुनी वही-खातीं उघडून बघत जा." पित्याने सल्ला दिला.

रामजी तीर्थयात्रेला गेल्यानंतर व्यंकटी व्यापार-व्यवसायात जातीने लक्ष घालू लागला. एकदा त्याच गांवातील एक फळांचा व्यापारी त्याच्याकडे आला व "मला पांच हजार वराह कर्ज हवे आहे. कागद लिहून घेऊन द्यावेत." तो व्यंकटीला म्हणाला.

"तुम्ही कोणता व्यापार करतां?" व्यंकटीने विचारले.

"मी फळांचा व्यापार करतो." व्यापारी म्हणाला.

"क्रय-विक्रय झाल्यानंतर दररोज किती शिल्लक तुमच्याजवळ उरते?" व्यंकटीने विचारले.

"पन्नास वराहांपेक्षा जास्तच उरतात. माझा माल येऊन पडला आहे. तो सोडवायचा आहे. लौकर कर्ज देववा!" फळांचा व्यापारी घाई करीत म्हणाला.

रोज पन्नास वराहाप्रमाणे, एका महिन्याची याची मिळकत फक्त पंधराशे वराह होते. मग याला पांच हजार वराहांचे व्याज देऊन कर्जफेड करणे शक्य होईल कां? अशी शंका व्यंकटीच्या मनांत आली.

"पांचहजार वराह मला देता येणार नाहीत. एक हजार देईन. पटले तर घेऊन जा!" व्यंकटी म्हणाला.

"असं कसं म्हणता? तुमच्या वडिलांनी कांही वेळा मला सहा हजारापर्यंतही कर्ज दिलेले आहे!" आश्चर्याने व्यापारी म्हणाला.

एवढ्यात एक हिऱ्यांचा व्यापारी तिथे आला व व्यंकटीकडे पहात, "मला दहा हजार वराह हवेत!" असे म्हणाला. त्याच्या स्वरांत अरेरावी होती.

त्या जवाहिऱ्याचे बाजारपेठेत एक लक्ष वराहांपेक्षाही जास्त किंमत होईल असे दुकान असल्याचे व्यंकटीला माहीत होते. त्याने मागितलेले दहा हजार वराह व्यंकटीने मुकाट्याने काढून दिले व जवाहिऱ्याला पाठवून दिले. फळविक्याने मात्र कितीही गयावया केली तरीही हजार वराहांपेक्षा एक पैसाही अधिक त्याने दिला नाही.

त्यानंतर दरमहिन्या-महिन्याला फळांचा व्यापारी कांही ना कांही आणून आपल्या खात्यांत जमा करवून घेऊं लागला. हिऱ्यांच्या व्यापाऱ्याने मात्र चार महिने लोटले तरीही तोंडसुद्धा दाखविले नाही. कर्जफेडीबद्दल विचारपूस करायला गेलेल्या










माणसाशी वाकडे बोलून त्याला परत पाठवून दिले. या मुदतीत फळांच्या व्यापाऱ्याने अर्धे कर्ज फेडले होते.

रामजी तीर्थयात्रा करून परत आल्यावर एकदा वही-खाते पहात असतां व्यंकटीने फळांच्या व्यापाऱ्याला व जव्हेऱ्याला दिलेले कर्ज त्याच्या दृष्टीस पडले.

त्याने मुलाला हांक मारली व "जव्हेऱ्याला दहा हजार वराह–एवढी मोठी रक्कम कशाला दिलीस?" असा जाब विचारला.

अपराध्यासारखा चेहरा करून व्यंकटी म्हणाला–"तो श्रीमंत् आहे, कर्ज सहज-फेडील या भरोशाने मी त्याला मोठी रक्कम दिली. परंतु आज पावेतो त्याने एक दमडीही परत केलेली नाही."

"मी तीर्थयात्रेला जाण्यापूर्वी तुला आपल्या सावकारीच्या धंद्यातली कांही रहस्यं सांगितली होती, एक महत्त्वाची गोष्ट सांगायची राहून गेलेली दिसतेय! आपण कर्ज देतांना विचार करण्यासारखी गोष्ट म्हणजे 'कर्जदाराची आर्थिक स्थिती आजमावण्यापेक्षा त्याच्या मनांत शक्य तेवढे लवकर कर्जफेड करण्याची इच्छा आहे की नाही' हे पाहणे महत्त्वाचे असते. अशी तळमळ असलेल्याला त्याच्या आर्थिक स्थितीपेक्षा जास्त कर्ज दिले तरी त्याची परतफेड होण्याची खात्री असते. जव्हेऱ्याकडे भरपूर श्रीमंती आहे पण नीतीमत्ता नाही."

त्यानंतर थोड्या दिवसांतच व्यंकटीचे लग्न ठरले. रामजी, जव्हेऱ्याच्या दुकानांत गेला व आपल्या सुनेसाठी दागिने विकत घेऊन आला. दागिन्यांची निवड-करतांना त्यांची किंमत दहा हजार वराह व त्यांचे व्याज यापेक्षा जास्त होणार नाही याची रामजीने खबरदारी घेतली. घरी आल्यावर जव्हेऱ्याच्या खात्यावर ती किंमत जमा केली व खाते संपविले.

या अनुभवामुळे व्यंकटी आपल्या वडिलांची सावकारी मोठ्या कुशलतेने चालवू लागला.



# सूप व चाळणी

शिल्लंगेरीच्या राजाच्या दरबारांत एका उच्चाधिकाऱ्याची जागा रिकामी झाली. अशा जागी कुणा नव्या माणसाची नियुक्ती करण्यापूर्वी राजा आपल्या गुरूकडून त्याची परीक्षा करवून घेत असे.

या जागेसाठी आलेल्या रामशास्त्री व गोपालशास्त्री-यांना त्याने आपल्या गुरूकडे पाठविले. परीक्षेनंतर गुरु उमेदवाराच्या हातांत कांहीतरी वस्तू देऊन त्याला राजाकडे पाठवीत असे. त्या वस्तूवरून राजाला त्या व्यक्तीच्या स्वभाव-विशेषाची माहिती होत असे.

यावेळी गुरूकडून परत येतांना रामशास्त्र्यांच्या हाती सूप व गोपाळशास्त्र्यांच्या हाती चाळण या वस्तू होत्या.

कितीही विचार केला तरी राजाला, गुरुने पाठविलेल्या त्या वस्तूंचे आकलन होईना. म्हणून त्याने ते काम राजपुरोहितावर सोपविले. पुरोहिताने कितीही डोकेफोड केली तरी त्याला गुरूचा अभिप्राय समजला नाही. विचारांच्या तंद्रीत तो घरी पोचला. समोरच त्याची बायको कांडलेले पोहे सुपाने पाखडीत होती व कसलेतरी पीठ चाळणीने चाळीत होती.

दुसरे दिवशी दरबारात गेल्यानंतर पुरोहिताने राजाला असें सांगितले–"महाराज! गुरूवर्यांचा अभिप्राय असा दिसतोय–रामशास्त्री हे सुपाप्रमाणे उपयोगी गोष्टींचा संग्रह करून निरुपयोगी गोष्टींना थारा न देणारे विवेकी असून गोपाळशास्त्री हे चाळणीप्रमाणे उपयुक्त ते टाकून, कोंड्यासारखे जे टाकाऊ तेच धरून बसणारे मंदमती दिसताहेत!"

दरबारांतील रिकाम्याजागीं राजाने रामशास्त्रींची नियुक्ती केली.













# भूत-भ्रम

कालिंदी नदीच्या काठी पुंजिका नांवाच्या गांवी प्रज्ञावंत नांवाचा एक ब्राह्मण रहात असे, नांव चांगले असले तरी कुठल्याही कामासाठी निरुपयोगी असा तो दुर्दैवी होता.

'कावळ्याच्या नाकांत मोत्याची बेसर' म्हटल्या प्रमाणे त्याच गांवातील सुलोचना नांवाच्या मुलीशी त्याचे लग्न ठरले. सुलोचना अप्सरेलाही लाजवील अशी लावण्यवती होती.

प्रज्ञावंत माहितीतला मुलगा असल्या-मुळे आपली मुलगी आपल्या डोळ्यापुढेच राहील असा तिच्या आई-वापांनी विचार केला.

मुहूर्त ठरला. सुलोचनेच्या अंगाला हळद लावली. तिला हे लग्न मुळीच पसंत नव्हते, परंतु काय उपयोग? म्हणून तिने आत्महत्या करायचे ठरविले. लग्नादिवशी पहाटे घागर घेऊन ती कालिंदीकडे निघाली. घागर कांठावर ठेऊन ती नदीत उडी घेणार, एवढ्यांत पाठीमागून कुणीतरी तिला धरले.

सुलोचनेला आत्महत्या करुं न देणारा तो तरुण, वित्तकर्मा होता. तो दक्षिणेतील कुंभकोणम् या गांवी व्यापार करीत असे. लग्न करण्याच्या हेतूने तो आपल्या स्वग्रामी आला होता. बऱ्याच मुली पाहिल्या, परंतु त्याला एकही मुलगी पसंत पडली नाही. आजूबाजूच्या गांवीही मुली पहाव्या, या विचाराने तो घोड्यावर बसून निघाला. असता दुरूनच त्याने सुलोचनेला पाहिले व घोड्यावरून उतरून चालू लागला. ती सारखी वळून वळून मागे पहात पुढे जात असलेली पाहून त्याला संशय आला. म्हणूनच त्याने ऐन वेळी देवासारखे तिचे प्राण वांचविले.

"नववधूच्या पोशाखात असून हे काय करते आहेस? तूं कोण आहेस?" वित्त-कर्म्याने तिला विचारले.

कांहीही आडपडदा न ठेवता तिने सर्व कांही त्याला सांगितले. "तसल्या बाव-ळटाबरोबर जन्मघालविण्यापेक्षा मेलेले बेहेत्तर म्हणून मी निघाले, परंतु ऐन वेळी तुम्ही मोडता घालून सारे बिघडविलेत!" असे म्हणून ती रडूं लागली.

"चांगलेच झाले की! माझ्याबरोबर येतेस कां? मी कन्येसाठीच भटकतो आहे. कित्येक मुली पाहिल्या परंतु तुझ्या सारखी रूपवती कुणी भेटली नाही. दक्षिण देशांत, तुझ्याकडच्या लोकांपासून एवढे लांब जायची तुझी तयारी असली तर मीं तुझ्याशी लग्न करीन!" वित्तकर्मा म्हणाला.

"आत्महत्या करायची ठरविली तेंव्हाच मी सर्वांचा मोह सोडून दिला कारण ज्यांनी माझ्या बऱ्या वाईटाचा विचार न करता माझे भवितव्य एका मूर्खाच्या हातीं सोपविले त्यांचा विचार करण्याचे कांही कारण नाही. परंतु तुम्ही मला मरूं ही दिले नाही! म्हणून आतां लग्न करून पत्नी म्हणून माझा स्विकार करा." सुलोचना आगतिकपणे म्हणाली.

वित्तकर्माने तिला घोड्यावर बसवून घेतले व उजाडायच्या आंत तीन गांवं



ओलांडून पुढे निघून सरळ कुंभकोणम्ला पोचला.

ती दोघं निघून गेल्यानंतर थोड्या वेळाने गांवांत सुलोचनेसाठी शोधाशोध सुरु झाली. कांही लोकांना नदीकांठी तिची घागर दिसली. ती ओळखून व तिचा कुठे ही तपास लागला नाही म्हणून नवरी मुलगीच नदीत बुडून मेली असे लोकांना वाटले. लग्नासाठी आलेले नातेवाईक, सुलोचनेबद्दल ज्याला जसे सुचेल तसे बोलूं लागले.

लग्नच करावयाचे ठरविल्यानंतर मग ती व्यक्ती किती ही बावळट किंवा वेडगळ असो-मुलगी मिळत नाही, असे होत नाही!

कांही काळ लोटल्या नंतर राधा नावाच्या एका मुलीशी प्रज्ञावंताचे लग्न झाले. ती नांदायला आली व कांही दिवसांनी तिला दिवस राहिले.

गरोदर स्त्रियांची प्रकृती नाजूक असते त्यांत राधाला कडक डोहाळे लागलेले. तिला भिती वाटू लागली. त्यातच शेजारपाजारच्या आया-बाया येऊन—" वेडे, कालिंदीच्या कांठी कशाला गेलीस? सुलोचना तिथे भूत होऊन हिंडत असते. लग्नादिवशी सकाळीच तिचा दारूण मृत्यू झाला. तिच्या होणाऱ्या नवऱ्याशी तूं लग्न केलंस म्हणून आतां तुला पीडते आहे!" त्या तिला अधिकच भीती दाखवीत.

राधाबरोबर पोटांतल्या बाळाला कांही इजा होऊ नये म्हणून प्रज्ञावंताने निरनिराळ्या मांत्रिकांना दाखविले. कितीही जणांना दाखविले तरी ते सगळे 'सुलोचना भूत बनून त्रास देते आहे' असंच सांगत. प्रज्ञावंताचा त्या भुतावर विश्वास बसला. आजूबाजूच्या खेड्यांतल्या मंत्र-तंत्र जाणणाऱ्या लोकांना बोलाऊन त्याने तावीज करवून घेतले.

भूत-बाधा टळावी म्हणून अंगारे-धुपारे इत्यादी नाही नाहीते उपाय केले. एकानंतर एक चार मांत्रिकांनी भूत घालविण्यासाठी जे कांही सांगितले, ते सर्व उपाय करून झाले. हळूहळू राधाची प्रकृती सुधारू लागली.

'भूत सोडून गेले' असे सर्वांना वाटले.

योग्यकाळी राधाने एका मुलाला जन्म दिला.

जन्मल्यानंतर कांही वेळाने तो मुलगा दगावला. 'हे भुताचेच काम असावे' असे सर्वांना वाटले. इतक्या लोकांनी इतके मंत्र करून काय उपयोग झाला? या क्षुद्र देवतांच्या उपासनेने भूत कांही पिच्छा सोडत नाही! कुठल्यातरी तीर्थयात्रेला जाऊन ये!" कांही लोकांनी सल्ला दिला.

"रामेश्वराला जाऊन येणे चांगले! तो भोळासांब, भूतनाथ असून भक्तांच्या हांकेला धाऊन येतो. एकाला असेच भूत लागले होते ते रामेश्वरला जाऊन आल्यावर सुटले!" एकजण म्हणाला.

बायकोला बरोबर घेऊन रामेश्वरला जाऊन यायचे असे प्रज्ञावंताने ठरविले. चांगला मुहूर्त पाहून दोघे बाहेर पडले. बरेच दिवस प्रवास केल्यानंतर एके दिवशी ते कुंभकोणमला पोचले. तिथे एका धर्मशाळेत उतरले. त्या रात्री त्यांचे सर्व सामान कुणी चोराने चोरले.

या चोरीमुळे राधा व प्रज्ञावंताजवळ अंगावरच्या कपड्याशिवाय कांही उरले नाही. पुढे प्रवासाला जाणेही शक्य नाही की मागे घरी परतणेही शक्य नाही! त्यांची दुर्दशा पाहून तिथले लोक म्हणाले—"घडलेल्या घटनेवर विचार करीत














बसण्यात काय हंशील आहे? या शहरांत तुमच्या गांवाकडचाच एक व्यापारी, दानवीर कर्णासारखाच आहे. त्याच्याकडे जाऊन तुमच्यावर ओढवलेला प्रसंग त्याला सांगा म्हणजे तो तुमची पुढची सर्व सोय करून देईल!"

त्या व्यापाऱ्याच्या घराचा पत्ता विचारून प्रज्ञावंत बायकोसह त्याच्याकडे गेला. नवरा व्यापाऱ्याबरोबर बोलत असतां, राधा व्यापाऱ्याच्या बायकोकडे गेली व 'सुलोचना भूत होऊन तिचा कसा पिच्छा पुरवीत आहे', त्यातून सुटण्यासाठी ते कसे रामेश्वराला जायला निघाले, वाटेंत चोरांनी त्यांना कसे लुबाडले; हे सर्व सविस्तर सांगत बसली.

ते सर्व ऐकल्यानंतर त्या व्यापाऱ्याच्या बायकोने आपल्या अंगावरचे सर्व दागिने काढून ठेवले, साधीच साडी नेसली व "आपल्या मालकाशी बोलत असलेल्या प्रज्ञावंताला आंत बोलाव" असे आपल्या नोकराला सांगून पाठविले.

प्रज्ञावंत आला परंतु त्याने व्यापाऱ्याच्या बायकोकडे दृष्टी उठवून पाहिले नाही.

"काय हो! मला पूर्वी कधीतरी पाहिल्याचे आठवतेय कां?" व्यापाऱ्याची बायको म्हणाली.

प्रज्ञावंताने वर पाहिले. सुलोचनेला समोर उभी असलेली ओळखून आश्चर्याने दिग्मूढ होऊन पहात राहिला.

सुलोचना राधेकडे वळत म्हणाली— "पाहिलंस कां बाई? मी भूत बनून तुझा पिच्छा पुरविला या भ्रमामुळे तुम्ही नाना उपाय योजतां आहांत! 'भूत' ही एक भ्रामक कल्पना आहे; हे आतां तरी समजून घ्या व घरी जाऊन सुखाचा संसार करा!" असे म्हणून तिने त्या जोडप्याला आपला सारा इतिवृत्तांत ऐकविला.

प्रज्ञावंत व राधा सुलोचनेच्या घरी दोन दिवस राहिले तिचा पाहुणचार घेतला व घरी परत जाण्यासाठी तिच्याकडून कांही पैसे घेतले व आपल्या गांवी निश्शंक मनाने परत गेले.





# दुराशा दुःखाचे मूळ

जनाबाईंच्या घराचे दार उघडे पाहून रस्त्यावरून पळत येणारा एक चोर पटकन् आत शिरला व आंतून दार लावून घेतले त्याला पाहून जनाबाई ओरडणार तोच—

"ओरडलीस तर जीव जाईल! मी कांही तुझ्या घरांत चोरी करायला आलेलो नाही. बाजारात, एका माणूसाचा भरजरीचा शालू मी पळवून आणीत असता तो माझा पाठलाग करूं लागला; म्हणून मी बचावासाठी इथे आलो आहे." चोर म्हणाला.

भरजरी शालूचे नांव ऐकताच जनाबाईंच्या तोंडाला पाणी सुटले. "कुठे आहे? बघू बर?" त्या म्हणाल्या. हातातल्या पिशवीतला शालू काढून चोराने त्यांना दाखविला व लगेच पिशवीत ठेऊन दिला. 'असलाच शालू घेऊन या' म्हणून आमच्या ह्यांना कित्येक वेळा सांगून झाले, पण ह्यांनी आणलाच नाही. शेवटी काल मी ह्यांच्याकडे हट्टच धरला. 'बनारसी शालू म्हणजे काय साधी बाब वाटली होय? एवढे पैसे आणू कुठून?' हे चिडून म्हणाले. तुझ्या कडचा शालू तर तू पैसे देऊन आणलेला नाहीस! चोरीच्या मालाची ती किंमत काय लावणार? मला तो तू दोनशे रुपयाला दे. पैसे मोजून घे व शालू देऊन जा! कुणी तुझा पाठलाग केला तरी हरकत नाही." जनाबाई म्हणाल्या.

"ठीक आहे! पैसे घेऊन ये!" चोर म्हणाला. एवढ्यात बाहेरच्या दारावर गडबड ऐकू आली. त्याबरोबर चोर शालू घेऊन माळ्यावर दडून बसला.

जनाबाईंनी बाहेरचे दार उघडले. दारांत दोन पोलीस उभे होते. "बाई! एक चोर कुणाच्या तरी हातातला शालू पळवून याच

दिशेने पळाला आहे. तो इकडे तर आला नाही ना?" त्यांनी तिला विचारले.

क्षणभर विचार करून जनाबाई घाई घाईने म्हणाल्या–"इकडे कुणीही आलेला नाही रे बाबा!" चोराला पोलिसांच्या हाती देऊन तिला काय मिळणार होते? चांगला हजार रूपयालाही मिळणार नाही असला छान शालू, तो चोर तिला दोनशे रूपयाला द्यायला तयार झाला होता. दार लावून आंत आल्या व महात्रासाने गोळा केलेले दोनशे रुपये घेऊन आल्या. चोराला माळ्यावरून उतरायला सांगून, त्याच्या हाती दोनशे रुपये दिले व शालू घेऊं लागल्या चोराने दोनशे रुपये व्यवस्थित पाकिटांत ठेवले. जनाबाईंच्या हातून पिशवी हिसकाऊन घेतली व तो पसार झाला.

क्षणांत घडलेल्या या घटनेमुळे जनाबाईंच्या पायातली शक्तीच नाहिशी झाली. 'चोरीच्या मालाची आशा वाटून, चोराला आश्रय दिल्याबद्दल देवाने चांगली अद्दल घडविली,' असे त्यांना कळून चुकले.

जरा वेळाने त्यांचा नवरा विठोबा घरी आला. त्यांना पाहून असे म्हणाला–

"तुझं नशिबच फुटकं दिसतंय! कैक दिवसापासून 'शालू घेऊन द्या' म्हणून मागे लागली होतीस नां? त्या साठी दोघांची भांडणं सुद्धा झाली ना? 'जाऊं दे' म्हणून एका मित्राकडून एक हजार रुपये कर्जाऊ घेतले व दुकानांतून भरजरी शालू विकत घेतला. पिशवीत ठेऊन बाजारपेठेतून येतच होतो, कुणी तरी चोर हाताला हिसडा देऊन पिशवी घेऊन पळून गेला. हजार रुपयाची साडी त्या मेल्याच्या हाती उघड्या डोळ्यांनी कशी जाऊं देऊं म्हणून त्याचा पाठलाग करुं लागलो. परंतु त्याने माझ्या हातावर तुरी दिल्या! लगेच पोलिसांत फिर्याद नोंदविली. पण चोर सापडायची आशा वाटत नाही ये!"

हे ऐकल्या नंतर जनाबाईंना दुराशा धरल्या बद्दल मिळालेल्या कठीण शिक्षेची पूर्ण कल्पना आली! परंतु मूग मिळून गप्प बसण्या शिवाय कांही इलाज नव्हता!





# गणेश पुराण

एकदा नारद, कैलासाला जायच्या वाटेने निघाले असतां, कंटकमुखी असे नांव असलेली एक यक्षिणी चेष्टेने त्याला म्हणाली–"माझ्याशी लग्न कर की रे नारदा! ब्रह्मचर्य सोडून दे रे ब्रह्मपुत्रा!"

"मी कलह-भोजन-प्रिय म्हणून विख्यात आहे! तेव्हा कलह-भोजन शिजविणारी हवी बरंका मला!" नारद म्हणाला.

"मी भांडण लावण्यात, तुझ्याहून वरताणच ठरेन बरं!" यक्षिणी म्हणाली.

त्याच वेळी, समोरून गणेश व कुमारस्वामी दोघे 'चित-का-पट' खालीत येत होते. त्या दोघांना येत असलेले पाहून, नारद त्या यक्षिणीला म्हणाला–"त्या दोघा भावांमध्ये भांडण लावशील कां?"

"हात्तेच्या! एवढेच नां?" असे म्हणत ती कंटकमुखी, लगेच जवळ असलेल्या दल-सरोवरांत शिरली व सुवर्ण-कमळाचे रूप धारण करून "पार्वती-परमेश्वरांच्या सुपुत्रा करितां मी उमलले आहे!" असे गाऊं लागली. ते ऐकून ते दोघे भाऊ "हे माझं आहे", म्हणून भांडू लागले. "आईने बनविलेला बाहुला आहेस तू! मळाचा नुसता गोळा आहेस झालं!" कुमारस्वामी गणेशाला चिडवीत म्हणाला. त्यावर आक्षेप घेवून "चिखलाचे आगर असलेल्या शरवण सरोवरांतूनच तू आलेला आहेस!" गणपतीने उलट चिडविले.

कार्तिकेयाने हाताची मूठ वळवून गणपती वर ठोसा उगारला तेव्हा गणेशाने आपल्या

      



सोंडेने त्याचे मनगट धरले. दोघांचे भांडण जुंपले. गणपतीने आपल्या सोंडेने कार्तिकस्वामीची कम्बर धरली व त्याला वर उचलले. त्या बरोबर कुमारस्वामीने आपल्या भाल्याचा नेम-लंबोदराच्या पोटावर धरला.

धांवत येऊन नारदाने त्यांना सोडविले व "तुम्ही दोघे ही कुठली तरी पैज लावा बघूं!" नारद म्हणाला.

क्षणभर विचार करून कुमारस्वामी म्हणाला—"विश्व प्रदक्षिणा करून, आधी जो येईल, त्याचेच ते स्वर्ण-कमळ!"

"छान आहे! चांगली पैज लावलीत!" नारद म्हणाला.

कुमारस्वामी लगेच मोरावर बसून विश्वप्रदक्षिणा करण्यास निघाला.

गणपतीने हताश होवून एक उसासा सोडला. "काय विघ्नेशा! तुझा काय विचार आहे?" नारदाने पृच्छा केली.

"ज्याच्या आवाक्यात जेवढे आहे; तेवढेच त्याला प्राप्त होणार! स्वर्ण-कमळ मलाच मिळूदे म्हटले, तर मिळणार आहे कां, नारदा! माझे हे लंबोदर व माझे हे उंदीर-वाहन पाहिलेस नां? मला कसली जमते विश्व-प्रदक्षिणा! धाकट्या भावालाच मिळू दे ते स्वर्ण-कमळ!" गणपती म्हणाला.

"विश्व-जननी व जनक असलेल्या पार्वती-परमेश्वराचे दर्शन घ्यावे, या विचाराने या बाजूला आलो होतो. परंतु बघू पुढे कधी तरी! बरंय विघ्नपती! येईन परत!" असे म्हणत नारद निघून गेला.

गणेश पटकन् उठला व एका चबुतऱ्यावर बसलेल्या पार्वती-परमेश्वराभोवती तीन वेळा प्रदक्षिणा घालून, धाकटा भाऊ यायची वाट पहात बसला.

बऱ्याच वेळानंतर कुमारस्वामी विश्वप्रदक्षिणा घालून परत आला व मयूर-वाहनावरून खाली उतरला. गणपतीने कुमारस्वामीला मिठी मारली व "छोट्या! फार त्रास घेऊन विश्वाला प्रदक्षिणा घातलीस! आधी जाऊन ते स्वर्ण-कमळ घे बघूं! पैज मीच जिंकली, पण मला ते कमळ नकोय!" गणपती म्हणाला. "ते कसे काय?" नवल वाटून कुमारस्वामी म्हणाला.

"तुझ्या आधीच मी त्रिवार विश्व-प्रदक्षिणा घालून इथे बसलो आहे, कुणाला विचारतोस, ते विचार!" गणेश म्हणाला.

"पैज गणपतीनेच जिंकली!" अशी आकाश-वाणी झाली. सत्य समजल्यानंतर कुमारस्वामीने गणपती पुढे गुडघे टेकले व म्हणाला—"दादा! मी मोठी तपश्चर्या करून ब्रह्मज्ञान मिळविले, परंतु छोट्या विषयांत अज्ञानीच राहिलो! तुझी बुद्धी कुशाग्र आहे. तुझ्यापुढे माझी हुशारकी ती किती? तुझ्यानंतरच मी झालोय ना? तारकासुराशी युद्ध करण्यास निघतो आहे. मला आशीर्वाद दे!"

त्याला वर उठवून विघ्नेश्वर म्हणाला—"छोट्या! मी मोठा, तू लहान, असे मानण्याचे कांही कारण नाही. तुझा जन्म, निश्चित अशा कारणा करिता झालेला आहे. तू म्हटल्याप्रमाणे, मी मात्र, कांही-तरी खेळ म्हणून आईने केलेला मातीचा गोळाच आहे! तुझ्यासाठी म्हणून शिव-पार्वतीचे महा-मिलन घडले! त्यांच्या अनुरागाचे तू फळ आहेस! 'तुझा विजय



होणे' हे आधीच ठरलेले विधीलिखित आहे! 'तुझ्या हातून मरण यावे' असा तारकासुराने वर मागून घेतला आहे. तू सुब्रह्मण्येश्वर असून कांही भागांमध्ये तुझी मोठ-मोठी देवालये होतील. कांही तीर्थक्षेत्रे होतील! प्रमुख दैवत म्हणून लोक तुझी उपासना करतील! शक्य तेवढे लवकर तारकासुराच्या कचाट्यातून सर्वांना मुक्त कर!"

देवांचा सेनापती म्हणून कुमारस्वामी तारकासुरावर चाल करून गेला.

यक्षांचा अधिपती कुबेर याने कंटक-मुखीला असा शाप दिला—"शिव-पार्वतीच्या मुलांमध्ये भांडण लावणाऱ्या पापी मुली!



पृथ्वीतलावर 'गोकरू' म्हणून जन्माला येशील!"

कंटकलतेने कुबेराची क्षमा मागितली असतां—"विघ्नेश्वराच्या कृपेमुळेच तुला शापमुक्त होता येईल!" असा कुबेराने तिला उःशाप दिला. कंटकमुखी, तत्काळ गोकरूची रोपं बनून जमिनीवर उगवली व पसरूं लागली. देवादिकांचं सेनापत्य करून कुमारस्वामीने तारकासुराचा वध केला. त्यामुळे समाधान वाटून देवेन्द्राने आपली कन्या देवयानी हिच्याशी कुमारस्वामीचा विवाह करण्याचे योजिले. परंतु मोठ्या भावा आधी धाकट्याचे लग्न कसे करणार! म्हणून ते लग्न लांबणीवर पडले.

"प्रियनंदना! छोट्याचे लग्न व्हावे असे तुला वाटत असेल तर 'तूं लग्नासाठी तयार होणे' हे तुझे कर्तव्य ठरत नाही कां?" पार्वतीने हळूच गणेशाला विचारले.

"आई! अर्थ नसलेले हे नियम कशा करितां? विवाह, हा ज्याचा-त्याचा ऐच्छिक प्रश्न होय! माझ्यासारख्या एकदाताच्या व एकान्त प्रिय व्यक्तीला या चिखलांत कां ओढूं इच्छिता?" अशाच कित्येक पळवाटा गणपती काढीत राहिला!

यावेळेस मात्र पार्वतीने गणेशाच्या लग्नाविषयी हट्टच धरला. तेव्हां "आई! मला तप करायचे आहे! धाकट्याभावाने केले, परंतु मी केले नाही ना?" असे म्हणून गणपती तपश्चर्ये करिता बाहेर पडला.

इंद्राने, स्वर्गातील अप्सरांना विनायकाचा तपोभंग करण्यासाठी पाठविले. अर्का नांवाच्या अप्सरेने आपला विरोध दाखविला. तेव्हां "तूं डोंबकावळा आहेस! अस्पृश्य रूईचे रोपटे बनून जमिनीवर उगव!" असा तिला शाप दिला.

तपाकरिता अनुकूल अशी जागा शोधून विघ्नेश्वर तप करूं लागला. त्या जागी सर्वत्र गोकरूंची रोपं उगवली होती. रूईच्या झुडुपांवर फुलांचा बहर आलेला होता. विघ्नेश्वराचे तपाचरण सुरू होते. तपोभंग करावयास आलेल्या अप्सरा नृत्य करूं लागल्या; तो त्यांच्या पायाला गोकरूंचे काटे बोचूं लागले. आंगभर गोकरूं बोचल्यामुळे त्या यातना सहन न होऊन त्या अप्सरा आर्त-नाद करूं लागल्या. विघ्नेशाचे ध्यान मोडले. डोळे उघडून पाहिले तेव्हां झाला प्रकार त्याच्या लक्षांत आला. घाबरलेल्या अप्सरा लंगडत-पडत पळूं लागल्या. गणपतीला गोकरू व सराट्यांबद्दल अभिमान वाटला. तेव्हां 'गोकरू' म्हणून जन्मलेली कंटकमुखी म्हणाली—"स्वामी! तुम्हा भावंडांमध्ये भांडण लावल्याच्या अपराधावरून कुबेराच्या शापाला बळी पडले आहे. अनुग्रह असावा!" असे म्हणून गणेशाची क्षमा मागितली.

त्या दिवशी भाद्रपद शुक्ल चतुर्थी होती. तो गणेशचतुर्थीचा दिवस! गणपती कंटकमुखीला म्हणाला—"आजच्या दिवशी लोक 'विचित्र-विनोद' म्हणून तुझी कांटेरी फळें उपयोगात आणतील बरे!"

यक्षिणी शापमुक्त होऊन अलकापुरीस निघून गेली. तेव्हां रूई असे म्हणाली—"स्वामी! माझ्याकडेही तुमची कृपादृष्टी वळूं दे! मी अर्का नांवाची अप्सरा असून, इंद्राची आज्ञा अमान्य केल्यामुळे, आज अशी अस्पृश्य रूई झाले आहे. तुम्ही माझे श्रद्धास्थान असून, तुमच्या ठायी माझी नितांत भक्ती आहे!"

"विघ्नेश्वर म्हणाला—"या सृष्टीत अस्पृश्य असे कांहीच नाही! तुझ्या कळ्या













फुलांचा हार मी प्रेमाने गळ्यांत घालीन! द्वापर युगामध्ये तूं कुब्जा म्हणून जन्माला येशील. भगवान कृष्ण तुझा उद्धार करतील. तूं निर्भय होऊन स्वर्गांत जा! तुला इंद्राचीच नव्हे तर कुणाचीही भीती बाळगण्याचे कारण नाही. कुठलाही शाप तुला लागू पडणार नाही. अर्कमुळे आयुर्वेदातील औषधांसाठी उपयोगी ठरतील. अर्कपत्रें सूर्याला प्रिय राहातील!" अर्का, अप्सरेचे रूप धारण करून स्वर्गांत निघून गेली.

विघ्नेश्वर कैलासाकडे निघाला. त्याला पाहतांच पार्वती म्हणाली—"बाळा! तप झाले ना? आतां लग्न..." तिचे म्हणणे पूर्णपणे ऐकून न घेता, गणपती म्हणाला—"तप झाले ना? म्हणून काय विचारतेस? खरं सांगायचं तर तपाची सुरुवातच झाली नाही! हा बघ, तप करावयास निघालोच!" असे म्हणून विघ्नेश्वराने दुसऱ्या एका ठिकाणी ध्यान धरले. त्या जागेच्या चोहीकडे सर्पांची वारुळे होती. गणपती तपाचरण करीत असतां वारुळांतील सारे नाग तडक उठले व विघ्नेश्वराच्या चोहीकडे फणा उगारून खडा पहारा देऊं लागले. ते पाहून इंद्राने-मूषकासुराचे अनुचर असलेल्या राक्षसांना चिथविले—"तुमच्यां राजाला ज्याने आपले वाहन केले आहे, तो विघ्नेश्वर, तुम्हा सर्वांचा समूळ विनाश करण्यासाठी आतां तप करीत आहे. तेव्हां तुम्ही त्याचा सूड उगविण्यास ही उत्तम संधी आहे!"

ते ऐकून विघ्नेश्वरावर चालून गेलेल्या राक्षसांना; पाताळांतून आलेल्या महासर्पांनी पळवून लावले. जे थोडेबहुत राक्षस जीव वांचवून पळाले, ते आपल्या अविवेकाला व इंद्राला बोल लाऊं लागले.

आतां इंद्राने, अतिशय उत्साही व सुंदर देवांना तसेच अप्सरांना—"गणपतीचे मन अनुरागाकडे वळेल असे करा!" अशी आज्ञा देऊन पाठविले व वज्रायुध हाती धरून स्वतः त्यांच्या मागून निघाला.

स्वर्गातील देवपुरुष व अप्सरा जोडी-जोडीने सुरापान करीत नाचत-गात कोलाहल करीत निघाले. त्यामुळे महासर्पांना राग आला व त्यांनी देवांच्या पायांना विळखा घालून चावा घ्यायला सुरुवात केली. इंद्राने त्या सर्पांवर आपले वज्रायुध उगारले. ते पाहून सर्प चवताळले व पाताळातून लक्षावधी महासर्पांनी बाहेर पडून देवांना सळो की पळो करून सोडले. देव व नागांमध्ये छोटासा संग्रामच झाला! इंद्राच्या वज्रालाही न जुमानता त्या सर्पांनी स्वर्गातसुद्धा हाहाःकार माजवला. नंतर सर्व सर्प मागे परतले. त्यांनी केलेल्या या सहाय्यामुळे गणपतीला फार समाधान वाटले. त्या सर्पांना उचलून घेऊन विघ्नेश्वराने त्यांचे कौतुक केले व सर्पांचे दागिने अंगभर घातले व कैलासाला निघाला.

गणपतीच्या अंगभर सर्प रूळत असलेले पाहून पार्वती आश्चर्यचकित झाली. "आई! वडिलांचा वारसा मुलाला मिळणे साहजिकच नव्हे का! शंकराची आभरणे, तीच माझी भूषणे! शिवाय हे सर्प माझे जीवश्च मित्र आहेत. प्राण पणाला लाऊन यांनी माझे रक्षण केले आहे. आप्तस्वकीयांच्या सदीच्छा पाठीशी असणे भूषणावह असते! म्हणून मी नागभूषण हे नांव सार्थकी लावले!" विघ्नेश्वर म्हणाला.

पार्वती विनायकाच्या विचित्र-चेष्टांना कंटाळली. शंकर मात्र मनापासून हसत होता. अशा रीतीने विनायक नाना विघ्ने उपस्थित करीत राहिला.

पार्वतीने अखेरचा म्हणून परत एकदा लग्नाचा विषय काढला. तेव्हां—"आई! कांहीतरी घनकार्य केल्यानंतरच ना मला प्रतिष्ठा मिळेल? धाकट्या भावासारखे कुठले तरी मोठे कार्य साधून 'समर्थ' ठरल्यानंतरच मी लग्नाचा विचार करीन!" गणपतीने निक्षून सांगितले.

"तुझ्यांत कसली कमतरता आहे? समर्थ नव्हेस तर काय शेळपट आहेस होय?" पार्वती नाइलाजाने म्हणाली.

(क्रमशः)





# दोन वस्ताद

[ ७ ]

दुसऱ्या दिवशी सकाळी पादरस अलीला घरी आलेला पाहून अहमदच्या जिवांत जीव आला. त्याच्या प्रिय शिष्याचा तपास लागला नाही म्हणून आदल्या दिवशी रात्री तो जेवला नाही की झोपला नाही. उजाडताच त्याचा साथीदार दुसरा कोतवाल हसन याला बोलावून त्याचा सल्ला विचारला. ते दोघे बोलत असतां पादरस घरी परत आला.

त्याने स्वतःवर गुदरलेला सर्व प्रसंग त्यांना ऐकविला. तो ऐकून मिस्किलपणे हसत, हसन म्हणाला—"एवढी करामत करूं शकणारी तरुणी, बगदाद मध्ये एकटीच आहे. ती, कबुतरांकरवी टपाल-खाते चालविणाऱ्या दिलैलाची मुलगी जीनाबच! शेवटी तिचे काय करायचे ठरविले आहेस?"

"लग्न करावे म्हणतो तिच्याशी!' पादरस म्हणाला.

"एवढी अद्दल घडली तरी सुद्धा?" हसन नवल वाटून म्हणाला.

"तिने एवढे केले तरी मी तिला माफ करूं शकतो. ती माझी पत्नी व्हावी याशिवाय आयुष्यांत माझी दुसरी कसलीही इच्छा नाही." पादरस मनापासून म्हणाला.

"तुझी एवढी तीव्र इच्छा असली तर ती पूर्ण व्हायलाच हवी. तू सुद्धा देखणा आहेस. तुमचा जोडा छान दिसेल!" हसन म्हणाला.

"या कामांत याची थोडी मदत कर!" अहमद हसनला म्हणाला.

हसनने तावडतोब पादरस अली करिता एक योजना बनविली.



पादरसने आपल्या अंगाला काळारंग लाऊन घेतला व निग्रोचा वेश धारण केला. थोडे पैसे व थोडी भांग बरोबर घेऊन मंडईत निघाला. तिथे त्याने दिलैलाच्या स्वयंपाक्याला शोधून काढले. त्याच्याजवळ जाऊन "दादा! मी या शहरात नवखा आहे. तू एक आपला वाटलास. चल, दारूच्या दुकानांत जाऊन यथेच्छ पिऊया!" हसंत पादरस म्हणाला.

"मला क्षणाचीही उसंत नाही. आमच्या घरीच ये! तिथे सर्व तऱ्हेची पेयं व जेवण सुद्धा मी तुझ्यासाठी आयोजित करीन." दिलैलाचा स्वयंपाकी म्हणाला.

पादरसला तेच हवे होते.

तो त्या निग्रोबरोबर दिलैलाच्या घरी गेला. स्वयंपाक घरात गेला. तेवढ्यात दिलैला व जीनाब जेवायसाठी आल्या. स्वयंपाक्याने त्यांचे जेवण व पेयं तयार केली व एकेक नेऊन बाहेरच्या दालनात ठेऊं लागला. तो बाहेर जाताच पादरसने सुरईमध्ये भांग मिसळली.

थोड्याच वेळांत पादरसाचा हेतु साधला.

दिलैला, जीनाब, चाळीस गुलाम व स्वयंपाकी इतकेच नव्हे तर राखणीचे कुत्रेसुद्धा आपली शुद्ध हरपून, होते त्या ठिकाणी निपचित पडले.

पादरस यथेच्छपणे घरभर हिंडला. टपालाधिकारी म्हणून चालवयाचा दिलैलाचा पोशाख, सोन्याची टोपी, तसेच निग्रोंचे भरजरी लाल कपडे सर्व गोळा करून गाठोडे बांधले. गच्चीवर जाऊन सर्व कबुतरं धरून एका मोठ्या पिंजऱ्यात ठेवली. नंतर "हे काम वीरवर पादरस अली शिवाय कुणाचे असावे?" अशी चिठ्ठी तिथे लिहून ठेवली व कपड्यांचे गाठोडे, कबुतरांचा पिंजरा घेऊन सरळ अहमदच्या घरी आला.

दिलैलाला जाग येईपर्यंत संध्याकाळ झाली होती. तिने पादरसने ठेवलेली चिठ्ठी वाचली. नंतर घरभर दृष्टी फिरविली तेव्हां 'खलीफांशी संबंधित असलेला दस्त-ऐवजच याने पळविलेला दिसतोय' हे तिच्या लक्षात आले.

ही घटना जर बाहेर समजली तर आपली बेअब्रूच नव्हे तर दरबारातील नोकरी सुद्धा जाईल हे तिला समजून चुकले. पादरसचा सूड उगविण्यात फायदा नव्हता! अहमदनेच हे काम त्याच्या करवी करविले असणार. त्याच्या पायापडून कां होईना; दरबाराचा पोशाख व टोपी परत आणायला हवी! अहमदचा सूड घेण्यासाठी तिने आपल्या मुलीकडून पादरस अलीचा पराभव करविला होता. त्याचं उट्टं काढण्यासाठीच अहमदने पादरसकडून हे काम करविलं. आतां फिटुम्फाट झाली. अहमदला आतांतरी तिची विनंती मान्य करण्यास हरकत नसावी. "आतांच येते." असे मुलीला सांगून दिलैला अहमदच्या घरी निघाली.

दिलैला तिथे गेली तेव्हां, अहमद, हसन, पादरस अली वगैरे बसून जेवत होते. तिला पाहताच अहमद, हसन उठले व डोके लववून सलाम करीत "या दिलैला! कृपा करून आम्हांला तुमचा पंक्ती लाभ मिळू द्या!" असे आदराने म्हणाले.

ते खात असलेले मांस कबुतराचे आहे हे समजताच दिलैलाच्या डोळ्यापुढे अंधारी आली. तिला चक्कर आल्यासारखे झाले. "अहमदला माझा सूड उगवायचा असला





तरी, खलीफांना प्राणप्रिय असलेली कबुतरं चोरून आणून ती शिजवून खावीत ना! चोरीलासुद्धा नीती-शास्त्र असते!" कांपऱ्या आवाजात दिलैला म्हणाली.

"ही टपालाची कबुतरं आहेत, हे माहिती असते तर खाल्ली नसती की!" पादरस म्हणाला त्यावर सर्वजण हसले.

हसन तिला दिलासा देत म्हणाला– "तूं कांही घाबरूं नकोस! टपालाची कबुतरं कुठेही गेलेली नाहीत! खलीफांची अमानत सुरक्षित आहे. या छोटयाची एक छोटीशी इच्छा आहे. ती तू पूर्ण केलीस तर या क्षणी तुझे कपडे व कबुतरं तुझ्या स्वाधीन करूं!"

"कोणती ते सांगा! मी असहाय आहे हे तुम्हाला माहीत नाही कां?" अगतिकपणे दिलैला म्हणाली.

"विशेष कांही नाही! हा मुलगा अली, तुझी मुलगी जीनाब हिच्याशी लग्न करूं इच्छितो!" हसन म्हणाला.

"अरे बाबांनो! यासाठी कां मला एवढा त्रास दिलात? मी कबूल करून ही काही फायदा नाही. कारण ती सज्ञान होई पर्यंत तिचा मामा तिचा पालक आहे. माझा मोठा भाऊ 'जुरेक' आहे नां? तो कबूल झाल्याशिवाय हे लग्न होऊं शकत नाही. तो किती निर्दयी आहे, हे तुम्हाला माहित नाही काय? त्याची कबुली मिळवायची पूर्ण जबाबदारी पादरस अलीचीच राहील!" दिलैला म्हणाली.

जुरेकला भेटून त्याची अनुमती मिळविल्यानंतरच जीनाबशी लग्न करण्यास पादरस अली तयार झाला.

दिलैला आपले कपडे व कबुतरं वगैरे घेऊन निघून गेली.

दिलैलाचा भाऊ जुरेक हा एकेकाळचा प्रसिद्ध चोरच होता. त्याने केलेल्या चोऱ्यांची कधी चौकशी, फिर्याद वगैरे झाली नाही. बसल्या जागे वरूनच तो कधी, कशी कुठे चोरी करावयाची ती हातोहात करीत असे.

हल्ली म्हातारपणामुळे चोरी सोडून दिली होती त्याने! तळलेले मासे विकून तो आपला निर्वाह करीत असे. अजूनही त्याच्या हाती हस्तचातुर्य होते.

आपल्या दुकानाकडे ग्राहकांचे चित्त वेधण्यासाठी त्याने एक युक्ती योजली होती. जुरेकने आपल्या दुकानापुढे हजार दिनारांची एक थैली टांगली होती. 'ती थैली जो कुणी पळवू शकेल त्याला ती बहाल करण्यात येईल,' अशी अफवा सर्वत्र पसरली होती. दीनारांची थैली हस्तगत करण्याच्या उद्देशाने हजारो लोक त्याच्या दुकानांत खरेदी साठी येत राहिले, परंतु अजून एकालाही या कामात यश मिळाले नाही.

पिशवीला हात लावताच शेकडो घंटा व डफ एकाएकी दुकानभर वाजू लागत.

त्या बरोबर जुरेक कुठेही असला तरी पळत येत असे व चोराला धरत असे. किंवा तापलेल्या शिशाचे छर्रे त्याच्या हातापायावर मारीत असे. अशा माराने हात-पाय दुखावलेले कैक लोक होते.

पादरस अली जुरेकला भेटला. आपली ओळख करून दिली. आपण कोतवाल अहमदच्या घरी रहात असून जीनाबशी विवाह करू इच्छितो असेही त्याने सांगितले, व लग्नाला अनुमती देण्याकरिता जुरेकची मनधरणी केली. परंतु जीनाबशी पादरस अलीचा विवाह व्हावा असे त्याला किंचितही वाटले नाही. जीनाबच्या योग्यतेला अली साजेसा नाही असे त्याला वाटले.

जुरेकची दिनारांची पिशवी पळवून, त्याची आपल्या लग्नाला सम्मती मिळवावी असे पादरस अलीने ठरविले. म्हणून तो गर्भवती स्त्रीचा वेश घालून जुरेकच्या दुकानांत गेला. मासे विकत घेत असता पोटांत दुखू लागल्या सारखे कण्हूं लागला. हे पाहून भांबावलेला जुरेक आपल्या बायकोला बोलवायला घरांत गेला.

(क्रमशः)





# मुखदुर्बळ

आपल्या नेहमीच्या सवयीप्रमाणे गोपाळरावाच्या बायकोने घराचा केर काढला व तो उचलून भितीच्या पलीकडे शेजारच्या अंगणात टाकून दिला व मागे वळली व एकाएकी घाबरून गेली. घाईघाईने आपल्या नवऱ्याजवळ जात म्हणाली—"अहो! नेहमीप्रमाणे मी आजसुद्धा केरकचरा शेजाऱ्यांच्या अंगणात टाकून दिला! शेजारी या कारणाने भांडायला येतील, तेव्हां तुम्ही आधी जाऊन त्यांना समजुतीने सांगा बरं!"

आपल्या बायकोच्या तोंडून हे सर्व ऐकून गोपाळरावाचं धाबं दणाणलं! कुणाशीही भांडायचं म्हणजे त्याला भीती वाटत असे.

त्याचं असं होतं की शेजारचं घर बरेच दिवसापासून रिकामच होतं. केर नेऊन उकिरड्यावर टाकायचा कंटाळा वाटे, म्हणून निर्मलाबाई भितीवरून शेजारच्या आवारांत तो सहजच टाकून देत असत. बकऱ्यांचा कळप घेऊन, कालच कुणीतरी त्या घरांत आले होते.

गोपाळराव बायकोला रागावले व त्यांनी शेजारी डोकावून पाहिले. मागच्या परसांत चाळशीचा एक माणूस, बकऱ्यांना बाभळीच्या शेंगा चारीत होता.

"आमच्या घरापासून उकिरडा थोडा लांब आहे. इतके दिवस हे घर रिकामंच होतं म्हणून माझी बायको केर इथेच टाकत असे. आज देखील तिने त्या सवयी प्रमाणेच केले." गोपाळरावांनी, त्या माणसाला उद्देशून समजावणीच्या सुरांत सांगितले.

ते ऐकून शेजारच्या घराचा नवा मालक भितीजवळ आला व म्हणाला—"तुम्हांला कानकोंडं वाटायचं कारण नाही, रोजच तुम्ही आपल्या घरातला सगळा केर आमच्या परड्यात बेलाशक टाकत जा! माझी बायको रोजच आमचं अंगण व परडं झाडून स्वच्छ करतेच तेव्हां आमच्या केराबरोबर तुमचा केरही उचलून टाकील!"

'हा निव्वळ भोळा-सांब आहे' हे गोपाळरावांना उमजलं. तसंच त्याचं नांव सदाशिव असून 'बकऱ्या' हीच त्याची संपत्ती असल्याचे त्यांना समजले.

गोपाळराव घरांत येऊन बायकोला म्हणाले—"आपला शेजारी निव्वळ गावंढळ दिसतो आहे. सगळा केर त्यांच्या परसांत टाकत जा."

एके दिवशी गोपाळरावांनी सदाशिवाला दमदाटी दिली—"काय रे! तुझ्या बकऱ्यांच्या ओरडण्याने रोज रात्री माझी झोपमोड होते आहे. गांवातल्या पंचांपुढे तक्रार नोंदवू कां?"

"नका हो! माझ्या पोटावर पाय देऊं नका! या बकऱ्याच माझी सारी धन-संपदा आहेत." सदाशिवने गयावया केली.

त्यावर गंभीर आव आणून गोपाळराव म्हणाले—"रात्री बकरीचं दूध पिऊन निजलं तर गाढ झोप येते म्हणे! तेव्हां तूं रोज रात्री शेरभर दूध पाठवत जा, म्हणजे आमची झोपमोड व्हायची नाही!"



"एवढंच नां? रात्रीच कशाला? सकाळी एक शेर व रात्री एक शेर दूध मी आनंदाने पाठवीत जाईन!" सदाशिवने रुकार दिला.

त्या दिवसापासून गोपाळराव, सदाशिवच्या भोळेपणाचा फायदा घेऊं लागले. त्याच्याकडून ते सर्वतऱ्हेची वेठबिगार करऊन घेऊं लागले. विहिरीचं पाणी शेंदायचं, झाडांना आळी करायची, त्यांच्या दुकानासाठी आणलेले सामान गाडीतून खाली उतरवून दुकानांत ठेवायचे, अशी सर्व कामं सदाशिव मुकाट्याने करूं लागला.

गोपाळराव आपल्या किराणा दुकानासाठी लागणारे महिन्योभराचे सामान

आशा काळे



एकदम मागवीत असे. त्यासाठी तो भल्या पहाटे शहराच्या वाटेला लागत असे. एके दिवशी निघतांना त्याने आपल्या बायकोला उठवून दार लावून घ्यायला सांगितले. बकरीचे एक कोकरूं त्यावेळी, कुणास ठाऊक कसे वाड्यातून बाहेर पडून बें बें करीत त्यांच्या दारापुढे उभे होते.

त्या कोकराला पहाताच निर्मलाबाईच्या मनांत एक विचार चमकून गेला. ती नवऱ्याला म्हणाली–"हे कोकरू खेड्यांत गुदमरतं आहे. याला उचलून शहरात घेऊन जा! विकलं तर पंचवीस रुपये नक्कीच मिळतील. या अंधारात कुणाच्या लक्षातही यायचं नाही."

आपल्या बायकोचं सांगणं ऐकून गोपाळरावांनी कोकराला खांद्यावर उचललं व चालू लागला. संध्याकाळी परततांना पंचवीस रुपये घेऊन घरी आला.

"ते रुपये इकडे आणा! बकऱ्यांच्या पैशांचे मला दागिने घडवायचे आहेत!" असे म्हणत निर्मलाबाईंनी रुपये घेतले व पदरात बांधले.

"तू आणखी किती बकऱ्या विकणार आहेस?" गोपाळरावांनी विचारले.

"किती म्हणून काय विचारतां? सदाशिवचा कळप संपेपर्यंत! त्याच्या मनाला शंकासुद्धा शिवणार नाही अशी एक छान युक्ती मला सुचली आहे!" असे म्हणत निर्मलाबाईंनी गोपाळरावांच्या कानांत गुपित सांगितले. तेवढ्यांत सदाशिव त्यांच्या झाडांना पाणी घालायला आला. तो म्हणाला–"मालक! माझ्या बकऱ्यांच्या कळपातलं एक कोकरूं नाहिसं झालं आहे!"

ते ऐकून निर्मलाबाई म्हणाली–"तरी मला वाटतच होतं की असलं काहीतरी होईल म्हणून! हे काम भुताचंच आहे. माझी तरी खात्री आहे!"

"भुताचं म्हणतां? भूत तर माझ्या सासरच्या कडून नात्यातलंच आहे! भूत असलं काम करू शकतं, म्हणतां?" नवल वाटून सदाशिव म्हणाला.





सदाशिवच्या बायकोचा आतेभाऊ लहरी व भांडकुदळ होता, म्हणून त्याच्या सासरी त्याचे 'भूत' असे टोपण नांव होते. सदाशिवला वाटे, त्याचे नांवच 'भूत' असावे.

गोपाळराव सहानुभूती दाखवीत म्हणाले–"होय रे, नातलगच फसवत असतात!"

"आतां शहरात जातेवेळी तुम्ही मोठी बकरी उचलून न्या, म्हणजे शंभर रुपये मिळतील!" निर्मलाबाई नवऱ्याला म्हणाल्या

इकडं कांही दिवसापासून जो गोंधळ चालला होता. त्याच्या बरोबरच त्या नवरा-बायकोमधील संवाद बाजूच्या पिंपळाच्या झाडावर असलेल्या छोट्या भुताने ऐकला. खरं तर ते छोटं भूत, स्मशानातल्या चिंचेच्या झाडावर रहात असे. त्या चिंचे जवळ एक मोठं वडाचं झाड होतं. त्या वडावर एक मोठं भूत रहात असे. ते या छोट्या भुताला दमदाटी करून त्याच्याकडून हवं ते काम करवून घेत असे.

त्या वेठ-बिगारीला वैतागून छोट्या भुताने रडवेलं तोंड केलेलं पाहून मोठं भूत म्हणालं–"त्या सदाशिवाकडून गोपाळराव जेवढं काम करवून घेतात त्यातलं एक सहस्त्रांशसुद्धा मी तुझ्याकडून करवून घेत नाही! जा, जाऊन त्याचा किता गिरऊन ये." त्या नवराबायकोचं बोलणं ऐकून त्या छोट्या भुताला, मोठ्या भुताच्या तावडीतून सुटायचा छान उपाय सुचला.

एके दिवशी गोपाळराव भल्या पहाटे उठले व सदाशिवच्या वाड्यातून एक धष्टपुष्ट बकरी हांकवीत शहराकडे निघाले. वाटेत एक छोटंसं रान लागायचं. अंधार असल्यामुळे गोपाळरावांचं काळीज धडधडू लागलं. अंधारात थोडा धीर यावा म्हणून ते येतील ती गाणी मोठ्याने म्हणत वाट चालू करूं लागले. बकरीच्या डोक्यावर एकाएकी शिंगं उगवली असल्यासारखा त्यांना भास झाला. आणखी थोडं दूर गेल्यावर बकरीच्या तोंडावर

दाढी-मिशा व अंगावर वाघासारखे पट्टे दिसू लागले.

ते पाहून गोपाळरावांना धडकी भरली व ते आपल्या गांवाच्या दिशेने पळू लागले. बकरीदेखील वाघासारखी डरकाळी फोडत त्यांच्या मागे लागली. गांवाच्या वेशीपर्यंत आल्यावर वटवाघळाचे रूप घेऊन ती स्मशानातल्या चितेवर जाऊन बसली.

गोपाळराव धापा टाकीत घरी आले व घडलेला वृत्तांत बायकोला सांगून म्हणाले–"मी जिवानिशी आलो, ते तुझ्या पातिव्रत्याचे पुण्य म्हणून! आपण सदाशिवाला निव्वळ बावळट ठरविले पण खरंच 'भूत' त्याच्या नात्यातलंच दिसतय! आपण त्याची क्षमा मागू या."

ते ऐकून भितीने निर्मलाबाईंचा थरकांप उडाला. भितीजवळ जाऊन त्यांनी सदाशिवाला हांक मारली व म्हणाली–"भाऊराव! आम्हाला माफ करा! तुमच्या भुताला आमच्या मागे लावू नका! यापुढे आम्ही तुमच्याकडून वेठ-बिगार घेणार नाही!" त्यानंतर त्या दोघांनी सदाशिवाजवळ आपली चूक कबूल केली व आतापर्यंत त्याच्या कडील दुधाचे जेवढे पैसे झाले होते ते सर्व तर दिलेच, त्याबरोबर कोकराबाबतचे पंचवीस रुपयेसुद्धा चुकते केले

हे सर्व 'गौडबंगाल' काय आहे हे त्याला मुळीच कळले नाही. त्याला वाटले "आपल्या सासरकडून नात्याच्या भुताच्या नांवानेच हे घाबरलेले दिसताहेत!" या घटनेनंतर ते छोटे भूत, वडाच्या झाडावरील मोठ्या भुताकडे गेले व सारा इतिवृत्तांत त्याला सांगितला व म्हणाले–"यापुढे गोपाळराव व त्याची बायको सदाशिवाकडून वेठ-बिगार घेणार नाहीत. तूसुद्धा त्यांचा किस्ता गिरव!"

मोठे भूत खदाखदा हसले व म्हणाले–मुखदुर्बळ व भित्र्याचे जिणे असेच असते तू त्या गोपाळरावांना चांगला धडा शिकविलास. परंतु मला धडा शिकविणारा जन्माला येईपर्यंत, तुला मात्र माझी चाकरी करावीच लागेल!"






# [१६]

[व्याघ्रदत्ताची नजर चुकवून पळून गेलेला समरसेन शिथिलनगरात पोचला. तिथे व्याघ्रदत्त आपल्या अनुचरांबरोबर आला. अपूर्व शक्तींनी युक्त असे शाक्तेयाचे त्रिशूल गजबनांत गुरुद्रोहीच्या अस्थिपंजरांत असल्याचे त्याला समजले. त्या प्रदेशांत दुसऱ्याच्या अस्तित्वाचा भास व्याघ्रदत्ताला झाला. त्यानंतर–]

समरसेन व त्याचे सैनिक दडलेल्या दिशेने व्याघ्रदत्ताने दृष्टीक्षेप टाकला व आपल्या सैनिकांना म्हणाला–"ऐका, इथे शिथिलभवना आड दुसरे कुणीतरी दडलेले आहे. ते आपल्या प्रबळशत्रू-शिवदत्तचे अनुयायी असण्याची शक्यता आहे. ते कुणी का असेनात, आधी त्यांना धरून बंदी बनवा!"

ते ऐकून समरसेनला पुढच्या संकटाची कल्पना आली.

आपल्या जवळील सहा सैनिकांच्या जोरावर व्याघ्रदत्ताचा सामना करणे निव्वळ आत्महत्या करण्यासारखेच होईल. तेंव्हा यावेळी शक्य तितके लवकर हा प्रदेश सोडून निघून जाणेच श्रेयस्कर ठरणार होते.

तेवढ्यात व्याघ्रदत्ताचे सगळे सैनिक एकाएकी समरसेन असलेल्या शिथिल भवनाकडे आरोळ्या ठोकीत सरसावले.



या आकस्मिक हल्ल्यामुळे समरसेन दचकला व आपल्या सैनिकांना सावध करीत मागे वळला, व सूचना देऊ लागला.

सहा सैनिक व समरसेन एकीकडे तर वीस सैनिक व त्यांचा नायक असलेला व्याघ्रदत्त दुसरीकडे. मग काय विचारता त्यांच्या आरोळ्या व किंकाळ्यांनी तो सारा प्रदेश दुमदुमला.

शिथिल भवनाच्या भिंतीआड लपत, समरसेन व त्याचे साथीदार तिथून निसटण्याच्या प्रयत्नात होते. परंतु व्याघ्रदत्ताने आपल्या सैनिकांना दोन गटात विभागून दिले व समरसेनच्या सैनिकांना व त्याला चारी बाजूंनी घेरण्यास सांगितले.

मोडलेले खांब व भिंतीचा आडोसा घेत समरसेन व त्याचे सैनिक वाकून व लपत-छपत जवळ आलेल्या व्याघ्रदत्ताच्या अनुचरांचा सामना करू लागले. 'व्याघ्रदत्ताच्या अधिकांश सैनिकांना मारल्याशिवाय इथून निघता येणार नाही.' हे समरसेनला कळून चुकले.

व्याघ्रदत्त आपल्या सैनिकांना धीर देत होता. आपण स्वत: समरसेनशी झुंजावे असे त्याला वाटू लागले. एवढ्यांत समरसेनने त्याच्या चार-पांच सैनिकांना स्वर्गात पोचविले.

जखमी सैनिकांच्या किंकाळ्यांनी आसमंत भरून गेला चोहीकडे हा:हाकार माजला. अशावेळी व्याघ्रदत्ताने मोठ्या धाडसाने समरसेनला तोंड दिले.

दोघेही अतिशय बलवान, धैर्यवान, पराक्रमी व कुशल योद्धे होते. बघता बघता दोघांमध्यें भयंकर असे खड्गयुद्ध सुरू झाले. त्यांचे वार चुकून स्तंभांना लागले तर आधीच मोडकळीस आलेले ते खांब भराभर कोसळू लागले. प्रबळ शत्रूकडून होत असलेले तलवारीचे वार व कोसळणाऱ्या दगडांचे मार चुकवीत त्या दोघांमध्ये भयंकर असे युद्ध जुंपले.

बराच वेळ त्यांचे युद्ध सुरू होते. सरतेशेवटी व्याघ्रदत्त दमला असे पाहून समरसेन अधिक उत्साहाने त्याच्यावर तुटून पडला.

एवढ्या वेळात संख्येने दुप्पट असलेल्या व्याघ्रदत्ताच्या सैनिकांना, समरसेनच्या सैनिकांना बंदी बनविण्याच्या कामी यश आले होते. त्यांपैकी दोघे-तिघे तर जबर जखमी झाले होते. अशा रीतीने समरसेनच्या सैनिकांना बंदी बनविल्यानंतर ते आपल्या सरदाराच्या मदतीसाठी धावले. थोडावेळ, तो सारा कोलाहल शांत झाला. "आपले सैनिक बंदिवान तरी झाले असावेत किंवा मेलेतरी असावेत." असे समरसेनला वाटले. तेंव्हा आता शक्य तेवढे लौकर व्याघ्रदत्ताला चकमा देऊन इथून पळायला हवे होते.

असा विचार येताच समरसेनने व्याघ्रदत्तावर दुप्पट हमला केला. पाठीमागून व्याघ्रदत्ताच्या सैनिकांना अचानक हमला करता येऊ नये म्हणून तो भिंती लगत राहून झुंजत राहिला.

ज्या भिंतीचा आपण आधार घेतला आहे, ती भींत अगदी कोसळण्याच्या बेतात आहे, हे बिचाऱ्या समरसेनच्या लक्षातही आलं नाही. परंतु समोरून लढणाऱ्या व्याघ्रदत्ताच्या ते ध्यानी आलं.

व्याघ्रदत्ताच्या अनुयायांचा कठोर ध्वनी एकाएकी घुमला. 'आपल्या सरदाराच्या मदतीसाठी ते सारे सैनिक एकदम झेंप घ्यायला सज्ज होते' हे समरसेनने एका कटाक्षांत हेरले.





या संकटातून स्वतःला सावरण्याकरिता, त्याने आपल्या तलवारीचा एक जोरदार वार व्याघ्रदत्तावर करण्यासाठी म्हणून, मोठ्या चपळाईने मागच्या भिंतीवर उडी घेतली.

उडी मारून समरसेन त्या भिंतीवर उभा राहता क्षणीच आधीच मोडकळीस आलेली ती भींत मोठ्ठा कडकडाट करीत मागच्या बाजूला एकाएकी कोसळली व समरसेन दगडांच्या ढिगात अडकला.

आयती चालून आलेली ही सुवर्णसंधी पाहून व्याघ्रदत्त आपल्या दलाचा जयजयकार करीत समरसेनवर तुटून पडला. व्याघ्रदत्ताचे सगळे सैनिकही तिथे आलेच होते. त्यांनी समरसेनचे हात-पाय आवळून धरले. सुटण्यासाठी त्याने केलेली धडपड निष्फळ ठरली. अशा रीतीने तो शत्रूच्या तावडीत सापडला.

व्याघ्रदत्ताची आज्ञा होताच त्याच्या सैनिकांनी समरसेनला बंदी बनविले. नंतर व्याघ्रदत्ताने त्याची तलवार काढून आपल्या हातात धरली.

आपल्या शत्रूला बंदी बनविल्यामुळे त्याचा आनंद गगनांत मावेना. क्रूरतेने हंसत व्याघ्रदत्त म्हणाला—"समरसेना! तू आधीच माझ्याशी सहमत झाला असतास तर तुझी अशी दुर्दशा झाली नसती! शाक्तेयाचे त्रिशूळ कुठे आहे हे मला माहीत झाले आहे. तेव्हां आता तुझा क्रूर मृत्यू निश्चितच आहे!"

व्याघ्रदत्ताचे बोलणे ऐकून समरसेन थोडासुद्धा डळमळला नाही. यदाकदाचित त्याला क्रूर मृत्यूचा सामना करावा लागलाच तर तो, त्या साठीही सिद्धच होता. स्वतःवर ओढवलेल्या या लाजिरवाण्या प्रसंगापेक्षाही त्याला काळजी वाटत होती ती, त्याच्यावर विश्वास ठेवणाऱ्या त्याच्या सैनिकांची! 'सेनापती' असून देखील आपण आपल्या सैनिकांचे योग्य नेतृत्व करूं शकलो नाही; या विचाराने स्वतःच्या अक्षमतेची त्याला खंत वाटू लागली.



समरसेनच्या गप्प रहाण्याचा, व्याघ्रदत्ताने दुसराच अर्थ घेतला. अत्यंत निर्भिक व निश्चल असा समरसेनचा स्वभाव पाहून तो बेचैन झाला. कुणा असामान्यव्यक्तीकडून मदतीच्या अपेक्षेने तर हा इतका निश्चित नाही ना? की स्वतःच्या बचावाकरितां कांही योजना आंखतोय?

असे विचार मनांत येता क्षणींच व्याघ्रदत्त तीव्रस्वरात म्हणाला—"याद राख! माझ्या तावडीतून तुझी सुटका करणारा कुणीच नाहीये!"

ही धमकी ऐकून समरसेन आपल्या मदतीस-येणाऱ्यांची नांवे पटापट सांगेल असे व्याघ्रदत्ताला वाटले.

परंतु प्रखरबुद्धीच्या समरसेनने व्याघ्रदत्ताची साशंक मनोदशा ओळखली. या संधीचा फायदा घेऊन व्याघ्रदत्ताला चांगली दहशत बसविण्यातच आपला फायदा आहे, हे समरसेनने ताडले.

असा विचार करून समरसेन म्हणाला—"व्याघ्रदत्ता, शाक्तेयाच्या त्रिशूळाची माहिती असलेले, तुझ्या व्यतिरिक्त इतरही अनेक आहेत, हे विसरूं नकोस! शिवाय नुसता त्रिशूळाचा ठाव-ठिकाणा माहिती झाला, म्हणजे तुझा हेतू साध्य झाला असे नव्हे!"



हे उत्तर ऐकून व्याघ्रदत्त थक्क झाला. 'शाक्तेयाचे त्रिशूळ गजवनात आहे', हे आपल्या खेरीज एकट्या शिवदत्ताला माहीत असल्याचे, त्याला माहीत होते. आतां आपण व्याघ्रदलाच्या अनुयायांना, त्रिशूळाची माहिती देत असतांना, समरसेनने ती ऐकली असावी, अशी शंका त्याच्या मनांत आली.

"तूं भिंतीआड दडून 'त्रिशूळ कुठे आहे' हे ऐकले आहेस, हे मला ठाऊक आहे. शिवदत्तालाही ते माहीत आहे. तरी सुद्धा, तूं किंवा शिवदत्त, ते त्रिशूळ हस्तगत करतांना, मला अडवू शकणार नाही. अशा स्थितीत, दिव्यशक्तींनी युक्त असे

ते त्रिशूळ घेत असतां, माझा प्रतिकार करणारा आहेच कोण?" व्याघ्रदत्त म्हणाला.

समरसेनने या प्रश्नाचे कांही उत्तर दिले नाही. नुसते स्मितहास्य केले. व्याघ्रदत्ताचे मनोधैर्य खचवायचा त्याचा विचार होता. समरसेनचे ते मिस्किल हंसणे पाहून व्याघ्रदत्ताचा चेहरा पांढरा पडला. ते पाहून समरसेनला त्याचा उपाय लागू पडल्याने समाधान वाटले.

"व्याघ्रदत्ता, ते दिव्य त्रिशूळ तुझ्या हातीं लागू नये म्हणून प्रयत्न करणारे दोघे आहेत. त्या पैकी एकाला तू बंदी बनविले आहेस. परंतु त्या त्रिशूळावर तुझी दृष्टी पडण्यापूर्वीच तुझा अंत करणारी आणखी एक व्यक्ती आहे. ती व्यक्ती, माझा जिवलग मित्र असून, त्याची आज्ञा पाळण्यासाठी, मी तुझ्या व्याघ्रमंडळात प्रवेश केलेला आहे. आले कां लक्षांत?" समरसेन म्हणाला.

ते ऐकून व्याघ्रदत्ताची बोबडी वळली. आपल्याला वाटत होते तेवढे हे काम कांही सोपे नाही, याची त्याला जाणीव झाली.

"मला अडविण्याची क्षमता असणाऱ्याचे नांव तरी काय आहे?" व्याघ्रदत्ताने विचारले.



"चतुराक्ष!" समरसेनने उत्तर दिले.

चतुराक्षाचे नांव ऐकून व्याघ्रदत्ताच्या अनुयायांमध्ये खळबळ उडाली. स्वत: व्याघ्रदत्त सुद्धा हादरला. त्याचे सैनिक भयकंपित होऊन आपल्या नायकाकडे विस्मयाने पाहू लागले. ते लक्षांत येताच खोटा उत्साह दाखवीत व उसने अवसान आणून व्याघ्रदत्त म्हणाला–"असे होय! आले लक्षांत. तू त्याला ओळखतोस म्हणायचे?"

"मी त्याच्या आज्ञेनेच या प्रान्तात आलो आहे; हे मी थोड्या वेळापूर्वी सांगितलेले, तुझ्या लक्षांत असेलच!" समरसेन शांतपणे म्हणाला. हे उत्तर

ऐकताच व्याघ्रदत्ताचा थरकांप उडाला. चतुराक्ष व त्याच्या अद्‌भुत शक्तींबद्दल त्याने पूर्वीच ऐकलेले होते.

'आतां पुढे काय करावे' अशा विचारात तो गर्क असता दुरून सैनिकांचा कोलाहल ऐकू येऊ लागला. तेवढ्यात एक शिपाई धापा टाकीत त्याच्या जवळ आला व कांपऱ्या आवाजात–"सरदार, शिवदत्त त्यांच्या अनुयायां समवेत शिथिल नगरात प्रवेश करीत आहेत!" असे म्हणाला.

हे ऐकताच अंगावर वीज कोसळल्यासारखी त्याची दशा झाली.

आता त्याच्या पुढे दोनच मार्ग होते. एक तर आपल्या मूठभर अनुयायांबरोबर शिवदत्ताचा सामना करणे किंवा तिथून जीव वांचवून ,पळणे. परंतु 'समरसेनचे काय करावे' हा यक्ष प्रश्नही त्याच्यापुढे होताच. या क्षणीच समरसेनचा अंत करावा, असे त्याच्या मनांत आले. पण हे कामसुद्धा धोकादायकच आहे असे त्याला वाटले. कारण आपल्या मित्राच्या मृत्यूमुळे राग येऊन, अद्‌भुतशक्तीमुळे वाट्टेलते करू शकणाऱ्या चतुराक्षाने साऱ्या व्याघ्रमंडळाला जमीनदोस्त करायलाही मागेपुढे पाहिले नसते.

या सर्व गोष्टीचा विचार करून व्याघ्रदत्त म्हणाला–"समरसेना, या साऱ्या घटना झाल्या असल्या तरीही, मला असे वाटते की आपल्या दोघांमध्ये कांहीतरी तडजोड झाली, तर ती दोघांनाही हितावह ठरेल. तडजोडीच्या अटींबद्दल आपण नंतर निवांतपणे विचार करू. तूर्त आपण दोघेही एखाद्या सुरक्षित स्थानी जाऊ या."

त्यानंतर नि:शस्त्र झालेल्या समरसेनाला घेऊन तो व त्याचे अनुयायी वेगाने पळू लागले.

दुरून व्याघ्रदत्ताचे उरलेले अनुयायी व शिवदत्ताचे अनुयायी, यांच्यात होत असलेल्या संघर्षाचा गोंगाट व आरोळ्या ऐकू येत होत्या.

(क्रमश:)



# हृदय परिवर्तन

आपला हेका न सोडता विक्रमादित्य झाडाकडे परत गेला व झाडावरील प्रेत काढून खांद्यावर टाकून नेहमी प्रमाणे मौन पणे स्मशानाच्या दिशेने पावले टाकीत चालू लागला, तेंव्हा प्रेतातील वेताळ म्हणाला–"राजा, माणसं पावलोपावली आपली मते बदलत असतात, हे पाहून मला आश्चर्य वाटते. याचे उदाहरण म्हणून मी तुला विक्रमवर्मा व समरसेनाची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे म्हणून वेताळ गोष्ट सांगू लागला.

विक्रमपुरी व आनंदपुरी या राज्यांत चिरकाला पासून वैर चालत आले होते. जेंव्हा जेंव्हा एखाद्याची स्थिती ढासळलेली असे तेंव्हा तेंव्हा त्या परिस्थितीचा फायदा घेऊन दुसरा त्याच्यावर चालून जात असे. व त्यांच्यात युद्ध होत असे



असे गेल्या कित्येक पिढ्यांपासून सुरू होते. या युद्धांमुळे धनाची व प्रजाजनांची अपार हानी होत असे. परंतु एकमेकांवर विजय मिळविणे त्या दोघां नाही जमले नव्हते.

चालू पिढीत, विक्रमपुरीचा राजा विक्रमवर्मा झाला असून-आनंदपुरीचा राजा आनंदवर्मा बनला. आनंदवर्माचा मंत्री भद्रपाल असून सेनापती समरसेन होता.

आनंदवर्मा गादीवर बसताच त्याने विक्रमपुरीचा पराभव करण्याचा निश्चय केला. तेंव्हा मंत्री भद्रपालने त्याचे समर्थन केले.

"विक्रमपुरीवर विजय प्राप्त झाल्यामुळे, आपल्या पूर्वजांना जे जमले नाही, ते साधल्याचे श्रेय आपल्याला मिळेल व त्या-बरोबर, राज्यश्रीच्या गौरवावर कळस चढविल्याचे श्रेयही आपल्यालाच लाभेल!" भद्रपाल म्हणाला.

परंतु सेनापती समरसेन असे म्हणाला—"आजवर या दोन्ही राज्यांत ज्या लढाया झाल्या, त्यामुळे आपल्या देशाचे फारच नुकसान झालेले आहे. दोन्ही राज्यं समान शक्तिशाली आहेत, म्हणून एकमेकांना हरविणे शक्य झाले नाही. विनाकारणच दोन्ही राज्यं इतका दीर्घकाळ भांडत बसली असे मला वाटते. तेंव्हा विक्रमपुरीशी मैत्री संबंध स्थापित करणे हितावह ठरेल असे माझे मत आहे."

राजा आनंदवर्माने समरसेनच्या मताचा तिरस्कार केला व युद्धाच्या तयारीला लागावे असा आदेश दिला.

तेंव्हा सैनिकांना प्रशिक्षण देणे व किल्ल्याची डागडुजी करून, पक्का बंदोबस्त करणे या कामांत समरसेन गढून गेला. मंत्री भद्रपाल, युद्धासाठी लागणारे धन जमविण्यासाठी कर वसुलीच्या मागे लागला.

विक्रमपुरीचा राजा विक्रमवर्मा हा प्रखरबुद्धिवान व दक्ष प्रजाशासक असून महान योद्धा होता. आपल्या गुप्त हेरांकडून आनंदवर्माच्या युद्धाच्या तयारीची बातमी समजल्या नंतर त्यांनीही आपले सैन्य सुसज्ज केले.

'आनंदवर्मा आपल्यावर चाल करून येण्याची वाट पाहण्यापेक्षा आपणच त्याच्यावर चालून जावे' असा विचार करून विक्रमवर्माने विलंब न करता युद्ध घोषणा दिली व आनंदपुरीवर आक्रमण केले.

आनंदवर्माने आपल्या सैन्याला, किल्ल्याच्या बाहेर जाऊन विक्रमवर्माच्या सैन्याचा सामना करायची आज्ञा दिली. दोन्ही सैन्यांमध्ये कांही दिवस भयंकर युद्ध झाले. विक्रमवर्मा स्वतः आपल्या सैन्याचे संचालन करीत आहे हे माहीत होताच आनंदवर्माही आपल्या सैन्याचे नेतृत्व करण्यासाठी सरसावला. परंतु दुसरे दिवशीच शत्रुसैन्याचा एक विषारी बाण लागून धारातीर्थी पडला.

समरसेनने आपल्या सैन्याला किल्ल्यांत सुरक्षित आणून किल्ल्याचा कडेकोट बंदोबस्त केला. आनंदवर्माला कुणी वारस नसल्यामुळे, 'पुढे काय?' असा प्रश्न उभा राहिला. त्याच्या समोर त्याने मंत्री भद्रपाल यांच्याशी विचार-विनिमय केला. तेव्हां भद्रपाल म्हणाला—"आपल्या राज्याला कुणी वारस नसल्यामुळे विक्रमवर्माशी संधी करणे युक्त ठरेल!"

परंतु समरसेनने त्याचा विरोध केला. "आपला किल्ला अजेय असून कैक महिने



पुरेल एवढी रसद आपल्याजवळ आहे. तेव्हां किल्ल्याच्या आंत राहूनच युद्ध सुरू ठेवावे. विक्रमवर्माला जेव्हां कळून चुकेल की यांच्याशी युद्ध करीत राहणे कांही सोपी बाब नव्हे, तेव्हां आपण संधी करण्याचा प्रयत्न करूं या! कारण आतां हार मानून संधीचा प्रस्ताव मांडला तर त्यांच्या अटी जास्त कटु असतील." समरसेनने आपल्या म्हणण्यावर जोर दिला.

किल्ला जिंकण्यासाठी विक्रमवर्माने केलेले सारे प्रयत्न फोल ठरले तेव्हां वेढा काढून मागे फिरण्याच्या विचारांत विक्रमवर्मा होता. एवढ्यात मंत्री भद्रपाल याने त्याची भेट घेतली. त्यामुळे विजय प्राप्तीची



त्याला आशा वाटू लागली. 'आनंदवर्माच्या मृत्यूनंतर गादीला कुणी वारस नसल्यामुळे सेनापती समरसेन गादी बळकवील' अशी शंका भद्रपालच्या मनांत आली.

समरसेन जर राजा झाला, तर तो आपल्याला मंत्रीपदावरून नक्कीच काढून टाकील अशी भद्रपालला भीती वाटू लागली.

'किल्ला विक्रमवर्माच्या ताब्यात देऊन आपले मंत्रीपद टिकवावे,' असा त्याने विचार केला. व विक्रमवर्माशी गुप्त कट रचला.

भद्रपालच्या फितुरीमुळे, एके दिवशी रात्री विक्रमवर्माने आनंदपुरीचा किल्ला आपल्या ताब्यात घेतला. समरसेनसकट बऱ्याच अधिकाऱ्यांना बंदी बनविण्यात आले. भद्रपालच्या अपेक्षेप्रमाणे विक्रमवर्माने समरसेनला फांशी दिली नाही म्हणून भद्रपालची निराशा झाली.

एके दिवशी विक्रमवर्माने समरसेनला आपल्यापुढे बोलाविले व त्याला असे म्हणाला–"तुला फांशी द्यायचा मी विचार केला होता, परंतु तू माझ्या प्रती राजभक्ती दाखविलीस तर मी तुझी प्राणरक्षा करून तुझी परत सेनापती पदावर नियुक्ती करीन!"

ते ऐकून समरसेन म्हणाला की तो आनंदाने मृत्यूचे स्वागत करील पण विक्रमवर्माची चाकरी करणार नाही.

त्यावर विक्रमवर्मा म्हणाला–"ठीक आहे. तुझी अखेरची इच्छा कांही असली तर ती सांग!"

समरसेन म्हणाला–"महाराज, गेल्या कांही पिढयां पासून विक्रमपुरी व आनंदपुरीत, जी वारंवार युद्धे झाली, त्यांचे मूळ कारण 'कांही लोकांचा मूर्खपणा' होता, असे मला वाटते. तुम्ही विजेते आहात, म्हणून मी आपल्याला एक निवेदन करूं इच्छितो–आपण कृपा करून, आनंदपुरीच्या प्रजेवर न्यायपूर्ण शासन करावे, प्रजेला छळू नये!"





समरसेनचे बोलणे ऐकून विक्रमवर्माने त्याला फासावर तर चढविलेच नाही; उलट बंधमुक्त केले. आपल्या विश्वासार्ह गुप्तहेरांना त्याच्यावर पाळत ठेवायला नेमले.

मंत्री भद्रपालला वाटले की, विक्रमवर्मा आपल्याला मंत्रीपदावर नेमेल. परंतु बरेच दिवस लोटले तरी राजाकडून त्याला कसलाही निरोप मिळाला नाही. विक्रमवर्माला भद्रपालचे विस्मरण झाले होते. आपल्या कुशल शासन व्यवस्थेमुळे कालांतराने विक्रमवर्माचा चांगला नांव लौकिक झाला. आपल्या विरुद्ध, युद्धाला उभे राहिलेल्या अधिकाऱ्यांना त्याने कुठलीही शिक्षा केली नव्हती.

एके दिवशी समरसेनने विक्रमवर्माची भेट घेतली. आपण द्याल ती नोकरी करायला आपण स्वेच्छेने तयार आहोत. असे त्याने निवेदन केले.

हे ऐकून विक्रमवर्माला अत्यानंद झाला. त्याने समरसेनला आपला 'प्रमुख सल्लागार' म्हणून नेमले. तसेच "माझ्या अनुपस्थितीत, समरसेन माझा प्रतिनिधि म्हणून राज्य व्यवस्था सांभाळील." अशी घोषणा दिली.

इथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, विक्रमवर्मा व समरसेन विषयी माझ्या मनांत अनेक शंका येत आहेत. समरसेनने आधी 'युद्धाला आपला विरोध दाखवून विक्रमवर्माशी मैत्रीचे संबंध ठेवावेत,' असा आनंदवर्माला सल्ला दिला. परंतु जेंव्हा युद्ध सुरू झाले व आनंदवर्मा मृत्यु पावला, तेंव्हा त्याने विक्रमवर्माशी तह करण्याचे नाकारले. तसेच जेंव्हा विक्रमवर्माने, त्याला सेनापती बनवायचे ठरविले तेंव्हा त्याने ते पद अव्हेरले, नंतर मात्र तो विक्रमवर्माच्या दरबारांत कसलीही नोकरी पत्करायला तयार झाला.

तसेच विक्रमवर्माचे. त्याने आधी समरसेनला फांसावर द्यायचे ठरविले, व नंतर सेनापती पदावर नेमायची तयारी दाख-